# नाथांचा भागवतधर्म

लेखक,
प्रा श्रीधर रगनाथ कुळकर्णी
एम् ए पीएच डी



प्रस्तावना,
ह भ. प प्रा श वा दाडेकर.



श्रीएकनाथ संशोधनमंदिर, औरंगाबाद.

# प्रकाशकांचें निवेदन

फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तव हमाल भारवाही ॥

श्रीएकनाथ संशोधनमंदिराच्यावतीनें 'नाथांचा भागवतधर्म' ह्या संशोधनपर आणि विद्वत्ताप्रचुर मौलिक ग्रंथाचे स्वरूपांत यंदाच्या नाथषष्ठी महोत्सवाचे प्रसंगीं ही वाङ्मय-सेवा श्रीनाथांच्या चरणीं अर्पण करण्याची संधि मिळत आहे याबद्दल आनंद वाटतो

श्रीएकनाथांच्या वाङ्मयाचें संशोधन आणि त्यांच्या शिकवणुकीचा जनतेंत प्रसार हा जो संस्थेचा प्रमुख उद्देश आहे तो या प्रकाशनानें अंशत तरी सफल होईल अशी अपेक्षा आहे

गेल्या जन्माष्टमीस संस्थेनें सातव्या वर्षांत पदार्पण केलें या अल्पकाळात लहान मोठीं अशीं संतचरित्र व वाङ्मयात्मक नऊ प्रकाशनें संस्थेकडून झाली.

गतवर्षी ह भ प. धुंडामहाराज देगलूरकर यानीं लिहिलेला 'हरिपाठ-विवरण' हा भक्तिशास्त्राचें रहस्य अत्यंत सुलभ रीतीनें प्रतिपादन करणारा सुमारें आठशें पानांचा ग्रंथ संस्थेनें प्रकाशित केला या ग्रंथानें धार्मिक वाङ्मयात महत्त्वाची भर पडली आणि तो भागवतधर्मानुयायांत विशेषत वारकरी पंथात इतका मान्य आणि प्रिय झाला की, हातोहात त्याच्या साऱ्या प्रती खपल्या आणि अधिक पुस्तकांची मागणी अनेक ठिकाणाहून अद्यापि येऊ लागली आहे

प्रस्तुतचा ग्रंथ संशोधनपर आहे. या ग्रंथाचे कर्ते डॉ श्रीधरराव कुलकर्णी एम् ए. पीएच. डी , मराठी वाङ्मयाचे एक अभ्यासु व चिकित्सक प्राध्यापक आहेत. विद्यार्थीदशेपासून औरंगाबादच्या जीवनाशीं त्यांचा

संबध आला. पुढे स्वतत्र्याच्या चळवळीत त्यानी नाना प्रकारचे कष्ट सोसले आणि खडतर सेवा केली. अशारीतीनें राष्ट्रसेवेत काही काळ घालविल्यावर त्यानीं आपल्या आवडीच्या शिक्षणक्षेत्रात प्रवेश केला आणि अगच्या गुणाचें तेज प्रकट केलें सतवाङ्मयाकडे त्याचा नैसर्गिक कल असल्यामुळें त्या विषयावर काही व्याख्यानें देण्याची सस्थेनें त्याना विनति केली. त्या निमित्तानें नाथवाङ्मयाचे त्यानीं श्रद्धा, आस्था आणि परिश्रमपूर्वक परिशीलन करून त्यातून प्रस्तुत प्रबधाचें नवनीत काढले याच प्रबधावर उस्मानिया विद्यापीठानें डॉक्टरेटची उपाधि देऊन त्याचा बहुमानहि केला आहे. सस्थेवरील प्रेमामुळें आपला प्रबध या ग्रथाचे स्वरूपात प्रकाशित करण्याचें काम त्यानी सस्थेवर सोपविलें. आणि त्याची सारी जबाबदारी स्वत. पत्करून तें काम तडीस नेले याबद्दल सस्था त्याची अत्यत आभारी आहे नाथाच्या भाडारातून हा माल त्यानीं परिश्रमपूर्वक काढला. सस्था केवळ भारवाही आहे व जनतेपर्यंत तो माल आणून पोंहचता करण्याचें काम ती करीत आहे या सस्थेच्या मागील प्रकाशनाप्रमाणें जनतेकडून याहि प्रकाशनाचें उत्साहपूर्वक स्वागत होईल अशी अपेक्षा अप्रस्तुत होणार नाहीं.

अनेक कारणामुळें समग्र एकनाथदर्शनाचें महत्त्वाचें कार्य अद्यापि अपुरें राहिलें आहे तेंहि आता लवकरच पूर्णतेला पोंहचेल असा विश्वास निर्माण झाला आहे

सस्थेचा प्रपच वाढता आहे तशी नाथाची कृपाहि वाढती आहे. त्याचमुळें जनताजनार्दनाचा आश्रय आजवर सस्थेला लाभला व तिच्याकडून अल्पस्वल्प सेवा घडत आली यापुढेंहि संस्थेकडून अधिक प्रमाणात सेवा घेणें त्याच दैवी शक्तीकडे आहे! त्याकरिता नाथाच्या चरणी पुनरपि प्रार्थना करून हे निवेदन सपवितों

औरंगाबाद
नाथषष्ठी, शके १८७९

बळवत गिरिराव घाटे
अध्यक्ष,
श्रीएकनाथ सशोधनमंदिर

# श्रीएकनाथ संशोधनमंदिर

## संस्थेचें उद्दिष्ट

या सस्थेची स्थापना इ स १९५१ सालीं भगवान् श्रीकृष्णाच्या जन्मदिवशी खालील उद्देशानें झाली --

१ श्रीएकनाथ आणि इतर महाराष्ट्र सताच्या अप्रसिद्ध ग्रथाचे सकलन, सशोधन व प्रकाशन करणें

२ अशा ग्रथाच्या स्वस्त किंमतीच्या आवृत्त्या काढणें

३ मराठीतील सतवाङ्मयाचा राष्ट्रभाषेंतून आणि अन्य भाषातील सतवाङ्मयाचा मराठींतून अनुवाद करणें

४ सतचरित्रें आणि त्याच्या वाङ्मयासबधीं अधिकारी व विद्वान व्यक्तीचीं प्रवचनें करविणे

५ सास्कृतिक सशोधनाकरिता शिष्यवृत्त्याची योजना करणें

सार्वजनिक सस्थाच्या नोंदणी-कायद्यानुसार २४ डिसेंबर १९५२ रोजीं या सस्थेची नोंदणी करण्यात आली. या सस्थेच्या विश्वस्त मडळात ह भ प धुडामहाराज देगलूरकर, श्री. सेतुमाधवराव पगडी, उपसचिव शिक्षण-खातें, मुबई व श्री. बळवतराव घाटे भूतपूर्व सेशन्स जज्ज हे आहेत

## प्रकाशन-कार्य

संस्थेनें गेल्या सहा वर्षांत नऊ पुस्तकें प्रकाशित केलेली आहेत सस्थेच्या पुरस्कृत ग्रथात श्रीकृष्णदयार्णवाचा 'हरिवरदा' ग्रथ श्री कोपर्डेकर खण्डश. प्रसिद्ध करीत आहेत व त्याचे तीन खण्ड आतापर्यंत निघाले आहेत वे. शा स नारायणशास्त्री व्यास राक्षसभुवनकर यानी खेडो-पाडीं हिंडून सुमारें १५०० हस्तलिखितें गोळा केली आहेत. त्याची सूचि तयार करण्यात आली असून सशोधनाचें काम लौकरच हातीं घेण्यात

येईल संस्थेच्यावतीनें भारत इतिहाससंशोधन मंडळाचे श्री शंकरराव जोशी यानीं पैठण तालुक्यात हिंडून पैठणमाहात्म्यासंबंधी एक माहितीपूर्ण ग्रंथ प्रसिद्ध करण्याची सामग्री गोळा केली आहे तो ग्रंथ लौकरच प्रसिद्ध होईल प्रतिवर्षी नाथषष्ठीचे उत्सवात संस्थेच्यावतीनें महाराष्ट्र संताच्या वाङ्मयावर प्रकाश पाडणारे प्रबंध वाचले जातात आणि अधिकारी व्यक्तींची प्रवचनें करविण्यात येतात

संस्थेच्या संग्रहात सध्या सहाशें उपयुक्त ग्रंथ आहेत श्री काकासाहेब गाडगीळ, डॉ हर्षे, संकेश्वरपीठाचे जगद्‌गुरु शंकराचार्य व प्राचार्य सीनोपंत दांडेकर इत्यादींनी संस्थेचें कार्य पाहून समाधान व्यक्त केलें आहे

कार्यारंभीं या संस्थेला राष्ट्रपति बाबू राजेंद्रप्रसाद यांचा आशीर्वाद लाभला त्यांच्या इच्छेनुसार महाराष्ट्र संतांची चरित्रें व वाङ्मययाचा हिंदी भाषेंतून अनुवाद करण्याचें काम संस्थेने हातीं घेतलें आहे 'एकनाथ और तुलसीदास' या आमच्या प्रकाशनास उत्तरप्रदेश सरकारनें २५० रु. चें पारितोषिक दिले आहे आतापर्यंतचीं प्रकाशनें पुढीलप्रमाणे आहेत :

१ **एकनाथदर्शन**

२ **पैठणचे नाथ** — श्री महादेवशास्त्री जोशी

३ **श्रीअमृतरायचरित्र** — ,, विष्णु बाळकृष्ण कन्नडकर.

४ **सूफीपंथ** — ,, सेतुमाधवराव पगडी, उपसचीव, शिक्षणखातें.

५. **एकनाथ और तुलसीदास** (हिन्दी) — श्री जगमोहनलाल चतुर्वेदी.

६ **हरिपाठ विवरण** अर्थात् **भक्तिशास्त्ररहस्य** — ह. भ प धुंडामहाराज देगलूरकर

७. **कै विनायकबुवा टोपरे** यांचा कवितासंग्रह

८ **बालयोगी ज्ञानेश्वर** (हिन्दी) } — श्री. जगमोहनलाल चतुर्वेदी,

९ **बालभक्त ज्ञानेश्वर** ( ,, ) } भू प्रिं. ट्रे. कॉ

१० **नाथांचा भागवतधर्म** डॉ. श्रीधर कुळकर्णी.



संस्थेची संकल्पित इमारत

संस्थेची स्वतंत्र इमारत असणें अवश्य होतें म्हणून या जिल्ह्यातील उदार अंतःकरणाच्या सज्जनांकडे द्रव्यसाहाय्याची मागणी केली. आतापर्यंत त्यांनीं वीस हजार रु. चें साहाय्य केलें. त्यामुळे खडकेश्वर मंदिराच्या आवारात एका सुंदर व भव्य इमारतीचा फक्त तळमजला तयार करता आला. अद्यापि वरच्या मजल्याचे बांधकामाकरिता आणि ग्रंथसंग्रहाकरिता किमान तीस हजारांची आवश्यकता आहे. संतवाङ्मय आणि तत्त्वज्ञान यांच्या संशोधनाचें हे एक महत्त्वाचे केंद्र बनवावें अशी इच्छा असल्यामुळें इंग्रजी, हिंदी आणि मराठी भाषांतून प्रसिद्ध झालेल्या अशा प्रकारच्या वाङ्मयाचा या ठिकाणी संग्रह करण्याचें योजिलें आहे. आगामी मराठवाडा विद्यापीठाच्या आकांक्षा पूर्ण करण्याकरिता आणि जनतेला भारतीय संस्कृतीचें खरेखुरें दर्शन घडविण्याकरिता अशा प्रकारच्या संस्थेची किती आवश्यकता आहे हे सांगणें नको. तेव्हा या सत्कार्यास आपण मुक्तहस्ताने अंतःकरणपूर्वक साहाय्य करून श्रेय व प्रेय संपादावें ही नम्र विनंति आहे.

आपले नम्र

**अध्यक्ष व कार्यकारी समिति.**

# ऋणनिर्देश

जनस्वरूपी जनार्दनाचे चरणीं “नाथाचा भागवतधर्म” समर्पित करताना मला धन्यता वाटत आहे श्रीएकनाथ सशोधनमदिराने सुमारें सहा वर्षांपूर्वी नाथवाङ्मया-वर काही व्याख्यानें देण्याची आज्ञा केली होती त्यानिमित्ताने सतश्रेष्ठ श्रीएकनाथ याच्या वाङ्मयाचा अभ्यास करीत असताना नाथोक्त भागवतधर्मात आढळून येणाऱ्या आगळ्या वैशिष्ट्याचा प्रत्यय आला उस्मानिया विद्यापिठाच्या पीएच डी पदवीसाठी देखील हाच विषय घेतला विद्यापीठानें या प्रबधास मान्यता दिली विद्यपीठानें मान्य केलल्या प्रबधात आवश्यक तो सक्षेपविस्तार करून श्रीएकनाथ सशोधनमदिराच्या वतीनें हा प्रबध प्रकाशात येत आहे

उस्मनिया विद्यापिठाने नेमलेले मार्गदर्शक गुरुवर्य प्राचार्य र म भुसारी याचें अमोल मार्गदर्शन लाभल्यामुळे नाथवाङमयाचें शास्त्रीय सशोधन करणें मला शक्य झालें प्रबधात असलेल्या सर्व गुणाचें श्रेय त्याचेंच आहे दोषाचा धनी मात्र मीच आहे गुरुवर्यांच्या मार्गदर्शनाबद्दल मी त्याच्या ऋणी आहे प्रबधाचे सहृदय परीक्षक । यानीं केलेल्या उपयुक्त सूचनाबद्दल मी उभय परीक्षकाचा आभारी आहे प्रबधाचे प्रकाशन करण्यास अनुमति दिल्याबद्दल उस्मानिया विद्यापिठाचे आभार मानणेंहि आवश्यक आहे प्रबधाचें लेखन चालू असताना वेळोवेळी उपयुक्त सूचना करून वारवार उल्हसित करणारे माझे स्नेही प्रा भा श कहाळेकर याचे केवळ औपचारिक आभार मानणें त्याना रुचणार नाहीं म्हणून त्याच्या सहकार्याचा उल्लेख तेवढा करतों निजाम कॉलेजमधील माझे सहकारी प्रा पाडुरगाचार्य वैद्य याच्या सहकार्यामुळें कानडी भाषेतील भक्तिसप्रदायाचें समालोचन करणें शक्य झालें प्रा वैद्य व प्रा खडेराव देशपांडे याच्या साहाय्याबद्दल मी त्याचा आभारी आहे

कामाचा भरपूर व्याप आणि प्रकृतीचें अस्वास्थ्य असतानाहि ह भ प प्रा सोनोपत दाडेकर यानीं माझ्या विनतीस मान देऊन प्रस्तवना लिहून या परिश्रमावर कळस चढविला याबद्दल मी प्रा दाडेकर याचा ऋणी आहे

सतवाङमयावर अपार निष्ठा बाळगणारे मदिराचे अध्यक्ष श्री बळवतराव घाटे, आपल्या शिष्यावर पुत्रवत् प्रेम करणारे गुरुवर्य प्राचार्य यत्ते, सस्थेचे कार्यवाह श्री. लक्ष्मण-राव कुळकर्णी याच्याविषयीं वाटणारी कृतज्ञता शब्दातीत आहे

जयहिंद प्रेसचे उत्साही व्यवस्थापक व माझे जुने स्नेही श्री जगन्नाथराव बर्दापुरकर यानी अत्यत आस्थेनें सुबक छपाई केली व्यावसायिक जबाबदारीपेक्षाहि मित्र-प्रेमानें त्यानी हें कार्य केल्यामुळें श्रीएकनाथ षष्ठीच्या सुमुहूर्तावर ग्रथाचें प्रकाशन होऊ शकलें श्री बर्दापुरकर, त्याचे सहकारी व मुद्रणाबाबत अनुभवाचा सल्ला देणारे लक्ष्मी-आर्ट प्रेसचे मालक श्री जी नारायणराव या सर्व सन्मित्राचा मी आभारी आहे

श्रीएकनाथ षष्ठी, शके १८७९ (१० मार्च १९५८) — श्रीधर कुळकर्णी.

# प्रस्तावना

महाराष्ट्रात जें भव्य भागवतधर्म-मदिर उभारलें गेलें त्याच्या ध्वजाच्या ठिकाणी बहिणाबाईनी 'जनार्दन एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥' म्हणून ज्याच्या ग्रथाची स्थापना केली ते पैठणचे श्रीएकनाथ हे एक मध्ययुगामध्यें अलौकिक पुरुष होऊन गेले ज्ञानदेवानतर त्यानीं अपार ग्रथसपत्ति निर्माण करून महाराष्ट्र वाङ्मयात मोलाची भर टाकली आत्मज्ञानसपन्न होऊन पुराण कीर्तनद्वारा भागवतधर्माचा प्रसार केला व याप्रमाणें भागवतधर्मास उजळा देऊन हजारों जीव सन्मार्गास लावले फार काय ज्याची 'स्वकरें चदन घासणें', 'पाणी भरणें' या सारखीं कामें 'न सागता करण्यात' प्रत्यक्ष माधवजी याना आनद वाटावा अशी जी थोर विभूति होती ती सोळाव्या शतकाच्या अखेरीस पैठणात होऊन गेली त्यांच्या ग्रथाची छाप त्याच्या मागून झालेले समर्थ, तुकारामबोवा, दासोपन्त, मुक्तेश्वर प्रभृति थोर सन्त व पडितकवि या सर्वांवर पडलेली आहे

नाथाचें इतकें थोर कार्य असूनसुद्धा ज्ञानदेव, तुकारामबोवा, समर्थ याच्या ग्रथासबधीं जितकें लिखाण प्रसिद्ध झालें आहे तितकें नाथाच्या सबधानें झालेलें दिसत नाहीं. या म्हणण्याचा हेतु असा कीं, इतर सन्ताप्रमाणें नाथाचींहि चरित्रे वेगवेगळ्या चरित्र-लेखकानीं जरी लिहिलेलीं असली तरी ज्ञानेश्वराच्या ज्ञानेश्वरीचा, तुकारामबोवाच्या गाथ्याचा अथवा समर्थाच्या दासबोधाचा अभ्यास करून ज्या-

प्रमाणें अनेक लेखकानी आपले विचार प्रबधरूपानें माडले आहेत तसे नाथाच्या भागवताचा, भावार्थरामायणाचा अथवा भारुडाचा अभ्यास करून तद्विषयक फारसे ग्रथ अझून निर्माण झालेले नाहींत नुकताच एकनाथदर्शन म्हणून औरगाबाद येथील एकनाथमडळानें एक ग्रथ सपादित केलेला आहे त्याव्यतिरिक्त या ग्रथासबधीं मराठी वाङ्मयाच्या इतिहासामध्यें काही त्रोटक माहिती मिळते एवढेंच ही उणीव डॉ कुळकर्णी यानी पुष्कळसा अभ्यास करून तयार केलेल्या या प्रस्तुत ग्रथानें भरून निघेल असें वाटतें आणि म्हणून हा प्रबंध लिहिल्याबद्दल डॉ कुळकर्णी याचें अभिनदन करणें जरूर आहे

या ग्रथाचा आणखीहि एक विशेष आहे. तो म्हणजे डॉ कुळकर्णी याची नाथाच्या भागवतधर्माकडे पाहण्याची नवीन दृष्टि हा होय नाथाच्या सबधी आजवर ग्रथ झाले त्यात नाथाच्याकडे जुन्या दृष्टीनें — म्हणजे ज्यानी हरिभक्तीचा महिमा विशेष वाढविला असे थोर भागवद्भक्त याच दृष्टीनें — बघून त्याच्या विषयीचें बहुतेक लिखाण लिहिलें गेले आहे प्रस्तुतच्या प्रबधात डॉ कुळकर्णी यानीं एका नव्या दृष्टीनें श्रीएकनाथाच्या कार्याकडे बघितलें आहे व ती दृष्टि म्हणजे वेदातील 'ऋत' या शब्दात व्यक्त झालेली विश्वव्यवस्थेची कल्पना-माणसाचें कर्तव्य स्वत . पूर्ण होऊन विश्वास पूर्ण होण्याकरता अविरत कार्य करीत राहणें, किंबहुना पुरा विश्वविकास झाल्याशिवाय जीवाची पूर्णता होत नाहीं—नारायणीयधर्म म्हणून भारतात, निष्काम कर्मयोग म्हणून भगवद्गीतेंत व भागवतधर्म म्हणून श्रीमद्भागवतात व्यक्त झालेली आपणास दिसते तिचाच महाराष्ट्रात नाथाच्या भागवत-धर्मांत आपणास आविष्कार दिसतो थोडक्यात सागावयाचें म्हणजे नाथाचा भागवतधर्म म्हणजे वेदातील 'ऋताचा' महाराष्ट्रीय अवतार होय. या प्रमेयाची स्पष्टता व्हावी म्हणून जरा मोठा पण कल्पना स्पष्ट करणारा पान २९ वरील उतारा देतों :

"भागवतधर्म हा भक्तिप्रधान आहे. इतर बाबींना महत्त्व नाहीं असें नाहीं परन्तु भक्तीचें मूलाधिष्ठान या धर्मास असल्यानें

भक्तीचें स्वरूप समजावून घेणें अगत्याचें ठरतें. नाथांची भक्ति कल्पना फारच व्यापक आहे. भागवतधर्माच्या मूलप्रेरणेंतून ती परिणत झाली आहे. ऋत किंवा धर्म या भक्तीचें किंवा भागवत-धर्माचें अधिष्ठान आहे. विश्वाचा विकास विशिष्ट नियमानें होत असतो. वेदांत यालाच 'ऋत' ही संज्ञा दिली आहे. ज्या नियमानें विश्व बद्ध झालें आहे, विश्वाचें संवर्धन ज्यायोगें होतें, देव ज्याचें स्वतः रक्षण करतात त्यास ऋत म्हणतात, त्यामुळें देवांच्या आणि सज्जनांच्या मार्गास 'ऋतस्य पन्था' असें संबोधण्यात येतें. ऋताशीं अविरोधीच नव्हे, तर पोषक व संवर्धक असें सज्जनांचें वर्तन असतें. म्हणून देव ज्या विश्वनियमांचें परिपालन करतात तोच मार्ग सज्जनहि अवलंबितात. याचाच अर्थ असा होतो कीं, ऋताच्या म्हणजे विश्वाच्या प्रगतीस पोषक असेल तें सत्कर्म आणि विरोधी असेल तें असत्कर्म. सत् या शब्दाचा अर्थ देखील सतत टिकणारें किंवा शाश्वत असा होतो. ज्याचें निर्मूलन होऊ शकत नाहीं तें सत् किंवा कर्म हा अर्थहि यामुळेंच ऋताला आला. सत्य आणि कर्म हे अविनाशी असल्यामुळें तें ब्रह्मसंज्ञक बनलें. परमेश्वर-स्वरूप आणि परमेश्वरप्राप्तीचा उपाय असा यज्ञ ऋताच्या रूपानें याज्ञिकांनीं पाहिला. म्हणूनच भिन्न काळांत सत्य, ब्रह्म, यज्ञ, धर्म असे पर्यायवाचक शब्द ऋताचा निर्देश करण्यासाठी अस्तित्वात आले. कारण, सत्याच्या आराधनेसाठीं, ब्रह्माच्या प्राप्तीसाठीं किंवा यज्ञाच्या परिपूर्तीसाठी होणारें कर्म आपण ऋतसंवर्धनार्थच करीत आहोंत ही प्राचीनांची श्रद्धा होती. हीच श्रद्धा पुढें धर्म या संज्ञे-च्याद्वारें व्यक्त होऊं लागली."

आपण हा नवा दृष्टिकोन लावून नाथांच्या ग्रंथांचें स्वरूप सांगत आहोंत व त्यांच्या कार्याचें मूल्यमापन करीत आहोंत, ही जाणीव डॉ. कुळकर्णी यांच्या ठिकाणी असल्यानें या ग्रंथाचीं शेवटचीं चार १५ ते १८ प्रकरणें प्रत्यक्ष 'एकनाथप्रणीत भागवतधर्म' याच्या चर्चेस दिलेलीं आहेत. १२ ते १४ प्रकरणें नाथांचें चरित्र, वाङ्मय याकरता खर्चिलीं आहेत व पहिलीं ११ प्रकरणें म्हणजे दोनशेंवर पानें ऋत या

कल्पनेचें स्वरूप व तिचा वेळोवेळी झालेल्या आविष्काराचा इतिहास सागण्यात खर्च झालेलीं आहेत व या गतिमान् धर्माचा इतिहास श्रीएकनाथ–कालापर्यंत आणून ठेवला आहे येवढेंच नव्हे तर तो आचार्य विनोबा भावे याच्या कालापर्यंत आणून ठेवला आहे

भारताच्या सास्कृतिक इतिहासामध्यें डॉ कुळकर्णी याच्या मतें भागवतधर्माचें केवढें मोठें स्थान आहे हे पान दोन वरील पुढील परिच्छेदावरून वाचकाच्या लक्षात येईल. ते म्हणतात :–

> 'भागवतधर्माच्या या वैशिष्ट्यामुळेंच धार्मिक व राजकीय नैराश्याच्या काळात भारताला स्फूर्ति देण्याचें कार्य या धर्मानें केलें आहे अगदी अर्वाचीन काळाचा इतिहास घेतला तरीहि या सत्याचा प्रत्यय येतो इस्लामी आक्रमणाने निर्माण झालेल्या धार्मिक अराजकास भारताने तोंड दिलें तें भागवतधर्माच्या प्रसारानेंच इस्लामी आमदानीत आधुनिक भारतीय भाषातून सर्वत्र भागवतधर्माचा पुरस्कार झालेला आढळून येतो पुढें ब्रिटिश आमदानीत इग्रजी सत्तेच्या बळावर आगेकूच करणाऱ्या खिस्तीधर्माला पायबद घालण्याचें कार्य करण्याची स्फूर्ति भागवतधर्मानेंच भारताला दिली लोकमान्याचे जीवन आणि त्यानी मडाले तुरुगात लिहिलेलें 'गीतारहस्य' भागवतधर्माच्या आद्यग्रथापासून-श्रीमद्भगवत्गीतेपासून मिळालेल्या स्फूर्तीचाच परिपाक होय. राष्ट्रपिता महात्मा गाधी याचे 'अहिंसा-दर्शन' भगवद्गीतेच्याच आधारानें प्रकट झालें अगदीं अलीकडच्या काळात साऱ्या विश्वाचें लक्ष वेधून घेणारे आचार्य विनोबा भावे याच्या रूपानें गीतेंतील स्थितप्रज्ञ साकारलेला दिसून येतो'

हा भागवतधर्मविषयक ग्रथ लिहिताना डॉ. कुळकर्णी यानीं नुसतें भागवतधर्माच्या इतिहासातील घटना कशा घडत गेल्या याचें वर्णन केलें नसून त्याचा अन्वयार्थ (Interpretation) अथवा त्याची नवी उपपत्ति एका वेगळया दृष्टीनें लावण्याचा प्रयत्न केला आहे. त्याबद्दल त्याचे अभिनदन करणें अवश्य आहे. त्यांच्या दृष्टीनें

वर म्हटल्याप्रमाणें ज्या ज्या वेळी भारतावर सकट आले त्या त्या वेळीं भारतीय श्रेष्ठीनी या भागवतधर्मांचा कालानुरूप जीर्णोद्धार केला व भारतास वाचवलें हा इतिहास सागण्याकरता ग्रथाची दोनशेंवर पानें खर्ची पडलीं आहेत इतकी पानें खर्च करण्याचें कारण एका दृष्टीनें हा नाथाच्या भागवतधर्मांचा इतिहास नसून वेदातील 'ऋता'चा-भारतातील भागवतधर्मांचा–इतिहास आहे.

आपल्या या उपपत्तीचें विवेचन करताना जी माडणी डॉ. कुळकर्णी यानीं केली आहे त्यावरून त्याचा गाढा अभ्यास, विस्तृत वाचन व खोल जाऊन विचार करणारी बुद्धि दिसून येते प्रत्येक प्रकरणाच्या शेवटीं सदर्भ-टीपा म्हणून दिलेल्या आहेत यामुळे या ग्रंथात 'नामूल लिख्यते' ही गोष्ट तर उघड होतेच पण या ग्रथाकरता किती विविध प्रकारचें वाचन डॉ कुळकर्णी यानीं केलें आहे हे प्रत्ययास येतें डॉ, कुळकर्णी यानीं इतका परिश्रमपूर्वक हा निबध तयार केला याबद्दल ते खरोखर अभिनदनास पात्र आहेत डॉ· कुळकर्णी याच्या निबधाचीं मुख्य प्रमेयें पुढील त्याच्या तीन वाक्यात देता येतील :–

'भागवतधर्माची ऋतप्रेरणा जागवावयाची हे नाथाचें ध्येय' . (पान ३१९)

"भागवतधर्मातील भक्ति केवळ भजनात्मिका अथवा रागात्मिका नाहीं ती निष्काम कर्मयोगाधिष्ठित आहे· निष्काम कर्मयोग हेच भजन आहे·" (पान ३०३)

त्याच्या ग्रंथाचें सार पुढील त्याच्या वाक्यात देता येईल :

"भागवतधर्माची ऋतप्रेरणा नाथानीं बुद्धीनें जाणली, भावनेनें आकळली, आचारानें साकारली, वाणीनें प्रकाशिली म्हणून ते भागवतधर्माचे थोर प्रकाशक ठरतात" (पान २९७)

या प्रमेयाच्या मूल्याचा विचार करावयाचा म्हणजे ऋताचें वेदात स्थान कोणतें, त्याचा भागवतधर्म हा आविष्कार कसा ? डॉ कुळकर्णी यानी वर्णिलेलें नाथाच्या भागवतधर्माचें स्वरूप हेच त्याचें वास्तव स्वरूप का ? नाथाच्या पूर्वीच्या श्रीज्ञानदेवानीं या भागवतधर्मांचा

पुरस्कार केला किंवा नाही की, नाथाचेंच हे वैशिष्टय आहे ? इत्यादि प्रश्नाचा विचार होणें आवश्यक आहे या बाबतीतील सर्वच त्याचीं मतें सर्वांना मान्य होतील असें नाहीं उदाहरणार्थ वेदात 'ऋत' या कल्पनेला फार महत्त्व आहे हे खरें पण, नाथाच्या पूर्वी ज्ञानदेवाना त्याचें दर्शन झालेच नव्हतें, नाथ तेवढेंच समाजोन्मुख व त्याच्या पूर्वी कोणी महाराष्ट्रीय सत असा द्रष्टा झाला नाहीं व नतरहि झाला नाही– इत्यादि त्याचे निर्णय सर्वांना मान्य होण्यासारखे नाहींत त्याच प्रमाणे शकराचार्य, ज्ञानदेव व एकनाथ याची तुलना करून काढलेले निर्णयसुद्धा सर्वांना मान्य होतीलच असें नाहीं तरीपण मुख्य प्रमेय श्रीएकनाथानीं 'हरिची समाधि' सागितली अविरत कर्म करीत राहण्यात समाधिभग होत नाहीं, किंबहुना ज्ञात्यानें जगदुद्धार केला नाही तर तें त्याचें भडपण आहे हे आवर्जून स्वच्छपणें माडलें आहे ही गोष्ट खरी व हीच प्रामुख्यानें डॉ कुळकर्णी यानीं अभ्यासून या ग्रथात मडली आहे.

आपलें प्रमेय माडण्याकरता डॉ कुळकर्णी यानीं केवढा अभ्यास केला आहे हे त्याच्या टीपावरून चटकन् लक्षात येईल प्रस्तुतचा ग्रथ हा त्याच्या डॉक्टरेटच्या निवधाची थोडी वाढ करून काढलेली आवृत्ति हे लक्षात घेतलें म्हणजे त्यानीं आपल्या पदवीकरता केवढा अभ्यास केला हेहि लक्षात येण्यासारखें आहे व म्हणून असें म्हणावेसें वाटतें कीं, मराठी भाषेचें भवितव्य उज्वल आहे कीं जिचे डॉ. कुळकर्णी याच्या सारखें अभ्यासू खोल व विस्तृत वाचन व स्वतत्रपणें विचार करून तिच्या वाङ्मयात मोलाची भर घालीत आहेत.

या निबधासबधीं एक सूचना करावीशी वाटतें. ती ही कीं, श्रीएकनाथ समाजजागृतीचें जें भरीव कार्य करूं शकले त्याचा आधार दोन गोष्टी: आत्मानुभूति व हरिकीर्तन कीं जें श्रीनाथाच्या घरीं 'नित्य नवा' रंग वोढवित असे. नाथाच्या भागवतधर्माचा विचार करताना याचा जितका विस्तृत विचार मुळात व्हावयास पाहिजे होता

तितका झाला नाहीं. परिशिष्टात त्यास स्थान् मिळालें आहे पुढील आवृत्तींत हे गौणस्थान काढून कर्माबरोबर त्याचाहि पाट माडला जाईल अशी आशा आहे.

विषयाच्या स्पष्टतेकरता लहान लहान प्रकरणें करून, सदर्भ टीपा देऊन अभ्यासकाची मोय लेखकानीं चागली केली आहे श्रीनाथ, भागवतधर्म यावरील अद्यावत् वाङ्मय वाचून मराठीत एका मौल्यवान् ग्रथाची भर घातली याबद्दल डॉ. कुळकर्णी याचे पुनः अभिनदन करतों.

श्रीएकनाथ डॉ. कुळकर्णी याच्याकडून अशीच सेवा घेवोत !

मुंबई
फा शु. ११, शके १८७९ — शं वा. दाडेकर
२–३–५८

# विषयानुक्रम

( कसात दिलेले आकडे पृष्ठाचे आहेत )

## ५. नारायणीय धर्म (६८ ते ८०).



## ६. गीता ते भागवत (८३ ते ९८).



## ७. भागवतपुराणोक्त धर्म (१०१ ते १२५).



## ८. 'भाष्यकारांतें वाट पुसतु' (१२८ ते १३८).



## ९. भागवतधर्माचें मध्ययुगीन स्वरूप (१४० ते १६२).

## तृतीय खंड : श्रीएकनाथप्रणीत भागवतधर्म [ १६५ ते ३३८ ]

### १०. 'ज्ञानदेवें रचिला पाया' (१६६ ते १८२).



### ११. 'धर्म जागो पंढरीचा' [१८६ ते २०२].



### १२. एकाजनार्दनाचा वृत्तांत [२०४ ते २२०].



### १३. वाङ्मयोपासक एकनाथ [२२३ ते २४६].



### १४. नाथकालीन राजकारण व समाजकारण [२५० ते २६१].

---



श्रीएकनाथचरणीं -

किंबहुना तुमचें केलें धर्मकीर्तन हें सिद्धी गेलें
येथ माझें जी उरलें पाईकपण ॥

- ज्ञा १८-१७९२

# भूमिका

महाराष्ट्राचें जीवन पाडुरगक्षेत्रीं उगम पावलेल्या भागवतधर्मरूपी चद्रभागेने समृद्ध केलें आहे 'फेडीत पाप-ताप' पोखीत तिरींचे पादप' हा अखड प्रवाह गेलीं सुमारें सात शतकें मराठी मनाला 'सुजल' आणि 'सुफल' करीत आला आहे या पावन प्रवाहानें महाराष्ट्राचें स्वराज्य पाहिलें तसेंच 'दुर्दिनाहि. महाराष्ट्राच्या जीवनातील वसत-शिशिरादि सर्व ऋतूना हा प्रवाह साक्षीभूत होता परतु त्याचें 'जीवन' कधींच खडले नाही अनेक पथोपपथ आले आणि गेले तरी याचें कार्य मात्र अविरतच. 'हे विश्वचि माझें घर : ऐसी मती जयाची स्थिर . किंवा चराचर : आपण जाहला' या भागवतोत्तमाच्या लक्षणाप्रमाणें महाराष्ट्राचें शीलसवर्धन आणि सत्त्वरक्षण या प्रवाहानें केलें आहे म्हणूनच मराठी भाषिकाच्या जीवनेतिहासात भागवतधर्मास अनन्यसाधारण असें स्थान प्राप्त झाले

'ज्ञानेशो भगवान् विष्णु.' हे महाराष्ट्रातील भागवतधर्मसरितेच्या उगमस्थानीं आहेत या सरितेच्या पात्रावर सुगम, सुदर आणि भरभक्कम घाट एकनाथानीं बाधला महाराष्ट्रातील भागवतधर्माच्या विकासात नाथानी केलेल्या अलौकिक व असाधारण कार्याचें मूल्यमापन आतापर्यंत व्हावें तसें झालें नाही. ज्ञानेश्वराच्या वाङ्मयाचा अभ्यास कोणत्या का स्वरूपात होईना बराच झाला आहे. समर्थ रामदासाना बरेच अभ्यासक लाभले अनेकानी आपलें जीवन त्याच्या वाङ्मयाचें सशोधन व प्रकाशन करण्यासाठीं खर्ची घातलें. परंतु, एकनाथानी केलेलें कार्य असाधारण असूनहि भागवतधर्माच्या परपरेंत असलेल्या त्याच्या महतीवर पुरेसा प्रकाशझोत पडला नाही

सताच्या साहित्याचा अभ्यास म्हणजे सतवाङ्मयातील शब्दसपत्तीच्या स्वरूपाचें परिशीलन नव्हे नरात आढळून येणाऱ्या नारायणस्वरूपाची ओळख पटवून देण्यासाठी त्यानीं केलेल्या प्रयत्नाचें अवगमन करणें हाच

खऱ्या दृष्टीनें संताच्या साहित्याचा अभ्यास होय केवळ शब्द निष्प्राण असतात शब्दाच्या आवरणात असलेल्या चैतन्याचे दर्शन घडल्याविना शब्दज्ञान अपूर्ण राहतें या जाणीवेनें नाथाच्या साहित्याचें परिशीलन व्हावयास हवें

महाराष्ट्राच्या इतिहासात 'आस्मानी–सुलतानी'च्या काळात नाथाचा उदय झाला. ज्या वास्तूची पायाभरणी ज्ञानेशानीं केली होती तो पायाच खिळखिळा झाला होता ज्ञानेशाच्या कंठास 'अज्ञानवृक्षाची मुळी' लागली होती, आणि ज्ञानेश्वरी पाठातरानी 'अबद्ध' बनली होती म्हणजेच ज्ञाने-श्वरोक्त ज्ञानास अज्ञानानें पूर्णपणे ग्रासलें होतें एकनाथानीं ज्ञानेश्वराच्या समाधीचा जीर्णोद्धार केला व ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली या जीर्णोद्धाराच्या आणि सशोधनाच्या मुळाशीं भागवतधर्माच्या पुनरुत्थापनाची प्रेरणा होती म्हणूनच 'जनार्दनएकनाथ: स्तंभ उभारिला भागवत' असे उद्गार बहिणाबाईंनीं काढले आहेत नाथानीं ज्ञानेश्वरोक्त धर्मास कालसापेक्षता ध्यानात घेऊन उजळा दिला व स्वतःच्या कर्तृत्वाचा भक्कम आधारस्तंभ उभारून भागवतधर्माचे पुनरुज्जीवन केलें या आधारस्तभानें महाराष्ट्राचा कणा ताठ राहिला व तो नतमस्तक न बनता उन्नतमस्तक होऊन लवकरच स्वराज्याच्या सिंहासनावर आरूढ झाला नाथोक्त भागवतधर्मामुळें महाराष्ट्राच्या शिवशक्तीचें नवजागरण झालें म्हणून मराठी मन, मराठी माणूस आणि मराठी सस्कृति यात आढळून येणाऱ्या वैशिष्ट्याचें यथार्थ आकलन होण्यासाठीं नाथोक्त भागवतधर्माचा अभ्यास आवश्यक ठरतो.

महाराष्ट्रात झालेला भागवतधर्माचा आविष्कार इतर भाविकाच्या मानानें व तुलनेनें वैशिष्ट्यपूर्ण आहे हे अभ्यासकानी मान्य केलें असलें तरी या वैशिष्ट्याच्या उगमाची व स्वरूपाची शास्त्रीय कारणमीमासा अद्याप झाली नाहीं याचीं पुढील कारणें देता येतील (१) भारतीय इतिहास व सस्कृति याच्या विकासक्रमातील वैदिक संस्कृतीचें ऋण लक्षात न घेता मराठी संतवाङ्मयाचें होणारें समालोचन. (२) गीता व भागवत एवढयाच दोन ग्रथावर भागवतधर्माच्या उगमाच्या दृष्टीनें केंद्रित झालेली दृष्टि महाराष्ट्राच्या व विशेषत. एकनाथाच्या भागवतधर्माच्या समग्रदर्शनासाठीं ही दृष्टि अपर्याप्त ठरते

'धर्म केवळ पारलौकिक कल्याणाचाच विचार करतो इहलोकीच्या जीवनाशीं त्याचा मुळीच सबंध नाही' अशा स्वरूपाचे गैरसमज जाण-त्याचेहि ठिकाणी असल्यामुळें ऐहिक दृष्टिकोनातून धार्मिक विचार-विकासाचा अभ्यास झाला नाहीं तसेंच सामाजिक परिस्थिति व धर्माचें स्वरूप याचे अन्योन्य सबध देखील विचारात घेतले नाहीत वैदिक धर्मपरपरेस समाजशास्त्र अज्ञात होतें हा अपसिद्धात या अज्ञानाचे पोटी जन्मास आला आहे समाजशास्त्राचा अभ्यास फक्त पाश्चिमात्य राष्ट्रात झाला असे गृहीत धरून पाश्चिमात्य समाजाच्या विकासाचा क्रम पौर्वात्य समाजविकासात गृहीत, धरण्यात येतो अथवा ठोकळेबाज समाजशास्त्रीय निकष लावून भारतीय समाजप्रगतीचें मूल्यमापन होत असतें. या 'नव्या' दृष्टीचा स्वाभाविक परिणाम वैदिक परपरेंतील 'सत्य' आणि 'सत्त्व' याच्या अदर्शनात होतो. अनेक विद्वानानीं महाराष्ट्राच्या सास्कृतिक इतिहासात वैदिक सस्कृतीचें ऋण मान्य केले आहे मात्र महाराष्ट्राच्या संस्कृतीचा विचार करताना या अनुबधाचें स्वरूप मुळींच स्पष्ट केलें नाहीं. म्हणून हा सिद्धात शास्त्रीय सत्य न वाटता पारंपरिक अभिमानानें प्रतिपादिलेले गृहीत-तत्त्व वाटतें. परिणामी वैदिक सस्कृतीचें धारण-पोषणात्मक सार्व-कालीन स्वरूप अगोचरच राहतें.

भागवतधर्माच्या उगमाचा शोध करीत करीत वेदवाङ्मयापर्यंत जावें लागतें समाज-विकासाच्या व्यापक व उदात्त तत्त्वावर वैदिक धर्माची उभाग्णी करण्यात आली आहे हे वैदिक धर्माच्या परिशीलनानें स्पष्ट होतें वेदोक्त धर्म 'ऋता'च्या महान् ध्येयवादाने प्रेरित झाला आहे. वैदिक देवताचा हा समान धर्म विश्व, समाज आणि व्यक्ति याचा विकास परस्परपूरक मानतो 'ऋतातून विश्वाचा उदय झाला,' 'ऋतानें राजा वरुण विश्वाचें सरक्षण करतो,' ऋताच्या प्रकाशततूनीं विश्व विणलें आहे,' 'ऋतरक्षणार्थ देव धृतव्रत असतात,' 'सज्जनाचा व देवाचा मार्ग ऋताचा असल्यानें या मार्गावर प्रकाशाचे साम्राज्य असतें' हा ऋतमय ध्येयवाद ऋग्वेदातील धर्मतत्त्वाचे सारसर्वस्व आहे विश्व आणि मानव याच्या परस्परपूरक विकासाशीं सवादी असलला धर्म ऋतरूपानें वेदानी सागितला आहे.

हे ध्यानात घेतलें म्हणजे पुढें उपनिषदात आलेला ब्रह्म कर्मसमवाय, गीतेंतील निष्काम कर्मयोग, नारायणीय धर्मांतील नारायणभाव आणि भागवतातील निष्काम कर्माधिष्ठित भक्ति याचा उलगडा होऊ शकतो भागवतधर्माचा उगम गीता आणि भागवत याच्या पर्यंतच शोधण्याचे प्रयत्न अतापर्यंतच्या अभ्यासकानी केले आहेत हे सशोधनहि केवळ बहिरगाचें अथवा लक्षणाचें साधर्म्य याच्यापुरतें मर्यादित राहिलें आहे त्यामुळें भागवतधर्माच्या बाह्यस्वरूपाचा मागोवा घेता आला तरी त्याची प्रेरणा लक्षात भरली नाहीं वैदिक ऋताच्या प्रकाशात भागवतधर्माचा अभ्यास केला असताना ऋतप्रेरणा वेदोत्तरकालीन सत्य, यज्ञ, कर्म, ब्रह्म या पात्रातून प्रवास करीत करीत भागवतधर्मातील भग, विष्णु आणि निष्काम कर्मयोग यात परिणत झाली आहे आणि समाजविकासास आवश्यक असलेला ध्येयवाद परिस्थिति ध्यानात घेऊन या धर्मानें वेळोवेळी पुरस्कारिला आहे हे स्पष्ट होतें.

भागवतधर्माच्या मूळ प्रेरणेचें आकलन झालें म्हणजे महाराष्ट्रातील भागवतधर्मात आढळून येणाऱ्या आगळया वैशिष्टयाचा बोध होतो. त्याच प्रमाणें सतश्रेष्ठ एकनाथ याच्या असाधारण कर्तृत्वाची महती देखील निदर्शनास येते नाथाच्या भागवतधर्मात वैदिक धर्मप्रेरणेचा आविष्कार झाला आहे भागवतधर्माच्या मूळ प्रेरणेपर्यंत त्याची प्रखर दृष्टि पोंचली होती या प्रेरणेनें त्याचें अतःकरण प्रकाशमय झालें होतें म्हणूनच नाथाच्या वाणीच्याच द्वारें नव्हे तर त्याच्या आचरणातहि समग्र भागवतधर्माचें दर्शन घडतें

भवचक्रात आणि परचक्रात सापडलेला महाराष्ट्र नाथाच्या डोळ्यापुढें होता महाराष्ट्राला दुरावलेल्या पाडुरगाच्या मूर्तीस पुन्हा भीमातीरीं आपल्या मूळपदावर प्रस्थापित करणाऱ्या भानुदासाचे ते पणतु आपल्या 'पितामहाच्या पित्यास' साजेल असेंच कर्तृत्व त्यानींहि दाखविलें. अज्ञानानें काळवंडलेल्या, परधर्मनें ग्रस्त झालेल्या धर्मास उजळा देण्याचें महान् कार्य त्यांनीं केलें तें भागवतधर्माची मूळप्रेरणा ध्यानात ठेवून व या धर्माच्या ध्येयवादानें महाराष्ट्रास चैतन्यमय करून.

नाथाच्या भागवतधर्माची ही थोरवी वैदिक धर्मप्रेरणेचा अवबोध झाल्याविना ध्यानात येत नाहीं. म्हणूनच पहिल्या तीन प्रकरणांत वेदोक्त

ऋताचा प्रपच करण्यात आला आहे भागवतधर्म हा गतिमान् धर्म असल्याकारणानें वेळोवेळी समाजाच्या अभ्युदयासाठी या धर्माचा आश्रय करणें आवश्यक ठरलें समाजाच्या परागतीचा निरास झाला तो या धर्मास उजळा मिळाल्यानेंच म्हणून ऐतिहासिक पार्श्वभूमीवर गीतेपासून भागवता-पर्यंत आणि भाष्यकारापासून ते महाभागवत ज्ञानेश्वर याच्या काळापर्यंत झालेल्या वैचारिक आदोलनाचा आढावा चौथ्या प्रकरणापासून घेण्यात आला आहे. अर्वाचीन भारतीय भाषानीं पुरस्कारिलेल्या भागवतधर्मापेक्षा महाराष्ट्रानें केलेलें वैशिष्ट्यपूर्ण कार्य तुलनेच्या दृष्टीनें अभ्यासिता यावें यासाठी नवव्या प्रकरणात इतर प्रातातील भक्तिपथाच्या स्वरूपाचा आढावा दिला आहे भागवतधर्माची प्रेरणा व या धर्माचें समाजनिष्ठ स्वरूप या संबधींची दृष्टि अभिनव असल्याकारणानें नाथोक्त भागवतधर्माचें प्रत्यक्ष विवेचन करण्यापूर्वी भागवतधर्माच्या प्रेरणेचा व परपरेचा मागोवा घेणें अपरिहार्य वाटल्यावरून या विषयाचा विस्तार प्रारभीच्या प्रकरणात झाला आहे

या दृष्टिकोनातून नाथाच्या भागवतधर्माचा अभ्यास केला त्याचा निष्कर्ष असा

ऋतप्रेरणेचा कालसापेक्ष गतिमान् आविष्कार हा नाथोक्त भागवतधर्माचा विशेष आहे त्यामुळेंच धर्म आणि सत्य यामबधीची नाथाची भूमिका ऋताच्या वेदोक्त अभिप्रायास सार्थ करणारी आहे सत्य, यज्ञ, कर्म, ब्रह्म हे ऋताचे पर्याय नाथाच्या भागवतधर्मांत प्रतिबिंबित झाले आहेत ऋत हा देवाचा धर्म या धर्मानें देवात समानता निर्माण झाली देवाचें हे साम्य व्यक्तींच्या अत करणातहि प्रका-शित व्हावें ही ऋग्वेदातील शेवटच्या मडळातील शेवटच्या सूक्ताच्या शेवटीं आलेली प्रार्थना नाथाच्या 'सत्यात' प्रतिध्वनित झाली आहे 'सम ब्रह्म देखणें सतत' हें नाथानी घडविलेलें सत्यदर्शन आहे 'तुम्ही स्वधर्मयज्ञी यजावें अना-यासें' हा स्वकर्तव्यरूप यज्ञाचा म्हणजे व्यक्तिधर्माचा उपदेश करून नाथानीं ऋताचें यज्ञस्वरूप व्यक्तिधर्माच्या रूपानें प्रकाशिलें हा यज्ञ निर्दोष व्हावा त्यात न्यूनता राहू नये तसेच त्यायोगे घडणारें 'पुण्यात्मक पापाचें' बधनहि बाधू नये यासाठी भक्तियुक्त कर्माची उपासना त्यानी सागितली ब्रह्मस्वरूपात विश्वाचें

दर्शन घेणें जितके आवश्यक तितकेंच व्यक्तिगत कर्तव्यकर्माच्या रूपाने ब्रह्मप्रतीतीचा प्रत्यय घेणे अगत्याचे असल्यामुळे कर्म–ब्रह्माची अभिन्नता नाथांनी दर्शविली

मानवमात्राना उन्नत करण्यासाठीं ऋताच्या या मार्गाचे अनुसरण करावयाचे असते, म्हणून पुरुषसूक्तातील विराट् पुरुष आणि शतपथ ब्राह्मणातील पुरुषमेध यात वर्णिलेला नरस्वरूपी नारायण म्हणजे दुसरा तिसरा कोणीच नसून समाजातील मानवसमूहच होय ही नाथांची निष्ठा असल्यामुळे 'जनी जनार्दन' आहे असा उपदेश त्यानी केला 'जनीं जनार्दनाचा प्रत्यय हे सकळ उपनिषदाचे सार आहे' असें एकनाथानी सांगितले आहे ते ऋतरूप प्रेरणेच्या प्रकाशातच हें भागवतधर्माच्या विकासाच्या संदर्भात नाथोक्त भागवतधर्माचा अभ्यास केला असताना पटते

नाथाच्या भागवतधर्मात केवळ रागात्मिका भक्ति, केवळ निरपेक्ष कर्म, केवळ कर्तव्यबुद्धीनें केलेलें धर्माचरण किंवा मरणोत्तर मोक्षाच्या अभिलाषेनें केलेलें परमार्थसाधन आढळत नाहीं याचें कारण ऋताच्या रूपाने उपनिषदांनी वर्णिलेलें परब्रह्म, नराची नारायणरूपाने उपासना करणारा ब्राह्मणग्रथातील यज्ञ, गीतेचे परमेश्वरार्पण पूर्वक कर्म आणि भागवताची निष्काम कर्माधिष्ठित भक्ति नाथाच्या भागवतधर्मात परिणत झाली आहे म्हणूनच 'जनी आहे जनार्दन त्याते पहावया साडी अभिमान' असा उपदेश त्यानी केला

**मराठी माणसाचें आत्मबल या धर्मानें जागृत झालें व पुढें थोडयाच कालावधींत स्वराज्यसूर्याच्या तेजानें महाराष्ट्र उजळून निघाला कोणत्याहि प्रकारची आग्रही वृत्ति न धरता यथामति जे जे आधार सापडले त्यावरून वरील निष्कर्ष काढला आहे वैयक्तिक उणीवाची व मर्यादाची जाणीव आहेच.यातील 'न्यून्य तें पुरतें' जाणते आपल्या मतानीं पूर्ण करून घेवोत!**

सहा

प्रथम खंड

# भागवतर्माचा उद्गम

* अथातो धर्मजिज्ञासा
* भागवतधर्माचा उद्गम
* भागवतधर्माची प्रेरणा

# १. अथातो धर्मजिज्ञासा

गतिमान् धर्म–महाराष्ट्राचे आगळे वैशिष्ट्य–भागवतधर्म म्हणजे काय ?–भगवान् आणि भागवत–भागवतधर्माची ऋनमय परपरा–'सभवामि युगे युगे'–निरनिराळ्या युगाचे काल–

भारताच्या सास्कृतिक जीवनात भागवतधर्माचे स्थान फारच महत्वाचें आहे 'ज्या ज्या वेळी धर्माला ग्लानि येते त्या त्या वेळीं अधर्माचें निर्मूलन करण्यासाठीं मी अवतार घेतों' हे श्रीमद्भगवद्गीतेतील वचन भागवत-धर्माच्या बाबतीत अगदी यथार्थ ठरतें भारतीय सस्कृतीस ज्या ज्या वेळी अवकळा आली त्या त्या वेळीं भारतीय जीवनास उजळा देण्याचें कार्य भागवतधर्मानें केलें आहे युगसापेक्ष अशीं भागवतधर्माची विविध रूपें आढळतात त्याचे कारण हेंच आहे

वेदोक्त धर्माचें उज्वल स्वरूप केवळ कर्मकाडानें साप्रदायिक व जड बनलें असताना उपनिषदानीं 'सत्या'चा शोध करून वैदिक सस्कृतीत दृढ-मूल होऊ लागलेली जडता नाहींशीं केली तत्त्वचिंतनपरतेचा अतिरेक होऊन सन्यासमार्गास वाजवीपेक्षा अधिक महत्त्व आले त्या काळात निष्काम-कर्मयोगाचा प्रखर पुरस्कार करणारी भगवद्गीता उपदेशिण्यात आली महाभारताच्या उत्तरकाळात नारायणीय धर्माच्या उपदेशानें प्रवृत्ति आणि मोक्ष या दोन विरोधी भासणाऱ्या मार्गांचा समन्वय साधण्यात आला अवैदिक पथाच्या प्रसाराने निर्माण झालेल्या हतप्रभ अवस्थेचा भागवत-पुराणाच्या सकीर्तनाने निरास झाला वेदकालापासून भागवतपुराणाच्या रचनेपर्यंतचा इतिहास घेतला तरी सामाजिक व धार्मिक अवनतीच्या काळात भागवतधर्माने प्रगतीचा प्रकाश दाविला हे मान्य करावें लागते

## गतिमान् धर्म

इतर धर्मांना उदय आणि अस्त याची बाधा झाली भागवतधर्मांच्या बाबतींत मात्र तसें घडलें नाहीं भागवतधर्म हा गतिमान् धर्म आहे समाजाची धारणा आणि मानवमात्राचें कल्याण हेंच या धर्माचे प्रधान अंग असल्यानें व्यापक दृष्टिकोनातून समाजाचा विकास आणि मानवी कल्याणाची जोपासना या धर्मानें वेळोवेळी केली आहे या मानवनिष्ठेमुळेंच या धर्माची विकासक्षमता कधींच कुंठित झाली नाही 'ज्या लक्षणामुळे भागवतधर्माचें वैशिष्ट्य कायम राहिले ती लक्षणे कधींच नाहीशी होणारीं नाहींत तीं लक्षणें ही-की भागवतधर्म हा ऐतिहासिक धर्मा प्रमाणे मर्यादित धर्म नाही अमक्या साधूने उपदेशिला तो भागवतधर्म नसून सर्व साधूच्या उपदेशाला त्यात स्थान आहे. अमकाच एक ग्रंथ प्रमाण असें त्यात नाही तर सर्व धर्मग्रंथातील चांगला भाग घेण्यास भागवतधर्मास हरकत नाहीं त्याच्या धर्मविचाराचा ओघ सतत वाढत जाणार आहे तो कधींच कुंठित व्हावयाचा नाहीं' [१]

भागवतधर्मांच्या या वैशिष्ट्यामुळेंच धार्मिक व राजकीय नैराश्याच्या काळात भारताला स्फूर्ति देण्याचे कार्य या धर्मानें केलें आहे अगदीं अर्वाचीन काळाचा इतिहास घेतला तरीहि या सत्याचा प्रत्यय येतो. इस्लामी आक्रमणानें निर्माण झालेल्या धार्मिक अराजकास भारतानें तोंड दिलें तें भागवतधर्मांच्या प्रसारानेंच इस्लामी आमदानीत आधुनिक भारतीय भाषातून सर्वत्र भागवतधर्माचा पुरस्कार झालेला आढळून येतो. पुढें ब्रिटिश आमदानीत इंग्रजी सत्तेच्या बळावर आगेकूच करणाऱ्या ख्रिस्ती धर्माला पायबंद घालण्याचें कार्य करण्याची स्फूर्ति भागवतधर्मानेंच भारताला दिली [२] लोकमान्यांचे जीवन आणि त्यानी मंडाले तुरुंगात लिहिलेलें 'गीतारहस्य' भागवतधर्मांच्या आद्यग्रंथापासून— श्रीमद्भगवद्गीतेपासून— मिळालेल्या स्फूर्तींचाच परिपाक होय. राष्ट्रपिता महात्मा गांधी यांचें 'अहिंसादर्शन' भगवद्गीतेच्याच आधारानें प्रकट झालें अगदीं अलीकडच्या काळात साऱ्या विश्वाचें लक्ष वेधून घेणारे आचार्य विनोबा भावे यांच्या रूपानें गीतेंतील स्थितप्रज्ञ साकारलेला दिसून येतो

# महाराष्ट्राचें आगळें वैशिष्ट्य

केवळ महाराष्ट्राचा प्रमाणत अर्वाचीन इतिहास घेतला तरी भागवत धर्मांची थोर परपरा हेंच महाराष्ट्राचें बलस्थान असल्याचे दिसून येईल ज्ञानदेवापासून तुकोबारायापर्यंत आणि लोकमान्यापासून आचार्य विनोबा-भावे याचे पर्यंत भागवतधर्मांच्या थोर आचार्यांनीं महाराष्ट्रास समर्थ बनविलें आहे. ज्ञानेश्वरानी भागवतधर्माचा पाया घातला भजनात्मक भक्तीस निष्काम-कर्मयोगाची जोड देऊन गीतोक्त धर्माचे त्यानी महाराष्ट्रात पुनरुज्जीवन केलें याच काळात भारतात इतरत्र रूढ असलेल्या भक्ति-सप्रदायांत निष्काम कर्मयोगावर भर असलेला दिसून येत नाहीं. महा-राष्ट्रीय संताच्या भागवतधर्मात आगळे वैशिष्ट्य आढळून येतें तें यामुळेंच भक्ति आणि ज्ञान याची साधना करीत असताना समाजाच्या धारणेस आवश्यक असलेलें कर्म निष्काम बुद्धीनें केलें पाहिजे भक्तीचेंच तें निराळें स्वरूप आहे, हा आदर्श ज्ञानदेवाच्या उपदेशात आढळतो पुढें होऊन गेलेल्या सर्वच सतानीं हाच आदर्श आपल्यापुढें ठेवल्यामुळे निकोप भक्तिसप्रदाय आणि समर्थ कर्मयोग याची सागड महाराष्ट्राला घालता आली

ज्ञानदेवानतर सतश्रेष्ठ एकनाथ यांनीं भागवताचा भरभक्कम आधार-स्तभ या परपरेस दिला तुकाराम-रामदासापर्यंत सर्वच सत एकाच भागवत परपरेंतून उदयास आलेले असले तरी भागवतधर्मांच्या मूळ परपरेचें अविकृत दर्शन एकनाथाच्या वाङ्मयात जेवढें घडतें तेवढें इतरत्र घडत नाहीं भागवतधर्मांची मूळ प्रेरणा नाथानीं निर्मल स्वरूपात आपल्या वाङमयात जोपासली त्याच प्रमाणें युगसापेक्ष अशी आवश्यक ती गतिमानता देखील त्याच्या उपदेशात प्रतिबिंबित झाली आहे नाथाचा काळ हा भारतीय जीवनात विशेषत महाराष्ट्राच्या इतिहासात अत्यंत आणीबाणीचा होता. इस्लामी सत्ता महाराष्ट्रात दृढमूल झाली होती. या सत्तेस दक्षिणेंत शस्त्रबळानें तोंड देण्याचे जे प्रयत्न झाले ते पराभवाच्या मार्गास लागले होते विजयनगरच्या वैभवशाली साम्राज्याचा अत नाथाना आपल्या हयातींत पैहावा लागला होता. अशा अत्यत निराशेच्या राजकीय

व सामाजिक वातावरणात नाथाचें कार्य सुरू झाले या परिस्थितीवर भागवतधर्मच मात करू शकेल ही दृढ श्रद्धा हाच नाथाचा जीवनाधार या श्रद्धेतून उपदेशिलेल्या नाथोक्त भागवतधर्मात मूळ भागवतधर्माची प्रेरणा आविकृत स्वरूपात जोपासली गेली म्हणूनच नाथोक्त भागवत-धर्माचें यथार्थ मूल्यमापन करण्यासाठीं भागवतधर्माचा उद्गम, प्रेरणा आणि एकनाथाच्या काळापर्यंत झालेला विकास याचा मागोवा घेणे आवश्यक ठरतें

## भागवतधर्म म्हणजे काय ?

भागवतधर्म या सामासिक शब्दाचा विग्रह पुढीलप्रमाणें करता येईल -

१ भागवत पुराणात सांगितलेला धर्म

२ भगवताचे भक्त ते भागवत त्याचा धर्म तो भागवतधर्म

३ भगवताचा म्हणजे भगवतानीं उपदेशिलेला धर्म तो भागवतधर्म

४ 'ज्या धर्माच्या योगाने भगवान् प्रसन्न होतो तो' अशी एक व्याख्या भागवताचे टीकाकार श्रीधराचार्य यानीं दिली आहे [३]

भागवतधर्माच्या उपरोक्त व्याख्यापैकी पहिली व्याख्या बरीच अव्याप्त आहे भागवत पुराणात या धर्माचें निरुपण आलें आहे हे खरें. परतु तें या एकाच ग्रथात आलें आहे असें मात्र नाही भागवत पुराणाच्या पूर्वीहि भागवतधर्म अस्तित्वात होता त्यामुळें केवळ भागवतपुराणाने सांगितलेला धर्म तोच भागवतधर्म एवढी मर्यादित व्याख्या स्वीकारता येत नाही भग-वताचा भक्त तो भागवत त्याचा धर्म तो भागवत धर्म ही व्याख्या परपरेशीं सुसगत असली तरीहि अव्याप्तच आहे. भगवताच्या भक्तास भागवत ही सज्ञा भागवतात आढळते [४] नाथानीहि भागवत, परम भागवत या नावाने भगवद्भक्ताचा उल्लेख केला आहे [४] भगवद्भक्ताच्या आचरणानें व्यक्त-दशेस आलेल्या या धर्माचें उगमस्थान स्वत. भगवान् आहेत भगवतानी या धर्माचा उपदेश केल्यामुळें भागवतधर्म हे नाव या धर्मास पडलें. या दृष्टीनें तिसरी व्याख्या देखील विचारात घेतली पाहिजे. भागवत-

कारास ही व्याख्या अभिप्रेत दिसते एकादशस्कधात भागवतधर्माचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे आले आहे

ये वै भगवता प्रोक्ता उपाया ह्यात्मलब्धये ।
अज पुसामविदुषा विद्धि भागवतान्हि तान् ॥
(भागवत, ११-२ ३४)

'सामान्य माणसास सुलभतेने आत्मप्राप्तीसाठीं भगवतानीं जे उपाय सागितले त्यास भागवतधर्म म्हणावे' असा वरील श्लोकाचा भावार्थ आहे इतरत्र आलेला उल्लेखावरूनहि[५] भगवतानी उपदेशिलेला धर्म तो भागवतधर्म असाच अभिप्राय ध्वनित होतो वर दिलेल्या विग्रहापैकीं चौथा म्हणजे 'ज्या धर्माने भगवान् प्रसन्न होतो तो भागवतधर्म' हा भागवतधर्माच्या आचरणाचा परिणाम असल्यानें भागवतधर्माची व्याख्या निश्चित करण्याच्या दृष्टीनें त्याचा उपयोग होऊ शकेल असें वाटत नाहीं

साराश, भगवद्भक्तानी आचरलेला आणि भगवतानी उपदेशिलेला धर्म तो भागवतधर्म अशी भागवतधर्माची स्थूल व्याख्या गृहीत धरून चालण्यास हरकत नसावी

## भगवान् आणि भागवत

साहजिकच प्रश्न असा निर्माण होतो की, 'भगवान्' म्हणजे कोण ? भागवतधर्मात विष्णु आणि श्रीकृष्ण याना 'भगवान्' या नावाने सबोधिले जाते परतु, भागवतधर्मातील पहिल्या पदात असलेला 'भागवत' हा शब्द आणि या धर्माचे आराध्य दैवत 'भगवान्' या शब्दाच्या व्युत्पत्तीचा शोध घेणें भागवतधर्माची परपरा लक्षात घेण्याच्या दृष्टीने आवश्यक आहे 'भागवत' या साधित शब्दाचे मूळ आहे 'भगवत्' भगाने युक्त तो भगवत् असा त्याचा अर्थ आहे भग आणि भगवत् हे दोन्ही शब्द ऋग्वेदकालापासून रूढ आहेत भग हा शब्द ऋग्वेदात अनेकदा आला आहे[६] धन, भाग्य, अन्न, भजनीय स्थान असे सदर्भभेदाने या शब्दाचे अर्थ सायणाचार्यांनीं दिले आहेत[७] 'प्राप्त करणे' 'सुखानुभव घेणें' या अर्थानें भग हें क्रियापद वैदिक वाङमयात आढळते.[८] शिवाय, आदित्यमडळात भग या नांवाची देवताहि आहे शब्दाच्या अर्थाप्रमाणे भाग्य

आणि समृद्धी यांची ती स्वामिनी आहे.[९] आदित्य-गणात असलेल्या निरनिराळ्या देवतांचे महत्व कालांतराने कमी झाल्यावर प्रसिद्धीस आलेल्या याच गणातील सूर्य आणि विष्णु या देवतांचे ठिकाणीं आदित्यगणातील इतर देवतांच्या गुणधर्मांचा समावेश होऊं लागला. या विकासक्रमात भगाचे गुणधर्म भगवान् विष्णूशीं एकरूप झाले आणि भागवत-धर्मांत तर विष्णूचा किंवा श्रीकृष्णाचा उल्लेख केवळ 'भगवान्' या नावानें होऊं लागला. पौराणिक काळात 'भगवान्' या शब्दाचा षड्गुणेश्वर- यश, श्री, औदार्य, ज्ञान, ऐश्वर्य वैराग्य यांचा स्वामी- असा अर्थ लक्षणेने करण्यात येत असला[१०] तरीहि या शब्दातील 'भग' हा आदित्यगणातील देवतांचा आणि त्यांच्या गुणधर्मांचा प्रतिनिधि आहे ही गोष्ट विसरतां येत नाही. आदित्यगणातील देवता या तैजस देवता तर आहेतच परंतु त्याबरोबरच विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि धारणा त्यांच्याशीं या देवतांचा निकटचा संबंध आहे. अदिति ही विश्वाची माता. आदित्यगण विश्वाला प्रकाश देणारा, भाग्य आणि समृद्धी प्रदान करणारा, विशेषतः विश्वाच्या नियामक तत्त्वाचे संवर्धन आणि संरक्षण करणारा असा असल्याची वर्णनें ऋग्वेदात विपुल आहेत.[११] इंद्र, अग्नि इत्यादि देव ज्या ऋतांचें संरक्षण करतात त्या ऋताचे साक्षात् अवतार असेंहि आदित्याचें वर्णन आलें आहे.[१२] विष्णु हा आदित्य-गणातील एक देव असला तरी 'भगवान्' किंवा 'भागवत' मधील 'भग' हीहि उपरोक्त वैशिष्ट्यांनीं युक्त असलेली आदित्यगणातील एक देवता आहे. भागवतधर्मास वेदकालाइतकी प्राचीन परंपरा आहे हे केवळ 'भागवत' या एकाच पदाच्या पूर्वपीठिकेचा शोध घेतला तरी प्रत्ययास येईल.[१३]

## भागवतधर्माची ऋतमय परंपरा

या समासातील धर्म हे उत्तरपद देखील असेंच महत्वाचें आहे. 'धर्म' या शद्बातील मूळ धातु 'धृ' हा असून धारण करणें, रक्षिणें असे या शद्बाचे अर्थ होतात. धार्मिक आज्ञा किंवा विधि,[१४] आचाराचे नियम,[१५] धार्मिक कर्तव्य,[१६] या अर्थांनें वैदिक वाङमयात हा शद्ब अनेकदा आला आहे.

वर्णाश्रमास आवश्यक असलेलीं कर्तव्यें, सदाचार, स्वकर्तव्य, गुणधर्म या अर्थांबरोबरच विश्वाचा सनातन नियम या अर्थानें गीतेंत धर्म या शब्दाचा उपयोग केला आहे [१७] या शब्दाचा तो प्राचीनतम अर्थ आहे असें विद्वानाचें म्हणणें आहे [१८] वैश्विक नियम आणि मानवी नीति या अर्थानें 'ऋत' हा शब्द वैदिक वाङ्मयात अनेकदा येतो वरुणादि देवता ऋतरक्षणार्थ बद्धपरिकर असल्याचीं वर्णनें ऋग्वेदात विपुल आहेत [१९] वैदिक 'ऋतास'च उत्तरकाळात धर्म ही सज्ञा प्राप्त झाली [२०] गीता हा भागवतधर्माचा आद्यग्रथ असल्यानें 'धर्म' या शब्दाचा प्राचीनतम अर्थ गीतेने कायम ठेवावा हे एकापरीनें योग्यच असून भागवतधर्माच्या उद्गमाच्या दृष्टीनें तें महत्वाचेंहि आहे गीतेवरील भाष्याच्या प्रस्तावनेंत आद्यशकराचार्यांनीं धर्माची जी व्याख्या दिली आहे तीहि या सदर्भात ध्यानात ठेवण्यासारखी आहे 'जो जगाच्या स्थैर्यास कारणीभूत होतो, प्राण्याच्या अभ्युदयाचा आणि निश्रेयसाचा जो साक्षात् हेतु आहे आणि ब्राह्मणादि वर्ण आणि आश्रम याच्या कल्याणार्थियाच्या द्वारें जो अनुष्ठिला जातो त्यास धर्म म्हणावें' [२१]

भागवत आणि धर्म या दोन्ही पदाचा पूर्वेतिहास वैदिक देवताच्या ऋतमय परपरेशी निगडित झाला आहे हे वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. भागवतधर्माचा उद्गम आणि विकास याचा आढावा घेण्यासाठी वेदकालापासून लाभलेल्या परपरेचा मागोवा घेणे आवश्यक आहे हे निराळें सांगण्याची आवश्यकता नाही. गीता आणि भागवत या दोन्ही ग्रथात हा धर्म प्राचीन असून त्याचा उपदेश पूर्वी भगवतानी कोणकोणत्या व्यक्तीस केला होता याची माहिती दिली आहे [२२]

## 'संभवामि युगे युगे'

या धर्माच्या विकासाचे ऐतिहासिक दृष्टया पुढीलप्रमाणें कालखड कल्पिता येतील,

१ वैदिक काल ( वेदाच्या रचनेपासून उपनिषदाची रचना पूर्ण होईपर्यंतचा काल)

२. महाभारतकाल (गीता आणि महाभारतातर्गत नारायणीय आख्यान यात दिसून येणारे भागवतधर्माचें स्वरूप )
३ पौराणिक काल ( भागवतपुराणाच्या रचनेनतर आचार्यांच्या उदयापर्यंतचा कालखट )
४ आचार्यांचा काल (शकराचार्यांनतर मध्वाचार्यांपर्यंतचा)
५ आधुनिक काल या कालखडात अनेक पोटविभाग कल्पावे लागतील महाराष्ट्रापुरताच विचार केला तर
(अ) नाथपूर्व काल– ( ज्ञानेश्वरादिक सतांनी उपदेशिलेल्या भागवतधर्माचे स्वरूप )
(आ) एकनाथ काल
(इ) नाथोत्तर काल असे तीन उपकालखड होतील

ऐतिहासिक दृष्टया विचार करावयाचा म्हणजे शक सवत्सराच्या परिभाषेत वरील कालखडाची निश्चिती करणे आवश्यक ठरते वेदाच्या रचनेचा काल भिन्नाभिन्न विद्वानांनी भिन्न मानला आहे इसवी सनापूर्वी सुमारे साडेचार हजार वर्षांपासून ते इ स पूर्वी दीड हजार वर्ष वेदकाल मानण्याची निरनिराळ्या विद्वानाची प्रवृत्ति आहे [२३] आपल्या विवेचनाच्या सोयीसाठी खिस्तपूर्व १५०० पर्यंत पहिला म्हणजे वैदिक कालखंड गृहीत धरण्यास हरकत नसावी

दुसरा कालखड महाभारताचा या कालखडात गीतेनें उपदेशिलेल्या भागवतधर्माचें स्वरूप आणि शांतिपर्वातील नारायणीय आख्यानात उपदेशिलेला भागवतधर्म हे दोन पोटविभाग पडतात. वेदकालप्रमाणेंच महाभारताच्या काला सबधी देखील विभिन्न मतें आढळतात. मूळ भारत खि पू ३१०० मध्यें रचलें असून खिस्तपूर्व २५० पर्यंत भारताचें महाभारत होत होतें असें भारताचार्य वैद्य याचें मत आहे तर काही आधुनिक विद्वान् इ स ४०० हा महाभारताचा काल मानतात [२४] महाभारताच्या कालपेक्षाहि आपल्या विवेचनाच्या दृष्टीनें महत्वाचा ठरतो तो भगवद्गीतेचा काल पण, या कालासबंधानेंहि मतैक्य नाही. लोमान्यानीं इ. स पूर्वी ९९० हा मूळ गीतेचा काल मानला आहे [२५] खिस्ता पूर्वी २००

वर्षे गीतेची रचना झाली असेंहि कित्येक विद्वान् मानतात [२६] बुद्धापूर्वी म्हणजे इ स पूर्वी ६०० वर्षेपर्यंतचा कालखड दुसऱ्या विभागात येतो असें मानण्यास हरकत नसावी.

तिसरा कालखड पौराणिक वाङमयाचा. या कालखडात दोन उपखड येतात बौद्ध आणि जैन या पथाच्या प्रारभापासून पुराणाच्या रचनेपर्यंतचा आणि पुराणाची रचना सुरु झाल्यानतर आचार्य–युगास आरभ होण्यापूर्वीचा खिस्त–पूर्व ६ व्या शतकापासून इ स च्या तिसऱ्या–चौथ्या शतकापर्यंत पहिला पोटखड येईल तर इ स च्या तिसऱ्या चौथ्या शतकापासून ८ व्या शतकापर्यंत दुसऱ्या उपखडाची कालमर्यादा कल्पावी लागेल

बौद्ध आणि जैन या पथाच्या उदयानतर रूढ धर्ममार्गास बराच हादरा बसला प्रामुख्याने राजाश्रयाच्या आधाराने वाढलेले हे दोन 'अवैदिक' गणलेले पथ एका दृष्टीनें भागवत धर्मातील काही तत्त्वाच्या आधारानेंच काही शतकें वाढले. या पथास ओहोटी लागण्याच्या सुमारास पुराणाच्या रचनेच्या रूपानें पुन्हा वैदिक धर्माच्या पुनरुत्थापनास प्रारभ झाला या कालात इतर पुराणाच्या रचनेबरोबरच भागवत पुराणाची रचना झाली

## भागवतपुराणाचा काल

भागवतपुराणाच्या कालासबधी देखील जाणत्यात मतभेद आहेत कोलब्रुक, विलसन, बुरनाफ या पाश्चात्य पडितानी तेराव्या शतकातील हेमाद्रीचा मित्र बोपदेव याजकडे भागवतपुराणाचे कर्तृत्व दिले आहे डॉ भाडारकर आणि पुराणाचा पाश्चात्य अभ्यासक पार्गिटर यानी इ. स चे दहावें शतक हा भागवताचा काल मानला आहे. भारताचार्य वैद्य आणि विंटर्निट्झ व फर्कुहर या विद्वानानीं इ स. ९०० च्या आसपास भागवताची रचना झाली असें मत माडलें आहे [२७] काहीं भारतीय पडिताच्या मतें खिस्तपूर्व चौथें शतक हा भागवतपुराणाचा रचनाकाल ठरतो [२८]

भागवतपुराण हे भागवतधर्माच्या विकासात अत्यत महत्त्वाच्या कालखडात येत असल्यानें या पुराणाच्या कालासबधी थोडी अधिक चर्चा आवश्यक वाटते वर दिलेलीं भिन्न मतें अभ्यासल्यानतर किमान प्राचीन-

त्वास काहीं मर्यादा घालणे आवश्यक ठरतें भागवतपुराणात गौतमबुद्धाच्या अवताराचा स्पष्ट उल्लेख आहे. त्याच्या कार्याचा सबध विष्णूच्या अवतारकार्याशी जोडलेला आहे याचा अर्थ भागवतपुराण बुद्धोत्तर काळातील आहे असाच होतो बुद्धोत्तर काळात भागवतधर्माच्या पुनरुज्जीवनाचे प्रयत्न इ स पूर्वी २ शतके तरी सुरू होते असे मानण्यास आधार सापडतो [२९] भागवत, विष्णु, ब्रह्मांड आणि वायु या पुराणाच्या शेवटी दिलेल्या राजाच्या वशावळीत आलेली राजाची नावे इ स ३३५ पर्यंतचीं आहेत. त्यावरून खिस्तपूर्व २०० वर्षे आणि खिस्तोत्तर ३५० वर्षे हा वेगवेगळ्या पुराणाच्या रचनेचा व सस्करणाचा काळ मानावा लागतो [३०] काही आधुनिक विद्वानाचा कल इ स चें तिसरे शतक हाच भागवत पुराणाचा काल मानण्याकडे आहे. [३१]

चौथा कालखड हा आचार्याचा. कालनुक्रमाने पहिले आचार्य आद्य शकराचार्य इ स च्या आठव्या शतकात येतात आद्यशकराचार्याचा आणि भागवतधर्माच्या प्रसाराचा प्रत्यक्ष सबध नसला तरी त्यानी पुरस्कारिलेल्या अद्वैत्व वेदातानें भारतीय तत्वज्ञानाच्या क्षेत्रात एका नव्या युगाचा उदय झाला हे विसरता येत नाही रामानुजाचार्य, निबार्काचार्य आणि मध्वाचार्य याचा तर भागवतधर्मातील निरनिराळ्या उपपथाशीं साक्षात् सबध आहे. इतकेंच नव्हे तर आधुनिक भारतीय भाषापैकी मराठी भाषा वगळल्यास इतर भाषातून झालेल्या भागवतधर्माच्या प्रसारास उपरोक्त आचार्यत्रयी आणि वल्लभाचार्य याच्या तत्त्वज्ञानापासून मिळालेली स्फूर्ति कारणीभूत झाली आहे चौथा कालखड हे भाष्यकाराचें युग म्हणण्यास हरकत नाही. त्याची कालमर्यादा इ स च्या ८ व्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत कल्पावी लागेल

पाचवा म्हणजे शेवटचा कालखड हा साधारणत तेराव्या शतकानंतरचा उत्तरभारतात या सुमारास इस्लामी आक्रमण पूर्ण झालें होतें. इस्लामी सत्तेचा प्रसार दक्षिणेकडे होत होत १६ व्या शतकात म्हणजे एकनाथाच्या काळात दक्षिणेंत नाव घेण्यासारखें हिंदु राज्य शिल्लक राहिलें नव्हतें तामिळ, तेलगु, कानडी या दाक्षिणात्य आणि बगाली, हिंदी या उत्तरेतील भाषाच्या द्वारे भागवतधर्म जागाविण्याचे प्रयत्न या काळांत झाले.

या भाषातील प्रयत्नापेक्षा महाराष्ट्रांत झालेलें नवजागरण निराळ्या स्वरूपाचे होतें ज्ञानदेवानीं केलेली पायाभरणी आणि एकनाथानीं दिलेला आधारस्तभ व उत्तरकाळात या इमारतीवर चढलेला कळस याचा समावेश पाचव्या कालखडातील निरनिराळ्या उपविभागातून होतो.

वर कल्पिलेले पाच कालखड भागवतधर्माच्या विकासक्रमातील निरनिराळ्या अवस्थाचे निदर्शक आहेत आपल्या सास्कृतिक इतिहासात ज्या ज्या वेळी धर्मग्लानीची अवस्था निर्माण झाली त्या त्या वेळी समाजधारणा आणि ऋतरक्षण या मूळ प्रेरणेस सुसगत पण परिस्थितिसापेक्ष असें भागवतधर्माचें स्वरूप ज्या ज्या काळी उपदेशिण्यात आलें त्या त्या कालाचे स्थूल मानानें पडणारे विभाग उपरोक्त पाच कालखडाच्या रूपानें कल्पिले आहेत. या कालखडातून झालेले भागवतधर्माचे अवतार लक्षात घेतल्या शिवाय नाथाच्या भागवतधर्माचें वैशिष्टय आणि भागवतधर्मीय आचार्यात त्याचें असलेले अनन्यसाधारण स्थान याचें यथोचित आकलन होणें अशक्य होईल. ● ●

## १–टीपा

१ न्या रानडे, **धर्मपर व्याख्याने,** पृ ४२४–२५

२ प्रार्थना समाजाच्या चळवळीचे अध्वर्यू स्वत स भागवतधर्मीय म्हणत असत न्या रानडे, **धर्मपर व्याख्याने,** पृ ३४२

३ 'यै धर्मैं प्रसन्न भगवान्', भागवत, ११–२–७ वरील **श्रीधरी** टीका

४ **भागवत, ११–२९–४७, एकनाथी भागवत, १८–३९०**

५ **भागवत,** ११–२९, ८

६ **ऋग्वेद,** १–१६४–४०, ७–४१–४, १०–६०–१२

७ **ऋग्वेद,** १–१६४–४०, १–१४१–६, ५–७–८, २–३४–८, या वरील सायण-भाष्यात वरील अर्थ अनुक्रमानें आले आहेत

८ Oldenberg, *Vedic hymns*, Vol I & II, Introduction

९ Griffith, *Hymns of Atharva Veda* P 161, **विष्णुपुराण,** ६–५–९४.

१० 'आइका यश श्री औदार्य ज्ञान वैराग्य ऐश्वर्य हे साही गुणवर्य वसती जेथ ।। म्हणौनि तो भगवतु . **ज्ञानेश्वरी,** ६ ३७, ३८ एकनाथी भागवतात देखील हाच अर्थ स्वीकारण्यात आला आहे १५--०७, १६--२११, ३१-३५०

११ 'या मंडळाकडे (आदित्य गणातील देवता) वैश्विक व मानवी जीवनातील नीतिनियमाच्या परीक्षणाचे कार्य सोपविले आहे वैश्विक ऋताचे आणि मानवी नीतिनियमाचे संरक्षण करणे हेच या मंडळाचे काम' - ग ना दांडेकर, **वैदिक देवताचे अभिनव दर्शन,** पृ १०

१२ **ऋग्वेद,** ३--५५- १३ व ३--५५ -१४ यावरील सायणभाष्यात 'ऋतस्य आदित्यस्य' असे स्पष्टीकरण करण्यात आले आहे

१३ 'भागवत हा शब्द एका प्राचीन परंपरेचा विकास दर्शविती आशीर्वादाचे प्रदान करणारा हा देव वैदिक वाङ्मयात आढळून येतो हळुहळू भग या नामाचेच विशेषण बनून भगवान् हा शब्द रूढ झाला या भगवनाची पूजा करणारा जो धर्म तो भागवतधर्म' - Radhakrishnan, *Indian Philosophy*, Vol I, P 492

१४ **ऋग्वेद,** ५--२६--६,

१५ **ऋग्वेद,** ५ ६३ -७

१६ **ऋग्वेद,** ८ -४३--२४

१७ **श्रीमद्‌भगवद्‌गीता,** ४ ७ व ८

१८ Dasgupta, *History of Indian Philosophy* vol II, P 486

१९ **ऋग्वेद,** ५ ६४--१

२०. R Zimmerman, Evidence of Rik Text for the meaning of 'ऋत' *Proceedings of fifth Oriental Conferance*, P 217

२१ **गीता,** शांकरभाष्य, गोरखपुर प्रत, पृ १३ -१४

२२ **गीता,** ४--१ व २, **भागवत,** २--९--३ ते ५

२३ लोकमान्य टिळक आणि जेकोबी यानी ख्रिस्तपूर्व ४५०० हा वेदकाल मानला असून इतर पंडितानी १५०० वर्षे ख्रि पू हा वेदकाल मानला आहे Dr Radhakrishnan, *Indian Philosophy* vol I, P 67

२४ ख्रिस्तापूर्वी ४२२, ख्रिस्तपूर्व ४०० ते इ स ४०० आणि ख्रिस्तपूर्व १०० असे महाभारताचे काल अनुक्रमे विद्वद्रत्न दप्तरी, डॉ विंटरनिट्झ, व डॉ

राधाकृष्णन् यानी मानले आहेत Dr Winternitz, *History of Indian Literature*, vol I, P 465
Dr Radhakrishnan, *Indian Philosophy* vol I, P 480

२५ लो० टिळक, **गीतारहस्य,** पृ ५५१, ५५८ ते ५६४,

२६ डॉ राधाकृष्णन् याच्या मते खिस्तपूर्व ५ व्या शतकात, डॉ भांडारकर याच्या मते खि पू ४थ्या शतकात, व्या तेलंग याच्या मते खि पू ३ ऱ्या शतकात गीतेची रचना झाली

Dr Radhakrishnan, *Bhagwatgita*, Intro
Dr Radhakrishnan, *Indian Philosophy* vol I, P 524
Dr Farquhar, *An outline of Religious Literature of India* P 45

२७ Winternitz, *History of Indian Literature*, Vol I P 519
Farquhar, *Outline of Religious Literature of India*, P 519

२८ 'भागवतरहस्य'कार कोल्हटकर यानी खिस्तपूर्व ५०० वर्षे, 'पुराणनिरीक्षणकार' काळे याच्या मते खिस्तपूर्व ४०० वर्षे भागवताचा काल येतो विद्वद्रत्न दप्तरी यानी त्याहि पूर्वी म्हणजे खिस्तपूर्व ६९८ वर्षे भागवताचा काल मानला आहे काळे न्य गु, **पुराणनिरीक्षण** पृ ६९ व ८२
चिपळूणकर, वा ल **'नवभारत'** मासिक, मे १९५२

२९ तळटीप २ दुसरे प्रकरण पहा

३० डॉ केतकर, **प्राचीन महाराष्ट्र,** शातवाहनपर्व, पृ ८६ व ८७

३१ वायु, ब्रह्मांड, विष्णु आणि भागवत ही पुराणे इ स ३३५ च्या सुमारास लिहून झाली होती असे पर्गिटर याचे मत आहे *The Purana Text of The Dynasties of kali Age,'* Introduction P 12
श्री मुजुमदार याच्या मतें इ स ३०० ते ६०० हा भागवताचा काल असून श्री दाक्षितार यानी इ स चे तिसरे शतक हा काल दिला आहे Mujumdar R C *Ancient India* P 467
Dixitar V R *The Purana Index* vol I, Intro, P 29

# २. भागवतधर्माचा उद्गम

शिलालेखाचे आधार--उपनिषत्कालीन परपरा शतपथब्राह्मणातील पुरुषमेध -पुरुषसूक्त भागवतधर्माचा मूलाधार -ऋतरक्षक आदित्यगण 'उरुक्रम' विष्णु--'भग एव भगवान्'--ऋतगोप वरुण आणि भगवान् विष्णु - सगुणभक्तीची प्रेरणा--भक्ति उद्गम आणि शास्त्र- श्रद्धा भक्तीचे उगमस्थान - श्रद्धेचे जन्म--स्थान ऋत ,

'भागवत' आणि 'धर्म' या दोन्ही पदांच्या व्युत्पत्तीचें विवरण करीत असताना वैदिक ऋतमय परपरेशी त्याचा सबध असल्याचे गेल्या प्रकरणात दिग्दर्शित करण्यात आलें आहे भागवतधर्माचे युगसापेक्ष असे जे अवतार झाले त्याचे स्थूलमानाने जे कालखड पडतात त्याचाहि उल्लेख प्रारंभाच्या प्रकरणात आला आहे या कालखडाच्या कालमर्यादाचा निर्देश देखील वरील सदर्भात आला आहे. श्रीमद्भगवद्गीता आणि भागवत हे भगवतधर्माचे प्रमुख प्रमाणग्रथ आहेत भागवतानतर आचार्याच्या भाष्याचें व तदनतर प्राकृतभाषातील धर्मप्रसाराचे युग सुरु झाल्याकारणानें अगदी अलीकडच्या काळात भागवतधर्माच्या सुव्यवस्थित स्वरूपासाठी भागवतपुराणाचा आश्रय घेणें आवश्यक ठरतें गीतेनतर आणि भागवताच्या पूर्वी भागवतधर्मास बरीच लोकप्रियता प्राप्त झाली होती हे सिद्ध करणारे अन्य पुरावेहि उपलब्ध आहेत

## शिलालेखांचे आधार

इ स च्या तिसऱ्या–चौथ्या शतकात भागवताची रचना झाली या काळातील गुप्त सम्राटानी भागवतधर्मास राजाश्रय दिला होता हे अलाहाबादच्या शिलालेखावरून स्पष्ट होतें गुप्त सम्राट् स्वतःस 'परमभागवत'

म्हणवीत. अलाहाबादच्या शिलालेखात सम्राट् समुद्रगुप्ताचा 'परमभागवत' या नावाने त्याच्या साव्यविग्रहमन्त्र्यानें उल्लेख केला आहे[1] या कालाच्याहि पुर्वीचा शिलालेख ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकातला आहे नाणेघाटाचा शिला लेख या नावाने ओळखल्या जाणाऱ्या या शिलालेखात भागवतधर्मातील सकर्षण आणि वासुदेव या देवताचा उल्लेख आला आहे भागवतधर्मात उत्तर काळात व्यूहसिद्धातास बरेच महत्त्व आले होतें या व्यूहात वासुदेव, सकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध या चार देवाचा अनुक्रमें निर्गुण परमात्मा, जीव, मन आणि अहकार या तत्त्वाच्या प्रतीकासाठीं उपयोग करण्यात येत असे व्यूहसिद्धात मानणाऱ्या या उपपथास पाचरात्र–मत असेंहि नाव मिळालें होतें महाभारतातील नारायणीय आख्यानात 'पाचरात्र' सिद्धाताचा उल्लेख आला आहे नाणेघाटातील शिलालेखात भक्तिभावानें उल्लेखिलेले सकर्षण आणि वासुदेव भागवतधर्माच्या वरील पाचरात्रमताचेच निदर्शक आहेत या पूर्वीचेहि दोन शिलालेख आढळतात इ स च्या पूर्वी २ शतके कोरलेले बिसनगर आणि घोसुडी येथील शिलालेख पूर्वेतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत बिसनगरचा शिलालेख विशेषे करून लक्षात घेण्यासारखा आहे या लेखात ग्रीक वकील हेलिओदर याने देवाधिदेव वासुदेव याच्या स्मरणार्थ गरुडस्तभ उभारल्याचा उल्लेख आहे या लेखात 'यवन' वकील स्वत स 'भागवत' म्हणवितो लेखाचा भावार्थ पुढीलप्रमाणें आहे 'तक्षशिलेचा रहिवाशी दियोचा पुत्र महाराजा अतालिकिटास याचा काशीपुत्र भगभद्र याच्या दरबारी असलेला यवन वकील 'भागवत' हेलिओदर यानें देवाधिदेव वासुदेवाच्या स्मरणार्थ हा गरुडस्तभ उभारला.'[2] परराष्ट्रिक आणि परधर्मीय याना देखील भागवतधर्मात स्थान असे हे या शिलालेखावरून स्पष्ट होतें

भागवतधर्माचे उल्लेख जैन आणि बौद्ध वाङ्मयातहि आढळतात[3] पाणिनीच्या व्याकरणात 'वासुदेवार्जुनाभ्या वुञ्' या सूत्रात वासुदेवभक्तीचा उल्लेख आला आहे वासुदेव हे भगवताचे नाव आहे असें पतजलीचें या सूत्रावरील भाष्य आहे[4] पाणिनीचा काल ख्रिस्तापूर्वी आठशें वर्षे मानलेला आहे.[5] इ. स. च्या पूर्वी ८०० वर्षे भागवतधर्म प्रचारात असल्या-

च्या स्पष्ट खुणा शिलालेखात व वाङ्मयात आढळतात गीतेचा काल खि पू ६ वें शतक मानण्यात आलेला असला तरी भागवतधर्माचा हा आद्य प्रमाणग्रंथ रचला जाण्यापूर्वी किमान दोन शतकें तरी भागवतधर्म रूढ असल्याचे पुरावे उपलब्ध आहेत

## उपनिषत्कालीन परंपरा

हे पुरावे लक्षात घेतले म्हणजे 'मूळ गीतेचा काळ खि. पू ९०० वर्षे असून तत्पूर्वी किमान ५०० वर्षे म्हणजे इ स पूर्व १४०० वर्षे तरी भागवतधर्म अस्तित्वात असावा'[६] हे लोकमान्याचे मत लक्षात घेण्यासारखें आहे असें वाटू लागते इ स च्या पूर्वी १४०० म्हणजे उपनिषदाचा काल साधारणत येतो उपनिषदाच्या विचाराचा भागवतधर्मावर बराच परिणाम झाला आहे, यात वाद नाही भागवतधर्माच्या पूर्वपीठिकेच्या बऱ्याच खुणा उपनिषद्वाङ्मयात देखील आढळतात नारायणीयोपनिषद हे भागवत-धर्माच्या परपरेस अत्यत जवळचें असलेलें उपनिषद् होय आद्य शंकराचार्यांचें भाष्य या उपनिषदावर नसल्यानें ते दशोपनिषदा इतकें प्राचीन आहे किंवा नाही अशी शका येणें स्वाभाविक आहे तथापि, बोधायन आणि अपस्तभ या सूत्रकारानी नारायणोपनिषदाचा उल्लेख केल्यामुळें त्याच्या प्राचीनत्वाविषयी शका राहू नये[७] या उपनिषदाचा कर्ता नारायण ऋषि असून विष्णूचें माहात्म्य आणि त्याची उपासना हे त्याचे विषय आहेत 'विश्व नारायणात्मक असून त्याची हृदयात संस्थापना करावी आणि त्यास हृदयानें जाणावें' हे या उपनिषदाच्या उपदेशाचे सार आहे 'नारायणाय विद्महे वासुदेवाय धीमहि तन्नो विष्णु प्रचोदयात्' हा भागवतधर्मीयाचा मंत्रहि या उपनिषदात येतो[८] भागवत आणि नारायणीयोपनिषद यात विचारसाम्यहि बरेंच आहे काही ठिकाणी तर जवळपास सारखीच शब्द-योजना असलेले श्लोकहि आले आहेत[९] 'हसरूप गुरु जो मी' असा उल्लेख भागवतात आला आहे (भागवत, ५–१–१०) नारायणीय उपनिषदात देखील 'हसरूपानें द्युलोकात राहणारा' असा नारायणाचा निर्देश करण्यात आला आहे.[१०] महाभारतात वर्णिलेलें आणि महाराष्ट्रीय सतानी

गाइलेलें हरिहर-ऐक्यहि या उपनिषदांनें उल्लेखिलें आहे या विचारसाम्या-वरून हे उपनिषद भागवतधर्मीय परपरेंतीलच आहे हे स्पष्ट होतें

## शतपथब्राह्मणांतील पुरुषमेध

उपनिषत्कालाच्या आणखी मागें ब्राह्मणग्रथाचा काल येतो शतपथ-ब्राह्मणात आलेलें पुरुषमेधाचें वर्णन भागवतधर्मीय परपरेतून करण्यात आले आहे असेच म्हणता येईल [११] या यज्ञात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, चाडाल आदि जमातींच्या सुमारें ७० पुरुषाची यज्ञमडपात नियुक्ती करून त्याचे परमेश्वर रूपानें आणि ऋग्वेदातील पुरुषसूक्तानें आवाहन करावे असा विधि सांगितला आहे भागवतधर्मात पुरुषरूपाने केलेली परमेश्वरपूजा आणि सर्व वर्णांना असलेला भक्तीचा आधिकार लक्षात घेता या पुरुष-मेधाचे महत्व सहज ध्यानात येईल किरात, हूण, आध्र, पुलिंद, पुलकेस, अभीर, कक, यवन, खस इत्यादिकाना भगवद्भजनानें मोक्ष मिळेल असे आश्वासन शुकाचार्यांनी भागवतात दिलें आहे [१२] सर्वात्मभाव आणि 'वासुदेव सर्वम्' (गीता ७-१९) हा तर भागवतधर्माचा आत्मा त्याचाच निर्देश पुरुषमेधाच्या प्रारभीं आला आहे 'पुरुष नारायणास इच्छा झाली कीं, मी सर्वभूतात वास करावा—अतितिष्ठेय—मी हे व्हावे त्याने पाच दिवस—पचरात्र—हा पुरुषमेध यज्ञ केला त्याला इष्ट सिद्धी झाली अशा प्रकारें जो यजन करील त्याला हेंच फळ मिळेल' अशी या यज्ञाची फलश्रुती सांगून हा यज्ञ करणारानें सर्वस्वाचा त्याग करावा असें शेवटी सांगण्यात आलें आहे परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करण्याचा भागवतधर्माचा आदेश वरील उपदेशाशीं विसगत वाटण्याचे कारण नाही म्हणूनच 'शतपथब्राह्मणातील पुरुषमेध हे भागवतधर्माचें बीज आहे' असे म्हणणें यथार्थ ठरते [१३]

## पुरुषसूक्तः भागवतधर्माचा मूळाधार

शतपथब्राह्मणातील पुरुषमेधाच्या आणखी मागें गेलो तर ऋग्वेदांतील पुरुषसूक्तात वर्णिलेल्या 'विराट् पुरुषाचें' दर्शन घडतें [१४] या सूक्तात पुरुषरूपानें भगवताचें वर्णन करण्यात आलें आहे. अशाच प्रकारचें वर्णन अथर्ववेदांतहि आलें आहे [१५] ऋग्वेद आणि अथर्ववेद या दोन्ही ठिकाणीं

आलेल्या उपरोक्त सूक्ताचा द्रष्टा नारायण ऋषि आहे शतपथ ब्राह्मणातील पुरुषमेध करणारा पुरुष नारायण, पुरुषसूक्त व अथर्ववेदातील उपरोक्त सूक्त याचा द्रष्टा नारायण, महाभारतातील शांतिपर्वांत नारदास भागवतधर्म सांगणारा ऋषि नारायण असल्यामुळे या धर्माचा आद्यप्रणेता नारायणऋषि असून त्याने पुरुषसूक्तात वर्णिलेला पुरुषरूपधारी भगवान् हा भगवत-धर्माचा मूलाधार होय असा निष्कर्ष निघतो [१६] भागवताच्या पारायणास पुरुषसूक्ताच्या आवाहनाने प्रारंभ करण्याची रूढि सुद्धा तेंच दर्शविते महाभारतात या धर्मास नारायणीय धर्म या नावाने संबोधिलें आहे. नारायण हा या धर्माचा मूळ प्रवर्तक असून कालांतराने धर्मप्रवर्तक नारायण आणि आराध्यदैवत भगवान् विष्णु हे एकरूप झाले. नारायणीय उपनिषदात आणि तदनंतरहि 'नारायण' या नावानें विष्णूचा उल्लेख येतो तो या प्रवृत्तीचा निदर्शक आहे

## ऋतरक्षक आदित्यगण

भागवतधर्माच्या गंगोत्रीचा शोध करीत शेवटीं ऋग्वेदापर्यंत आपण आलों 'भागवतधर्म' या सामासिक शब्दातील 'भागवता'चा आधार असलेला 'भग' आदित्यगणातील एक देव असल्याचें प्रारंभीच्या प्रकरणात दर्शविले आहे या धर्माचें आराध्य दैवत भगवान् विष्णु हीहि आदित्य-गणातील एक देवता आहे. वैदिक वाङ्मयात आदितीचे महत्व बरेंच आढ-ळते [१७] आदित्यगणातील सर्वच देवता तेजाचें प्रतीक म्हणून ऋग्वेदांत वर्णिल्या आहेत [१८] तेजाची आणि विशेषत सूर्याची उपासना हे जगातील भिन्न प्राचीन धर्माचें महत्वाचें सूत्र आहे [१९] इराणी–भारतीय संस्कृतीचा तर तो समान वारसा आहे.[२०] ऋग्वेदात निरनिराळ्या काळातल्या देव-ताशी कोठे ना कोठें तरी आदित्याचा संबंध येतो. अगदीं प्रारंभीच्या काळात वरुण हा देवाचा राजा मानला गेला वरुण हा कधीं आदित्य समूहापैकीं एक तर कधी या गणाचा राजा मानलेला आहे. सूर्य हा वरु-णाचा चक्षु, तर स्थावरजंगमाचा आत्मा.[२१] विष्णू आणि सूर्य हे आदित्य-गणातील देव एकरूप झाले उन्नत सूर्य बिंबाच्या ठिकाणीं विष्णूचें परमपद असल्याची समजूतहि दृढावली [२२] स्वर्ग, अंतराल आणि पृथ्वी

याच्या ठिकाणी वरुणाचे एकेक रूप-स्वर्गात सूर्याच्या रूपाने, अंतराळात वायु किंवा इंद्ररूपाने आणि पृथ्वीवर अग्निरूपाने-आढळते असें आदित्याशी एकरूप असलेलें इंद्राग्नीचें वर्णन ऋग्वेदात आले आहे [२३]

आदित्यगणातील देवताचें आणखी एक वैशिष्टय भागवतधर्माच्या स्वरूपाच्या दृष्टीनें अधिक महत्त्वाचें आहे या तैजस देवताना सद्गुणाचें आणि नीतियमाचें अधिष्ठान आहे वैदिक ऋततत्त्वाचा संबंध तसा सर्व देवताशी येत असला तरी आदित्यगण विशेषे करून या तत्त्वाच्या परिपालनासाठी प्रख्यातीस आला आहे [२४] भागवतधर्माच्या गतिमानतेचें रहस्य आदित्याच्या या गुणधर्मात आहे

## 'उरुक्रम' विष्णु

भागवतधर्मीयाचे आराध्य दैवत असलेला विष्णु हा आदित्यगणांतीलच असल्यानें आदित्याच्या वैशिष्टयाची परंपरा या देवतेत केंद्रित झालेली दिसून येईल विष्णु या शब्दाची व्युत्पत्ति यास्काचार्यांनी पुढील प्रमाणें दिली आहे "तद् विपितो भवति तद् विष्णुर्भवति । विष्णुर्विशतेर्वा व्याश्नोतेर्वा तदेषा भवति ।"[२५] निरुक्ताचें टीकाकार दुर्गाचार्य यांनीं वरील व्युत्पत्तीचें पुढीलप्रमाणें स्पष्टीकरण केलें आहे

'विषितो व्याप्तोयमेव सूर्यो रश्मिभि भवति । विशतेर्वा यदादिष्ट प्रविष्ट सर्वतो रश्मिभिर्भवति तदा विष्णुर्भवति । व्याश्नोतेर्वा विपूर्वस्य वाश्नोते । यदा रश्मिभि अतिशयेनाय व्याप्तो भवति व्याप्नोति वा रश्मिभिरय तदा विष्णुर्भवति । ....'

बृहद्देवताखण्डात शौनकाने 'व्यापनशीलत्वात् विष्णु' असा अर्थ दिला आहे [२६] सायणाचार्यांनी देखील तोच अर्थ स्वीकारला आहे [२७] विष्णूच्या व्यापनशीलत्वाबद्दल ऋग्वेदात त्याची स्तुतीहि करण्यात आली आहे.[२८] संकटात सापडलेल्या मानवासाठीं तीन वेळा पृथ्वी व्यापणारा,[२९] भक्ताच्या हाकेस धावून येणारा,[३०] मानवाच्या वसाहतीसाठी पृथ्व्यादि भुवनें निर्माण करणारा,[३१] असा विष्णूचा महिमा वैदिक ऋषींनी गाइला आहे 'बृहच्छरीर' म्हणजे जग हेच ज्याचें शरीर आहे[३२] अशा विष्णूच्या परमपदाचे ठिकाणी मानवाना अमृतत्त्वाचा अनुभव मिळतो [३३] त्रिभुवनाचा

एकमेव आधार, धर्माचा धारणकर्ता [३४] असा विष्णु मरणोत्तर उत्तमगतीचा प्रदाता म्हणूनहि वेदानी स्तविला आहे

अधिभौतिक आणि अध्यात्मिक मानवी जीवनाशी संबंधित असल्यामुळे विष्णूचा महिमा ऋग्वेदोत्तर काळात देखील बराच वाढला त्याच्या माहात्म्याचे बीज मात्र ऋग्वेदातील विष्णूच्या स्वरूपात आढळून येतें ऋग्वेदात कधीं इंद्राचा सखा म्हणून तर कधीं स्वतंत्रपणें विष्णूचा सुमारें १०० वेळा उल्लेख आला आहे [३५] स्वतंत्र विष्णुवर्णनपर असी सूक्तें वरुण, इंद्र आणि अग्नि यांच्या मानानें बरीच कमी आहेत परंतु या सूक्तात 'विष्णूत सर्व देवांचा समावेश झाला आहे' 'इतर देवता या विष्णूच्या शाखा आहेत [३६] अशा अर्थाची विष्णूची स्तुती आली आहे ऋग्वेदाच्या ७ व्या मंडलात ९९ आणि १०० या दोन सूक्तात विष्णूच्या पराक्रमाचें सविस्तर वर्णन आले आहे "पृथ्वी, स्वर्ग, पाताळ आदि भुवने निर्माण करणाऱ्या, वर्धमान शरीर धारण करणाऱ्या विष्णो तुझा महिमा यथार्थ रीतीने कोणालाच कळणें शक्य नाहीं यज्ञ करणारासाठीं तू विस्तीर्ण स्वर्गलोक निर्माण केला आहेस सूर्यादिकांना तू जन्म दिलास पर्वत तू निर्माण केलेस असुरापासून मानवाचें संरक्षण तू करतोस तुझा पराक्रम फार मोठा आहे तुझी भक्ति करणारास तू धनादिकाचें प्रदान करून संतुष्ट करतोस भक्तासाठीं ही व्यापक पृथ्वी तू निर्माण केलीस युद्धादिकाच्या वेळी तू उग्ररूप धारण करतोस तुझें स्वरूप आमच्या पासून गूढ ठेवू नकोस प्रकट व पराक्रमशाली रूपात आम्हाला तुझें दर्शन घेऊ दे"

गीतेंत आणि भागवतात आलेली भगवताच्या अवताराची कल्पना, भगवद्भक्तांना वैकुंठात मिळणारी उत्तमगति किंवा मोक्ष, विष्णूनें आणि श्रीकृष्णाने केलेले असुरांचे आणि दुष्टाचें निर्दालन, विश्व नारायणात्मक असल्याची श्रद्धा, योग्यानाहि अगम्य असलेला परब्रह्मरूपी भगवान् इत्यादि भागवतधर्मातील विष्णूचा महिमा उपरोक्त वेदकालीन वर्णनात बीजरूपाने आढळून येईल [३७]

## "भग एव भगवान्"

भागवतधर्मांत केवळ विष्णूची आराधना नसून भगवान् विष्णूची भक्ति आहे हें विसरता येत नाहीं भागवत या शद्वाची व्युत्पत्ति देताना आदित्यगणातील 'भग' या देवतेचा आणि भग या शद्वाच्या अर्थाचा विचार प्रारभीं झाला आहे भाग्य, सुख, समृद्धी इत्यादिकाची ही देवता आहे 'परमेश्वराच्या प्रसादाचे मानवाना विभाजन करणारा देव' असा भगाच्या कार्याचा थोडक्यात निर्देश करता येईल 'भग ज्या प्रमाणे प्रत्येक माणसास त्याचें भाग्य वाटून देतो त्याप्रमाणे उषादेवीहि प्रति प्रात काळीं प्रकाशाचा ठेवा विभागते आणि प्रत्येक माणसास त्याचा भाग देत असतें' असें उषेसह भगाचे वर्णन ऋग्वेदात आले आहे [३८] भगाचें एक स्वतत्र सूक्तहि आहे [३९] या सूक्तात अदितीचा पुत्र भग याचे इद्र-वरुणादिकाबरोबर आवाहन करण्यात आले असून 'भग हाच भगवान् आहे. त्याच्या योगाने आपण भाग्यवत होऊ या' असा या सूक्ताचा समारोप आहे भग हा भाग्याची वाटणी करणारा सरक्षक देव म्हणून इराणी व स्लॉव्हॉनिक भाषातहि प्रसिद्ध आहे या भाषात देव हा या शद्वाचा अर्थ आहे आदित्य किंवा तैजस देवता प्रमाणेंच इराणी–भारतीय सस्कृतीचा भग हाहि समान वारसा असून तो वैदिक परपरेच्या द्वारें भागवतधर्मानें चालविला आहे असें म्हणता येईल.[४०]

## ऋतगोप वरुण आणि भगवान् विष्णु

केवळ आराध्यदैवताच्या पूर्वपीठिकेचा शोध घेत घेत आपण वैदिक-वाङ्मयातील विष्णु आणि भग याच्या स्वरूपाचे सक्षेपाने निरीक्षण केलें भगवान् विष्णूची उपासना करणाऱ्या या धर्मास आदित्यमडळातील देवताच्या गुणधर्माचें प्रतीक असलेल्या विष्णूच्या गुणाचा आणि पराक्रमाचा वारसा प्राप्त झाला आहे हे आतापर्यंतच्या विवेचनात स्पष्ट केलें आहे भागवत-धर्मीय सतानीं मराठीभाषेंत चालविलेल्या भक्तिपरपरेचें मूळ ऋग्वेदातील इद्राच्या भक्तीत आहे कीं वरुणाच्या हा थोडासा वादाचा विषय झाला आहे. श्री. वेलणकर यांनी लिहिलेल्या 'ऋग्वेदातील भक्तिमार्ग' या

पुस्तकात या वादाचा ऊहापोह आला आहे त्याच्या मतें ऋग्वेदातील इंद्राची भक्ति हेच मध्ययुगातील भक्तिसंप्रदायाचें मूळ आहे काहीं विद्वानांना मात्र हे मत मान्य नाहीं त्याच्या मतें भारतात परिपुष्ट झालेल्या भक्तिगंगेचें उगमस्थान ऋग्वेदातील वरुणभक्तीत आहे [४१] हा वाद प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें फारसा महत्वाचा नाही त्यामुळें या बाबतीत पूर्वोत्तर-पक्ष करण्याची विशेष आवश्यकता आहे असें वाटत नाहीं तथापि, भागवत-धर्मातील भक्तिपरंपरेचाच विचार करावयाचा झाल्यास या परंपरेस इंद्रापेक्षा वरुण अधिक जवळचा ठरेल कारण, एक तर विष्णु ज्या आदित्यमंडळाचा घटक आहे त्या मंडळाचा राजा वरुण आहे. शिवाय, भागवतधर्मांत असलेली भक्ति केवळ भजनात्मिका नाहीं. त्या भक्तीस विशिष्ट दिशा आहे निश्चित ध्येय आहे परमेश्वराचें स्तवन करणें किंवा त्याची उपासना करणें हे भागवतधर्मीय उपासनेचें एक अंग आहे त्या उपासनेची दुसरी बाजू 'कर्में ईशु भजावा' किंवा निष्काम कर्मयोग ही आहे. भक्तीच्याच परिभाषेंत बोला-वयाचें झाल्यास 'परमेश्वरार्पणपूर्वक कर्मयोग' हे या धर्माचें महत्वाचें अंग आहे विश्वाचें चक्र गतिमान् असतें. या गतिचक्रात मानवानें ईशस्तवन करणें जितकें आवश्यक आहे तितकेंच किंबहुना त्याहून अधिक आपण ज्या मानवसमूहात वावरतों त्याच्या विकासाकडे लक्ष देणें अगत्याचें आहे. 'मला काही करावयाचें शिल्लक राहिलें नाहीं तरी मी कर्तव्यकर्म करतों' असें गीतेंत भगवंतांनीं अर्जुनास सांगितलें आहे. त्याचा अर्थ विश्वाच्या धारणेस आणि समाजाच्या विकासास पोषक असें कार्य करणें प्रत्येक व्यक्तीचें कर्तव्य असतें असाच होतो या कर्तव्याची पातळी उंच व स्वार्थनिरपेक्ष रहावी यासाठीं निष्काम किंवा परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करण्याचा आदेश भागवतधर्मानें दिला आहे. भागवतधर्मातील निष्काम कर्मयोगाची ही भूमिका वैदिक इंद्राच्या कार्यापेक्षा वरुणाच्या कार्यास अधिक निकटची आहे. कारण, तो विश्वाच्या सनातन नियमाचा संरक्षक,[४२] संवर्धक, प्रणेता आणि अनृताचें पारिपत्य करणारा आहे [४३] वरुणाच्या जीवनाची ही प्रेरणाच—ऋत—भागवतधर्मात निष्कामकर्मयोगाच्या रूपानें आढळून येते. वरुणा-प्रमाणें इतर देवतांचें वर्णन ऋताच्या पार्श्वभूमीवर आलें असलें तरी वरुण

आणि आदित्यगण याचा जेवढा सबंध ऋताशी येतो तेवढा अन्य देवताचा येत नाही [४४]

## सगुणभक्तीची प्रेरणा

दुसरा मुद्दा इद्राच्या मानुषी चारित्र्यासबधींचा 'इद्राचें व्यक्तिमत्व वरुणाच्या मानानें अधिक मानुष वाटतें म्हणून सगुणरूपधारी परमेश्वराची उपासना करण्याची भागवतधर्मीयाची प्रवृत्ति इद्राच्या उपासनेंतून परिणत झाली असणे अधिक शक्य आहे' असा या सबधीचा पूर्वपक्ष आहे सगुणभक्ती सबधीचा वरील मुद्दा निर्णायक होऊ शकत नाहीं भागवत-धर्माच्या पूर्वपीठिकेत ब्राह्मणग्रथात येणारा पुरुषमेध, तदनतर ऋग्वेदातील पुरुषसूक्त, या सूक्तास भागवतधर्मीय परपरेने दिलेलें महत्त्व याचें विवरण आले आहे त्या ठिकाणी पुरुष नारायणाने केलेला पुरुषमेध व त्याहि पूर्वीचें पुरुषसूक्त याचे परपरेच्या प्रकाशात जे दिग्दर्शन झालें आहे त्यावरून देखील या धर्मातील सगुणभक्तीचें मूळ इद्राच्या मानुषी व्यक्तिमत्वापेक्षा पुरुषरूपधारी विष्णूच्या व्यापनशील व पराक्रमशाली स्वरूपातच अधिक आढळून येईल [४५] शिवाय, 'इद्राचे महत्त्व वाढलें तसें वरुणाचें कमी झालें' हे खरें असले तरीहि, 'वरुण कल्पनेतील जो मध्यवर्ती विचार होता त्याचा अगदी निराळ्या रीतीनें विकास झाला प्राचीन भारतीयाचे अनेक तत्त्वज्ञानात्मक सिद्धात त्याच्या दैवतशास्त्रीय कल्पनातूनच उद्भुत झाले आहेत औपनिषद् ब्रह्माविषयक सिद्धाताचें चिकित्सापूर्वक विश्लेषण करणाऱ्या अभ्यासकास तो सिद्धात म्हणजे वरुणाधिष्ठित दैवतशास्त्रीय कल्पनेचा एक प्रकारचा नैसर्गिक विकास आहे असें आढळून येईल . . वरुणाच्या व्यक्तिमत्वाचें सार या रीतीने तत्त्वज्ञानात्मक स्वरूपात परिणत झालें आहे' [४६]

## भक्ति : उद्गम आणि शास्त्र

याच सदर्भात दुसराहि एक प्रश्न स्वाभाविकरीत्या उपस्थित होतो तो भक्तीच्या पूर्वपीठिकेसबधींचा. भागवतधर्मातील भगवान् विष्णूस वेदकाला-इतकी प्राचीन परपरा आहे हे पूर्वपीठिकेच्या वरील शोधातून निष्पन्न होत

असले तरी भक्तीची कल्पना इतकी प्राचीन आहे काय असा प्रश्न उपस्थित होतो

व्युत्पत्तीच्या दृष्टीनें भक्ति या शब्दाचा अर्थ आश्रय घेणें व आश्रयीभूत व्यक्तीवर प्रेम करणें असा होतो.[४७] ज्याच्यावर प्रेम केलें जातें या अर्थाचा लोप होऊन 'प्रेम' या अर्थानेंच हा शब्द रूढ झाला 'अग्निभक्तिनि' 'इंद्रभक्तिनि' या रूपात निरुक्तकारानीं याच अर्थाने हा शब्द वापरला आहे 'भजन भक्ति' असा अर्थ आद्य शंकराचार्य देतात 'सततध्यान, प्रेम, उपासना' असे रामानुजाचार्यांनी केलेले अर्थ आहेत [४८]

नारद आणि शांडिल्य यांनी तर भक्तीचे स्वतंत्र शास्त्रच कल्पून तिचें विवेचन केले आहे. भावनेच्या दृष्टीने भक्तीची मीमांसा नारदाच्या सूत्रात केली आहे तर भक्तीच्या तत्त्वज्ञानाचा प्रपंच शांडिल्याच्या सूत्रात आला आहे "भक्ति म्हणजे परमेश्वराविषयींचे परमप्रेम (नारदभक्तिसूत्रे सूत्र १, २, ३) कर्म आणि ज्ञान यापेक्षा भक्ति श्रेष्ठ आहे, (सूत्र–२५) भक्त आणि परमेश्वर अभिन्न असल्यामुळें परमेश्वराची सेवा करणारा माया तरून जातो (सूत्र, ४१ व ४६), भक्त स्वत तरतो आणि इतरास तारतो (सूत्र, ५०) भक्तीच्या क्षेत्रात जाति, विद्या, क्रिया इत्यादिकामुळे निर्माण झालेले भेद लोप पावतात," असे श्रेष्ठ भक्तीचे नारदानें निरूपण केलें आहे

शांडिल्याने भक्ति हेच सर्वस्व मानले आहे 'जीवाना भासमान होणारा प्रपंच अविद्याजन्य आहे तसा तो अभक्तिमूलक आहे अनन्य भक्तीनेंच जीवब्रह्मैक्य जाणता येतें. या क्षेत्रात लहान-थोर, उच्च-नीच या सर्वांनाच सारखा अधिकार आहे' (सूत्रे ३–२–६, ३–२–४ व २–२–१) असा शांडिल्याचा सिद्धात आहे भागवताने श्रेष्ठ धर्म या शब्दात भक्तीचा गौरव केला आहे [४९]

## श्रद्धा : भक्तीचें उगमस्थान

श्वेताश्वतरोपनिषद वगळले तर भक्ति या शब्दाचा उल्लेख उपनिषद्वाङ्मयात आढळत नाहीं [५०] तथापि, उपनिषदातील उपासना ही भक्तीरूपानें विकसित झाली आहे असें विद्वानाचें म्हणणें आहे.[५१] इतकेंच

नव्हे तर 'सगुण परमेश्वरा विषयी श्रद्धा, प्रेम, त्याचेसाठी सर्वस्वसमर्पण आणि त्याच्या भक्तीच्या योगाने परमपदाची प्राप्ती एवढाच भक्तीचा अर्थ असेल तर वेदातील वरुणपूजेंत या सर्व गोष्टी आढळून येतील'[५२] असेंहि मत विद्वानानीं व्यक्त केलें आहे

तसें पाहिले तर माणसाच्या नैसर्गिक प्रवृत्तींतच भक्तीचा उगम आढळतो निसर्गाच्या भव्य दर्शनानें मनुष्याचे हृदय आनदानें, आदरानें, व क्वचित् प्रसगीं भीतीनें भरून येते. नियमित वेळी होणारे सूर्याचे उद-यास्त व ऋतुपरत्वें फुलणारा आणि झडणारा निसर्ग पाहून या विश्वाच्या मुळाशीं निश्चित कार्यकारणभाव आहे असे वाटू लागते विश्वाचे सचालन करणाऱ्या मूळ शक्तीविषयी आदरभाव वाटतो तो यामुळेंच आस्तिक्य भाव आणि भक्ति या भावनेंतूनच उद्‌भूत होतात ऋग्वेदातील वरुण-सूक्ताचा अभ्यास केला असताना हेंच सत्य प्रत्ययास येते

'खिस्तपूर्व चौथ्या शतकापासून भारतीय वाङ्मयात भक्ति हा शब्द आढळत असला तरी वैदिक वाङमयात वरुणभक्तीच्या रूपाने भक्तिभावना आढळते" असे डॉ ग्रियर्सन याचें मत आहे. "गीतेंतील आर्त, जिज्ञासु आदि भक्ताचे चार प्रकार व भक्तीची विविधरूपें ऋग्वेदातील वरुण-सूक्तात आढळतात .. भाक्तीची बीजेच नव्हे तर तिचा सर्वांगीण विकास वैदिक वाङ्मयात दिसून येतो" अशा आशयाचे मत डॉ आपटे यानीहि माडलें आहे[५४]

भक्तीस जन्म देणाऱ्या श्रद्धेची महतीहि वेदानी गाइली आहे 'श्रद्धा हृदयस्थ असून श्रद्धावतास इष्ट सिद्धी प्राप्त होत असते',[५५] 'श्रद्धा विश्वाचे आश्रयस्थान आहे, श्रद्धेनें देवाना देवपण येते, सारें विश्व श्रद्धामय आहे' असे वर्णन करून तैत्तिरीय ब्राह्मणाने पुढील प्रमाणे श्रद्धेचा महिमा गाइला आहे-[५६] 'श्रद्धा ही ऋतापासून प्रथम उत्पन्न झाली, ती सर्व प्राणिमात्राचें पोषण करणारी आहे भुवनाचे परिपालन करणारी श्रद्धादेवी आम्हाला अमृत अशा लोकाप्रत नेवो!'

## श्रद्धेचें जन्मस्थान : ऋत

म्हणजे भक्तिभावनेचें मूळ असलेली श्रद्धा आणि भक्तीचा ज्या

देवावर प्रथम वर्षाव झाला तो वरुण या दोहोंचा भक्ति आणि भागवत-धर्मातील विष्णु याच्याशी प्रत्यक्ष सबध येतो तसाच श्रद्धेचा आणि वरुणाचा वेदातील ऋताशी सबध येतो श्रद्धा ही ऋतजात आहे तर वरुण हा ऋतरक्षक आहे भागवतधर्मातील दैवत आणि भक्ति याचा अशा रीतीनें ऋताशी साक्षात् सबध येत असल्याने भागवतधर्माच्या पूर्वपीठिकेचे समग्र दर्शन घडविण्याच्या दृष्टीने वेदातील ऋततत्त्वाचा चिकित्सापूर्वक आभ्यास करणें आवश्यक ठरते ● ●

## २. टीपा

१ Corpus Ins. Indi vol III, Quoted by Robinson in *India Short Cultural History* P 106

२ Dasgupta, *History of Indian Philosophy*, vol II, P 539-40

Chandrahara Gulheri, 'Shiva Bhagwata' *Indian Antiquary*, Nov 1912

३ Hemachandra Raichowdhary, *Materials for the Early History of Vaishnavisum* Introduction

४ डॉ किलहॉर्न, (म) **व्याकरणमहाभाष्य**, पृ ३१४

५ Dasgupta, *History of Indian Philosophy*, vol II, P 540

६ लो टिळक, **गीतारहस्य**, पृ ५५१

७ धर्मकोश, **उपनिषत्काड**, प्रस्तावना, पृ ११५

८ कर्नल जेकब (स) **नारायणोपनिषद**, पृ ४

९ उदाहरणार्थ, नारायण महाज्ञेय विश्वात्मान परायणम्

नारायण पर ब्रह्म तत्त्व नारायण पर

नारायण परो ज्योति आत्मा नारायण पर

नारायण परो ध्याता ध्यान नारायण पर

**नारायणो** ०-११-३, ४, ५.

वासुदेवपरा वेदा वासुदेवपरा मखा
वासुदेवपरा योगा वासुदेवपरा क्रिया
वासुदेवपर ज्ञान वासुदेवपर तप
वासुदेवपरो धर्मो वासुदेवपरा गति

– भागवत १–१–२८ व २९

१० **नारायणीयोपनिषद,** १२–२, धर्मकोश, **उपनिषत्काड** तृतीयखड, पृ १६३५

११ **शतपथब्राह्मण,** १३–६–१–१

१२ **भागवत,** २४–१८

१३ धर्मकोश, **उपनिषत्कांड,** प्रस्तावना पृ ११५

१४ **ऋग्वेद,** १०–९०

१५ **अथर्ववेद,** १०–२

१६ धर्मकोश, **उपनिषत्काड,** खड पहिला, प्रस्तावना ११५

१७ 'अदितिर्द्यौरदितिरन्तरिक्षम्।
अदितिर्माता सा पिता स पुत्र
विश्वे देवा अदितिर् जातमदितिर् जनित्वम्॥

-- ऋग्वेद १--८९--१०

'दिव्य तेजाने झळकणारी प्रतिभा, (द्यो), चैतन्याची आतरिक स्फूर्ति (अन्तरि--क्षम्), लहानथोर सर्वा विषयी उदार समानवृत्ति (मा-ता), जगाला रक्षणाची पाखर घालणारे व्यापक प्रेम (पिता), अवघा ससार सुखाचा करणारी पवित्रता (पु त्र), विश्वसग्रहाची शक्ति (विश्वेदेवा), पाचवार्णिक मानव वशा-विषयी सहानुभूति (पच जना), भूतकाळाचे अनादि स्मरण (जातम्), आणि भविष्यकाळाविषयीची अनत आशा (जनित्वम्) --ही सर्व अदितीच्या ठाई एकवटली आहेत' असे राहुगण -पुत्र गौतमानें वर्णन केले आहे "- विनोबा, **उपनिषदाचा अभ्यास** पृ ४७

देवाची माता असाहि अदितीचा उल्लेख ऋग्वेद ६–५०–१ मध्ये आढळतो.

१८ Griswold, *The Religion of Rigveda*, P 143

१९ Macnicol, *Indian Theism*, P 32

२० Grierson Bhakti Marga, *Encyclopaedia of Religion and Ethics* vol II

२१ सूर्य आत्मा जगत तस्थुषश्च !

२२ यास्काचार्यांनी और्णनाभ याच्या मताचा उल्लेख केला असून त्याच्या मतें

माध्यान्ही आकाशात उन्नत असलेले सूर्यबिंब हेच विष्णूचे परमपद होय

२३ **ऋग्वेद**, १–९५–३, ४–१–७, १०–८८–१०

२४ Griswold, *Religion of Rigveda*, P 143

२५ **निरुक्त**, द्वितीयखंड, १२–१८

२६ Macdonell (Ed) *Brihaddevata Khanda of Sonaka* (सूत्र ६९) P 20

२७ **ऋग्वेद**, १–१५४–१ वरील सायणभाष्य

२८ **ऋग्वेद**, १–१५४ व १५५ सूक्त

२९ **ऋग्वेद**, ६–४९–१३,

३० **ऋग्वेद**, १–१५५–६

३१ **ऋग्वेद**, १–१५४–३, ७ १००–४,

३२ **ऋग्वेद**, १–१५५–६,

३३ **ऋग्वेद**, १–१५४–४,

३४ **ऋग्वेद**, १–१५४–४, पुरुषसूक्त

अतो धर्माणि धारयन् विष्णो कर्माणि पश्यत
तद्विष्णोः परम पद सदा पश्यन्ति सूरय ॥

३५ Dandekar, R N Vishnu in Rigveda, *A volume of studies in Indology presented to M M Kane*, P 95.

३६ **ऋग्वेद**, ७–४१, ५,

३७ पहा, श्रीमद्भागवत, १–३–१

जगृहे पौरुष रूप भगवान् महदादिभि
सभूत षोडशकल्मादौ लोकसिसृक्षया ॥

३८. **ऋग्वेद**, १–१२३–३.

३९ **ऋग्वेद**, ७–४१.

४० Adolf kaegi, *Rigveda The oldest Literature of Indians*

अथर्ववेदात भाग्याची व विवाहाची अधिष्ठात्री देवता असे भगाचें वर्णन आहे Griffith, *Hymns of Atharvaveda*. P, 163.

४१. वेलणकर, **ऋग्वेदांतील भक्तिमार्ग**, पृ ८४ ते ९०.

'The theism of the Vaishnavas and the Bhagvats with its emphasis on Bhakti is to be traced

to the Vedic worship of Varuna with its consciousness of sin and Trust in Divine forgiveness' Dr Radhakrishnan, *Indian Philosophy*, vol I, Page 78

४२. **ऋग्वेद**, ५- ६४--१,

४३ **ऋग्वेद**, ७ -८५--४,

४४. 'Varuna is real trustee of Rita,' Bloomfield, *The Religion of Veda*, Quoted in *Indian Theism* P 28

४५ महाराष्ट्रीय सताच्या वाङ्मयात परमेश्वरप्राप्तीसबधाने जी तळमळ दिसून येते तशाच प्रकारची उत्कट भावना वरुणाच्या काही सूक्तातहि आढळते 'हे वरुणा, मी माझ्या शरीराने तुझ्याशी केव्हा सन्मुख होईन, तुझ्यात केव्हा अतर्मुख होईन ? माझ्या चित्ताची शुद्धी होऊन मला वरुणाचे केव्हा दर्शन घडेल ? देवा, कोणते पाप माझ्या हातून घडले आहे ? माग तरी माझ्या पापाची पृच्छा करण्यासाठी विद्वानाकडे मी गेलो त्यानी सागितले, 'वरुण तुझ्यावर कोपला आहे !' म्हणून म्हणतो, हे देवा, राग सोड आणि मला तुझ्या शापातून मुक्त कर अरे, असा कोणता अपराध घडला आहे माझ्या हातून ? तू आमचा घात करण्यास का सिद्ध झाला आहेस ? साग, माझे पाप साग म्हणजे त्याचे प्रायश्चित्त घेऊन शुद्ध अत करणाने तुझें नामस्मरण करीत मी तुझ्या सनिध येऊ शकेन "

– **ऋग्वेद**, ७–८२–२ ते ४ (सायणभाष्यासह)

४६ रा. ना दाडेकर, **वैदिक देवताचे अभिनवदर्शन**, पृ ६५

४७ पाणिनि, ४–३–९५

४८ गीता, १३- १०, व १४--३६ वरील शाकरभाष्य, गीता, ७ -२१ व ९--३४ वरील रामानुजभाष्य

४९ भागवत, १ -२--६, ६--३--२२.

५० श्वेताश्वतरोपनिषद्, ६--२३

५१ Dr Radhakrishnan, *Indian Philosophy*, vol I, P 525

५२. कित्ता, पृ १०८.

५३. Dr Grierson, Bhakti Marga, *Encyclopaedia of religion* and *Ethics*, vol II, P. 549

५४. डॉ. आपटे, "ऋग्वेदातील भक्तिमार्ग," **नवभारत**, एप्रिल १९४९

५५ ऋग्वेद १०--१५१, १ ते ५,

५६. श्रद्धादेवी प्रथमजा ऋतस्य ।
विश्वस्य मूर्नि जगन प्रतिष्ठा ॥
ता श्रद्धा हविषा यजामहे । मा नोलोक अमृन दधातु
ईशाना देवा भुवनस्याधिपत्नि ॥
--तै ब्रा ३--१२--३--२ (धर्मकोश, **उपनिषत्काड**, प्रथमखड, पृ ४२७)

# ३. भागवतधर्माची प्रेरणा

धर्माचे उद्दिष्ट–सत्य पर धीमहि--वैदिक देवताचा समानधर्म ऋत–ऋत विश्वाचे नियामक सूत्र- ऋत सत्य ब्रह्म यज्ञोवा-युगधर्म आणि ऋत–विष्णूची ऋताशी व युगधर्माशी एकरूपता-भागवतधर्माची प्रेरणा ऋत–मराठी सताचें वैशिष्ट्य-नाथानी घडविलेले ऋतदर्शन

पुरुषरूपधारी भगवान् विष्णूची आणि त्याच्या कृष्णप्रमुख अवताराची भक्ति करणारा भागवतधर्म इ स च्या पूर्वी किमान १४०० वर्षे मान्यता पावलेला होता असें उपलब्ध पुराव्याच्या आधारावर नि शकपणें म्हणता येईल या काळाच्याहि पूर्वी भागवतधर्माचें अस्तित्व सिद्ध करणारे प्रत्यक्ष पुरावे आज उपलब्ध नसले तरी वैदिक वाङ्मयात आढळून येणारी भागवत-धर्माची पूर्वपीठिका लक्षात घेता या धर्माच्या प्राचीनत्वा विषयीं शका रहात नाही पुरुषरूपधारी भगवान् विष्णु आणि भक्ति याचें उगमस्थान वैदिक देवतात विशेषें करून वरुण आणि आदित्यगण याच्या गुणधर्मात आढळते इतकेच नव्हे तर भक्ति, भगवान् आणि विष्णु या सर्वांचा ऋततत्त्वाशीं निकटचा सबध येत असल्यानें भागवतधर्माची परंपरा म्हणजे वैदिक ऋततत्त्वाचाच विकास होय हे पहिल्या दोन प्रकरणातील विवरणात स्पष्ट करण्यात आलें आहे

## धर्माचें उद्दिष्ट

'वेदोऽखिलो धर्ममूलम्'[1] या विख्यात वचनाप्रमाणें सर्वच वैदिक पथोपथाचें उगमस्थान वेदात आढळून येतें असें सिद्ध करणें अवघड जाणार नाहीं त्यामुळें वेदमूलकत्व हे भगवतधर्माचें अनन्यसाधारण वैशिष्टय आहे असें म्हणतां येणार नाही वैदिक देवदेवता आणि काहीं

वेदोक्त विचार व आचार यांच्या पुरताच वैदिक परंपरेचा आणि भागवत धर्माचा संबंध असता तर वैदिक परंपरेचा अधिक मागोवा घेण्याचें कारणहि नव्हतें. वेदोक्त धर्म आणि भागवतधर्म यांचा संबंध दूरान्वित परंपरेपेक्षा अधिक निकटचा व जिव्हाळ्याचा आहे. वेदोक्त धर्माच्या प्रेरणेतून भागवतधर्माची परिणती झाली आहे या वैशिष्टयामुळें युगायुगाचें ठायीं नवनवीन अवतार घेऊन सद्धर्माची धारणा करण्याचें कार्य भागवतधर्मास साधता आलें भागवतधर्माचें अनन्यसाधरण वैशिष्ट्य आहे तें हेंच.

इंद्रवरुणादि देवतांची स्तुति, देवतोद्देशानें केलेले यज्ञयाग अथवा 'चोदना लक्षणार्थे धर्मः.'[२] या पूर्वमीमांसासूत्राप्रमाणें पाळावयाचा विशिष्ट आचारधर्म म्हणजे समग्र वेदोक्त धर्म नव्हे वेदोक्त धर्माचें तें एक अंग आहे महत्त्वाचा प्रश्न आहे तो आचार कोणता पाळावयाचा हा नसून धर्माचरण कां करावयाचें हा आहे. स्वर्गाच्या कामनेनें धर्माचरण करणें ही खरी धर्मनिष्ठा नव्हे हे आपल्या धर्मग्रंथानीं अनेक ठिकाणीं स्पष्ट केले आहे मोक्ष हे धर्माचें उद्दिष्ट आपण मानतों 'बंधनातून सुटका' असा मोक्ष या शब्दाचा शब्दशः अर्थ होतो बंधनाचा अभाव ही मोक्षाची अभावात्मक कल्पना आहे तिचें भावरूपहि ध्यानात ठेवलें पाहिजे. नव्हे–धर्माच्या उद्दिष्टाच्या दृष्टीने तेंच अधिक महत्त्वाचें आहे.

सतत बदलणाऱ्या विश्वाच्या मुळाशी असलेलें अविनाशी व शाश्वत तत्त्व शोधणें, त्याचा प्रत्यय घेणें, त्याचे दर्शन घडण्यास आवश्यक असलेली साधना सत्कर्माच्या साधनाने साधणें थोडक्यात, सत्स्वरूपाचा साक्षात्कार अनुभविणें हे धर्माचें भावरूप उद्दिष्ट असतें. 'सता'नें मानवासह विश्वाची प्रगति होते आणि असतानें प्रगतीचा मार्ग रुद्ध होतो म्हणून विश्वाची व व समाजाची धारणा करणाऱ्या 'सता'चा आश्रय आवश्यक असतो हीच सन्निष्ठा हा धर्माचा आत्मा आहे या निष्ठेसाठींच सदसद्विवेक करावयाचा असतो सत्कर्म करावयाचें तें याकरिताच. सदाचाराचेंहि उद्दिष्ट तेंच कारण, 'सता'चा आणि विश्वविकासाचा संबंध अनिवार्य असतो.

# 'सत्यं परं धीमहि'

हीच सन्निष्ठा किंवा वैदिक परिभाषेत बोलावयाचे झाल्यास ऋतनिष्ठा ही भागवतधर्माची प्रेरणा आहे. आदर्श भागवत केवळ गिरिकंदरात राहण्यात जीवनाची कृतार्थता मानीत नाहीं स्वत च्या कृतीनें तो 'असता'चा निरास करीत असतो व इतराना देखील तशाच प्रकारची प्रेरणा व्हावी असा आदर्श त्याच्या आचरणात आढळतो. कर्मांचा स्वरूपत त्याग करण्याची शिकवण देणारा सन्यास या धर्मांत प्रभावी होऊ शकला नाहीं त्याचे कारण हेच आहे पारलौकिक जीवनाकडे लक्ष देऊन अथवा मरणोत्तर प्राप्त होणाऱ्या उत्तमगतीच्या अभिलाषेने धर्माचारण केलें पाहिजे हा आग्रह या धर्मात नाहीं मरणोत्तर गतीपेक्षा इहलोकींच्या आदर्श जीवनास या धर्मानें अधिक महत्त्व दिले आहे गीतेंतील स्थितप्रज्ञ, ज्ञानी किंवा भक्त अथवा दैवी सपत्तीची लक्षणे याचा अभ्यास केला असता ही गोष्ट सहज लक्षात येईल लोकात राहून, लोकाचें कल्याण करीत आदर्श महात्मा आपले जीवन कृतार्थ करीत असतो हे गीतेंतील आदर्श पुरुषाच्या लक्षणाचें सार आहे ४

या पुरुषोत्तमाचा स्वार्थ विश्वा एवढा व्यापक असतो ज्ञानेश्वराच्या शब्दात सागावयाचें झाल्यास तो 'विश्व होऊन विश्वात विचरत असतो.' स्वर्ग किंवा अपवर्ग याच्या प्राप्तीसाठी हे कार्य महात्म्याकडून होत नसतें. स्वर्गाची अभिलाषा ही सुद्धा 'सकाम' कर्मांत समाविष्ट होते निष्काम कर्मयोगात उत्तम वा अधम कोणत्याच कामनेस स्थान नसतें. निर्मल आत्माविष्कार निष्काम कर्मयोगानें घडत असतो अज्ञानानें जडप्राय झालेल्या जिवास 'जड' दिसणाऱ्या विश्वाच्या मुळाशीं असलेल्या सत्तत्त्वाचें दर्शन घडविण्यासाठी निष्काम कर्मयोगाची आवश्यकता असते. म्हणून भागवतधर्मानें साधक आणि ज्ञानी यानीं निष्काम कर्मयोगाचा आश्रय केला पाहिजे यावर अधिक भर दिला आहे त्याच प्रमाणें जगन्मिथ्यावाद्याच्या मताप्रमाणें विश्व हा केवळ भ्रम असल्याची भूमिका भागवतधर्मास मान्य नाही. विश्व हा सत्तत्त्वाचाच एक आविष्कार आहे (ऋत या शब्दाचा मूर्तामूर्त जग असा एक अर्थ आद्य शकराचार्यांनीं तैत्तिरीय उपनिषदावरील

भाष्यात दिला आहे हे या संदर्भात ध्यानात ठेवण्यासारखें आहे) त्यास मिथ्या मानता येत नाही ऋग्वेदातहि 'परब्रह्माचा किंवा सत्तत्त्वाचा आविष्कार ऋत आणि सत्य याच्या रूपाने प्रथम झाला त्यानंतर काल व तदनंतर सृष्टि आविष्कृत झाली' असे अंतिम मंडळाच्या उपान्त्य सूक्तात सांगण्यात आले आहे [५] या सूक्ताप्रमाणे ऋत आणि सत्य हे विश्वाचे आदिकारण ठरते भागवताच्या आदिम श्लोकात 'सत्यं परं धीमहि' या शब्दात याच आद्यतत्त्वास जे वंदन करण्यात आलें आहे त्याची संगती या संदर्भात सहज लागते

## वैदिक देवतांचा समानधर्म : ऋत

वरील सूक्तानंतर आलेलें म्हणजे ऋग्वेदाचें अंतिम सूक्त देखील विचारात घेण्या सारखे आहे. या सूक्तातील शेवटच्या ३ ऋचा पुढील प्रमाणें आहेत

> सं गच्छध्वं सं वदध्वं सं वो मनांसि जानताम्
> देवा भागं यथा पूर्वे संजानाना उपासते ॥२॥
> समानो मंत्रः समितिः समानी समानं मनः सह चित्तमेषाम्
> समानं मंत्रमभि मंत्रये वः समानेन वो हविषा जुहोमि ॥३॥
> समानी व आकूतिः समाना हृदयानि वः
> समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति
>
> ऋग्वेद, १०-१९१-२ ते ४

उपरोक्त सूक्तातील पहिली ऋचा अग्नीस उद्देशून असून वर दिलेल्या तीन ऋचा उपासकांशीं संबंधित आहेत 'तुमच्या बोलण्या-चालण्यात आणि वागण्यात समानता असावी पूर्वी ज्या प्रमाणें देवानीं समानता संपादन केली त्याप्रमाणें तुमची मनें, चित्त, हृदय आणि संकल्प यात समानता असावी' असा वर दिलेल्या तीन ऋचांचा भावार्थ आहे.

ऋग्वेदाचा हा संदेश आहे असें मानण्यास प्रत्यवाय नसावा. मानवाच्या आचरणात, संकल्पात आणि चित्तात सामानत्व असावें हे सांगताना समानत्वाचें स्वरूपहि याच ठिकाणीं दिग्दर्शित केलें आहे: 'देवांनीं पूर्वी ज्याप्रमाणे समानत्व संपादन केलें त्याप्रमाणें.' अर्थात् ज्या तत्त्वानें देवात

समानत्व निर्माण झाले त्या तत्त्वाचें अनुष्ठान मानवानें करावे असा संदेश ऋग्वेदाच्या या अंतिम सूक्ताच्याद्वारें मानवमात्राना देण्यात आला आहे

देवात समानत्व प्रस्थापित करणारें तत्त्व कोणतें ? देव, अग्नि, वरुण, मित्रावरुणौ, इंद्र, विष्णु, उषा, इंद्रावरुणौ या सारख्या देवताच्या गुण-धर्मांचा अभ्यास केला असताना त्याच्या वर्णनात एक समानधर्म आढळतो 'ऋत' या नावानें या धर्मांचा उल्लेख करता येईल देवाचें सर्वसाधारण वर्णन 'ऋतस्य अनुव्रता ',[६] 'ऋतप्रजाता ',[७] 'ऋतस्य गोपान्'[८] या शब्दात करण्यात आलें आहे अग्नि 'ऋतजात',[९] 'ऋतस्य गोपा',[१०] 'ऋतस्य धीति '[११] आहे देवाचा राजा वरुण अनृताचे पारिपत्य करणारा,[१२] ऋताच्या योगानें राज्य करणारा आहे [१३] मित्रावरुणौ ऋताची वृद्धी करणारे[१४] आणि ऋतासाठी प्रयत्नशील आहेत [१५] इंद्र ऋताच्या मार्गानें जाणारा,[१६] ऋताचें संरक्षण करणारा[१७] तर विष्णु ऋतगर्भ [१८] उषा ऋताच्या मार्गानें जाते म्हणून तिचा मार्ग चुकत नाही [१९] आदित्य याच परंपरेतले.[२०] इंद्रावरुणानीं ऋताच्याच योगानें वृत्राचा पराभव केला [२१]

अशा रीतीनें ऋग्वेदातील देवता ऋताची अभिव्यक्ति करणाऱ्या, ऋताचें संरक्षण आणि संवर्धन करणाऱ्या आहेत 'ऋत' हा सर्व देवताचा समानधर्म आहे ऋतानें विविध देवतात समानत्व आले आहे ऋग्वेदाच्या अंतिम सूक्तात उल्लेखिलेलें 'देवानीं पूर्वी ज्या प्रमाणें प्राप्त केलें तें समानत्व' म्हणजेच 'ऋत' होय हे वरील विवरणावरून स्पष्ट होईल हा समानधर्म देवा पुरताच मर्यादित राहिला नाही. वेदविद्येचे द्रष्टे महर्षि[२२] आणि यज्ञानुष्ठान करणारे यजमान[२३] याचें वर्णन देखील ऋतगर्भ भाषेंतच करण्यात आलें आहे [२४] म्हणजेच देवाना आणि मानवाना समानत्व प्राप्त करून देणारे तत्त्व म्हणजे 'ऋत' हेंच आहे हे सिद्ध होते देव ज्या तत्त्वाच्या संरक्षणार्थ आणि संवर्धनार्थ बद्धपरिकर आणि धृतव्रत असतात तें 'ऋत' असून मानवाच्या धर्मानुष्ठानाचे उद्दिष्ट देखील 'ऋत'च आहे हे वरील विवरणावरून ध्यानात येईल

## विश्वाचें नियामक सूत्र : ऋत

ऋग्वेदात ३५८ उताऱ्यातून एकदा वा अनेकदा आलेल्या 'ऋत' या शब्दातील मूळ धातु 'ऋ' हा गतिवाचक असून 'गति,' 'प्रगमन,' 'जाण्याचा योग्य क्रम' या अर्थानें हा शब्द प्रथम रुढ झाला आणि नंतर धर्माच्या गतिमानतेचें तो प्रतीक बनला मूळ धात्वर्थाच्या संदर्भानें पाश्चात्यांनीं या शब्दाचे विविध अर्थ पुढील प्रमाणें दिले आहेत

'Course of Things', 'Nature', 'Cosmic Order', 'Order of the World','World Ordinance', 'The law in Nature as in Human life'[२६] (निसर्गाचे व मानवी जीवनाचें नियंत्रण करणारें शाश्वत तत्त्व) 'Right Path', 'Proper order', 'Sacrifice', 'Sacred'[२७] इत्यादि.

या विविध अर्थांत विश्वाचा शाश्वत नियम' हा अर्थ प्रामुख्यानें आला आहे विश्वाची प्रगति एका निश्चित मार्गानें होत असते. प्रगतीच्या या मार्गाचें अनुसरण करणें हा वैदिक देवताचा धर्म असून या तत्त्वाचें सांगोपन आणि संवर्धन करण्यास सर्व देवता 'ऋतव्रत' आहेत मानवी जीवनाच्या विकासाचा मार्ग देखील याच तत्त्वाच्या आचरणानें साधणारा असल्यानें विश्वाच्या प्रगतीशीं अविरोधीच नव्हे तर पोषक आणि पूरक असलेल्या ऋताचे अनुष्ठान मानवानें केलें पाहिजे हे देवता, यजमान आणि महर्षि यांचा ऋताशी जो संबंध आला आहे त्यावरून ध्वनित होतं मानवानें धर्माचरण करावयाचें तें केवळ 'स्वार्था'साठीं नसून जगताची धारणा करणाऱ्या शाश्वत तत्त्वावरील अशाश्वताचें आवरण दूर करून क्षीणतेज झालेल्या सत्यास उजळ करण्याकरिता आत्मोद्धार आणि विश्वो द्धार हे द्विविध कार्य व्यक्तीनें केले पाहिजे. विश्वोद्धारातच आत्मोद्धाराची परिसीमा सामावलेली आहे ही भागवतधर्माची शिकवण ऋताच्या या महान् कल्पनेंतूनच परिणत झाली आहे ज्ञानप्राप्तीनंतर लोकसंग्रहासाठीं कर्म आवश्यक असल्याची गीतेची शिकवण[२८] आणि ब्रह्मप्राप्तीसाठीं कर्म सोडण्याची आवश्यकता नाहीं हा नाथाचा आग्रह ऋताच्या उपरोक्त भूमिकेचाच परिपाक होय.[२९]

विश्वाच्या विकासाचे शाश्वत तत्त्व आणि मानवी जीवनाच्या साफल्यास आवश्यक असणारा धर्म ही कल्पना 'ऋत' या शब्दाने ध्वनित होते म्हणूनच देवाच्या आणि सज्जनाच्या मार्गास 'ऋतपथ' असे अभिधान प्राप्त झाले 'आम्हाला ऋताच्या मार्गानें ने म्हणजे आम्ही पापमुक्त होऊ'[३०] अशी प्रार्थना वैदिक ऋषींनी केली आहे ती यामुळेच 'ऋताच्या स्थानावर देव आपलें संरक्षण करतात'[३१] असा ऋषींचा विश्वास होता याचे कारणहि हेच आहे

ऋग्वेदातील ऋतदेवाच्या स्तुतीवरूनहि त्याचे स्वरूप व कार्य स्पष्ट होण्या सारखें आहे

> 'ऋताच्या योगानें पाणी विपुल होतें. ऋतयुक्त प्रज्ञा पापाचें निवारण करते. ऋतयुक्त श्लोक अमंगलाचें श्रवण घडू देत नाहींत ऋताची साकाररूपे आल्हादकारक आहेत. ऋताच्या योगानें विपुल धान्य मिळावें अशी स्तोत्याची इच्छा असते सूर्यकिरणाचा पाण्यात प्रवेश होतो तो ऋतामुळेंच ऋतानें ऋतदेवाची स्तुति करणाऱ्या यजमानास ऋताची प्राप्ती होते बलप्राप्तीहि ऋतानेंच होतें विस्तीर्ण आकाश आणि पृथ्वी ऋतासाठींच अवतार धारण करतात परमोत्कृष्ट धेनूचें दोहन ऋतासाठीच होत असतें'
>
> – (ऋग्वेद ४–२४–८ ते १० सायणभाष्याधारे).

## 'ऋतं सत्यं ब्रह्म यज्ञो वा'

ऋताची ही महान् कल्पना वेदोक्त धर्माची प्रेरणा आहे वेदोत्तर कालात धर्मकल्पनेचा संकोच झाल्याकारणानें समग्र ऋतदर्शनाऐवजी ऋताच्या विशिष्ट अंगावर अधिक भर देण्यात आला. ब्राह्मणग्रंथाच्या काळात यज्ञागास प्राधान्य प्राप्त झाल्यामुळे ऋत म्हणजे यज्ञ हा अर्थ या काळात रूढ झाला. पुढच्या काळात होऊन गेलेल्या कर्मकांडाच्या पुरस्कर्त्यांनी देखील 'ऋत' हे केवळ यज्ञस्वरूप मानले

सत्य, आणि परब्रह्म हे ऋताचे पर्याय यास्काचार्यांनीं दिले असले तरी त्यांच्या दृष्टीनें ऋताचे ते गौण अर्थ आहेत. प्रधान अर्थ 'यज्ञ' हाच

गृहीत धरून त्यानी ऋत शब्दाची निरुक्ती केली आहे कर्मकाण्ड म्हणजेच वेदोक्तधर्म हा जसा वेदोक्तधर्माचा सकोच आहे त्याच प्रमाणें यज्ञ म्हणजेच ऋत हाहि ऋताच्या महान् कल्पनेचा सकोचच होय

कर्मकाण्डास प्राधान्य असलेल्या धर्माचा उबग घेऊन उपनिषत्कारानी तत्त्वसशोधन व तत्त्वचिंतन सुरू केलें तेव्हा ऋताच्या 'सत्य' स्वरूपाचें दर्शन त्याना घडले उपनिषद्वाङमयात ऋताच्या सर्व कल्पना सत्याच्या परिभाषेत माडण्यात आल्या आहेत ब्राह्मणकाळात 'यज्ञ' हा युगधर्म बनला त्या प्रमाणें 'सत्य' हा उपनिषत्कालीन युगधर्म होता बृहदारण्यकातील पुढील वर्णन या सदर्भात ध्यानात ठेवण्यासारखें आहे

'प्रथम हे ब्रह्म ब्राह्मणरूप होते तें एक असल्यानें प्रभावी होऊ शकलें नाही म्हणून त्यानें क्षत्रिय वर्ण बनविला त्यानतरहि समाज परिपूर्ण व समर्थ झाला नाही म्हणून ब्रह्मयानें वैश्यवर्णाची स्थापना केली. तरीहि तो अपूर्णच राहिला म्हणून समाजाचें पोषण करणारा शूद्रवर्ण त्यानें निर्मिला त्यानतरहि समाजाची असमर्थता दूर झाली नाही म्हणून श्रेयोरूप धर्माची स्थापना झाली हा धर्म क्षत्रियाचाहि नियामक होता म्हणून धर्मापेक्षा दुसरें बलवान् तत्त्व नाही धर्माच्या साहाय्यानें दुर्बल मनुष्य बलवतास जिंकतो जो हा धर्म तेंच सत्य होय म्हणूनच धर्म बोलणाराम तो सत्य बोलत आहे असे म्हणत त धर्म व सत्य हे एकच तत्त्व आहे'[३२]

सत्यसशोधनाची परिणती ब्रह्मविद्येत झाल्यानतर सत्स्वरूपी ऋत परब्रह्म या नावाने ओळखलें जाऊ लागले. उपनिषत्कारानी सत्य आणि परब्रह्म एकच असल्याचा निर्वाळाहि दिला आहे 'तेच सत्य होय, तें हे सत्य सृष्टीच्या प्रारभीं होतें हे आश्चर्यकारक सत्य हेंच प्रथम प्रकट झालेलें ब्रह्म होय'[३३] सत्याच्या व परब्रह्माच्या वरील वर्णनात वैदिक ऋताचा केवळ नामभेदानें विस्तार करण्यात आला आहे हे निराळें सांगण्याची आवश्यकता नाही ब्रह्मविद्येशी सबधित असलेलें आत्मतत्त्व देखील ऋताच्या उत्तरकालीन अर्थाचें निदर्शक आहे निरुक्ताच्या चौदाव्या अध्यायात 'ऊर्ध्वमार्ग गति हे देवताग सागतो' अशी प्रस्तावना करून आत्मपर अर्थ लावता येईल अशा ऋचाचा सग्रह निरुक्तकारानी केला आहे या सग्रहात महान् आत्म्याची जिज्ञासा असलेली पुढील ऋचा यास्काचार्यांनीं दिली आहे .

'अहमस्मि प्रथमजा ऋतस्य पूर्वं देवेभ्यो अमृतस्य नाम'
या ऋचेंतील 'ऋत' या शब्दाचा 'महान् आत्मा' असा अर्थ निरुक्तकारानी दिला आहे याच अध्यायातील दहाव्या खडात महान् आत्म्याच्या अनेक नावात 'ऋत' हे नावहि आढळतें [३४] इतर उपनिषत्कारानी देखील आत्मा आणि ब्रह्म याचा पर्याय शब्द म्हणून सत्याचा उल्लेख केला आहे 'ऋत सत्य पर ब्रह्म' (म ना उ ३-५-६)' तत्सत्य स आत्मा (छा. उ. ६-८-७), 'ब्रह्मणो नाम सत्यमिति' (छा उ. ८-३-४), 'सत्य ज्ञानमनत ब्रह्म' (तै उ २-१-१) इत्यादि याचा अर्थ असा की, उपनिषद्विद्येच्या विकासाच्या काळात ऋत हे सत्य या नावाने ओळखले जाऊ लागलें ऋताच्या वैशिष्ट्याच्या सर्व कल्पना उपनिषदात सत्याच्या रूपानें आविष्कृत होऊ लागल्या म्हणूनच सत्य, आत्मा, परब्रह्म हे ऋताचे पर्याय शब्द या काळात रूढ झाले.

कर्मकाडाच्या पुरस्कर्त्यानी 'यज्ञ' या ऋताचा पर्याय प्रामुख्याने मानला असला तरी ऋताचा तेवढाच अर्थ गृहीत धरून वेदसहितेचा अर्थ लावणें त्याना शक्य झाले नाही म्हणून ऋताचे इतर अर्थहि त्याना द्यावेच लागले अशा रीतीनें ऋत म्हणजे केवळ यज्ञ नव्हे याची अप्रत्यक्ष कबूली त्यानी दिलेल्या विविध अर्थाच्या द्वारे मिळालीच त्यामुळे ऋताची मूळ कल्पना गौण स्वरुपात का होईना या आचार्याच्या विवरणात स्पष्ट झाली सत्य, यज्ञ, परब्रह्म, उदक असे ऋताचे भिन्न पर्याय यास्काचार्यानी दिले आहेत [३५] सायणाचार्यानीहि संदर्भभेदाने ऋताचे पुढील अर्थ दिले आहेत

१ ऋतस्य सत्यस्य अवश्य भाविन: कर्मफलस्य
(ऋग्वेद, १-१-८ वरील भाष्य)
२ ऋतस्य गतस्य (ऋग्वेद, १-६५-९ व १० वरील भाष्य)
३ ऋतेन सत्यवचनेन (ऋग्वेद, १-२३-५ वरील भाष्य)
४ ऋतस्य सत्यभूतस्यादित्यस्य (ऋग्वेद, १-१२३-१३ वरील भाष्य)
५ ऋतस्य आदित्यस्य (ऋग्वेद, १-१२४-३ वरील भाष्य)
६. ऋतस्य उदकस्य (ऋग्वेद, ३-५५-१२ वरील भाष्य)
७. ऋत च सत्यं च ऋतमिति सत्यं नाम ऋत मानस यथार्थ-

सकल्पन सत्य वाचिक यथार्थभाषणम्
(ऋग्वेद, १०-१९०-१ वरील भाष्य)

८ ऋतस्य सत्यस्य ब्रह्मण '(ऋग्वेद, १०-१७७-२ वरील भाष्य)

## युगधर्म आणि ऋत

यज्ञ, सत्य, उदक, परब्रह्म, गत, आदित्य, मनाचा यथार्थ सकल्प, अवश्य प्राप्त होणारे कर्मफळ, हे यास्क आणि सायण या दोन आचार्यांनीं दिलेले पर्याय लक्षात घेतले असताना ऋताच्या यज्ञागास प्राधान्य देऊनहि या शब्दाच्या इतर अर्थच्छटा या आचार्यांच्या विवरणात आल्या आहेत हे समजून घेण्यास वेळ लागणार नाहीं वैदिक सस्कृतीच्या इतिहासाच्या पार्श्वभूमीवर या विविध अर्थांचा विचार केला असता भिन्नभिन्न काळातील युगधर्मास ऋताच्या कोणत्या ना कोणत्या अर्थानें सबोधिलें आहे हेहि ध्यानात येईल उपनिषत्काळात सत्य आणि परब्रह्म, व कर्मकाण्डाच्या प्रभावाच्या काळात यज्ञ हा ऋताचा वाचक बनला आहे. अशा रीतीनें ऋताचे प्रमुख अर्थ आणि भिन्न काळातील युगधर्म याची एकरूपता आढळून येईल तथापि, शाश्वतधर्म आणि विश्वनियम हे ऋताचे मूळ अर्थ मात्र पूर्णपणें दृष्टिआड झाले नाहीत. ऋताचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष उल्लेख असो वा नसो ऋततत्त्वाची कल्पना मात्र या ना त्या स्वरूपात अभिव्यक्त झालेली आहे इतर पथोपपथात धर्मांच्या विशिष्ट अगास प्राधान्य मिळालें परतु भागवतधर्मात मात्र ऋततत्त्वाचा सपूर्ण आविष्कार झाला हे गीता, भागवत पुराण आणि एकनाथ यानी उपदेशिलेल्या धर्माचा अभ्यास केल्यानतर प्रत्ययास आल्यावाचून राहणार नाहीं गीतेंत 'शाश्वतधर्मगोप्ता' (गीता, ११-१८) या नावानें कृष्णास सबोधिले आहे वैदिक ऋताच्या कल्पनेचें तें सार आहे. भागवत एकादशस्कधात ( १३-३९ ) आलेल्या 'ऋत' आणि 'सत्य' या पदाची व्याख्या श्रीधराचार्यांनीं पुढील प्रमाणें केली आहे 'ऋतं प्रमीयमान धर्म. सत्य अनुष्ठीयमान धर्म ' – प्रमाणानीं समजून घ्यावयाचा धर्म तें ऋत आणि आचरावयाचा धर्म तें सत्य

## विष्णूची युगधर्मांशीं एकरूपता

सायणाचार्यांनी दिलेल्या ऋताच्या अर्थात आदित्य हाहि एक अर्थ आहे भागवतधर्माच्या परंपरेच्या दृष्टीनें हा अर्थ महत्त्वाचा आहे इतर वैदिक देवता आणि ऋत याचे निकटचे संबंध असले तरी आदित्यगण म्हणजे ऋताचा साक्षात् अवतारच ! 'प्रगमनशील आदित्याचा मार्ग ऋताच्या तंतूनी विणला आहे'[३६] असें ऋग्वेदात आदित्याचें वर्णन आहे वरुण, मित्र, विष्णु इत्यादि आदित्यगणातील देवता ऋताला धारण करणाऱ्या आहेत वरुण ऋतगोप आहे,[३७] विष्णु ऋतगर्भ आहे,[३८] भगस्वसा उषा 'ऋतावरी' आहे[३९] तर सारेच आदित्य विश्वाची धारणा करणारे (धारयन्त विश्वस्य), भुवनाचे संरक्षक (भुवनस्य गोपा) आणि ऋतवान आहेत[४०] ऋतद्युम्न (ऋताचे प्रकाशक) आदित्य ऋतानें त्रैलोक्याची धारणा करतात[४१] विष्णूनें आदित्याची ऋतमय परंपरा सातत्याने चालविली आहे आदित्याचा राजा वरुण वेदकालातच मागें पडत चालला होता इतर देवताची पिछेहाट पुढच्या काळात झाली भगवान् विष्णूच्या बाबतीत मात्र तसें झालें नाही उलट आदित्यगणातील सर्व देवताचे गुणधर्म भगवान् विष्णूच्या गुणात केंद्रित झाले त्यामुळे भगवान् विष्णु हा ऋताचा साक्षात् अवतारच बनला या बाबतीत दुसरा एक पोषक पुरावा आपल्या धर्मग्रंथात आढळतो बदलत्या युगधर्मानुसार ऋताला ज्याप्रमाणे भिन्न नावे प्राप्त झाली त्याच प्रमाणे विष्णु हा बदलत्या युगधर्माचें प्रतीकहि बनला आहे. ब्राह्मणग्रंथात ऋताचें यज्ञाग प्रभावी ठरले 'ऋतमसि ऋतस्य ऋतमसि' 'ऋतस्य पथा असि देवानाम्' असे तैत्तिरीय संहितेत यज्ञीय अश्वाचे वर्णन आले आहे.[४२] अथर्वसंहितेत हुतावशिष्ट पचौदन ऋतसत्यरूप मानले आहे[४३] याच काळात विष्णूची यज्ञाशी एकरूपता वर्णिलेली आढळते[४४] 'यज्ञमुख,' 'यज्ञपुरुष' या अभिधानाने विष्णूचें आवाहन होऊ लागलें 'यज्ञात विष्णूचे यश अवतीर्ण झालें' असें वर्णन तैत्तिरीय आरण्यकातहि आले आहे म्हणजे ऋत यज्ञस्वरूप होताच विष्णु देखील यज्ञपुरुष झाला भागवतधर्मातील भगवान् विष्णूची आराधना देखील याच विकासक्रमाचा परिपाक आहे.

## भागवतधर्माची प्रेरणा : ऋत

साराश, ऋत हीच वेदोक्तधर्माची प्रेरणा असून भागवतधर्मानें याच प्रेरणेचा स्वीकार केला आहे वैदिक देवता ऋतार्चे सरक्षण करतात, ऋतामुळेच विभिन्न देवतात समानता निर्माण झाली, ऋतानें विश्वाचें भरण-पोषण होतें, ऋतानें धनधान्यादि समृद्धी प्राप्त होते तेजाच्या ततूनीं विणलेल्या ऋताच्या मार्गावर देव मानवार्चे सरक्षण करतात देवादिकाचा अवतार ऋतरक्षणार्थ असतो, ऋत हा देवाचा आणि मानवाचा जीवनाधार आहे परब्रह्माचा तो प्रथमाविष्कार आहे ऋताच्या मार्गाने विश्वाची प्रगति होते म्हणून मानवानी ऋताचाच मार्ग अवलबिला पाहिजे आत्मोन्नति आणि विश्वविकास या उभयताची साधना ऋतानुष्ठानाने होऊ शकते म्हणून धर्माचे उद्दिष्ट ऋतनिष्ठा हेच असावे या प्रेरणेने वेदोक्तधर्माचा अवतार झाला भागवतधर्मात हीच प्रेरणा साकारली आहे या धर्माचें आराध्य दैवत भगवान् विष्णु ऋताच्या बदलत्या अर्थाशी आणि बदलत्या युगधर्माशीं कसे निगडित झाले आहे याचे दिग्दर्शन वर आले आहे. प्रारभींच्या दोन प्रकरणात देखील भगवान्, विष्णु, भक्ति आणि भागवत या पदाचा ऋताशीं किती निकटचा सबध आहे याचें विवरण करण्यात आलें आहे ऋताचा हा सबध भागवतधर्माच्या आचारात प्रामुख्याने स्पष्ट झाला आहे. भागवतधर्मातील भगवान् विष्णूची उपासना म्हणजे ऋतस्वरूपाचीच उपासना होय. निष्काम कर्मयोगावर भागवत-धर्मानें दिलेला भर ऋतनिष्ठेचाच परिपाक आहे ऋताचा प्रथमाविष्कार असलेलें जगत् मिथ्या नसून सत्य आहे म्हणूनच जगाकडे पाठ फिरवून, कर्मसन्यासाचा अवलब करून, एकातात राहून केवळ परमात्मचिंतन करणें हाच धर्म आहे असें भागवतधर्म सागत नाही भागवतधर्मातील साधक आणि सिद्ध दोघेहि निष्काम कर्मयोगाचा अवलब करीत असतात कारण, केवळ आत्मोन्नति हे धर्माचें उद्दिष्ट नसून विश्वविकास साधण्याची जबाब-दारीहि मानवमात्रावर आहे याची जाणीव या धर्मात आहे समाजानिरपेक्ष अशा व्यक्तीच्या विकासास निश्चित मर्यादा आहेत. समग्र विश्वाच्या विकासानेंच व्यक्तीची परिपूर्ण प्रगति होऊ शकतें म्हणूनच विश्वाची धारणा

ज्या शाश्वत धर्मानें होतें त्या शाश्वतधर्माचे परिपालन – ऋताचें अनुसरण हे धर्माचे ध्येय असावें ज्ञानी व्यक्तीनें लोकसंग्रहासाठी कर्माचरण करावें असा गीतेचा आग्रह यासाठीच आहे

[ लोकसंग्रह या सामासिक शब्दातील 'लोक' या शब्दाचा अर्थ 'जन असा आद्यशंकराचार्यांनीं घेतला आहे परंतु संत ज्ञानेश्वरानी मात्र विश्व हा अर्थ घेऊन व्याख्यान केलें आहे

देखे फळाचिया आशा आचरे कामुक जैसा
कर्मी भरू होआवा तैसा निराशा ही ॥
जे पुढत पुढती पार्था हे सकळ लोकसंस्था
रक्षणीय सर्वथा म्हणऊनिया ॥
मार्गाधारे वर्तावे विश्व हे मोहरे लावावे

ज्ञानेश्वरी, ३–१६९ ते १७१ ]

'संता'वरील 'असंता'चें आवरण दूर सारून विश्वाच्या प्रगतीस व मानवाच्या उन्नतीस आवश्यक असलेला सत्याचा प्रकाश पसरविणे हे धर्माचें साध्य असतें अंधारातून प्रकाशाकडे आणि अज्ञानातून ज्ञानाकडे जाणारा मार्ग म्हणजे ऋताच्या तंतूनीं विणलेला तेजस्वी मार्ग या मार्गाच्या अनुसरणानें देवात समानत्व निर्माण झाले मानवात समानत्व निर्माण करणारा मार्ग हाच याच मार्गाचें–ऋताचें–अनुसरण केल्यानें नराचा नारायण होतो आणि स्वतः नारायण या धर्माचे संरक्षण करण्यासाठी नराचा अवतार घेत असतो मानवी देह या धर्मात पवित्र मानला आहे तो यामुळेच

## मराठी संतांचें वैशिष्ट्य

केवळ महाराष्ट्रापुरता विचार केला तरी महाराष्ट्रातील भागवतधर्म ऋताच्या भक्कम पायावर उभा आहे हे प्रत्ययास येईल. केवळ भजनात्मिका भक्तीचें स्वरूपच इतर प्रांतातील प्राकृत भाषांनीं पुरस्कारिलेल्या वैष्णव धर्मात आढळतें. पण, मराठी भाषेने मात्र भागवतधर्माची ऋतप्रेरणा भक्तीस निष्काम कर्मयोगाची जोड देऊन जोपासली ज्ञानेश्वरानी गीतेवर केलेलें व्याख्यान भागवतधर्माच्या मूळ स्वरूपास अधिक जवळचे आहे

नाथपूर्व किंवा नाथोत्तर कालात महाराष्ट्रात होऊन गेलेल्या संताच्या

उपदेशाचा आणि नाथोक्त भागवतधर्माचा तौलनिक अभ्यास केला असताना नाथाच्या वाङ्मयात समग्र ऋतदर्शन घडते असेंच म्हणावे लागेल. ऋताची वेदोक्त कल्पना, त्याच्या भिन्न भिन्न अर्थच्छटा, त्याचें प्रेरकत्व, भागवतधर्माने जोपासलेली ऋतमय परपरा याचा अविकृत आविष्कार नाथ-पुरस्कृत भागवतधर्मात झाला आहे भागवत पुराणाच्या काळापासून नाथ-काळापर्यंत सुमारे बाराशे–तेराशे वर्षांचा कालावधि लोटला होता या काळात भारतीय जीवनात अनेक स्थित्यतरे घडली परकीयाचीं राजकीय व धार्मिक आक्रमणे अनेकदा झाली होती वैदिक परपरेंत अनेक पथाचे उदयास्त झाले अस्तित्वात असलेल्या कित्येक पथात एकातिक निष्ठेचा प्रभाव अधिक होता धर्म पारलौकिक जीवन सुखमय करण्याचें एक साधन आहे, इहलोकींच्या जीवनाशीं धर्माचा अर्थाअर्थी सबध नाहीं, विश्व आणि मानवी शरीर घृणास्पद अत एव उपेक्षणीय आहे लौकिक जीवन हीन आणि हीनतर होत असलें तरी देवाची भक्ति करीत रहावें अशा प्रकारच्या कल्पना प्रबल ठरल्यानें प्रपचात पराभूत झालेले, इहलोकीची यात्रा जवळपास पूर्णकरून मरणाच्या उबरठ्यात असलेलेच तेवढे धर्माकडे वेधले जात होते अशा परिस्थितीत जनसामान्यास प्रभावित करून त्याना कार्यप्रवण करणाऱ्या धर्माचा उपदेश नाथानीं आपल्या जीवनाच्या आणि वाङ्मयाच्या आदर्शानें केला "धर्मग्लानीच्या काळात अधर्माचें निर्मूलन करण्यासाठीं मी अवतार घेतों" ही गीतोक्त भागवतधर्मपरपरा नाथाच्या व्यक्तिमत्वानें आणि त्यानी उपदेशिलेल्या भागवतधर्मानें पुन्हा एकवार खरी करून दाखविली.

धर्माचरण म्हणजे मरणाची पूर्वतयारी अशी वेडगळ समजूत म्हणजे धर्मकल्पनेचें विडबनच नाथाना मृतप्राय धर्म नको होता मृतप्राय झालेल्या जीवनास चैतन्यमय करणाऱ्या धर्माचें–भागवतधर्माचे–ते उपासक होते हा धर्म जागविण्यासाठीं त्यानी आपलें जीवित वेचलें. धर्मजागृती करीत असताना अधिकारपरत्वें नामस्मरण, भगवन्नामसकीर्तन इत्यादि साधनाचा त्यानीं उपदेश केला असला तरी भागवतधर्माचें ध्येय आणि प्रेरणा याचे समग्रदर्शन त्याना घडलें होते. म्हणूनच गतिमान् भागवतधर्म त्याच्या वाङ्मयात अवतीर्ण झाला नाथाच्या अवतारसमाप्तीनतर अवघ्या अर्ध्या-

शतकाच्या आत महाराष्ट्रानें स्वराज्यसुख अनुभविलें हा केवळ अपघाती योग मानता येत नाही नाथाच्या उपदेशानें आविष्कृत झालेल्या भागवत-धर्माच्या ऋतरूप मूळ प्रेरणेस त्याचे श्रेय द्यावेच लागेल

## नाथांनीं घडविलेलें ऋतदर्शन

नाथवाङ्मयात मूळ भागवतधर्माची ऋतरूप प्रेरणा कशारीतीनें प्रतिबिंबित झाली याचा सविस्तर विचार यथावकाश होईलच या ठिकाणी या प्रेरणेचें दर्शन नाथाच्या वाङ्मयात कसे घडते याचे सक्षेपानें दिग्दर्शन करणें अस्थानी ठरणार नाही ऋततत्त्वासबधी आतापर्यंत केलेल्या विवरणाच्या सदर्भात नाथानी 'ऋत' आणि 'सत्य' या शब्दावर केलेले पुढील व्याख्यान अभ्यासण्याजोगें आहे

ज्या नाव बोलिजे निजसत्य ते मी सागेन निश्चित
समब्रह्म देखणें सतत ते परम सत्य उद्धवा ॥
वस्तु न देखता सर्वसम जे देखणे गा विषम
तेंचि असत्य अतिदुर्गम सत्य ते ब्रह्म समसाम्यें ॥
केवळ जे सत्य भाषण ते निजसत्य नव्हे जाण
तेंचि विखींचें निरूपण स्वये श्रीकृष्ण सागत ॥
इतर ऋषींची वदती ऋत या नाव सत्य म्हणती
हे सत्य मानावे प्रवृत्ती समब्रह्म निवृत्तीमाजी सत्य ॥
ऋत म्हणिजे ते ऐसे येथ सत्यवाचा जें श्रोत्याचें हित
तेंहि दु खसबधरहित ऋत निश्चित बोलिजे ॥
चित्र पाहता दिसे विषम त्यामाजी भिती सदा सम
तेवी जग दिसता विषम ज्या ब्रह्म सम निजबोधे ॥

ए भा १८–४६० ते ४६५

'विषम दिसणाऱ्या विश्वात सत्य किंवा परब्रह्म हे सम असतें' हा भाव वरील ओव्यात आला आहे ऋग्वेदातील अतिम सूक्तातील समत्वाची कल्पना या ठिकाणीं सत्याच्या रूपानें स्पष्ट झाली आहे हे उघड आहे. दु खसंबधरहित व हितकारक सत्यवाणी असा ऋताचा अर्थ नाथानीं या ठिकाणीं दिला असला तरी वैदिक ऋताची कल्पना 'सत्या' च्या विवरणात

प्रतिबिंबित झाली आहे केवळ सत्यवचन म्हणजे सत्य नसून समत्वदर्शन हे सत्य होय समत्वरूपानें या सत्याचा घेतलेला प्रत्यय म्हणजेच परब्रह्म-प्राप्ती. (सत्य आणि परब्रह्म हे ऋताचे पर्याय थोर आचार्यांनी दिल्याचें पूर्वी उल्लेखिले आहेच नाथानी सत्य म्हणजे परब्रह्म हा जो अर्थ केला आहे तो या परंपरेस अनुसरूनच )

ऋग्वेदातील उपास्य सूक्तात उल्लेखिल्याप्रमाणें विश्व ही सत्स्वरूपी परब्रह्माची स्फूर्ति आहे हे नाथानीहि प्रतिपादिलें आहे

बीज ऊम दोनी एकरूप तैसा प्रपंच जाण सूक्ष्म चित्स्वरूप
जेवि कापुसाचे ततु कातोनि निश्चितु पट केला ।।
आडवे विणले ततु त्यासि वस्त्रनाम वृथा मातु
तेवी ससार शब्द हा व्यर्थु स्फुरे भगवतू सा तत्रूपे ।।
— ए भा १२–४११, ४१३ ते १५

विश्व मिथ्या नाहीं सत्याचाच तो आविष्कार आहे त्यामुळें प्रपच किंवा ससार उपेक्षणीय ठरत नाही त्याच प्रमाणें देहधारी मानव देखील

कर्मभूमि नरदेहप्राप्त हें पूर्ण निजभाग्याचे मथित
देव नरदेह वाछित — ए भा ३–२७०
यालागी नरदेह निधान जेणे ब्रह्मसायुज्यी घडे गमन
देव वाञ्छिती मनुष्यपण देवाचे स्तवन नरदेहा
— ए भा ९–२५०
या देहाचेनि साधनें अविनाशपद पावणे — ए भा ९–२८१

असा नरदेहाचा महिमा असल्यानें पूर्वसुकृतानें प्राप्त झालेल्या नरदेहाच्या योगानें शाश्वत धर्माचें आचरण करणें मनुष्यमात्राचें परम कर्तव्य ठरतें हा शाश्वत धर्म म्हणजे विषम दिसणाऱ्या विश्वात समत्वानें असणारे, देव ज्याचें सरक्षण आणि सवर्धन करतात तें ऋततत्त्वच होय सत्याप्रमाणेच कर्म देखील ब्रह्मस्वरूप असते ही नाथाची शिकवण, प्रपच परमार्थरूप असल्याचा त्याचा सिद्धात म्हणजे ऋतप्रेरणेचाच आविष्कार होय [४५]

एकनाथांनीं पुरस्कारिलेल्या भागवतधर्माचे स्वरूप विशद करण्यापूर्वी भागवतधर्माची पूर्वपीठिका आणि प्रेरणा याचा विस्तारानें प्रपंच का

करण्यात आला याची कल्पना आता येईल विशिष्ट देवतेची उपासना व विशिष्ट आचारधर्म एवढाच भागवतधर्म नव्हे भागवतधर्माचें आराध्य दैवत आणि आचार याना विशिष्ट ध्येय आहे मानवी कर्तव्य आणि विश्वाची धारणा याचा समन्वय या धर्मानें साधला असून विश्वात सत्याचा प्रकाश प्रभावी व्हावा, असत्याचें निराकरण व्हावें यासाठीं भागवतधर्माचा अवतार आहे या ध्येयाशी – ऋतरक्षणाच्या प्रेरणेशी – सुसगत असा आचार, विचार आणि आराध्य देव याची साधना सागण्यात आली आहे आचारधर्म किंवा आराध्य दैवत याच्या पेक्षा ऋतरक्षणाच्या प्रेरणेस भागवतधर्माने अधिक महत्त्व दिले आहे त्यामुळे या धर्मात प्रगमनशीलता टिकून राहिली· जडता आणि सांप्रदायिकता या धर्मात दृढमूल झाली नाही ती यामुळेंच भागवतधर्माची ही ऋतरूप मूळ प्रेरणा एकनाथानी पुरस्कारिलेल्या भागवतधर्मात आढळून येते म्हणून वेदकालीन धर्मप्रेरणा व पूर्वपीठिका याचा विचार प्रथम करण्यात आला आहे

भागवतधर्माच्या विकासक्रमात ऋततत्त्वाचा आविष्कार भिन्नकाळीं कोणत्या स्वरूपात झाला याचा अभ्यास यानतर व्हावयाचा असून तदनतर नाथोक्त भागवतधर्माचें स्वरूप स्पष्ट करण्यात येईल

## ३. टीपा

१ **मनु,** २–६
२ **पूर्वमीमासा,** १–१–२
३ **ज्ञानेश्वरी,** ९–३०७ ते ३२०,
४ **गीता,** १२–१५
५ **ऋग्वेद,** १०–१९०–१ ते ३
६ **ऋग्वेद,** १–६५–३ व ४
७ **ऋग्वेद,** १–६५–९ व १०
८. **ऋग्वेद,** ६–५१–३.

९. ऋग्वेद, १-१८९-६
१० ऋग्वेद, १-१-८
११ ऋग्वेद, १-१६१-५ व ६
१२ ऋग्वेद, ७-८५-४
१३ ऋग्वेद, १०-१२४-५
१४ ऋग्वेद, १-१-८
१५ ऋग्वेद, १-१५३-३
१६ ऋग्वेद, ३-३१-५
१७ ऋग्वेद ४-२३-८
१८ ऋग्वेद, ४-२३-९
१९ ऋग्वेद, १-१२३-१३
२० ऋग्वेद, ७-६०-३
२१ ऋग्वेद, ६-६८-२
२२ ऋग्वेद, १-१७९-२
२३ ऋग्वेद, ६-३-१
२४ "ग्रीक आणि रोमन देवनाचा संबंध दैवाशी (fate) निगडित झाला आहे त्या प्रमाणे वेदिक देवता ऋताशी संबद्ध आहेत प्रत्येक देवता आपल्या कक्षेत ऋतस्वरूपी असून ती ऋताचा आविष्कार करते, ऋताचे संरक्षण करते आणि ऋताचीच इच्छा बाळगते" Griswold, *Religion of Rigveda* P 107 & 109
२५ Macdonell, *Sanskrit English Dictionary*.
२६ Adolf kaegi, *Rigveda The Oldest Literature of Indians*, P 126
२७ Oldenberg, *Vedic Hymns* vol I & II.
२८ गीता, ३-१७ ते २५
२९ ब्रह्मालागी कर्म साडणे हे कुडे पाय खटोनि पुढे चालू पाहसी
डोळ्याची नव्हाळी वेळूनाना करतळी
पाहो जाता मुळी पाहणेच नाही
एका जनार्दनी सर्व कर्म पाही साटी माटी नाही तये ठायी ॥
फळाअगी फूल डोले ब्रह्मी कर्म तैसे चले
फळामाजी फूल जैसे ब्रह्मी कर्म तेवि प्रकाशे

फूल सुके फळ पोखे कर्म ब्रह्मचि होय देखे
एकाजनार्दनी वर्म कर्मी देख झाले ब्रह्म ॥
– **एकनाथ गाथा,** (तुकारामतात्या संपादित) पृ ४४४ व ४४६

३० **ऋग्वेद,** १०–१३३–६

३१ **ऋग्वेद,** १०–१७७–३

३२ **उपनिषत्प्रकाश,** पुष्प ९ वे पृ ८३ ते ९०

३३ **किस्ता,** पृ ५९५

३४ **निरुक्त,** द्वितीयखंड, पृ १०७ व १०११
'अहमस्मि' ही ऋचा चतुःश्लोकी भागवतातील पहिल्या श्लोकाशी समानार्थक आहे हे लक्षात ठेवण्यासारखे आहे वेदोक्तधर्म भागवतधर्मात कशा रीतीने परिणत झाला याचा प्रत्ययहि यावरून येण्यासारखा आहे चतु –श्लोकी भागवताचा पहिला श्लोक असा
अहमेवासमेवाग्रे नान्यद् यत्सदसत्परम्
पश्चादहं यदेतच्च योऽवशिष्येत सोऽस्म्यहम् ॥

३५ **निरुक्त,** द्वितीय खंड, ८–६ आणि २–२५, ४–१९

३६ **ऋग्वेद,** १–१३६–२

३७ **ऋग्वेद,** ५–६८–४

३८ **ऋग्वेद,** ४–२३–९

३९ **ऋग्वेद,** ३–६१–६

४० **ऋग्वेद,** १–२७–४

४१ **ऋग्वेद,** २–२७–८

४२ धर्मकोश, **उपनिषत्कांड,** प्रथमखंड पृ ४३०

४३ **किस्ता,** पृ ४३४ व ६४८

४४ **शतपथब्राह्मण,** १४–११ 'मखो विष्णु'

४५ कर्म–ब्रह्माची एकरूपता वर दिलेल्या २९ व्या टिपेतील अभंगात आढळून येईल प्रपंच परमार्थरूप असल्याचे प्रतिपादन नाथवाङ्मयात विपुल आहे उदा०– आवटे, **एकनाथाच्या अभंगाचा गाथा,** क्र ३२६१, **हस्तामलक,** ५७७ व ५७९, **ए भा** २३–३८९–३९४,

द्वितीय खंड

# भागवतधर्माचा विकास

- गीतोपदिष्ट धर्म
- नारायणीय धर्म
- गीता ते भागवत
- भागवतपुराणोक्तधर्म
- 'भाष्यकाराते वाट पुसतु'
- भागवतधर्माचे मध्ययुगीन स्वरुप

# ४. गीतोपदिष्ट धर्म

महाभारतकालीन द्विविध स्वरूप–भगवान् कृष्णाचें व्यक्तिमत्त्व–गीतेचें महत्त्व–गीतेतील ब्रह्मविद्या–आणि योगशास्त्र–धर्माचा व्यापक अर्थ–कर्तोद्भव धर्म–सुलभ व्यक्तोपासना–भक्तिप्रधान भागवतधर्म–

भागवतधर्माच्या भिन्नकालीन स्वरूपाच्या दृष्टीने या धर्माच्या विकास-क्रमात पाच कालखंड कसे पडतात याचें विवेचन पहिल्या प्रकरणात आलें आहे यापैकीं भागवतधर्माचा उद्गम आणि प्रेरणा याच्या विवरणात पहिल्या कालखंडाचा म्हणजे वेदकालीन स्वरूपाचा विचार झाला असल्यानें त्याचे निराळे विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं वेदकालानंतर महा-भारतकालीन भागवतधर्माचा अभ्यास करणे आवश्यक ठरतें महाभारतात भागवतधर्माचें द्विविध स्वरूप आढळतें भीष्मपर्वांतर्गत भगवद्गीतेंत सांगितलेला भागवतधर्म आणि शांतिपर्वांतील नारायणीयाख्यानातून आलेला नारायणीय धर्म

## महाभारतकालीन धर्माचें द्विविध स्वरूप

एकाच महाभारतात हे दोन्ही उपग्रंथ येत असले तरी त्याचें स्वरूप मात्र भिन्न वाटतें त्यावरून मूळ भगवद्गीता रचल्यानंतर बराच कालावधि लोटल्यावर शांतिपर्वांतील नारायणीयाख्यानाची रचना झाली असावी असे वाटते नारायणीय आख्यानात 'हा धर्म गीतेंत पूर्वी सांगितला आहे' असे स्पष्ट उल्लेख आले आहेत [१] इतकेंच नव्हे तर महाभारतात आदि-पर्वापासून गीतेचा निर्देश अधूनमधून येतो त्यावरून 'महाभारतापूर्वी गीता रचण्यात आली असावी. . प्राचीन भागवतधर्माचें स्वरूप संक्षेपानें सांगणारी गीता महाभारताच्या एखाद्या संस्करणाच्या वेळीं महाभारतात

समाविष्ट करण्यात आली असावी' हे असभवनीय वाटत नाही[२] गीता आणि नारायणीय आख्यान याच्या दर्म्यान दीर्घ कालावधि लोटल्यामुळें स्वरूपात भिन्नता निर्माण होणे स्वाभाविक आहे गीतोपदिष्ट धर्मच नारायणीय धर्माच्या रूपाने सांगितला आहे असें महाभारतकारानीच नमूद केल्या कारणानें उपरोक्त दोन्ही ग्रथ भागवतधर्मीय परपरेंतीलच आहेत या विषयी मात्र शका रहात नाहीं

## भगवान् कृष्णाचें व्यक्तिमत्त्व

शका उरते ती कृष्णाच्या अवतारासबधी भागवतधर्मात कृष्ण हा विष्णूचा अवतार मानला जातो 'कृष्णस्तु भगवान् स्वय' ही उक्ति भागवतधर्मीयाच्या परिचयाची आहेच काही अपवाद वगळले तर गीतेंत श्रीकृष्णाचा उल्लेख सर्वत्र 'श्रीभगवान्' असा आला आहे महाभारतातील कृष्णाचे चारित्र लक्षात घेता त्याला अवतारी पुरुष म्हणून महाभारतकालात मान्यता मिळाली होती काय ? कृष्ण या नावाची व्यक्ति अस्तित्वात तरी होती काय ? अशा काही शका या सदर्भात उपस्थित होतात

वेदकालापासून महाभारताच्या कालापर्यंत महत्त्वाच्या तीन ठिकाणी तरी 'कृष्ण' चा सबध येतो वेदातील मन्त्राचा द्रष्टा, छादोग्योपनिषदात उल्लेखिलेला घोरआगिरसाचा शिष्य देवकीपुत्र आणि महाभारतात अर्जुनाला गीता सागणारा हे तिन्ही कृष्ण भिन्न असून भागवतधर्माच्या उत्तरकालीन सस्करणात ते अभिन्न झाले असें कै भाडारकराचें मत आहे[३] लोकमान्याच्या मताप्रमाणे कृष्ण चार पाच नसून तो एकच ऐतिहासिक पुरुष आहे.[४] इतरहि काही विद्वानानीं हाच अभिप्राय व्यक्त केला असून या ऐतिहासिक पुरुपाचा काल खिस्तापूर्वी किमान ९ शतके दिला आहे[५]

आपल्या विवेचनाच्या दृष्टीनें महत्त्वाचा प्रश्न यापुढचा आहे : महाभारतकालात कृष्णाची गणना विष्णूच्या अवतारात होत होती काय ? 'श्रीभगवानुवाच' या गीतोक्त पदाची सगति लावावयाची असेल तर कृष्ण भारतकालात देखील अवतारी पुरुष मानला जात असे हे निःसदिग्ध-पणें सिद्ध झालें पाहिजे. सभापर्वात दुर्योधनादिकानीं कृष्णाची निंदा केली

आहे त्यावरून अशी शका उपस्थित होते परंतु इतरत्र आलेले उल्लेख देखील जमेस धरावयास पाहिजेत 'कृष्ण हा आदितीचा पुत्र आहे, तो विष्णूचा अवतार आहे' असें वर्णन वनपर्वात आले आहे अनुशासन-पर्वातिल विष्णुसहस्रनाम, शांतिपर्वातील कृष्ण–युधिष्ठिर–संवाद, याच पर्वातील नारायणीय आख्यान या ठिकाणी कृष्ण विष्णूचा अवतार असल्याचे स्पष्ट उल्लेख आहेत [६] इतकेच नव्हे तर 'महाभारताची रचनाच विष्णूची महती गाण्यासाठी झाली आहे'[७] असा समज व्हावा, इतकी कृष्णाची महती महाभारतात वर्णिली आहे

वरील विवेचनाच्या संदर्भात पुढील बाबी गृहीत धरण्यास हरकत नसावी

१) अर्जुनास गीता सांगणारा कृष्ण हा अदितीचा पुत्र असून तो विष्णूचा अवतार आहे

२) भगवान् कृष्णानें गीतेत जो धर्म सांगितला तोच नंतर नाराणीय धर्माच्या रूपानें शांतिपर्वात आला आहे

३) गीता आणि शांतिपर्वांतर्गत नारायणीय धर्म याच्यात कालावधि बराच लोटल्यानें दोन्ही ठिकाणीं आलेल्या धर्माच्या स्वरूपात भिन्नता आढळून येते

म्हणुन महाभारतकालीन भागवतधर्माच्या स्वरूपाचा अभ्यास करताना गीतोपदिष्ट धर्म आणि नारायणीय धर्म या दोहोंचाहि विचार करणें आवश्यक ठरतें

## गीतेचें महत्त्व

वेदोक्त धर्मप्रेरणेतून भागवतधर्माची परिणती झाली असली तरी श्रीमद् भगवद्गीता हा या धर्माचा प्राचीनतम आद्य प्रमाण ग्रंथ मानला जातो. वैदिक परंपरेतील अन्यपंथीयानीं देखील या ग्रंथास प्रमाण मानलें आहे. भारतीय तत्त्वज्ञानाच्या प्रस्थानत्रयीत गीतेस महत्त्वाचें स्थान असल्यामुळें भिन्न विचारसरणीच्या आचार्यांनी आणि तत्त्वचिंतकानी गीतेवर भाष्यें लिहून आपली मतप्रणाली मांडली आहे आद्य शंकराचार्य, रामानुजाचार्य, निंबकाचार्यांचे अनुयायी, मध्वाचार्य, वल्लभाचार्य या आचार्यांनीं आपला

वेदांताविषयक दृष्टिकोन गीतेवर टीकाभाष्ये लिहून प्रतिपादिला आहे.

महाराष्ट्रात ज्ञानेश्वरानी भागवतधर्माचा उपदेश गीतेवरील 'भावार्थ-दीपिके' च्या रूपानें केला आहे महानुभाव पंथात गीतेवरील प्राकृत टीका विपुल आहेत दासोपंतानीं सव्वालक्ष 'गीतार्णव' लिहूनाहि 'गीतार्थचंद्रिका' लिहिली अलीकडच्या काळात लोकमान्य टिळक व आचार्य विनोबा भावे यानीहि आपली विचारसरणी गीतेवरील विवरणातूनच प्रगट केली आहे आहिताग्नि राजवाडे यानी 'निर्द्वंद्व' तत्त्वाच्या पुरस्कारार्थ लिहिलेले गीता-भाष्यहि या संदर्भात लक्षात ठेवले पाहिजे

महाराष्ट्राबाहेर देखील हाच प्रकार आढळतो योगी अरविंदाचें 'दैवी जीवन' आणि महात्मागांधींचा अनासक्तियोग गीतेवरच अधिष्ठित आहेत पौर्वात्य आणि पाश्चात्य तत्त्वज्ञात मान्यता पावलेले डॉ राधाकृष्णन् यानीहि गीतेवर भाष्य लिहिले आहे कित्येक पाश्चात्याना देखील या ग्रंथाने वेड लावलें आहे 'सामान्य जनतेचे बायबल' या शब्दात गीतेचा गौरव पाश्चात्यानीं केला आहे

सर्वकालीन पौर्वात्य व पाश्चात्य, तत्त्वचिंतक आणि मुत्सद्दी याना प्रेरणा देणारा हा ग्रंथ म्हणजे भारतीय तत्त्वज्ञानाचा एक अष्टपैलू हिराच होय सुमारें तीन हजार वर्षांच्या कालावधींत गीतेचें महत्त्व यत्किंचित्हि कमी झाले नाहीं या महान् ग्रंथात उपदेशिलेल्या शाश्वतधर्मास गीतेच्या या महतीचें श्रेय दिलें पाहिजे.

## गीतेंतील ब्रह्मविद्या —

कर्म, भक्ति आणि ज्ञान हे तीन 'योग' गीतेने उपदेशिले आहेत या योगांपैकी कर्मयोग आणि भक्तियोग याचा वेदोक्त ऋतप्रेरणेशीं असलेला साक्षात् संबंध दुसऱ्या आणि तिसऱ्या प्रकरणात विशद करण्यात आला आहेच गीतेतील ज्ञानयोगाचा आणि ऋताचा संबंधहि याच स्वरूपाचा आहे गीतेंतील ज्ञानयोग हा उपनिषदानी प्रतिपादिलेल्या तत्त्वाचा परिपाक आहे वेदातील ऋतरक्षक वरुणाच्या गुणधर्मांचा विकास उपनिषदातील ब्रह्मविद्येच्या रूपाने झाला असल्याने[८] या योगाची प्रेरणा देखील वेदोक्त ऋत हीच ठरते. अशारीतीनें गीतेंतील योगत्रयीचा ऋताशी साक्षात् संबंध

येतो त्यामुळे ऋतप्रेरणेचा भारतकालीन अवतार म्हणजेच गीतोपदिष्ट भागवतधर्म असें म्हणता येईल.

उपनिषद्विद्येचा गीतेवर बराच परिणाम झाला आहे कठ, केन, छांदोग्य, बृहदारण्यक इत्यादि उपनिषदातून कित्येक श्लोक व श्लोकार्धे गीतेंत जसेच्या तसेच किंवा भावार्थानें घेतले आहेत. विचारसाम्य दर्शविणारी स्थळें तर विपुल आहेत [९]

गीतेतील ज्ञानयोगाप्रमाणे कर्मयोगाचे मूळरूपहि उपनिषदात आढळून येतें निष्कामकर्मयोगाचा पुरस्कार सूत्ररूपानें ईशोपनिषदात केला आहे श्वेताश्वतरोपनिषदात परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करण्याचा आदेश आहे [१०] कर्म ही उपासनेची प्रतिष्ठा आहे (केन), कर्म करणारा मनुष्य जन्ममृत्यु तरून जातो (कठ), सर्व ब्रह्मविदामध्यें क्रियावान् पुरुष श्रेष्ठ आहे (मुण्डक), करून पाहिल्याशिवाय निष्ठा उत्पन्न होत नाही (छांदोग्य), या सारखीं किती तरी वचनें प्रत्यक्ष किंवा भावार्थानें गीतेच्या तत्त्वज्ञानात अंतर्भूत झालीं आहेत

## – आणि योगशास्त्र

केवळ उपनिषद्विद्येचे संकलन अथवा समन्वय एवढेच गीतेचें उद्दिष्ट होते असे मात्र म्हणता येणार नाही गीतेंत 'ब्रह्मविद्या' असली तरी गीता हे 'योगशास्त्र'हि आहे प्रत्येक अध्यायाच्या शेवटी 'इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे ... ' असा संकल्प असतो याचा अर्थ असा की, उपनिषदांतर्गत ब्रह्मविद्या योगशास्त्राच्या पार्श्वभूमीवर गीतेमध्यें आली आहे किंवा ब्रह्मविद्येस 'योगशास्त्रा'ची जोड गीतेने दिली आहे

धर्मधारणार्थ 'योग' शास्त्राच्या आधारानें ब्रह्मविद्या सांगण्याची आवश्यकता महाभारतकाळात निर्माण झाली होती कारण, ब्रह्मविद्या किंवा ज्ञानमार्ग वाढत वाढत आत्यंतिक संन्यासनिष्ठेंत परिणत झाला होता. त्याच प्रमाणें कर्ममार्गाचा संकोच इतका झाला होता कीं, वेदोक्त यज्ञयाग एवढेंच कर्माचें स्वरूप मान्यता पावलें होते. ज्ञानमार्गानें सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मचिंतन हें ध्येय मानलें होतें तर कर्मठांनी यज्ञयागादिक विधींतच धर्माची परिसीमा मानली होती वस्तुत. ज्ञान आणि कर्म यांचा परस्पराशी

विरोध नसून एकाच नाण्याच्या दोन बाजूप्रमाणे त्याचा सबध आहे. गीतेच्या पूर्वकालात ही सगती सुटली होती ज्ञानी सन्यासी झाले[११] व श्रुतिज्ञ कर्मठ बनले आणि बहुजनसमाज धर्मविहीन झाला पागळ्या शरीरात समर्थ मन आणि धडधाकड शरीरात पागळे मन असावे तशी समाजपुरुषाची अवस्था धर्माच्या या एकातिक कल्पनेमुळें झाली या दोन्ही मार्गाना विश्वाचा आणि विश्वकल्याणाचा विसर पडला व्यक्तिविकासास आणि समाजकल्याणास पोषक व पूरक होऊ शकेल अशा प्रकारचा ऋतधर्म सागण्यासाठीं गीतेचा अवतार झाला

केवळ कर्म किंवा केवळ ज्ञान यानें समाजविकास घडत नसतो ज्ञानाने कर्म डोळस होते आणि कर्माने ज्ञान कृतार्थ होतें अशा डोळस कर्माचा उपदेश गीतेत आला आहे गीतेत कर्मयोग आहे, ज्ञानयोग आहे तसाच भक्तियोगहि आहे परतु हे योग स्वतत्र किंवा परस्परनिरपेक्ष नसून परस्परपूरक आहेत समर्पक नावच द्यावयाचे झाल्यास गीतेंत 'जीवनयोग' आहे असे म्हणावे लागेल गीतेचे योगशास्त्र या प्रकारचें आहे 'कर्मसु कौशलम्' हा या योगाचा प्रारभ असून जीवात्म्याचा परमात्म्याशी योग ही त्याची परिसीमा आहे 'महाभारतकाळात जी परिस्थिति निर्माण झाली होती त्या परिस्थितीत उपनिषदाचें आदर्श कसे लागू पडतात हे गीतेनें दाखविलें आहे श्रद्धावान् मनुष्याला उपनिषदातील ध्येयवाद उपदेशिताना गीतेने आपला धर्म उपनिषदावर आधारला उपनिषदातील चिंतनशील ध्येयवाद भक्तिप्रधान वैयक्तिक जीवनातहि साकारता येतो हें गीतेने दाखविलें . गीतेंतील अध्यात्मवाद उपनिषदातील सत्यदर्शना-वर आधारलेला असूनहि व्यक्तिगत जीवन परिपूर्ण करण्यावर गीतेनें अधिक भर दिला आहे'[१२]

म्हणूनच जीवनाचे कोणतेंहि अग गीतेने तिरस्कृत ठरविले नाही अखिल विश्वात आणि व्यक्तीच्या हृदयात परमेश्वर आहे विश्वातर्गत आणि हृदयस्थ परमेश्वराच्या इच्छेशीं सुसगत असेच कर्म आपल्या हातून घडेल अशा पद्धतीनें व्यक्तीने आपलें चरित्र घडविलें पाहिजे. सत्कर्मानेंच जीवेश्वरसयोग साधता येतो 'लोकसग्रह' (Solidarity of the world) हें व्यक्तीच्या कर्माचे साध्य असून ज्ञान आणि कर्म याची

परिसीमा सुद्धा हीच आहे यासाठी इंद्रियदमन न करता इंद्रियाना 'अभ्यास आणि वैराग्य' याच्या साह्याने योग्य ते वळण लावले पाहिजे म्हणजे संकुचित स्वरूपाचा अहंकार लुप्त होऊन व्यापक अहं-वृत्ति (अहं ब्रह्मास्मि) जागृत होते व या अवस्थेत हृदयस्थ परमेश्वरच विश्वात्मक रूप धारण करून सर्वत्र वास करित आहे असा अनुभव येतो असा विश्वास गीतोक्त धर्मात आढळतो

## 'धर्मा' चा व्यापक अर्थ

'धर्मसमूढ बुद्धीचा' मोह दूर करून स्वधर्माचरणाच्या योगाने धर्मसंस्थापना करण्याचे ध्येय गीतेपुढे होते म्हणूनच धर्म हा शब्द अत्यंत व्यापक अर्थाने गीतेंत योजला आहे यज्ञयागादिक कर्म या अर्थानें गीतेंत धर्म या शब्दाचा उपयोग करण्यात आला नाहीं वर्णाश्रमाप्रमाणें प्राप्त झालेले कर्तव्य या अर्थाने 'स्वधर्म' हा शब्द गीतेंत आला आहे विश्वाचा नियम या अर्थानें चौथ्या अध्यायात (श्लोकात ७ व ८) धर्म या शब्दाचा उपयोग गीतेनें केला आहे अथर्ववेद आणि शतपथब्राह्मण या ग्रंथात याच अर्थानें 'धर्म' या शब्दाचा प्रयोग करण्यात आला आहे विश्वनियम किंवा वेदातील 'ऋत' हा अत्यंत प्राचीन असा धर्म शब्दाचा अर्थ गीतेस अभिप्रेत आहे [१३] ऋताच्या व्यापक अर्थाच्या संदर्भात गीतेंतील 'धर्माचा' अर्थ लावला असता गीताकारास कोणत्या स्वरूपाचा धर्म अभिप्रेत होता याची कल्पना येईल. '(विश्वाची धारणा करणारा) धर्म अधर्माचरण किंवा विपरीत धर्मकल्पना याच्या योगानें लोप पावू लागतो त्यावेळीं धर्माची घडी नीट बसविण्यासाठी मी अवतार घेतों' हे भगवताचे उद्‌गार (गीता, ४-७ व ८) 'देव ऋतरक्षक असतात, सज्जनाचा मार्ग हा ऋताचा मार्ग असतो,[१४] या पूर्वी वर्णिलेल्या वेदोक्त देवताच्या धर्माशी किती सुसंगत आहेत याची कल्पना येईल याच धर्माच्या रक्षणासाठी स्वधर्माच्या योगानें प्राप्त झालेलीं कर्मे निरपेक्ष बुद्धीनें करण्याचा आदेश भगवान् श्रीकृष्णानी अर्जुनास दिला आहे

## ऋतोद्भव धर्म

या दृष्टीने विचार केला असता 'गीता कर्मसन्यासपर आहे' हा सन्यासवाद्याचा सिद्धात टिकूच शकत नाही गीता कर्मयोगपर असल्याचे लोकमान्य टिळकानीं सिद्ध केलेच आहे त्याच्याहि पूर्वी निराळ्या संदर्भात एकनाथानी 'कर्मसन्यास हा गीतेच्या प्रतिपादनाचा विषयच नव्हे' असा सिद्धात माडला आहे. एकनाथी भागवत, (२–४२१,४२१,२२), चतुः–श्लोकीभागवत (६५८–६६५), स्वात्मसुख (२६२–७०), हस्तामलक (३५४–३५६) या ठिकाणी निष्काम कर्मयोग हीच खरी समाधि असल्याचें नाथानी सागितलें असून आधारासाठीं गीतेचा उल्लेख केला आहे [१५] गीता ही निष्कामकर्मयोगपरच आहे असे एकनाथाचें मत असून भागवत-धर्माच्या ऋतरूप प्रेरणेवर तें आधारलेलें आहे

या धर्मात ऋतप्रेरणा प्रभावी असल्याने परमेश्वराचे ज्ञान म्हणजेच जीवनाची कृतार्थता अशी भूमिका गीतेनें घेतली नाहीं ज्ञानोत्तर स्वत साठीं आवश्यक नसलें तरी 'लोकसग्रहार्थ' कर्माची आवश्यकता गीतेनें प्रतिपादिली आहे 'मला स्वत साठी कोणत्याहि कर्माची आवश्यकता नसताना मी लोकसग्रहार्थ कर्म करीत असतो' असे भगवान् स्वत सागतात म्हणून, ज्ञानोत्तर निष्काम कर्माचें आचारण हे ज्ञात्याचे कर्तव्य ठरते असा गीतेचा सिद्धात आहे

म्हणजे, प्रथम व्यक्तिविकासासाठी स्वधर्माचरण करावयाचें कर्माचा अहकार जडू नये, बुद्धीचें स्थैर्य ढळू नये म्हणून समबुद्धीने आणि ज्ञान-पूर्वक निष्काम कर्म करावयाचें परमेश्वराच्या यथार्थ स्वरूपाचें ज्ञानयोगानें वा भक्तियोगाने ज्ञान झाल्यानतर विश्वाच्या कल्याणासाठी सतत कर्म करावयाचें व आत्मोद्धाराबरोबरच विश्वोद्धारहि करावयाचा हे ज्ञान गीतेच्या द्वारें भगवतानीं सागितले आहे अर्थात्च व्यक्तीच्या आचरणातहि ऋत-रक्षणास प्राधान्य आहे. गीतेनें सागितलेल्या धर्माचा आणि ऋताचा अशा रीतीनें साक्षात् सबंध आहे

गीतेंत तत्त्वचर्चाहि प्रसगोपात आली आहे परतु तत्त्वचर्चेने अज्ञ जनाचा बुद्धिभेद होणार नाहीं व मूळ साध्यावर कें‌द्रित झालेलें लक्ष

ढळणार नाही याचीहि दक्षता गीताकारानी घेतली आहे शास्त्र हे व्याघ्रमुख असते असे म्हणतात म्हणून सामान्य माणूस शास्त्रापासून दूर अंतरावरच राहण्याचा प्रयत्न करतो किंवा शास्त्रीय चर्चेच्या चक्रव्यूहातच गुतून पडतो त्यामुळे या शास्त्राचा आणि आपल्या प्रत्यक्ष जीवनाचा काही संबंध आहे याचा त्याला विसर पडतो हा विसर पडणार नाही त्याचप्रमाणें ज्ञानानें व्यक्तिमत्त्व समृद्ध करण्याचे उद्दिष्ट ढळणार नाही याचीहि गीतेनें काळजी घेतली आहे म्हणूनच स्थितप्रज्ञ, ज्ञानी, आणि भक्त याच्या गुणाचा उल्लेख त्या त्या चर्चेच्या अनुसंधानाने गीतेंत केला आहे व सर्वांचे गुणधर्म जवळपास सारख्याच स्वरूपाचे असतात हेहि त्यानिमित्तानें दर्शविले आहे दुसऱ्या अध्यायातील स्थितप्रज्ञाचीं लक्षणें, पुढे आलेलीं ज्ञानी पुरुषाची लक्षणें, अथवा बाराव्या अध्यायातील भक्ताची लक्षणें किंवा दैवी संपत्तींतील गुणाचा समुदाय हेच दर्शविती

## सुलभ व्यक्तोपासना

'धर्मसम्मूढ चेता' अर्जुनास धर्माधर्म विवेक सागताना या धर्माचे स्वरूप विश्वनियमाच्या रूपानें प्रथम भगवतानी स्पष्ट करून नतर व्यक्तिधर्माचा उपदेश 'तू कर्म कर' असा वारवार कर्माचा उल्लेख करून भगवतानीं केला आहे परतु व्यक्तीनें कर्म करावयाचे ते प्रवाहपतितासारखे नसून स्वधर्माचरणाच्या रूपाने ते करावयाचें इतकेंच नव्हे तर ते निष्कामबुद्धीनें करावयाचें असा पुढचा मार्ग अर्जुनास सागण्यात आला आहे सुख-दु ख, लाभालाभ इत्यादि द्वंद्वाच्या अतीत होऊन समबुद्धीनें कर्म केलें असताना कर्माचे बधन लागत नाहीं म्हणून योगयुक्त होऊन स्थिरबुद्धीनें कर्मे करावीत ही पुढची अवस्था उपदेशिली आहे बुद्धि स्थिर होण्यासाठीं मनाचा निग्रह आवश्यक असतो आणि मन तर 'चल' आणि 'दुर्निग्रह' असें आहे मग हा योग साधावा कसा ? अभ्यास आणि वैराग्य हे त्यावरचे उपाय कृष्णानें सागितले आहेत. 'अभ्यासहि साधला नाही तर परमेश्वरार्पणपूर्वक कर्म कर' (गीता–१२–१०) असें सागून भक्तियोग सुचविला आहे.

अव्यक्त परमेश्वराचे ज्ञान हे कष्टसाध्य असल्यामुळे सगुणरूपधारी

परमेश्वराची उपासना करावी म्हणजे बुद्धि स्थिर होतें परमेश्वराचे ठिकाणी 'मनोबुद्धि' अर्पण करणारा, दृढनिश्चयी, असा भक्त परमेश्वरास आवडतो तो लोकांना उबगत नाही, लोकांनाहि त्याचा उबग वाटत नाहीं तो सुखदु खादि द्वंद्वाच्या पलीकडे गेलेला असतो, शत्रु आणि मित्र याच्याशी समभावानें वागतो, असा हा भक्त परमेश्वरास अत्यत प्रिय असतो भक्ताने ज्या परमेश्वराचें ज्ञान सपादन करावयाचे तो परमेश्वर सर्वव्यापी असून जगातील सर्व दिव्य, भव्य ऐश्वर्यसपन्न पदार्थांच्या रूपानें त्याच्या अशाचा आविष्कार झालेला आहे ब्रह्माची आणि शाश्वतधर्माची प्रतिष्ठा (आश्रय स्थान) सुद्धा हाच परमेश्वर आहे ज्ञानमार्गावर आरूढ होण्यासाठीं कठोर तपस्येची आवश्यकता असते भक्तिमार्गाचे तसें नाही परमेश्वराची अनन्य भक्ति करणारा भक्त क्रमाक्रमाने प्रगति करीत करीत शेवटी परमेश्वररूप बनतो असा गीतेचा सिद्धात आहे [१६] 'अमानित्वादि' ज्ञानलक्षणात 'मयिचानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी' (गीता १३–१०) असें एक लक्षण आलें आहे भक्तियुक्त अत करणाने केलेल्या साधनेनें ज्ञान प्राप्त होऊन परमात्मप्राप्ती होतें हाच आभिप्राय वरील लक्षणात ध्वनित होतो 'मन रामीं रगले' या पदात एकनाथानी हाच आशय स्पष्ट केला आहे.[१७]

## भक्तिप्रधान भागवतधर्म

गीतेचीं वैशिष्ट्यें सागताना 'व्यक्तोपासना किंवा भक्तिमार्ग हा गीतेतील उपपादनाचा उपनिषदापेक्षा दुसरा महत्त्वाचा उपदेश आहे . परतु याहिपेक्षा अधिक महत्त्वाचा भाग म्हटला म्हणजे कर्मयोगाशी भक्तीची व ज्ञानाची जोड घालून देणे हा होय [१८]' असे उद्गार लोकमान्यांनी काढले आहेत त्याचें महत्त्व वरील विवेचनाच्या सदर्भात लक्षात येईल गीतेच्या भक्तिप्रधान वैशिष्ट्यास मान्यता देऊनहि 'भक्तिप्रधान भागवतधर्म प्रतिपादण्यासाठी भागवत पुराण ही पुरणपोळी मागाहून बनविली'[१९] असें 'गीतारहस्यकार' का म्हणतात हे मात्र लक्षात येत नाहीं भक्तिप्राधान्य हे भागवतधर्माचे वैशिष्ट्य नव्हतें भागवताच्या काळात तें त्यास प्राप्त झालें असा वस्तुस्थितीशीं विरोधी असलेला भाव वरील वाक्यातून निघतो

भक्ति ही स्वतंत्र निष्ठा नाही असें लोकमान्यांचे मत आहे. ते म्हणतात, 'साधन या नात्यानें ज्ञान आणि भक्ति एकाच योग्यतेची असली तरी भक्ति ही कधीच निष्ठा होत नसून ज्ञान ही निष्ठा म्हणजे सिद्धावस्थेंतील अखेरची स्थिति होऊं शकते असा या दोहोंमध्यें महत्त्वाचा भेद आहे. अध्यात्मविचार किंवा अव्यक्तोपासना यानें परमेश्वराचें ज्ञान होऊं शकतें हे खरें. पण, हे ज्ञान झाल्यावर पुढे तो पुरुष संसार सोडून देऊन ज्ञानातच जर गढूं लागला तर गीता त्याला ज्ञाननिष्ठ म्हणते. भक्तिनिष्ठ म्हणत नाही. कारण, ब्रह्मात्मैक्य अवस्थेंत भक्तीच काय कोणतीच उपासना शिल्लक रहात नाही.'[२०]

आगोदरच्या एका प्रकरणात रहस्यकारांनीं 'निष्ठा' या शब्दाचा अर्थ निराळा दिला आहे. 'आणि जो मार्ग मोक्षप्रद नाहीं त्याला निष्ठा हे नांव देता येत नाही. कारण, ज्यानें अखेर मोक्ष मिळतो त्या मार्गासच निष्ठा असे म्हणावे.' 'निष्ठा' या शब्दाचा एकनाथानी दिलेला अर्थ लोकमान्यांच्या वरील अर्थास जवळचा वाटतो.

> जो गुण वाढे देहातीं। तेणें गुणें होय अंत स्थिति।
> त्या नांव निष्ठा म्हणती। — ए. भा. २५-३०६

गीतेच्या तिसऱ्या अध्यायातील दुसरा श्लोक आधारास घेऊन लोकमान्यांनीं 'ज्ञानयोग आणि कर्मयोग' या दोनच निष्ठा गीतेस अभिप्रेत असल्याचेंहि प्रतिपादिलें आहे. मूळ श्लोक असा.

> लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ।
> ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥

या श्लोकातील 'पुरा' हा शब्द महत्त्वाचा आहे. पुरा म्हणजे पूर्वी (तिसऱ्या अध्यायापूर्वी नव्हे तर गीतोपनिष्ट धर्म सांगण्यापूर्वी) दोन निष्ठा अस्तित्वात होत्या. तिसरी भक्तिनिष्ठा गीतेनें प्रथम सांगितली हा भाव वरील श्लोकांत आहे. ('पुरा पूर्वं सर्गादौ' असा अर्थ शंकराचार्यांनीहि याच श्लोकावरील भाष्यात दिला आहे.) याचाच अर्थ असा होतो की, भक्ति ही अभिनव निष्ठा गीतेनें प्रथम सांगितली आहे. अन्य दोन निष्ठा पूर्वीपासून प्रचलित होत्या. भागवतधर्मांतील कर्मप्रधान मार्गाचा लोप झाल्यानंतर भक्तिप्रधान मार्गास प्रारंभ झाला असें मानण्याचें कारण

नाहीं भक्तिप्राधान्य हे गीतेपासूनच भागवतधर्माचे वैशिष्ट्य आहे. नारायणीय धर्मातहि तें आढळते भागवतपुराण देखील याच भक्तिप्राधान्याचा पुरस्कार करते एकनाथानी सुद्धा भागवतधर्म भक्तिप्रधान मानला आहे परतु, भक्ति म्हणजे केवळ भजन नव्हे तर स्वधर्माप्रमाणे कर्म करणे अशी त्याची भूमिका आहे [२१]

भागवतधर्माची मूळ प्रेरणा लक्षात घेता भक्तिप्राधान्य हे या प्रेरणेशी विसगत मानण्याचें कारण नाहीं भक्ति ज्या श्रद्धेतून उदय पावते ती श्रद्धा ऋतजात असून भक्तीचा प्रथम वर्पाव ज्या देवतेवर झाला तो वरुण ऋतरक्षक असल्यामुळे भक्तीचा आणि ऋताचा प्रत्यक्ष सबध कसा पोंचतो हे पूर्वी विवेचिले आहेच [२२] भक्तीचा विकासहि वेदोक्तधर्माच्या ऋतमय-परपरेतून झालेला असल्याने गीतेंतील कर्म आणि ज्ञान या योगाप्रमाणेंच भक्तियोगाहि साक्षात् ऋततत्त्वाशीच सबधित आहे हे सिद्ध होतें

## गीतोपदिष्ट धर्माचें सार

साराश, प्रत्यक्ष जीवन जगत असताना, विषम परिस्थितीतहि चित्ताची समता ढळू न देता कर्तव्य कर्म अविचल निष्ठेने करण्याचा उपदेश गीतेंत प्रामुख्यानें करण्यात आला आहे विषमतेने भरलेल्या या जगात दु खादिकाच्या आवर्तात माणूस सापडतो अशा वेळीं जग वाईट आहे म्हणून त्यावर रुसून बसण्यात स्वार्थ किंवा परार्थ काहींच साधता येत नाही त्याचप्रमाणें सुखदु खादिकाच्या आघातानें आपली बुद्धि विचलित होऊ देण्यातहि अर्थ नसतो प्राप्तकर्म मानवाला चुकत नाही त्यास चुकविल्यानें स्वहित किंवा परहित मानवाला साधता येत नाही मानवाच्या आणि विश्वाच्याहि जीवितयात्रेसाठी कर्म आवश्यक असते म्हणून व्यक्तिविकासासाठी आणि विश्वाच्या कल्याणासाठीं कर्म केले पाहिजे तें कर्म निष्कामबुद्धीनें फलाची आकाक्षा न बाळगता केलें म्हणजे कर्माच्या बधनातून किंवा सुखदु खादिकाच्या परिणामातून व्यक्तीस अलिप्त राहता येते इतकेंच नव्हे तर जडजीवाचा विकास होत होत अती तो परमेश्वराशीं एकरूप होतो

ऐहिक सुखोपभोगाकडे धाव घेणाऱ्या सहजप्रवृत्तीवर विजय मिळवून निष्काम कर्मयोगाचा आश्रय घेण्यासाठी लागणारी अविचल निष्ठा ज्ञानानें,

ध्यानानें, किंवा भक्तीनें प्राप्त करता येते- ज्ञान आणि ध्यान हे मार्ग सामान्य माणसाच्या दृष्टीनें सुकर नसतात म्हणून सामान्यासाठी भक्तिमार्ग किंवा परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करण्याचा मार्ग हा अधिक श्रेयस्कर ठरतो कारण, भक्तिमार्गात अधःपाताचा धोका नसतो उपरोक्त तिन्ही मार्गावरील साधक म्हणजे ज्ञानी, योगी किंवा भक्त अंधारातून प्रकाशाच्या दिशेनें निश्चित प्रगति करीत असतो अर्थात तो संपूर्ण प्रकाशमय बनतो म्हणूनच, 'भक्ति म्हणजे सहज प्रकाश'[२३] असा भक्तीचा एक अर्थ एकनाथानी दिला आहे हा प्रकाश ज्याच्या अंतःकरणात उदित झाला आहे त्याला साऱ्या विश्वात सर्वत्र भगवान् दिसू लागतो एकनाथानीं वर्णिल्याप्रमाणें 'जन नोहे अवघा जनार्दन' अशी त्याची वृत्ति बनते या प्रकाशानें स्वतः भक्त हा तर विश्वरूप बनतोच परंतु इतराचाहि उद्धार करण्याचे सामर्थ्य त्यात असतें. अशारीतीनें स्वतःच्या कर्माच्या योगानें भगवताची पूजा करणारा मानव[२४] सिद्धी प्राप्त करून घेऊ शकतो स्खलनशील सहज-प्रवृत्तीवर विजय मिळवून प्राप्त कर्तव्याचरण आणि स्वधर्मपालन करीत करीत मानव आत्मतृप्त होत्साता परमेश्वराशी संयोग पावतो व आत्मोद्धारा बरोबरच विश्वोद्धारहि करतो हे गीतोपदिष्ट भागवतधर्माचे थोडक्यात सार आहे असे म्हणता येईल.

## ४. टीपा

१ **महाभारत** (चित्रशाळा आवृत्ति), शांतिपर्व, ३४६-११, ३४८-१, ३४८-५३

२ Dasgupta, *History of Indian Philosophy*, Vol II, Page 552

३ R G Bhandarkar, *Vaishnavism Shaivism & other* etc Page 11-12

४. लो टिळक, **गीतारहस्य**, पृ ५८३

५ Hemchandra Rai Choudhari, *Materials for the Early History of Vaishnava sect*, Page, 39.
Dasgupta, *History of Indian Philosophy*, Vol II. Page 544

६ **महाभारत**, शांतिपर्व, ३४२–७९,
Muir, *Original Sanskrit Texts*, Vol IV, P 118, 193

७ Winternitz, *History of Indian Literature*, Vol I, P 320, 326

Muir, *Original Sanskrit Texts*, Vol IV P. 103, 104

८ पृ २३

९ आंगिरस कुळात उत्पन्न झालेल्या घोर नामक ऋषींनी देवकीपुत्र कृष्ण यास पुढील उपदेश केल्याचे वर्णन छांदोग्योपनिषदात आहे
मरणकाळी या तीन मंत्राचा जप करावा तू अक्षत आहेस, तू अच्युत आहेस, तू सूक्ष्म आहेस तो अतृप्त झाला त्याला समानार्थक अशा दोन ऋचा आहेत (त्याचा अर्थ असा) चिरंतनाचिंतन करण्याची ज्योति नित्यपूर्णत्वानें ब्रह्मवेत्ते पाहतात ही ज्योति स्वर्गामध्ये अथवा परब्रह्मामध्ये प्रकाशत असते नभाच्या पलीकडे असलेली ज्योति पहात पहात आम्ही उन्नत झालो" (छांदोग्य ३–१७–६) गीतेत (८–८, ९ व १०) हाच भाव सांगण्यात आला आहे याच उपनिषदात वरील उपदेशापूर्वी "अथ यत्तपो दानमार्जव-महिंसा सत्यवचनमिति ता अस्य दक्षिणा " असे वचन आले आहे गीतेत दैवीसंपत्तीच्या लक्षणात (१६–३) वरील लक्षणाचाच प्रपंच करण्यात आला आहे द्रव्यमय यज्ञापेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे (गीता, ४–३३) हा गीतेचा सिद्धांत छांदोग्योपनिषदात आला असून परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करण्याचा उपदेश गीतेप्रमाणे छांदोग्योपनिषदानेहि केला आहे "मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना" हा विचार नारायणोपनिषदात विस्ताराने आला आहे (२–१०) गीतेतील विश्वरूप-दर्शन (११–१० ते २०) नारायणोपनिषदात पहिल्या दोन खंडात आढळते याच उपनिषदातील २२ व्या खंडात गीतेतील दैवीसंपत्तीतील 'सत्य, तप, दम, शम, दान आणि यज्ञ' याचे विवरण आले आहे

१० **ईश**, १–२, **श्वेताश्वतरोपनिषद्**, ६–४ या श्लोकावर भाष्य करताना शंकराचार्यांनी गीतेतील ९–२७ व २८ व ५–१० हे श्लोकच उद्धृत केले आहेत (गोरखपुर आवृत्ति, पृ २३८)

११ आगोदरच्या उपनिषदात ज्ञान आणि कर्म याचा समन्वय सागितलेला अमला तरी उत्तरकालात 'यदहरेव विरजेत् तदहरेव प्राव्रजेत्' या उपदेशापर्यंत मजल गेली आहे त्यामुळे नारायणीयोपनिषदामारख्या उपनिषदात प्रत्यक्ष सन्याममार्गाचा पुरस्कार केल्याचे दिसून येईल धर्मकोश, **उपनिषत्काण्ड,** तृतियखड पृ १६५०–५१

१२ Dr Radhakrishnan, *Indian Philosophy*, Vol. I, Page 530–31

१३ Dasgupta, *History of Indian Philosophy*, Vol II, Page 486

१४ पृ ३६ व ३७

१५ ताटस्थ्य नाही समाधी म्हणेल तयाची ठकली बुद्धी
ते ममाधी नव्हे त्रिशुद्धी जाण नुमधी मूर्च्छा आली ॥
अर्जुना देऊनि समाधि मवेचि घातिला निर्वाणयुद्धी
परि तो कृष्ण कृपानिधी ताटस्थ्य नेदाच स्पर्शो ॥
सकल कर्मी ममाधी होचि मद्गुरूची बुद्धी
तरी बुद्धीहि त्रिशुद्धी निजममाधि न मोडे ॥

—अे भा २–४१४, ४२१, ४२२

१६ **गीता**, १२–८

१७ मन रामी रगले अवघें मनचि राम झाले ॥
मबाह्य अभ्यतरी अवघे रामरूप कोदले ॥ चित्तचि हारपले । अवघे चैतन्याचि झाले । देखता देखता अवघे विश्वचि मावळले । पाहता पाहता अवघे सर्वस्व ठकले ॥१॥
आत्मारामाचें ध्यान लागलें मज कैसें । क्रिया कर्म धर्म अवघे येणेचि प्रकाशे । सत्यमिथा प्रकृतिपर रामचि अवघा भासे ॥२॥
भक्ति अथवा ज्ञान । शाती आणिक योगस्थिती । निर्धारिता न कळे रामस्वरूपी जडली प्रीती । एका जनार्दनी अवघा रामचि आदि अती ॥३॥

आवटे, **सकलसतगाथा,** एकनाथाचे अभग, क्र ३३४३.

१८ लो टिळक, **गीतारहस्य,** पृ ५२४–२५

१९ **कित्ता,** पृ ५४०.

२० **कित्ता,** पृ ४११–१२ आणि पृ ३१२

२१ भक्तिप्रधान भागवत मुख्य भक्ति ते स्वधर्मयुक्त
येणे स्वधर्मे भक्त समस्त परमभागवत उद्धरले
या स्वधर्माचा एकांत निजभजन भक्तीचा भावार्थ
उद्धवासि श्रीकृष्णनाथ स्वये सांगत एकादशी

**– ए भा** १८–३९०–९१

२२ पृ २४ ते २६

२३ **ए भा** ११–७७२ ते ७७८

२४ "स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धि विंदति मानव" **– गीता,** १८–४६

---

# ५. नारायणीय धर्म

नारायणीयधर्माची पार्श्वभूमि–धर्मपरंपरा आणि गीता–अद्वधर्म–सृष्टीच्या उत्पत्तीचा आधार–यज्ञीय हिंसेस विरोध–हरिहरां नाहीं भेद–कर्म–भक्तीचें काल-सापेक्ष महत्त्व–व्यूहसिद्धांत–पाञ्चरात्र मतास विरोध–दाक्षिणात्यांनीं केलेला पुरस्कार–अद्वैत आणि पाञ्चरात्र–अहिंसेस प्राधान्य–

महाभारताच्या शांतिपर्वांत १८ अध्यायांत नारायणीय धर्माचें विवरण आलें आहे कर्माकर्म व धर्माधर्म यांच्या बाबतींत निश्चित निर्णय लावतां न आल्यानें किंकर्तव्यमूढ झालेल्या अर्जुनास कर्मप्रवण करण्यास व धर्माचें स्वरूप सांगण्यासाठीं श्रीकृष्णानें गीतेचा उपदेश केला त्याच प्रमाणें युद्ध-समाप्तीनंतर युधिष्ठिराच्या मनांत निर्माण झालेला विषाद दूर करण्यासाठीं नारायणीय धर्म सांगण्यांत आला गीता आणि नारायणीय धर्म यांचा उपदेश भिन्न पार्श्वभूमीवर करण्यांत आला असला तरी दोन्ही ठिकाणीं मूळ प्रश्न सारख्याच स्वरूपाचा आहे

## नारायणीय धर्माची पार्श्वभूमि

शांतिपर्वाच्या प्रारंभीच युधिष्ठिराच्या मनांतील तळमळ महाभारत-कारांनी वर्णिली आहे आपलें मनोगत नारदास सांगतांना धर्मराज म्हणतो, ‘सारी पृथ्वी जिंकली खरी, पण, हा जयच मला पराभवासारखा वाटतो कारण, ज्ञातिक्षय करून मी हें वैभव संपादन केलें आहे.’ रुधिरप्रदिग्ध भोग भोगण्यापेक्षा भिक्षा मागितलेली बरी’ असें अर्जुनास वाटलें त्याच प्रमाणें राज्य सोडून अरण्यवास स्वीकारण्यास धर्मराज उत्सुक झाला होता ‘आपण धर्माचरण केलें आहे क्षत्रियाचा धर्मच आपण पाळला आहे. दण्डधारणीं हें क्षत्रियाचें कर्तव्य असल्यामुळें युद्ध करण्यांत आपल्या

हातून अधर्म घडला नाही'[1] अशाप्रकारें भीम, द्रौपदी आणि अर्जुन यानीं धर्मराजाचें समाधान केले तरी त्याचा उपयोग झाला नाहीं संन्यास क्षत्रियासाठी विहित नाहीं

दण्ड एव हि राजेंद्र क्षात्रधर्मो न मुण्डनम् ॥

– महाभारत, शांतिपर्व २३–५३

असा व्यासानी उपदेश केला असताहि युधिष्ठिराचें मन शांत झालें नाही. कृष्णाच्या उपदेशानंतर देखील त्याची व्यथा शमली नाही म्हणून राज्याभिषेकानंतर कृष्ण आणि धर्म कुरुक्षेत्रावर शरपंजरीं पडलेल्या भीष्माचार्यांकडे गेले या ठिकाणी भीष्माचार्यांनीं धर्मराजास मोक्षधर्म सांगितला. या विवरणात शेवटी नारायणीय धर्माचे कथन करण्यात आलें आहे. भीष्माचार्यांनीं सांगितलेला राजधर्म आणि आपद्धर्म ऐकल्यानंतर युधिष्ठिरानें भीष्माचार्यांस पुढील पृच्छा केली आहे

धर्मा पितामहेनोक्ता राजधर्माश्रिता शुभा
धर्ममाश्रमिणा श्रेष्ठ वक्तुमर्हसि सत्तम ॥
नष्टे धने वा दारे वा पुत्रे पितरि वा मृते
यया बुद्ध्या नुदेच्छोक तन्मे ब्रूहि पितामह

– शांतिपर्व, १७३–१ व ६

१ आश्रमीयाना श्रेष्ठ धर्म कोणता ?
२ विविध आपत्ति कोसळल्या नंतर शोक जेणें करून निर्माण होणार नाहीं अशी बुद्धि मागणारा धर्म कोणता ?

धर्मराजानें वरील दोन प्रश्न भीष्माचार्यांस विचारले आहेत या दोन्ही प्रश्नाचें एकच उत्तर–नारायणीयधर्म किंवा भागवत धर्म असें भीष्माचार्यांनीं दिलें आहे.

## धर्मपरंपरा आणि गीता

हा धर्म वैशंपायन ऋषींनीं व्यासापासून ऐकला. व्यासाला हे ज्ञान नारदापासून प्राप्त झालें आणि नारदास प्रत्यक्ष परमेश्वरानें हा धर्म सांगितला अशी परंपरा महाभारतकारानीं दिली आहे नारदास हा धर्म सांगण्यापूर्वी भगवतानी सूर्य, मनु, इक्ष्वाकु याना निरनिराळ्या युगात याच धर्माचा

उपदेश केला होता हेहि या धर्माच्या विवरणात नमूद करण्यात आलें आहे गीतेंत दिलेल्या परपरेशीं ( गीता–४–१ ते ३ ) ही परपरा जुळते नारायणीय आख्यानात वेगवेगळ्या कथाच्या द्वारे ती आली आहे एवढेच गीतेतील साख्य, योग, कर्म, क्षराक्षर विचार, विभूतिदर्शन, विश्वरूपदर्शन यासारखे विषयहि नारायणीय धर्मात आले आहेत या विषयाच्या विवरणा-वर गीतेची दाट छाया स्पष्टच दिसून येते इतकेंच नव्हे तर हाच धर्म पूर्वी गीतेत सांगितला आहे असें महाभारतकार स्पष्टच सांगतात

एवमेष महान् धर्म स ते पूर्वं नृपोत्तम
कथितो हरिगीतासु समासविधिकल्पित

– महाभारत, शान्तिपर्व, ३४८–११

गीतेतील भागवतधर्म नारायणीय धर्माच्या रूपाने सांगण्यात आला आहे हें वरील प्रमाणावरून निश्चित होतें गीतेत सूत्ररूपाने सांगितलेला धर्म नारायणीयाख्यानात सुव्यवस्थित व विस्तृत रूपाने वर्णिला आहे. धर्म या दृष्टीने केलेले सांगोपांग विवेचन या आख्यानात आल्यामुळे भागवत-धर्माचा तो मुख्याधार आहे असे मानण्यास हरकत नसावी [1] हाच आद्य धर्म असून या धर्मानेंच सृष्टि निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवानें नारायणाची पूजा केली [2] अशी या धर्माची महती वर्णिली आहे ऋषि नारायणाने सांगित-लेला हा धर्म ' प्रवृत्तिलक्षणात्मक '[3] असून देवानी आणि लोकानीं मानवी कल्याणाचें चिंतन करावें, स्वाधिकाराचे चितन कारावे असा आदेश भगवतानी दिला आहे यज्ञात होणारी पशुहिंसा ही वेदविरुद्ध असल्याचें या धर्मात प्रतिपादिले आहे यज्ञात पशुहिंसा न करता यज्ञाच्या सर्व भागाचे ठिकाणीं परमेश्वराची कल्पना करावी असे उपरिचरवसूची कथा देऊन सांगण्यात आलें आहे शतपथब्राह्मणातील ' पुरुषमेध ' यज्ञात देखील सर्व जातींच्या पुरुषाचे ठिकाणीं परमेश्वर आहे या निष्ठेने पुरुष-सूक्तानें त्याचे पूजन करावें असें सांगण्यात आल्याचें पूर्वी उल्लेखिलें आहेच. त्याचप्रमाणें ' पुरुषमेध ' हा भागवतधर्माचा मूलारंभ असल्याचें पूर्वी सिद्ध केलें आहेच नारायणीयोपाख्यानात ही वेदोपनिषत्कालीन परंपरा अबाधित ठेवण्यात आली असून पुरुषसूक्त हें वेदाचें सार असल्याचा निर्वाळाहि दिला आहे यावरून ऋग्वेदातील पुरुषसूक्त, ब्राह्मणग्रंथातील

पुरुषमेध, गीतेतील पुरुषोत्तम आणि नारायणीयधर्मातील नारायण विशेषत वासुदेव यातून परपरेची सुसूत्रता अबाधितपणे चालू असल्याचें प्रत्ययास येईलच

## आद्यधर्म

हाच प्रवृत्तिलक्षणात्मक नारायणीयधर्म सृष्टीच्या प्रारभापासून ब्रह्मदेवाचा आधार बनला होता स्वत नारायणाने ब्रह्मदेवाच्या वेगवेगळ्या अवतारकाळी या धर्माचा उपदेश केला. ब्रह्मदेवाचा पहिला मानस जन्म झाला त्यावेळी नारायणानें या धर्माच्या योगानें ‘ दैव्य ’ आणि ‘ पित्र्य ’ सृष्टीची उत्पत्ति केली नतर भगवान् अतर्धान पावले ब्रह्मदेवाच्या दुसऱ्या चाक्षुष जन्माचे वेळी हा धर्म पितामहाने सोमापासून श्रवण केला ब्रह्मदेवाच्या तिसऱ्या वाचिक जन्माचे वेळीं स्वत नारायणाने हा धर्म सागितला ( ३४८–१९ ) चौथ्या म्हणजे श्रवणज जन्माचे वेळीं ब्रह्मदेवाने प्रभूचे चिंतन केलें तेव्हा त्यास असा आदेश मिळाला की, ‘ तूं सृष्टीची उत्पत्ति कर व माझ्यापासून सात्वत नामक धर्माचें ग्रहण कर ! ’ या आद्यधर्मानें ब्रह्मयाने नारायणाची पूजा केली लोकाच्या हिताच्या हेतूनें ब्रह्मदेवाने हा धर्म स्वरोचिष मनूस सागितला मनूनें आपला पुत्र शखपाद यास या धर्माचा उपदेश केला ब्रह्मदेवाच्या पाचव्या, सहाव्या आणि सातव्या जन्माचे वेळीहि नारायणानें स्वत हा धर्म ब्रह्मदेवास सागितला त्रेतायुगात ब्रह्मदेवानें दक्षास, दक्षानें आदित्यास, आदित्यानें विवस्वानास, विवस्वानानें मनूस व मनूनें ‘ लोकभृत्यर्थ ’ इक्ष्वाकूस हा धर्म सागितला अशा रीतीने हा धर्म मानवास प्राप्त झाला गीतेतील धर्मपरपरा वरील परपरेशी (प्रारभींच्या ब्रह्मदेवाच्या जन्माच्या कथा वगळल्यास) ततोतत जुळते

## सृष्टीच्या उत्पत्तीचा आधार

सृष्टीची निर्मिती करण्याची क्षमता ब्रह्मदेवास या धर्माच्या योगानें प्राप्त झाली विश्वाची उत्पत्ति झाल्यानतर देखील विश्वास आधारभूत असा हाच धर्म होता. ऋग्वेदातील नासदीय सूक्ताच्या आधारानें दिलेली सृष्टीच्या निर्मितीची कथा नारायणीय धर्मात वर्णिली आहे. (अध्याय ३४२)

'रात्र आणि दिवस नसताना, व्यक्ताव्यक्त अप्रगट अवस्थेंत असताना अव्यय हरि प्रादुर्भुत झाला या पुरुषाच्या डोळयापासून अग्निषोमौ झाले तेच क्षात्र आणि ब्रह्म याचे आधार अग्नीशिवाय हवन नाहीं पुरुषाशिवाय तप नाही अग्नीपासून उत्पन्न झालेले ब्राह्मण यज्ञधारण करू लागले यज्ञानें देवाचें तर्पण झाले. देवानी पृथ्वीस भाविले हा अग्नि विष्णु रूपाने सर्व भूतात प्रवेश करून प्राणधारण करतो अग्निषोमीय क्षात्र आणि ब्रह्म जगताची धारणा करीत असते (३४२–६६)", ज्या राष्ट्रात ब्राह्मण वृत्तिहीन असतात त्या राष्ट्रातील जनता आपद्ग्रस्त व दास्यवृत्तीची बनते' असा इषाराहि याच सदर्भात देण्यात आला आहे

सृष्टीची निर्मिती झाली लोकसिद्ध्यर्थ ब्रह्मदेवानें वेद–वेदागयुक्त ज्ञान, पचभूते, अष्टप्रकृति आणि एकादश रुद्र याना निर्माण केलें हे सर्व ब्रह्मदेवाकडे गेले 'आमचे अधिकार कोणते? आमचें सामर्थ्य कशा प्रकारचें?' असा या सर्वांनीं ब्रह्मदेवास प्रश्न केला ब्रह्मदेवाने सागितलें, 'आपण सर्व त्या महापुरुषास शरण जाऊ तो आम्हास हिताच्या गोष्टी सागेल' त्यानतर सर्वजण क्षीरसागरावर गले त्यानी त्या महापुरुषाची प्रार्थना केली त्यावेळी अशरीरिणी आकाशवाणी झाली तिने आदेश दिला 'मा यजध्वम्' –यज्ञ करू नका यज्ञाचे सर्व भाग माझ्या ठिकाणीं कल्पा म्हणजे मी तुमचे कल्याण करीन' त्यानतर देवानीं यज्ञ केला तेव्हा आकाशवाणी झाली, 'प्रवृत्तिगुणकल्पित अशी मी तुमची निर्मिती केली आहे तुम्ही लोकहिताचें चितन करा प्रवृत्तीसाठी सप्तर्षि आणि निवृत्ति धर्मासाठी सनकादिक याची निर्मिती मी केली आहे या दोहोंपैकी जो ज्या मार्गात रमेल त्याला त्याप्रमाणें फळ मिळेल तुम्ही जा, स्वाधिकाराचें चिंतन करा, क्रिया करा व लोकाना कर्माचा आदेश द्या या कृतयुगात पशुयज्ञ वर्ज्य आहे' देवानी पुन्हा प्रश्न केला आम्ही जायचें कुठे? भगवान् म्हणाले, 'ज्याठिकाणी गुरुची पूजा होते त्याठिकाणीं तुम्ही वस्ती करावी त्या ठिकाणीं धर्माचे हरण होत नाहीं वेद, यज्ञ, तप, सत्य, दम अहिंसा ज्याठिकाणीं असतील त्या ठिकाणी अधर्माचा स्पर्शहि होणार नाही' (अध्याय ३४०)

# यज्ञीय हिंसेस विरोध

यज्ञात होणाऱ्या हिंसेस नारायणीय धर्माने बराच विरोध केला आहे. प्रारंभींच्या चार अध्यायात (३३४ ते ३३७) उपरिचरवसूची कथा देऊन यज्ञात पशुहिंसा न करताहि प्रभूचे दर्शन होते हे सांगितले आहे उपरिचरवसु म्हणतो.

> पशुहिंसा वारिता च यजुर्वेदादि मंत्रैः
> अहं न वरेय हिंसा द्रक्षाम्येकांतिकं हरिम्॥ (३३४–२१)

'पशुहिंसेचा त्याग यजुर्वेदसंमत आहे मी हिंसेचा त्याग केला (म्हणून) मला प्रभूचें दर्शन झाले' उपरिचरवसूने केलेल्या या यज्ञाचे वेळीं काही ऋषि होते त्यांनी देखील राजाच्या या मतास पाठिंबा दिला व भक्तियुक्त अंतःकरणानें परमेश्वराचें यजन करणारास परमेश्वराचे दर्शन होतें असा स्वानुभवहि सांगितला (अध्याय ३३६)

सांख्य, योग, पाशुपत इत्यादि भिन्न मताचा उल्लेखहि या धर्माच्या विवरणात आला आहे ही सारीं मतें वेगवेगळ्या ऋषींनी उपदेशिलीं आहेत. नारायणीय, पांचरात्र, सात्वत किंवा एकांतिक धर्म मात्र साक्षात् भगवतांनी उपदेशिला असल्यानें तोच प्रमाण मानावा. खऱ्या अर्थानें पाहिलें तर सांख्य आणि योग हे भिन्न नाहीत ते एकच आहेत असा महाभारतकाराचा निष्कर्ष आहे (अध्याय ३४८ व ३४९) (एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति असे गीतेचेंहि वचन आहे).

प्रश्न असा उपस्थित होतो की, सांख्य मानतात त्याप्रमाणे पुरुष अनेक मानावयाचे काय ? महाभारतकाराचें उत्तर आहे पुरुष एकच आहे. वेदविद्येचे सार पुरुषसूक्त आणि त्याचेंहि सार 'पुरुषैकत्व' असें व्यासांनी सांगितलें आहे

> इदं पुरुषसूक्तं हि सर्ववेदेषु पार्थिव
> ऋतं च सत्यं च विख्यातमृषिसिंहेन चिंतितम् (३५०–५)
> समाम्नतस्तु तद्व्यासं पुरुषैकत्वमुक्तवान्॥

नारायणीय धर्मानें काढलेला वरील निष्कर्ष भागवतधर्माची मूळ प्रेरणा व परंपरा यांच्याशीं किती सुसंगत आहे हें निराळें सांगण्याची

आवश्यकता नाही हा पुरुष सर्वसाक्षी, विश्वभुज, विश्वमूर्धा, असून

स हि नारायणो ज्ञेय सर्वात्मा पुरुषो हि स ।।(३५१–१८).

## ‘हरिहरा नाहीं भेद’

विश्व आणि देवता नारायणात्मक असूनहि कित्येक पुराणानीं शिव-विष्णु भेद कल्पिला आहे महाभारतकारानी मात्र तो मानला नाहीं उलट विष्णु आणि शकर हे एकरूप असल्याचें सागितले आहे शातिपर्वाच्या ३५० व्या अध्यायात आपल्या नावाची निरुक्ति सागत असताना श्रीकृष्ण म्हणतात– ‘ब्रह्म आणि रुद्र हे प्रसादज व क्रोधज असे मी निर्माण केले रुद्र उग्र व्रताचे आचरण करणारा योगी असून नारायणात्मक आहे त्याची पूजा केल्या माझी पूजा केल्यासारखें होते मी सर्व लोकाचा आत्मा आहे म्हणून माझा आत्मा असलेल्या रुद्राची मी पूजा करतों वरद शिवाची मी पूजा केली नाही तर आत्मपूजन केले असें होणार नाहीं . मला जो जाणतो तो रुद्राला जाणतो...जो रुद्रास जाणतो तो मलाहि जाणतो रुद्र आणि नारायण म्हणजे एकच सत्त्व असून ते द्विविध झालले आहे. विष्णु स्वत. च्या आत्म्याव्यतिरिक्त कोणाचीच पूजा करित नाही म्हणूनच मी रुद्राची पूजा करतो’ (शातिपर्व ३५०–२१ ते ३०)

याच आख्यानात पुढे हरिरुद्रसवाद आलेला आहे. या सदर्भातहि हरि रुद्रास म्हणतो–

यस्त्वा वेत्ति स मा वेत्ति यस्त्वामनु स मामनु
नावयोरतर किंचिन्मानेऽभूद् बुद्धिरन्यथा
अद्यप्रभृति श्रीवत्स शूलाको मे भवत्वयम्
ममाप्यकितश्चापि श्रीकण्ठस्त्व भविष्यसि ।। (शातिपर्व ३५२–६७,६८)

नारायणीय धर्मांचें हे वैशिष्टय महाराष्ट्रातील सताच्या भागवतधर्मात प्रामुख्यानें आढळतें ज्ञानेश्वराचा कृष्ण ‘शकराची स्तुति ही आत्मस्तुति होईल’ (ज्ञा १२म२१६ ते २१) असे उद्गार काढतो नाथानी देखील शिव हा रामचद्राचा परमभक्त असल्याचें वर्णन आपल्या अभगातून केलें आहे (आवटे, एकनाथ गाथा, पृ ९६–९७) भागवतधर्माचे प्राचीन विशेष महाराष्ट्रीय सतानीं उपदेशिलेल्या धर्मानें जोपसल्याचें हेहि एक गमक आहे.

# कर्म-भक्तीचें कालसापेक्ष महत्त्व

महाभारताच्या शांतिपर्वातील १८ अध्यायात आलेल्या नारायणीय धर्माचें स्वरूप थोडक्यात वरील प्रमाणें आहे गीतेत उपदेशिलेला धर्म आणि नारायणीय धर्म एकाच परंपरेतून निर्माण झालेले असले तरी नारायणीय धर्मात गीतेपेक्षा अधिक असे काही विशेष आढळून येतात हें सत्य आहे गीतेत निष्काम कर्मयोगावर अधिक भर देण्यात आला असून तदनुषंगाने भक्तीची महती वर्णिलेली आहे तर नारायणीय धर्मात भक्तीच्या अनुषंगाने निष्काम कर्मयोगाची थोरवी गायिलेली दिसून येते गीता आणि नारायणीय धर्म ज्या भूमिकेवरून सांगण्यात आले आहेत त्यावरून हा फरक पडला असावा असें म्हणता येईल अर्जुनास कर्माकर्मासंबंधाने मोह निर्माण झाला असताना गीतेंतील उपदेश सांगण्यात आल्यामुळे 'कर्म कर' हें मूळ सूत्र गीतेने वारंवार प्रतिपादिले आहे त्याच प्रमाणे नारायणीय धर्म

> गृहस्थो ब्रह्मचारी वा वानप्रस्थोऽथ भिक्षुकः
> य इच्छेत् सिद्धिमास्थातुं देवतां कां यजेत स
> कुतोह्यस्य ध्रुवं स्वर्गं कुतो नैःश्रेयसं परम्
> विधिना केन जुहुयाद्देवं पित्र्यं तथैव च ॥ – शांतिपर्व ३३४–१–२

या युधिष्ठिराच्या प्रश्नाचें उत्तर देताना भीष्माचार्यांनी उपदेशिला असल्यामुळे नारायणभक्ति ही या धर्मात प्रामुख्यानें सांगण्यात आली आहे. कर्मयोग आणि भक्तियोग नारायणीय धर्म व गीता या दोहोंसहि अभिप्रेत असले तरी निष्कामकर्मयोगाचें महत्त्व कमी झालें होतें त्या काळात गीतेची रचना झाल्यानें व भक्तीची महती कमी झाली असताना नारायणीय धर्म सांगण्यात आल्यामुळें गीतेंत निष्काम कर्मयोगावर व नारायणीय धर्मात भक्तीवर अधिक भर देण्यात आला आहे ऋतरक्षणार्थ भक्ति, कर्म आणि ज्ञान यांचा समन्वय आवश्यक असतो या तिहींपैकी ज्या अंगाकडे ज्या काळात दुर्लक्ष झालें त्या अंगाचा प्राधान्यानें उपदेश भिन्न ग्रंथात करण्यात आला आहे एवढाच भक्ति व धर्म यातील गौण–प्रधान–भावाचा अर्थ घेतला पाहिजे शिवाय, 'उपासना कोणती करावी" असा युधिष्ठिराचा मूळ प्रश्नच असल्यानें भक्तीचा विस्तार नारायणीय धर्मात होणें स्वाभाविक वाटतें.

गीतेच्या रचनेनतर बऱ्याच कालाने नारायणीय धर्माची रचना झाली असावी असे मात्र म्हणता येईल नारायणीय धर्मात भागवतधर्माची भिन्न-भिन्न नावें प्रचलित असल्याचे दिसून येते एकान्तिक (३४८-६१) सात्वत, नारायणीय, भागवत, पाचरात्र या नावानी भागवतधर्म सबोधिला आहे त्याच प्रमाणे निरनिराळ्या पथाचा उल्लेखहि नारायणीय धर्माच्या विवेचनात करण्यात आला असून या सर्वात पाचरात्र म्हणजे भागवतधर्म श्रेष्ठ असल्याचा सिद्धातहि माडला आहे [७]

## व्यूहसिद्धांत

गीतेंत नसलेला व्यूहसिद्धात नारायणीय धर्माच्या विवेचनात वारवार आला आहे [८] वासुदेव हा निर्गुण क्षेत्रज्ञ असून त्याच्यापासून सकर्षण नामक जीव उत्पन्न झाला सकर्षणापासून प्रद्युम्न सज्ञक मन निर्माण झाले आणि प्रद्युम्नापासून अहकार सज्ञक अनिरुद्ध निर्माण झाला. अशारीतीनें वासुदेव (निर्गुण परमेश्वर), सकर्षण (जीव), प्रद्युम्न (मन) आणि अनिरुद्ध (अहकार) अशी ही चतुर्व्यूहाची रचना आहे यासच मूर्ति-चतुष्टय, किंवा चतुर्विभक्त वासुदेव असें नाव देण्यात आले आहे ही मूर्ति-चतुष्टयाची किंवा चतुर्व्यूहाची कल्पना गीतेत मात्र कोठेच दिसून येत नाही

रामानुजाचार्यांनीं चतुर्व्यूह कल्पनेस बरेंच महत्त्व दिलें आहे परंतु त्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या शकराचार्यांनी या व्यूहकल्पनेचें खडन केलें आहे वेदातसूत्रातील २-२-४२ ते ४५ या सूत्रावरील भाष्यात आद्य शकराचार्यांनीं व्यूहकल्पना वेदविरोधी असल्याचें कटाक्षानें सागितलें आहे. या मताचें खडन करताना 'भागवतधर्मीयाचीं व्यूह कल्पना' असा उल्लेख आचार्यांनीं केला आहे. याचा अर्थ असा होतो की, शंकराचार्यांच्या काळीं चतुर्व्यूहात्मक भागवतधर्म प्रचलित असावा ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकातील नाणेघाटातील शिलालेखात सकर्षण आणि वासुदेव या देवताचा उल्लेख आढळतो त्यावरून भागवतधर्मात या काळातहि व्यूहकल्पना रूढ असावी असें अनुमान करता येतें परतु चार व्यूह होते किंवा नाही हे मात्र निश्चित सागता येत नाही. दोन व्यूह मात्र प्रचलित असावेत. शकरा-

चार्यांच्या काळात मात्र चतुर्व्यूहात्मक भागवतधर्म प्रचलित होता वर उल्लेखिलेल्या भाष्यात आचार्य म्हणतात,

'अत्र भागवता मन्यन्ते । भगवानेवैको वासुदेवो निरंजनज्ञान-स्वरूप परमार्थतत्त्व च चतुर्विधाऽऽत्मान प्रतिष्ठितो वासुदेवव्यूहरूपेण, प्रद्युम्नव्यूहरूपेण च । वासुदेवो नाम परमात्मोच्यते । सकर्षणो नाम जीव । प्रद्युम्नो नाम मन । अनिरुद्धानामाहकार । तेषा वासुदेव पराप्रकृतिरितरे सकर्षणादय कार्यम् ।'

'उत्पत्त्यसभवात्' या सूत्राचा आधार देऊन आचार्य असें सागतात की, अशाप्रकारे वासुदेवापासून जीवसज्ञक सकर्षणादिकाची उत्पत्ति असभवनीय आहे कारण, त्यमुळें मूळ तत्त्वाच्या नित्यत्वास बाध येतो ( अनित्यत्वादि दोषप्रसगात् ) म्हणून ही कल्पना विसगत आहे यास श्रुतीत आधार सापडत नाहीत हे चारहि ईश्वर आहेत, समान आहेत असें मानलें तर परमेश्वराचें अनेकत्व ध्वनित होतें उत्पत्ति झाली असें मानलें तर कार्यकारणभाव कल्पावा लागतो वासुदेवास षड्गुणेश्वर मानलें तर निर्गुणावर गुणाचा आरोप होतो म्हणून पाचरात्राची ही कल्पना वेद-विरुद्ध आहे असा शकराचार्यांचा निष्कर्ष आहे.[७] याच सूत्रावर भाष्य करताना रामानुजाचार्यांनीं ही व्यूह-कल्पना प्रमाण मानली असून त्यासाठी पौष्करसहिता, सात्वतसहिता व परमसहिता याचे आधार घेतले आहेत[८]

## पांचरात्र मतास विरोध

महाभारताचा विख्यात टीकाकार नीलकठ यासहि व्यूह-कल्पना किंवा पाचरात्र सिद्धात शकराचार्यांप्रमाणेंच आमान्य होते हे शातिपर्वावरील नीलकठाच्या भाष्यावरून दिसून येतें शातिपर्वाच्या ३३४ व्या अध्यायातील ९ व्या श्लोकावर टीका करताना नीलकठ लिहितो,

'स्वयभुव इत्यनेन वासुदेवस्यैवैते चत्वरो व्यूहा अजन्मान तेन तु पाञ्चरात्राणामिव वासुदेवात्परमकारणात् सकर्षणाख्यो जीव उत्पद्यते तत. प्रद्युम्नाख्यो जीव उत्पद्यते ततः प्रद्युम्नाख्य मनो जायते ततोऽनिरुद्धाख्यो-ऽहकार उत्पद्यते इति मत निरस्तम् । तथा च सूत्रम् । उत्पत्त्यसभावात् इति ।' पाचरात्रांची व्यूहकल्पना ही ब्रह्मसूत्राच्या आधाराने विरोधी

असल्याचें मत नीलकठानें दिले असून नारायणीय धर्मांत पाचरात्राचा पुढें ज्या ठिकाणीं उल्लेख आला आहे त्याठिकाणी 'पचरात्र भक्तिमार्ग' असा अर्थ त्यानें केला आहे (३४८-८२ वरील टीका) परतु ३४९ व्या अध्यायात साख्य, योग, पाशुपत इत्यादि मार्गांचा उल्लेख करून 'पाचरात्रा'-चा ज्ञाता भगवान् स्वत आहे (पाचरात्रस्य कृत्स्नस्य वेत्ता तु भगवान् स्वयम् ३४९-६८) असे वर्णन आले आहे त्याठिकाणीं मात्र पाचरात्र याचा अर्थ भक्तिमार्ग असा करणे शक्य नव्हतें म्हणून या पथात वेदविरुद्धत्व सूचित झालें असले आणि अवातर भेद असले तरी परमतात्पर्य एकच आहे तें म्हणजे 'इद विश्व नारायण' अशी पाचरात्र मतास नीलकठानें सशर्त मान्यता दिली आहे तरीहि पाचरात्र मार्ग हा वेदविरोधी मार्ग आहे ही भूमिका मात्र नीलकठानें सोडली नाहीं (३५१-२२ वरील टीका)

## दाक्षिणात्यांनीं केलेला पुरस्कार

दाक्षिणात्य वैष्णवानी मात्र पाचरात्रधर्म हाच प्रमाण मानला आहे इ स च्या पाचव्या शतकाच्या सुमारास सुरु झालेल्या तामीळ आळवारानी नारायणीय धर्मांत वर्णिलेली पाचरात्र पूजापद्धति श्रेष्ठ मानली आहे [१] याच परपरेत होऊन गेलेले रामानुजाचे गुरु यामुनाचार्य यानीं सुद्धा पाचरात्र धर्म-चतुर्व्यूहात्मक धर्म-हा प्रमाण मानला आहे इतकेंच नव्हे तर तो वेदविरोधी नाहीं असें स्पष्ट केले आहे 'आगमप्रामाण्य' या ग्रथात यामुनाचार्यांनी या मार्गावर घेण्यात येणाऱ्या सर्व आक्षेपाचे खडन केलें आहे वेदातसूत्रें, भारत आणि गीता याना सुद्धा हा मार्ग मान्य असल्याचें यामुनाचार्यांनीं प्रतिपादिलें आहे यामुनाचार्यांचे शिष्य आणि विशिष्टाद्वैत सप्रदायाचे प्रवर्तक रामानुजाचार्य यानींहि चतुर्व्यूहात्मक पाचरात्रधर्म हाच खरा भागवतधर्म असल्याचें ब्रह्मसूत्राच्या भाष्यात प्रतिपादन केलें आहे ज्या सूत्रावरील भाष्यात शकराचार्यांनीं चतुर्व्यूहाचें खडन केलें आहे त्याच सूत्रावरील भाष्यात हे मत वेदपरपरेस धरून असल्याचा निर्वाळा रामानुजाचार्यांनी दिला आहे नारदपाचरात्र सहितेंत [१०] 'हा धर्म वेदात सागितला आहे' असें सागण्यात आलें आहे. इतकेंच नव्हे

तर हे शास्त्र प्रत्यक्ष भगवतानीं सागितलें असून श्रुतिविभावन आहे असा या सहितेचा कटाक्ष आहे [११]

## अद्वैत आणि पाचरात्रमत

कारणे कोणतीहि असली तरी पाचरात्र मत हे वैदिक परपरेच्या विरुद्ध असल्याचें समज मात्र शकराचार्यांच्या कालापासून रूढ होते हे सत्य आहे महाभारताच्या काळात देखील या मताविषयीं असा समज असणें असभवनीय नाहीं महाभारतकाराची भूमिका ही समन्वयाची असल्याने काही काळ अवैदिक गणलेल्या साख्याचा गीतेने वैदिकदर्शनात समन्वय साधला त्याप्रमाणें नारायणीय धर्मात वेदबाह्य गणलेल्या पचरात्रागमाचा समन्वय दक्षतापूर्वक करण्यात आला असावा हे असभवानीय नाही. चार वेद आणि साख्य असा हा पचरात्रमार्ग असल्याचें [१२] महाभारत-कर्त्यानें नमूद केलें आहे नारायणाने पाच दिवस केलेल्या (पचरात्र) पुरुपमेधावरूनहि हें नाव या मार्गास पडलें असावें वैदिक सस्कृतीत रूढ असलेल्या उपासनामार्गाव्यतिरिक्त निराळया स्वरूपाची यज्ञयागादि-विरहित अशी उपासनापद्धति या मार्गानें रूढ केल्याकारणानें जैन आणि बौद्ध मतावर ज्याप्रमाणे अवैदिकत्वाची मुद्रा बसली त्याचप्रमाणें हा मार्गहि वेदबाह्य असा काहीं काळ गणाला गेला असावा जैनबौद्धाचे तत्त्वज्ञान उपनिषदावर आधारलेले असूनहि आचारभेदाने हे पथ वेद-बाह्य मानले गेले. पाचरात्र मतात सुद्धा पशुहिंसा वर्जिली असल्यामुळें यज्ञयागादिकाचे आचरण करणाऱ्या कर्मठाना हा मार्ग अवैदिक वाटला असावा महाभारतकारानी त्यास वैदिक परपरेइतकीच प्रतिष्ठा प्राप्त करून दिली असली तरी चतुर्व्यूहाच्या कल्पनेंत वासूदेवापासून सकर्षणादि व्यूहनिर्माण झाल्याचा जो सिद्धात आहे तो अद्वैतास बाधक असल्यामुळे शकराचार्यांनी व शाकरमतचें अनुसरण करणाऱ्या इतरानीं त्यास वाळीत टाकले आणि विशिष्टाद्वैताचा पुरस्कार करणाऱ्या रामानुजादिकानीं मात्र तोच खरा धर्म म्हणून त्याचा स्वीकार केला

दुसरें कारण डॉ भाडारकरानीं उल्लेखिलें आहें हा धर्म कृष्णाच्या ज्ञातींतच वाढल्यामुळे आणि कृष्ण हा सात्वतकुळातील असल्यामुळे

हा मार्ग ब्राह्मणाचा नाही म्हणूनहि त्याचा निषेध झाला असावा चतुर्व्यूहात्मक धर्मच पाचरात्रधर्म आहे असा आग्रह महाभारताने धरला नाही एकव्यूह, द्विव्यूह, त्रिव्यूह आणि क्वचित् चतुर्व्यूह असाहि हा धर्म प्रचालित आहे असे महाभारतकार सागतात [13] परतु हा धर्म अहिंसाप्रयुक्त आहे (शाति पर्व ३४८–५६), हा आत्मधर्म आहे, साक्षात् भगवतानी सागितला आहे व पूर्वी गीतेतहि सागितलेला हाच धर्म आहे हे मात्र महाभारतकारानी असदिग्धरीत्या स्पष्ट केले आहे

## अहिंसेस प्राधान्य

नारायणीय धर्म उपदेशिला गेला त्याकाळात यज्ञयागादिक कर्मकाड बरेच मागे पडलें असावें असे अनुमान करता येतें कारण, समाजात यज्ञयागादिक विधीना गीतेच्या काळाइतकी मान्यता राहिली असती तर पशुहिंसेचा उघड निषेध न करता गीतेप्रमाणेंच तरतमभावानें यज्ञ आणि उपासना याचा उपदेश नारायणीय धर्मात आला असता उपनिषदाच्या काळातच यज्ञविधीचें गौणत्व ऋषीना जाणवत होतें अहिंसेविषयींचा ओढा त्या काळापासून बळावत होता या प्रवृत्ति नारायणीय धर्माच्या उपदेशाच्या काळात बऱ्याच स्थिर झालेल्या दिसून येतात वेदाविषयी सपूर्ण आदराची भावना बाळगूनहि नव्या मताचा पुरस्कार करताना पूर्वपरपरेतूनच हे विचार उदयास आले आहेत हे पटविण्यासाठीं ब्रह्मदेवाच्या अनेक जन्माच्या वेळी नारायणानें हा धर्म ब्रह्मदेवास उपदेशि त्याचे कथन अत्यत दक्षतेने करण्यात आलें आहे वासुदेव या शब्दाची व्युत्पत्ति सुद्धा विष्णु या शब्दाच्या व्युत्पत्तीस जुळणारी आणि उपनिषदातील तत्त्वज्ञानाशी सुसगत अशी देण्यात आली आहे [15] भागवतधर्मास आधारभूत असलेलें पुरुषसूक्त हे वेदाचें सार आहे [16] असें सागून वेदोपनिषदाशीं नारायणीय धर्माचा सबध अधिक दृढ केला आहे. थोडक्यात, परमेश्वर, त्याची एकातिक भक्ति आणि भक्तीच्या क्षेत्रात अहिंसेस देण्यात आलेलें प्राधान्य हे नारायणीय धर्माचे विशेष म्हणून सागता येतील.




१ Dr Radhakrishnan, *Indian Philosophy*, Vol I, P 490

२ **शातिपर्व**, ३४८–३४ ते ३५, (चित्रशाळा आवृत्ति, पृ ७३४)

३ **कित्ता**, ३४७–८३

४ **कित्ता**, ३५०–५

५ **कित्ता**, ३५०–६३ ते ६८

६ **कित्ता**, ३३९–३२ ते ४६

७ **ब्रह्मसूत्राणि**, (आनदाश्रम आवृत्ति,) पृ ६१० ते ६१४

८ **ज्ञानकोश**, विभाग ४ था, १२६–१२७

९ Dr Radhakrishnan, *Indian Philosophy*, Vol I, P 496

१० अय च योगो वेदेपु वेदान्तेपु च गीयते
तथैव धर्मशास्त्रेपु दिव्यशास्त्रगणेपु च ॥
**नारदपाचरात्र**, १–५, (श्रीव्यकटेश्वर आवृत्ति)

११ पचरात्र महादिव्य शास्त्र श्रुतिविभावनम्
विशेषेणाविगन्तव्य गीत भगवता स्वयम् ॥
वेदवेद्य स भगवान् कृपया परयाच्युत
चतुर्विधमिद प्राह सर्वेषा हितकारणात्
– **नारदपाचरात्र**, ३–४० व ४१

१२ **ज्ञानकोश**, खड १७, पृ ६२ व ६३

१३ एकव्यूहविभागो वा क्वचिद्द्विव्यूहसज्ञित·
त्रिर्व्यूहश्चापि सख्यातश्चतुर्व्यूहश्च दृश्यते
– **शातिपर्व**, ३४८–५७

१४ **गीता**, ४–३३

१५ छादयामि जगद्विश्व भूत्वा सूर्य इवाशुभि
सर्वभूताधिवासश्च वासुदेवस्ततो ह्यहम् ॥
– **शातिपर्व**, ३४१–४१.

या श्लोकावर नीलकंठाचे भाष्य पुढीलप्रमाणे आहे
वासयति आच्छादयति विश्व वसत्यस्मिन्विश्वमिति वा वासु , वस आच्छादने वस निवासे इत्यनयो रूपे । स चासौ देवश्चेति वासुदेव इत्यर्थ एतेन इशावास्यमिद सर्व कर्माध्यक्ष सर्वभूताधिवास इति श्रुत्योरर्थ सगृहीत ।
१६ **शांतिपर्व,** ३५०–५

---

# ६. गीता ते भागवत

या काळातील विचार प्रवाह–पौराणिक वाङ्मयाचें वैशिष्ट्य–अवतारपूजा –विधियुक्त मूर्तिपूजा–कर्मठ पाचरात्रिक–महाराष्ट्राची प्रगमनशीलता–योगशास्त्र आणि भागवतधर्म–'परि सिद्धात तो हाचि'–योगवासिष्ठाची पौरुष-पूजा–नाथावर झालेला योगवासिष्ठाचा परिणाम–वैचारिक उत्क्राति आणि अवैदिकपथ–अवैदिकाची भागवत परपरा–वैदिक 'ऋत' आणि बौद्ध 'धम्म'–सिहावलोकन–

श्रीमद्‌भगवद्‌गीतेनतर सुमारे एक हजार वर्षांनी भागवत पुराणाची रचना झाली या हजार वर्षांच्या काळात झालेल्या विचारविकासाचा आढावा या प्रकरणात घ्यावयाचा आहे वैचारिक क्षेत्रात बरींच महत्त्वाचीं आदोलनें या काळात घडली भारताच्या राजकीय जीवनातहि बऱ्याच घडामोडी या काळात झाल्या काहीं परकीय जातींनीं भारतावर आक्रमण केलें भारताच्या काहीं भागात त्याची राजवटहि काहीं काळ राहिली. परतु सास्कृतिक दृष्टया भारतीय सस्कृतीच्या मानानें हे आक्रमक निकृष्ट संस्कृतीचे असल्यानें आमच्या सस्कृतीवर त्याचें आक्रमण होऊं शकले नाही उलट, भारतीय सस्कृतीनेंच त्याना जिंकले त्यामुळें ते आमच्या सस्कृतीशी समरस झाले यवनाचे राजदूत 'भागवत' बनले आणि शकहूणासारखे जेते शिव–विष्णूचे उपासक झाले अशारीतीनें भारतीय सस्कृतीच्या प्रवाहात त्याचें परकेपण लुप्त झालें

## या काळांतील विचारप्रवाह

वैचारिक क्षेत्रात झालेल्या आंदोलनाचा परिणाम मात्र आमच्या सस्कृतीवर बराच झाला यज्ञयागादिक कर्मकाडासच धर्म मानणाऱ्या प्रवृत्तीची विरोधी प्रतिक्रिया उपनिषत्कालापासूनच सुरु झाली होती. भारत-

पूर्वकालात तिनें सत्यसंशोधनाचे रूप धारण केलें होते. तत्त्वचिंतनाचा मार्ग संन्यासप्रधान ज्ञानमार्गात परिणत झाल्यानतर निर्माण झालेली एकांतिकता घालविण्यासाठीं ज्ञान आणि कर्म याचा समन्वय गीतेच्या रूपानें उपदेशिण्यात आला या उपदेशात भक्ति या अभिनव निष्ठेस महत्त्वाचे स्थान मिळालें या निष्ठेचा विस्तार नारायणीय धर्माच्या रूपानें पहावयास मिळतो यज्ञीय हिंसेस असलेल्या विरोधाची प्रतिक्रिया अहिंसेस प्राधान्य देण्याच्या रूपानें झाली तर ज्ञानमार्ग म्हणजे संन्यासमार्ग या विचाराची प्रतिक्रिया ज्ञान, कर्म आणि भक्ति याचा समन्वय साधण्यात झाली

कोणत्याहि एकाच विचाराचा अतिरेक समाजाच्या कल्याणास उपकारक ठरत नाहीं ज्ञान, कर्म, आणि भक्ति याचा समतोल त्यासाठीं आवश्यक असतो ही दृष्टि प्रारभापासून भागवतधर्मानें ठेवली आहे त्या दृष्टीनें या काळातील भागवतधर्मानें देखील विविध प्रवृत्तींचा समतोल साधला आहे तसेंच नवविचाराना स्थान देऊन आपली प्रगमनशीलता देखील भागवतधर्माने सिद्ध केली आहे.

वैचारिक आदोलनात पुढे आलेले नवे विचार सपूर्णपणें नवे होते असे मानण्याचें मात्र कारण नाहीं भागवतधर्मातील एखाद्या विशिष्ट अगावर अधिक भर दिल्यामुळें हे विचार नव्या स्वरूपात दिसतात एवढेंच अवैदिक गणलेल्या जैन – बौद्धाचें अहिंसा–प्राधान्य, चित्तवृत्ति स्थिरकरण्यासाठीं सागितलेलें योगशास्त्र, सुलभ व्यक्तोपासनेंतून उदयास आलेली मूर्तिपूजा, विशिष्ट देवाचा महिमा गाणारी पुराणें, धर्मसस्थापनार्थ भगवताचा अवतार होतो या सिद्धातातून परिणत झालेली अवतारकल्पना आणि भिन्न अवताराची उपासना यासारखे या सहस्रकात पुढें आलेले विचार भागवतधर्माच्या अगभूत तत्त्वातूनच परिणत झाले आहेत. यापैकीं जैन आणि बौद्ध या मतानी प्राचीन विचाराचें ऋण मान्य केलें असलें तरी वैदिक परपरा मानली नाही इतरानी वैदिक परपरेस मान्यता दिली म्हणून 'अवैदिक' आणि 'वैदिक' असा भेद मताच्या बाबतींत झाला सर्वच विचार वैदिक परपरेंतून आणि भागवतधर्माच्या अगभूत तत्त्वातून उदयास आला असला तरी प्राचीन परपरेची अखडधारा वैदिक मतानीं मानल्यामुळें वैदिक दर्शनात अथवा वैदिक तत्त्वप्रणालींत त्याना स्थान

मिळालें अवैदिक मताचें स्फूर्तिस्थान वैदिक परपरेबाहेरचे मुळीच नव्हतें हे विशेषेकरून ध्यानात ठेवले पाहिजे

## पुराणवाङ्मयांच वैशिष्ट्य

वैदिक परपरेच्या दृष्टीने पुराणाची रचना हे या काळातील अत्यत महत्त्वाचे कार्य आहे धर्माला शिस्तबद्ध स्वरूप देण्याच्या दृष्टीनें धर्मसूत्र-कारानी प्राचीन परपरा आणि वर्तमानकालीन गरज याचा विचार करून धर्मसूत्राची रचना केली या सूत्राच्या आधारानें आचारधर्माचें सविस्तर विवरण करणाऱ्या स्मृति उदयास आल्या सूत्रकार आणि स्मृतिकार याचा ओढा कर्मठतेकडे अधिक होता एका दृष्टीने कर्मकाडात्मक धर्मस्वरूपाचा वारसा त्यानी चालविला असेच म्हणता येईल पुराणें या दोषापासून सर्वस्वी अलिप्त आहेत असे नाही परतु, धर्माचाराच्या काटेकोर नियमापेक्षा धर्माच्या सर्वसग्रहात्मक स्वरूपावर पुराणाचा कटाक्ष अधिक असल्यामुळें आणि ज्या वर्णाना श्रुतीच्या अध्ययनाचा अधिकार नव्हता अशाना पुराण-श्रवणाचा अधिकार असल्यामुळे सर्वसामान्य जनतेच्या दृष्टीनें पुराणाना अधिक मान्यता मिळाली निरनिराळया कथाच्या आधारानें धर्मतत्त्वाचें विवरण, व सृष्टीची उत्पत्ति-स्थिति याचा विचार पुराणात झाला आहे त्यामुळेहि पुराणास प्रामाण्य प्राप्त झाले आणि वैदिक धर्मपरपरा ही श्रुति-स्मृति-पुराणोक्त-धर्म या नावानें ओळखली जाऊ लागली

सस्कृत भाषेत रचण्यात आलेली पुराणें पुष्कळ आहेत त्याचे कालहि भिन्न आहेत प्रमुख १८ पुराणाचा काळ देखील एकच नाहीं सर्व पुराणाना जन्म देणारें मूळ पुराण वेदकालापासून अस्तित्वात असावें असें विद्वानाचें मत आहे [१] वेदोपनिषदात पुराणाचे उल्लेख आढळतात खिस्तपूर्व चौथ्या शतकापासून पुराणाच्या रचनेस प्रारभ झाला असावा असे काही पडिताचे मत आहे इ स चें २ रे आणि तिसरें शतक हे पौराणिक रचनेचें सुवर्ण-युग असुन सातव्या शतकापूर्वी महत्त्वाच्या सर्व पुराणाची रचना झाली असावी असा विद्वानाचा अभिप्राय आहे [२]

भिन्न भिन्न देवताची महती गाण्यासाठी भिन्नकाळीं पुराणाची रचना झाली असली तरी 'पुराणवाङ्मयात एकप्रकारची सुसूत्रता आहे सर्ग, प्रति-

सर्ग, वंश, मन्वंतर, आणि वंशानुचरित अशा पाच लक्षणांनी युक्त असलेल्या रचनेस पुराण म्हणतात[3] या सूत्रास अनुसरून वेगवेगळ्या कथांच्या आधारानें सृष्ट्युत्पत्ति, जीव जगत् यांचें संबंध, परमेश्वराचे वर्णन, आणि त्या त्या देवतांची महती इत्यादि विषय पुराणांतून आले आहेत प्राचीन तत्त्वज्ञान आणि नवीन आचारधर्म यांची सांगड घालून, कालबाह्य आचाराचा युगधर्मांत समावेश करून वैदिक धर्मास कालानुरूप सुलभ स्वरूप देण्याचा प्रयत्न पुराणांनीं केला आहे

## अवतारपूजा

पौराणिक वाङ्मयांत अवतारांना बरेंच महत्त्व आलें अवतार कल्पनेचें बीज वैदिक वाङ्मयांत आढळतें तीन पावलांनीं पृथ्वी व्यापणाऱ्या विष्णू-च्या वर्णनावरून वामन अवताराची कल्पना पुराणांनी उचलली असावी वामन, वराह, मत्स्य आणि कूर्म या अवतारांचे मूळ शतपथ ब्राह्मणांत सांपडतें[4] 'धर्मसंस्थापनार्थ युगायुगाचे ठिकाणीं परमेश्वर अवतार घेत असतो' एवढाच गीतेंत अवतारासंबंधीचा उल्लेख असला तरी महाभारतांत मात्र कांहीं ठिकाणीं सहा व कांहीं ठिकाणीं दहा अवतारांचीं नावें आढळ-तात नावांच्या बाबतींत एकवाक्यता नसली तरी दहा अवतार बहुतेक पुराणांनीं मानले आहेत मत्स्यपुराणांत नारायण, नरसिंह, वामन, दत्ता-त्रय, मांधात्रि, परशुराम, राम, वेदव्यास, बुद्ध आणि कल्की अशी दहा नावें आलीं आहेत वायुपुराणांत बुद्धाऐवजीं कृष्णाचा उल्लेख आहे. हरिवंशांत कूर्म, परशुराम, मत्स्य, आणि बुद्ध हीं चार नावें वगळून त्या-ऐवजी कमल, दत्त, केशव आणि व्यास यांचीं नावें आलीं आहेत भाग-वतपुराणांत एकादशस्कंधांत तीन ठिकाणीं अवतारांचीं नावें आलीं आहेत. तिन्हीं ठिकाणीं नावें व संख्या यांत भेद आहे.[5] इ. स च्या चौथ्या शतकापासून ८ व्या शतकापर्यंतच्या शिलालेखांत अवतारपूजेचे उल्लेख आढळतात[6] त्यावरूनहि पौराणिक कालांत अवतार-कल्पना बरीच लोक-प्रिय होती असा निष्कर्ष निघतो

## विधियुक्त मूर्तिपूजा

मूर्तिपूजेचे वाढतें आकर्षण हे अवताराच्या लोकमान्यतेचे कारण देता येईल पुरुषरूपधारी भगवताची कल्पना प्रथम पुरुषसूक्तात आढळते भागवतधर्मातील भगवताच्या साकार मूर्तींचा उगम या पुरुषसूक्तातच असावा वैदिक ऋचातील प्रार्थना प्रत्यक्ष यज्ञविधीनेच सफल होऊ शकते हा कर्मकाण्डाचें अनुसरण करणाऱ्याचा समज होता त्याच प्रमाणे सगुण परमेश्वराची भक्ति मूर्तिपूजेनेच सफल होऊ शकते हा समज पौराणिक काळात वाढीस लागल्याने विष्णूची मूर्ति व विष्णूच्या विविध अवतारातील मूर्तींची उपासना होऊ लागली 'मूर्ति स्वरूप असेल तरच परमेश्वराचें चिंतन व पूजन होऊ शकते परमेश्वर ज्या स्वरूपात अवतीर्ण होतो त्या स्वरूपात त्याची विधियुक्त पूजा केली पाहिजे कारण, अमूर्ताची कल्पना मानवास सहज करता येत नाही . . म्हणून समूर्त परमेश्वराची पूजा करण्यात येते' असे उद्गार विष्णुधर्मोत्तरात काढले आहेत [७] मूर्तिपूजेच्या या उल्लेखावरून वेदोक्त यज्ञाची जागा पौराणिक काळात विधियुक्त मूर्ति-पूजेने घेतली असेंच म्हणता येईल तथापि, श्रुति आणि यज्ञ याचे महत्त्व पुराणानी कमी लेखले नाही श्रौतयज्ञ हा प्राचीन काळातील युगधर्म होता कलियुगात मूर्तिपूजा आणि नामसकीर्तन हाच युगधर्म आहे अशी व्यवस्था पुराणानी लावली [८]

## कर्मठ पांचरात्रिक

मूर्तिपूजेप्रमाणेच पाचरात्र सिद्धाताचा अवतार-कल्पनेशी निकटचा सबध दिसून येतो गीतेंत नसलेला व्यूहसिद्धात प्रथम महाभारतात आढळतो हे मागील प्रकरणात स्पष्ट केलेंच आहे [९] व्यूहकल्पना, नारायणा-खेरीज अन्य देवताविषयी असाविष्णु वृत्ति, गुरूचे अत्यतिक महत्त्व, मत्रा क्षरावर भर, यासारख्या वैष्टियामुळें पाचरात्र मतास कर्मठ सप्रदायाचे रूप प्राप्त झालें एकीकडे समाजविकासाच्या व्यापक भूमिकेवर आधारलेला सर्वसग्राहक भागवतधर्म आणि दुसरीकडे याच धर्मास कर्मठ सप्रदायाचें स्वरूप देणारा पाचरात्र सप्रदाय असे भिन्नप्रवाह पौराणिक काळात आढळ-

सज्ञा आढळतात [१४] त्यावरूनहि वरील अनुमानास पुष्टी मिळते

'चित्तवृत्तिनिरोध' अशी योगाची व्याख्या पतजलीच्या सूत्रात आली आहे चित्तवृत्तीचा निरोध करून समाधि साधणें एवढेच सकुचित उद्दिष्ट या शास्त्राचें नाही 'ऋतभराप्रज्ञा' किंवा गीतेच्या परिभाषेत सागावयाचें झाल्यास स्थितप्रज्ञावस्था हे पातजल योगाचें ध्येय आहे ही अवस्था यम-नियमादि साधनानें साध्य होते तशीच ती ईश्वराच्या भक्तीनें देखील प्राप्त होते (ईश्वरप्राणिधानाद्वा) असा योगशास्त्राचा सिद्धात आहे या शास्त्राने सागितलेले यमनियम व ईश्वरप्रणिधान भागवतधर्मातील निष्काम कर्मयोग आणि भक्ति यास पूरक आहेत योगशास्त्र समाजनिरपेक्ष एकातिक साधना करणारें शास्त्र नाही 'योगातील जे अहिंसादि पाच यम त्याचें अनुष्ठान आवश्यक असते आणि हे अनुष्ठान जनसमर्दात राहून पूर्णत्वाने घडून येतें म्हणजे सर्वांचा निष्कर्ष असा की, ब्रह्मविद्या अगी बाणण्यास समाजात राहणें बाधक नसून साधकच होय''[१५]'

पतजलीनें सागितलेले यमनियम गीतेतील दैवीसपत्तीच्या वर्णनातून घेतलेले दिसतात योगातील ऋतभराप्रज्ञा गीतेतील प्रतिष्ठित प्रज्ञेची प्रतिकृती दिसते योगसूत्रावरील दोन प्रमाणभूत भाष्यकार श्रीव्यास (इ स ६५०) आणि वाचस्पति मिश्र (इ स ८५०) यानी योगसूत्रा-वरील भाष्यात कित्येक सूत्राचे अर्थ भागवतधर्माच्या परपरेस अनुसरून लावले आहेत [१६] ''ईश्वरप्रणिधानाद्वा'' या सूत्राचा 'प्रणिधानात् भक्तिविशेषात्' असा अर्थ व्यासभाष्यात दिला आहे क्रियायोगातील 'ईश्वरप्रणिधान' (२-१) या साधनाचे स्पष्टीकरण करताना ''सर्व-क्रियाणा परमगुरौ समर्पणम्'' असें व्यासाने सागितले आहे २-३२ या सूत्राचा अर्थ गीतेतील निष्कामकर्मयोगास अनुसरून असाच भाष्यकारानीं दिला आहे 'ईश्वरप्रणिधानाद्वा' या सूत्रावर भाष्य करताना भोज लिहितो, ''ज्या भक्तीमध्यें कोणत्याहि प्रकारच्या इंद्रियसुखाची आशा नाही अथवा जीमध्यें कोणत्याहि प्रकारचा हेतु नाहीं आणि जींत सर्व कर्मे कृष्णार्पण होतात त्या भक्तीस ईश्वरप्रणिधान म्हणावें''[१७]

# " परि सिद्धांत तो हाचि "

ज्ञान, कर्म आणि भक्ति भागवतधर्म आणि योगशास्त्र या दोहोंसहि मान्य आहे ज्ञान-कर्म-भक्तीची साधना करताना अविचल वृत्ति कशी ठेवावी यावर योगशास्त्रानें अधिक भर दिला आहे योगशास्त्रातील "ऋतंभरा प्रज्ञा" भागवतधर्मातील ऋतप्रेरणेशी संबंधित आहे[१८] 'परमेश्वराच्या सत्स्वरूपाचें ज्ञान चित्त स्थिर झाल्यानें होतें अभ्यास आणि वैराग्य यांच्यायोगें चित्त स्थिर होतें ही साधनें ज्याना अटोक्या बाहेरची वाटतात त्यानी भक्ति करावी' असें भागवतधर्म सांगतो तर ऋतंभरा प्रज्ञा यमनियमादिकानी किंवा ईश्वराच्या भक्तीनें प्राप्त होतें असें योगशास्त्राचें प्रतिपादन आहे भागवतधर्मांच्या एक अंगाचा विस्तारानें विचार करणारें हे शास्त्र आहे हे वरील विवेचनावरून स्पष्ट होईल भागवत पुराणात योगशास्त्रीय परिभाषेचें प्रतिबिंब आढळतें[१९] महाराष्ट्रातील योगारूढ संत व अनन्यनिष्ठ भक्त यांच्या वाङ्मयातहि योगशास्त्रातील अनुभव आढळतात भक्तीची परमावधि आणि योगाची उत्कर्षावस्था सारखाच अनुभव देतात असें ज्ञानेश्वराचें वचन आहे[२०] त्यावरूनहि योगशास्त्राचें भागवतधर्मांकितत्वच ध्वनित होते

## योगवासिष्ठाची पौरुषपूजा

भागवतधर्मांचीच अंगभूत असलेली आणखीहि एक विचारधारा पौराणिक वाङ्मयाच्या उत्तरकाळात आढळते योगवासिष्ठ या ग्रंथात या विचारधारेचा विस्तार आला आहे. ज्ञान आणि निष्काम कर्म यावर योग-वासिष्ठानें अधिक भर दिला आहे इ स च्या पाचव्या-सहाव्या शतकात या ग्रंथाची रचना झाली असावी[२१] इसवी सनाच्या दुसऱ्या-तिसऱ्या शतकापासून वैदिक धर्माच्या पुनरुत्थापनाचे प्रयत्न होत असले तरी जैन-बौद्धानीं गौरविलेला सन्यासमार्ग वैदिक धर्मातहि बराच सुप्रतिष्ठित झाला होता. सन्यासपूर्वक ज्ञानोपासना करण्यात ज्ञानी लोक धन्यता मानीत असत कर्म-सन्यास भागवतधर्मास मान्य नाही म्हणून ज्ञानाचे प्रतीक बनलेला संन्यासमार्ग निषिद्ध आहे हे प्रतिपादण्यासाठी योगवासिष्ठाची रचना झाली.

कर्मयोगाचें महत्त्व या ग्रथात जागोजाग प्रतिपादिलें आहे प्रारभीच सुतीक्ष्णानें अगास्ति ऋपीस पुढील प्रश्न केला आहे

मोक्षस्य कारण कर्म ज्ञान वा मोक्षसाधनम्
उभय वा विनिश्चित्य एक कथय कारणम्–

– योगवासिष्ठ–वैराग्य–१–६

मोक्ष ज्ञानानें किंवा कर्मानें अथवा ज्ञानकर्म या दोहोंच्या योगानें प्राप्त होतो असा हा प्रश्न आहे अगास्ति ऋपींनी या प्रश्नाचें उत्तर पुढील प्रमाणें दिलें आहे.

उभाभ्यामेव पक्षाभ्या यथा खे पक्षिणा गति
तथैव ज्ञानकर्मभ्या जायते परम पदम् ॥
केवलात्कर्मणो ज्ञानान्नहि मोक्षोभिजायते
किन्तूभाभ्या भवेन्मोक्ष साधन तूभय विदु ॥

– १–१–७ व ८

श्रीरामचद्राना वाटत असलेली विरक्ती दूर करण्याकरिता योगवासिष्ठातील ज्ञानाचा उपदेश करण्यात आला आहे गीतेंतील स्थितप्रज्ञ, ज्ञानी आणि भक्त याच्या लक्षणात आणि योगवासिष्ठातील जीवन्मुक्ताच्या गुणधर्मात बरेंच साम्य आहे लोकोपकारार्थ सतत प्रयत्नशील राहण्याच्या वैशिष्टयावर योगवासिष्ठानें अधिक भर दिला आहे निष्काम कर्मांची निष्ठा सागताना मानवी कर्तृत्वाची महती देखील या ग्रथात आली आहे. 'दैव या नावाची वस्तु या जगात नाहीं ती मूर्खांची निर्मिती आहे. पौरुष हेंच जगात श्रेष्ठ आहे पौरुषास अप्राप्य असें काहीच नाहीं ज्ञानी किंवा जीवन्मुक्त हा पौरुषाचा उपासक असतो. या उपासनेनें त्याला उत्तमपदाची प्राप्ती होते' असा योगवासिष्ठकाराचा सिद्धात आहे [२२]

महाराष्ट्रातील भागवतधर्मावर विशेपत. एकनाथाच्या तत्त्वज्ञानावर योगवासिष्ठाचा बराच परिणाम झाला आहे भावार्थ रामायणात तर योगवासिष्ठातील काही निवडक श्लोकावर नाथानीं भाष्यहि लिहिलें आहे [२३] ज्ञानेश्वराच्या वाङ्मयावर देखील योगवासिष्ठाचा ठसा उमटला आहे [२४]

वैदिक परपरेच्या क्षेत्रात झालेल्या विचारविकासाचें स्वरूप थोडक्यात वरीलप्रमाणें आहे भागवतधर्मातील कोणत्या तरी विशिष्ट अगास महत्त्व देऊन अस्तित्वात आलेली विचारसरणीच प्रामुख्याने या काळात आढळते.

समाजकल्याणास पोषक आणि उपकारक व ऋतप्रेरणेस सुसगत असा सर्व विचाराचा व प्रवृत्तींचा समन्वय भागवतधर्माने या काळातहि साधला. भागवतपुराण हा या काळातील भागवतधर्माचा प्रमाण ग्रथ आहे या पुराणाचा विचार पुढील प्रकरणात व्हावयाचा असल्यामुळें त्यासंबधीं अधिक विवेचन न करता अवैदिक गणलेली या काळातील विचारसरणी देखील भागवतधर्मातील विशिष्ट अगाचा पुरस्कार करणारी आहे हे दिग्दर्शित करावयाचे आहे

## वैचारिक उत्क्रांति आणि अवैदिक पंथ

जैन आणि बौद्ध हे दोन्ही पथ वैदिक धर्माविरुद्ध झालेल्या बडातून उदयास आले असे भारतीय सस्कृतीच्या इतिहासकारानीं नमूद केलें आहे "खिस्तापूर्वी सहाव्या–सातव्या शतकात नव्या विचाराचा उदय झाला. त्या तून नवीन धर्मपथ उदयास आले त्यातील बहुतेक पंथ बडखोर प्रवृत्तीचे होते. अशा प्रकारचें वैचारिक आदोलन भारताच्या इतिहासात पूर्वी आणि नतरहि कधीं झालें नाहीं '[२५] ही विचारसरणी अवास्तव वाटते वेदकाला पासून बौद्धकालापर्यंत विचाराचा विकास सतत होतच होता परपरेचा अधिक्षेप न करता नव्या विचाराना स्थान मिळत गेलें वैचारिक उत्क्राती च्या या परपरेतूनच बौद्ध व जैन याची अहिंसेस प्राधान्य देणारी विचार-सरणी परिणत झाली हिंसेस विरोध आणि अहिंसेस महत्त्व केवळ बुद्धानेंच दिलें असें नाहीं बौद्धपूर्वकाळातील भागवतधर्माच्या स्वरूपात या वैशि-ष्ट्याचा अतर्भाव झाला होता हे मागील प्रकरणात स्पष्ट केलेच आहे या तथाकथित अवैदिक पथाचे वैशिष्ट्यच जर कोणते असेल तर ते अहिंसा-प्राधान्य हे नसून त्यानीं वेदप्रामाण्यास दिलेली अमान्यता हेंच सागता येईल

## 'अवैदिकां'ची भागवतपरंपरा

आपण नवीन विचार माडला आहे असा दोन्ही पथाच्या प्रवर्तकाचा आग्रह नाहीं उलट 'पूर्वपरपरेतून चालत आलेले विचारच मी आपल्या अनुयायास सागत आहे' अशीच भूमिका या पथप्रवर्तकानी घेतली आहे.

महावीराच्या पूर्वी अनेक तीर्थंकर होऊन गेल्याचें व गौतमापूर्वी सहा बुद्ध होऊन गेल्याचे परंपरागत समज याच सत्याचे निदर्शक आहेत आणि वैचारिक परंपराच शोधावयाची झाल्यास या पंथांना भागवतधर्मांखेरीज अन्य परंपरा आटळणारहि नाहीं जैन उपांगांत औपपात्तिक सूत्र नामक ग्रंथांत आठ क्षत्रिय शिक्षकांचा उल्लेख आहे या आठांत बलदेव आणि वासुदेव यांचा अंतर्भाव होतो जैनांच्या ६३ शलाकापुरुषांत २४ तीर्थंकर १२ चक्रवर्ती, ९ वासुदेव आणि ९ प्रतिवासुदेव आहेत. त्यावरूनहि "मूळ लोकाभिमुख व सर्वव्यापक स्वरूपांत जो आस्तिक्यवाद दिसून येतो तो महावीराच्या पंथानें वासुदेव–कृष्णाच्या पूजेंतून उचलला असावा" असें विधान करणें चुकीचें ठरणार नाही [२६]

## वैदिक 'ऋत' आणि बौद्ध 'धम्म'

बौद्ध पंथासंबंधानेंहि असाच निष्कर्ष काढणें क्रमप्राप्त ठरतें 'बौद्ध-परंपरा ही कृष्णमय वातावरणांतून परिणित झाली आहे' असें मत जाणत्यांनीं मांडलें आहे [२७] धर्म किंवा धम्म या संबंधानें बुद्धाची विचार-सरणी वेदोपनिषदांतील ऋत, सत्य आणि धर्म यांच्या कल्पनेहून अधिक वेगळी नाहीं 'ऋत आणि सत्य ही एकाच सत्याची व्यावहारिक व वैचारिक रूपें आहेत' असे बृहदारण्यक आणि तैत्तिरीय या उपनिषदांत नमूद करण्यांत आलें आहे धम्मासंबंधी बुद्धाचें विवेचन याच प्रकारचें आहे. धम्म ही विश्वाची नियंत्रक शक्ति आहे धम्माला दोन बाजू असतात व्यक्तीच्या आचरणांतून अभिव्यक्त होणारी आणि समष्टींत आविष्कृत होणारी म्हणजे एकच धर्म माणसानें संपादावयाचा आदर्श आणि विश्वाच्या धारणेचें सूत्र या द्विविध रूपांत अस्तित्वांत असतो नैतिक आचरणानें हृदय परिशुद्ध करून आपली सारी शक्ति सदसद्विवेक बुद्धीवर केंद्रित केल्यानंतर हृदयांतील दैवी शक्ति जागृत होते आत्मानंदाच्या या अनुभवानें आपण ब्रह्मीभूत बनतो अशी बुद्धाची शिकवण आहे.[२८] गीतेतील स्थितप्रज्ञ, भागवतांतील आदर्श भक्त आणि योगवासिष्ठांतील जीवन्मुक्त यांपेक्षा बुद्धानें सांगितलेला ब्रह्मीभूत निराळा नाहीं

धम्माला बौद्धपंथांत महत्त्वाचें स्थान आहे. वैदिक ऋताचा अर्थ बौद्ध

'धम्मा'त पहावयास सापडतो विश्वाच्या राहटीस 'धम्मचक्र' हे नाव बौद्ध-वाङ्मयात दिले आहे 'मिलिंदप्रश्नात' धम्म हाच सद्‌गुणाचा साकार ईश्वर असल्याचें नमूद करण्यात आलें आहे ब्रह्ममार्गास धम्ममार्ग असेंहि म्हणतात ब्रह्मीभूत हा आदर्श पुरुष बौद्धानी मानला असून नैतिक आच-रणाच्या योगानें हा आदर्श प्राप्त होतो असा बौद्धाचा सिद्धात आहे बुद्धाचा भर ज्ञानापेक्षा आचारावर अधिक होता म्हणून तत्त्वचर्चेपेक्षा आचारधर्माचें विवरण बौद्ध वाङ्मयात अधिक आढळते [२९]

महायानपथ तर भागवतधर्माच्या अधिकच जवळ आला आहे या पथाचा अभ्यास केला असताना 'गीतेपेक्षा त्यात निराळे असें काहीच नाही' असेच कोणाचेहि मत बनते [३०] या पथाची स्थापना करण्याची स्फूर्ति नागार्जुनास ज्ञानी कृष्णापासून झाली होती अशी साप्रदायिक कथा आहे [३१] धम्मपद, बुद्धचरित्, सद्धर्मपुण्डरीक या बौद्ध ग्रथाचें भगवद्-गीतेशी असलेले विलक्षण साम्य या साप्रदायिक समजूतीस दृढ करते गीतेच्या चौथ्या अध्यायातील ७ व ८ हे श्लोक सद्धर्मपुण्डरीकात (१५–७–९) अक्षरश आले आहेत त्याचप्रमाणे अश्वघोषाच्या बुद्धचरितातहि गीतेतील ४–१४ व १८, ८–५ ते ७, ९–१९ हे श्लोक थोड्याफार फर-कानें आले आहेत [३२] विचाराचें व परपरेचे हे साम्य बौद्धपथाचें भागवत-धर्माशीं असलेले निकटवर्तित्वच सूचित करतें

गीता ते भागवत या सहस्त्रकात झालेली वैचारिक उत्क्राति म्हणजे भागवतधर्माच्याच विशिष्ट अंगास प्राधान्य देऊन झालेला विचारविकास होय हे वरील विवेचनावरून स्पष्ट होईल वैदिक आणि अवैदिक या दोन्ही सप्रदायातील विचाराचा मागोवा घेतला तरी हेंच सत्य प्रत्ययास येतें अवैदिक गणलेल्या पथाना भागवतधर्मातून घेतलेल्या वैचारिक ऋणाची जाणीव होती हे या पथाच्या परपरेच्या अभ्यासानतर लक्षात येण्यास वेळ लागत नाही त्याच प्रमाणें भागवतधर्माच्याच आचारप्रधान विशिष्ट अगाचा विस्तार अवैदिक पथानें केला आहे याची जाणीवहि भागवत-धर्मीयाना होती असें दिसते. वैदिक परपरेनें आपल्या परपरेबाहेरचे म्हणून गणलेले जैन व बौद्ध या पथाचे प्रवर्तक भागवतपुराणात विष्णूच्या अवताराचे स्थानीं सुप्रतिष्ठित झाले याचे मुळाशी हीच जाणीव आहे हे उघड आहे

भागवतधर्मातील विशिष्ट अंग म्हणजे समग्र भागवतधर्म नव्हे विश्वविकासास कारणीभूत होणारी ऋतप्रेरणा एकांगी नाहीं. मानवाच्या प्रगतीस आवश्यक असलेल्या सर्वच आचारविचाराचा अंतर्भाव ऋतप्रेरणेत होतो म्हणूनच ऋताधिष्ठित वेदोक्तधर्म केवळ यज्ञयागप्रधान बनल्याने धर्मतत्त्वाचा झालेला संकोच आत्मचिंतनावर भर देऊन दूर करण्याचा प्रयत्न उपनिषत्कारांनी केला मुखानें केवळ वेदघोष करून आत्मविकास होत नसून 'आत्मा वा रे श्रोतव्य मन्तव्य निदिध्यासितव्य' — श्रवण, मनन आणि निदिध्यास यांच्या योगानें खरें ज्ञान व आत्मप्राप्ती होते असें उपनिषद्विद्येचे प्रणेते सांगू लागले आत्मचिंतनास उपासनेची जोडहि उपनिषत्कारांनी दिली कालांतराने उपनिषद्विद्या देखील केवळ ज्ञानप्रधान व संन्यासप्रवण बनली ज्ञानास महत्त्व असलें तरी समाजधारणेस कर्मांचीहि आवश्यकता असल्यामुळें निष्काम कर्मयोग आणि ज्ञान यांचा उपदेश गीतेनें केला हे योग सर्वांना साध्य व्हावेत यासाठी भक्तियोगाचाहि पुरस्कार गीतेनें केला आदर्श ज्ञानी, कर्मयोगी आणि भक्त यांच्या लक्षणांत अहिंसेस महत्त्वाचें स्थान गीतेने दिलें जैन-बौद्धांनी भागवतधर्मातील एकाच अंगास — अहिंसेस — आपल्या पंथांत महत्त्व दिले या मतांच्या उदयानंतर भारतात इतरहि विचारांचा पुरस्कार करणाऱ्या तत्त्वप्रणाली पंथ, उपपंथ आणि संप्रदाय यांच्या स्वरूपात अस्तित्वात आल्या विष्णूच्या उपासकांतहि दोन उपपंथ बुद्धोत्तर काळात आढळतात नारायणीय धर्मातील व्यूहसिद्धांतास प्रमाण मानून तंत्रमार्गाचा अवलंब करणारा कर्मठ पांचरात्रिकांचा आणि संन्यासास महत्त्व देणारा आजीविकांचा पंथ या पंथांपैकी आजीविकांचा उल्लेख जैन व बौद्ध वाङ्मयात आढळतो वैखानस धर्मसूत्रातील उल्लेखावरून बुद्धपूर्वकालातहि संन्यासप्रधान आजीविकांचा पंथ अस्तित्वात होता असें अनुमान करता येतें.[३३] पांचरात्रिकांच्या मार्गातील व्यूहनिष्ठा अद्वैतास बाधक असल्याकारणानें अद्वैतवादी तत्त्वज्ञानानें तीस प्रमाण मानलें नाही

जैन आणि बौद्ध या मतांच्या प्रसारानंतर वैदिकधर्माच्या पुनरुज्जीवनाचें आंदोलन खिस्तपूर्व तिसऱ्या-चौथ्या शतकापासून ते खिस्तोत्तर चौथ्या शतकापर्यंत चालू होतें पुराणांची निर्मिती या काळांत झाली. पुराणांनीं

धर्मास कालानुरूप सुलभ स्वरूप देण्याचा प्रयत्न केला अवतारकल्पना, अवतारपूजा, मूर्तिपूजा आणि विविध देवताची उपासना याना या काळात बरेंच महत्त्व आले वैदिक धर्मास सुव्यवस्थित करण्यासाठीं झालेल्या या आदोलनात पुराणाचे प्रामाण्य वाढलें व धर्मव्यवस्थेंत श्रुति आणि उत्तर कालातील स्मृतीइतकेंच मानाचें स्थान पुराणाना मिळालें परमेश्वरप्राप्तीस आवश्यक असलेल्या ज्ञानास आवश्यक असलेली स्थिर चित्तवृत्ति सपादन करण्याचा मार्ग उपदेशिणारे योगशास्त्र या काळात सकलित करण्यात आलें ज्ञान आणि कर्म याचा समन्वय सुचविणारे योगवासिष्ठाचे तत्त्वज्ञानहि या काळाच्या आसपास उदयास आलें

या सहस्त्रकात झालेली ही वैचारिक उत्क्राति एकागी स्वरूपाची होती या एकागी विचारसरणींत समग्र ऋतप्रेरणेचे दर्शन घडणें शक्यच नव्हतें म्हणूनच उदयास आलेल्या सर्व विचाराचें योग्य तें महत्त्व लक्षात घेऊन ऋतप्रेरणेशी सवादी असलेला भागवतधर्म भागवतपुराणानें साागितला धर्म लोकाभिमुख आणि सुलभ करण्याचे प्रयत्न पुराणानी केले असले तरी कित्येक पुराणातून दैवतविषयक असहिष्णु वृत्तीचा दर्प जाणवतो ही वृत्ति ऋतप्रेरणेशी विसगत आहे कोणतेहि दैवत आणि त्याची मूर्ति ही प्रतीकात्मक असून अतिम परब्रह्म निराकार असल्यामुळे प्रतीक कोणतेहि घेतलें तरी त्याच्या योगाने परब्रह्माचीच उपासना घडते या गोष्टीवर सर्वच पुराणानी सारखा भर दिला आहे असे नाही उपासनेच्या एकागीं स्वरूपाप्रमाणेंच ज्ञान, भक्ति आणि कर्म याच्या समन्वयावर सर्वच पुराणानी भर दिला आहे असे नाहीं भागवतधर्मात ही समन्वयवादी भूमिका अत्यंत महत्त्वाची आहे या धर्माची प्रगमनशीलता ऋतप्रेरणेस अनुरूप अशा समन्वयातून परिणत झाली आहे या सहस्त्रकातील वैचारिक उत्क्रातींत असलेली ही उणीव भागवत पुराणानें दूर केली. देवताविषयक अभिनिवेशास सर्व देवता नारायणात्मक आहेत या भूमिकेनें भागवतानें उत्तर दिलें ज्ञान, कर्म आणि भक्ति किंवा यज्ञ–याग व उपासना सर्वच नारायणात्मक आहे, विश्वहि वासुदेवमय असल्याने त्या वासुदेवाच्या प्राप्तीसाठीं भक्तिपूर्वक कर्म करावें व भक्तिपूर्वक ज्ञान सपादन करावे आणि तेणें करून प्रपच व परमार्थ आत्मोद्धार व विश्वोद्धार याची एकरूपता सपादन करावी असा

मूळ ऋतप्रेरणेशीं सवादी असलेला भागवतधर्म भागवत पुराणाने सागितला म्हणून महाभारतोत्तर कालातील भागवतधर्म समजून घेण्याच्या दृष्टीनें भागवत पुराणाचा अभ्यास आवश्यक ठरतो

## ६. टीपा

१ *History and Culture of Indian People*, Vol III, P 296-297

२ Winternitz, *History of Indian Literature*, Vol. I, P 517 and 526

Dr Radhakrishnan, *Indian Philosophy*, Vol I, P 524

*History and Culture of Indian People* Vol. III, P, 294

काळे, **पुराणनिरीक्षण**, पृ ३६

३ सर्गश्च प्रतिसर्गश्च वशो मन्वतराणिच ।
वशानुचरित चैव पुराण पचलक्षणम् ॥

कूर्मपुराण, १-१-२

४ *History and culture of Indian People*, Vol III, P. 4-15

५ **भागवत**, ११-१-३ या श्लोकात २२, ११-४-१७ या श्लोकात ४ व ११-४-१८ ते २२ या श्लोकात दहा अवताराची नावें आली आहेत

६ *History and Culture of Indian People* Vol III, P 416

७ **कित्ता**, पृ ४१७

८ **भागवत**, ११-५-२९ ते ४२

९ पृ ७६ ते ८०

१०. Dasgupta, *History of Indian Philosophy*, Vol III, P. 19-20.

११ पृ ६

१२ भिन्न भिन्न चारी व्यक्ति चहूरूपी एक मूर्ति
ऐसे जाणोनि पूजिजे भक्ति व्यूहस्थिति या नाव – **ए. भा.** ६–११८

१३ गुणाजी ना वा 'पथराज', **'पुरुषार्थ'** मासिक, डिसेंबर १९५४

१४ **भागवत**, १–६–२० व १–५–१३

१५ कोल्हटकर, **भारतीय मानसशास्त्र**, प्रस्तावना, पृ १२४

१६ **योगसूत्रम्**, (चोखबासिरीज) १–२३, २–१, २–३२ या सूत्रावरील भोजवृत्ति

१७ **योगसूत्रम्**, पृ २८

१८ ऋतामबधीचे विवेचन तिसऱ्या प्रकरणात आलेच आहे ऋतभरा प्रज्ञेनें योगी प्रकृष्ट योग प्राप्त करतो असें भोजाचे स्पष्टीकरण आहे नागोजीभट्ट आपल्या भाष्यात लिहितात, 'ऋत सत्य कूटस्थनित्य पुरुष बिभर्ति तादृशी तत्सज्ञा प्रज्ञा साक्षात्कारस्तत्र प्रसादे मति भवतीत्यर्थ ' **योगसूत्रम्**, (चोखबा सिरीज,) पृ ५४–५५

१९ **भागवत**, १–७–४, १–९–३०, १–९–४३ या ठिकाणी योगशास्त्राच्या परिभाषेचा अवलब केला आहे

२० आम्ही योगजात अभ्यासावें तेणें याचि अनुभवा यावे
शास्त्रजात आलोडावे परि सिद्धात तो हाचि – **ज्ञानेश्वरी**, ११–५९५

२१ **Dasgupta**, *History of Indian Philosophy*, **Vol II, P 231**

२२ मूढै प्रकल्पित दैव तत्परास्ते क्षय गता
प्राज्ञैस्तु पुरुषार्थेन पदमुत्तमता गता

२३ वसिष्ठ ग्रथ शतसहस्त्री त्यातील श्लोक सत्त्याहत्तरी
एकाजनार्दन त्यावरी ज्ञानार्थकारी टीका करी
– **भावार्थरामायण**, बालकाड ११–३०९

२४ रा द. रानडे, **ज्ञानेश्वरवचनामृत**, प्रस्तावना, पृ २

२५ *History and Culture of Indian People*, **Vol III, P. 360**

२६ **Hemchandra Rai Chaudhari**, *Materials for the Study of early Vaishnava seet*, **Introduction**

२७ Macnicol, *Indian Theism*, P 65
लो टिळक, **गीतारहस्य**, पृ ५६७ ते ५७०

२८ Dr Radhakrishnan, (*Ed*) *Dhammapad*, P 41-42

२९ Dr Radhakrishnan, *Indian Philosophy*, Vol I, P 682, 694

३० **कित्ता**, पृ ५९९

३१ लो टिळक, **गीतारहस्य**, पृ ५७८

३२ *Awakening of faith*, (Suzuk's translation) Ps 94, 145, 60, 61 respectively

३३ P C Divanji, 'Origin of Bhagwat and Jain Religions' *Anals of Bhandarkar Oriental Institute*, silverjubilee vol P 104
कालकाचार्य या जैन पंडिताचा आधार घेऊन उत्पलाने आजाविक या शब्दाचा अर्थ 'केशवमार्गदीक्षिता केशवभक्ता भागवता इत्यर्थ ' असा दिला आहे
Dr D R Bhandarkar, 'A note on Ajivikas *Indian Antiquary*, Dec 1912 P 296

---

# ७. भागवत पुराणोक्त धर्म

व्यासांची समाधिभाषा–संस्कृतवाङ्मयाचें अमृतफल–वेदांताचें सार–भागवताची कृष्णोपासना–गृहस्थाश्रमाचें महत्त्व–'सकळांसी येथें आहे अधिकार'–धर्मसंस्थापनेचे नर तेचि ईश्वरी अवतार–एकादशाचें महत्त्व–साररूप भागवतधर्म–युगधर्माचें वैशिष्ट्य–निष्काम कर्मयोग–द्वा सुपर्णा–संताची महती–त्रिगुणात्मक प्रपंच–भक्ति परमश्रेय–भक्ति–श्रेष्ठ साधन–साररूप भागवतधर्म–भागवतोक्त धर्माचे विशेष–

पुराण वाङ्मयांत भागवताचें स्थान अद्वितीय आहे अत्यंत लोकप्रिय असलेल्या पुराणांत भागवताची गणना होते एवढी लोकप्रियता कोणत्याच पुराणाच्या वांट्यास आली नाहीं श्रीमद्‌भगवद्‌गीतेनंतर एवढा सर्वमान्य ग्रंथ संस्कृत भाषेत झाला नाहीं रसाळ काव्य, मनोहर कथा आणि उदात्त तत्त्वज्ञान या सर्वच दृष्टीने इ स च्या तिसऱ्या शतकाच्या सुमारास रचलेल्या (या पुराणाच्या कालासंबंधी पहिल्या प्रकरणांत पृ ९ व १० चर्चा करण्यांत आली आहे ) या ग्रंथाचें स्थान पुराण वाङ्मयांत अनन्य-साधारण असेंच आहे

## व्यासांची 'समाधिभाषा'

आज कित्येक शतकें भारतीय जीवनावर प्रभाव गाजविणाऱ्या या पुराणांत काव्य आहे, तत्त्वज्ञान आहे आणि कथाप्रिय मनास रंजविणाऱ्या कथाहि आहेत गोपालकृष्णाच्या बाललीला, भगवान् कृष्णाच्या पराक्रम-कथा आणि योगेश्वर कृष्णानें केलेला तत्त्वोपदेश या सर्वांचा अंतर्भाव या पुराणांत झाला आहे. निष्काम कर्मयोग आणि भक्ति व अद्वैत तत्त्वज्ञान आणि भक्ति यांची सांगड भागवतानें घातली आहे भागवतानें कर्म हीन

लेखले नाहीं, प्रपच वर्ज्य मानला नाही, आणि नरदेहहि निंद्य गणला नाहीं ज्ञानाप्रमाणेंच भक्तीला, भक्तीप्रमाणेंच कर्माला प्रपचाइतकेंच परमार्थाला मानाचें स्थान देऊन चारित्र्यसपन्न, निष्काम कर्मयोगी, ज्ञानी भक्ताचा आदर्श या पुराणाने जनतेपुढे ठेवला आहे या पुराणानें अवैदिकास 'पावन' केलें. अर्हत्–गौतमास विष्णुस्वरूपी मानले, शकहूणास भागवतात स्थान दिलें आणि शूद्र–चाडालाना भक्तीचे अधिकारी बनविलें गभीर तत्त्वज्ञान सागूनहि तत्त्वज्ञाच्या रसहीन वृत्तीचा स्पर्श भागवतास झाला नाहीं रसाळ काव्य आणि रजक कथा देऊनहि मूळ तत्त्वज्ञानावरील भागवतकाराची दृष्टि ढळली नाही म्हणूनच "व्यासाची समाधि भाषा" असें वल्लभाचार्यांनीं भागवताचें वर्णन केलें आहे [1]

## संस्कृतवाङ्मयातील अमृत-फल

पाश्चात्यानीहि काव्य या दृष्टीने भागवताची प्रशसा केली आहे 'भाषाशैलि आणि काव्य–रचना या दृष्टीनेहि या ग्रथाची गुणवत्तता फार मोठी आहे' असें एका जर्मन पडिताचें मत आहे [2] दुसरा एक पडित म्हणतो, हा ग्रथ फार मोलाचा आहे पूर्वीच्या ग्रथकारानीं सागितलेल्या भक्तीपेक्षा नव्या प्रकारची भक्ति भागवतात आली आहे . काहीं विचार तर अध्यात्म आणि भक्ति याच्या क्षेत्रात अत्यत उच्च स्थान मिळवितील एवढ्या तोलाचे आहेत. भागवतातील अशा विचाराचा अभ्यास केला असताना जिवत धार्मिक अनुभवाचा तो आविष्कार आहे हे प्रत्ययास आल्यावाचून रहात नाही '[3]

युरोपीय भाषात सस्कृत पुराणाच्या अनुवादास प्रारभ भागवतपुराणाच्या भाषातरानें झाला आहे इ स १८४० सालीं भागवताचें भाषांतर पॅरिसहून प्रसिद्ध झालें [4] सोळाव्या शतकात फारसी भाषेंत या पुराणाचा अनुवाद झाला भारतातील अर्वाचीन भाषाच्या उदयापासून भागवतानें आपला प्रभाव त्या त्या भाषांवर गाजविला आहे भागवतातील दशमस्कधावर आधारलेल्या कृष्णलीलाना अर्वाचीन भारतीय भाषाच्या उदयापासूनच अनेक कवींनीं आपापल्या भाषेंत काव्यरचना करून अमर केलें आहे महाराष्ट्रानें भागवताच्या दशमस्कधापेक्षा एकादशाला अधिक महत्त्व दिलें आहे

हे वैशिष्टय मात्र अन्य भारतीय भाषाच्या तौलनिक अभ्यासानतर लक्षात भरतें

## वेदांताचें सार

भागवत पुराणातील भागवतधर्मांचा अभ्यास करण्यापूर्वी स्वत भागवतकारानीं आपल्या कृतीवर जो अभिप्राय दिला आहे तो लक्षात घेण्या सारखा आहे

निगमकल्पतरोर्गालित फल शुकमुखादमृद्रवसयुतम् ।
पिबत भागवत रसमालय मुहुरहो रसिका भुवि भावुका ॥

'वेदरूप कल्पवृक्षाचें हे पक्व फल आहे शुकमुखाचा (शुकाचार्य) सपर्क झाल्याने आनदमय अमृतानें ते परिपूर्ण झाले आहे रसिकानी वारवार आस्वाद घ्यावा अशा योग्यतेचा मूर्तिमत रस म्हणजे हे भागवत पुराण.' (भागवत, १-१-३)

सर्ववेदातसार हि श्रीमद्भागवतमिष्यते
तद्रसामृततृप्तस्य नान्यत्रस्याद्रति क्वचित्

'भागवत हे सर्व वेदाताचे सार आहे त्याचें रसामृत प्राशन करून तृप्त झालेल्याना इतरत्र कोठेंच 'रस' वाटणार नाहीं " (भागवत, १२-१३-१५)

या भागवतामध्यें मत्सररहित साधूचा निष्कामधर्म सागितला आहे यापासून तापत्रयाचें उन्मूलन करणाऱ्या सद्वस्तूचे ज्ञान होते इतर साधनानी सद्वस्तूचें हृदयांच्या योगें आकलन होऊ शकत नाही परंतु भागवताचे श्रावण करणाऱ्या सत्पुरुषाच्या हृदयात मात्र परमात्मा अविलबें करून बादिवान् होतो' (भागवत १-१-२)

वेदाताचें साररूप असलेल्या या पुराणाचा पहिलाच श्लोक तत्त्वज्ञानविषयक भूमिकेवर प्रकाश टाकणारा आहे

जन्माद्यस्य यतोन्वयादि तरतश्चार्थेष्वभिज्ञ स्वराट्
तेने ब्रह्म हृदा य आदिकवये मुह्यन्ति यत्सूरय ।
तेजोवारिमृदा यथा विनिमयो यत्र तिसर्गो मृषा
धाम्ना स्वेन सदा निरस्तकुहक सत्य पर धीमहि ॥ १-१-१॥

तेज, जल, मृत्तिका ही रूपांतरें ज्याप्रमाणें खोटी म्हणता येत नाहीत त्याच प्रमाणें उत्पत्ति, स्थिति आणि लय या तीन अवस्थानी प्रकट होणारे त्याचे स्वरूपहि असत्य मानता येत नाही जो आपल्या प्रकाशाने भ्रमाचा निरास करतो, ज्याच्यापासून उत्पत्ति, स्थिति लयादि अवस्था दृग्गोचर होतात, या जगाच्या कार्यामध्ये आणि इतरत्रहि ज्याची सत्ता दिसून येते, जो ज्ञानसपन्न स्वयंप्रकाश आहे, ज्ञानी देखील ज्याला भुलतात ते ब्रह्म, ब्रह्मदेवाला ज्यानें हृदयाने शिकविले अशा सत्यस्वरूपी परमेश्वराचे आम्ही ध्यान करतों "

## भागवताची ऋतोपासना

ब्रह्मसूत्रातील तीन सूत्राची छाया या पहिल्या श्लोकावर स्पष्टच दिसते [५] त्यामुळे भागवत हे वेदातसार असल्याची भागवतकाराची ग्वाही यथार्थ वाटते याहि पेक्षा शेवटच्या ओळींतील "सत्य पर धीमहि" ही पदें महत्त्वाची आहेत भागवतधर्माची पूर्वपीठिका आणि प्रेरणा याचा शोध घेत असताना ऋततत्त्वाचें दुसऱ्या व तिसऱ्या प्रकरणात जें विवेचन करण्यात आलें आहे त्याच्या सदर्भात 'ऋताचेंच' स्वरूप असलेल्या 'सत्यास'[६] करण्यात आलेलें आदिम श्लोकातील वदन लक्षात घेतले म्हणजे या धर्माची ऋतप्रेरणा भागवतकारासहि अभिप्रेत आहे हे ध्यानात येईल

अवस्थात्रयातून जाणारें पाचभौतिक विश्व अवभासात्मक नसून तें सत्तत्त्वाइतकेच सत्य आहे सत्याची 'सत्ता' जगाच्या कार्यातहि आहे अशा स्वरूपाच्या सत्यास भागवतकार वदन करतात भागवतकाराच्या मतें विश्व हे अवभासात्मक नसून मूल सद्वस्तूचेच तें स्वरूप आहे किंवा ज्ञानेश्वर म्हणतात त्याप्रमाणें ती "वस्तुप्रभा" आहे विश्वाचें नियमन आणि सचालन करणाऱ्या सत्याची म्हणजेच ऋताची आराधना करणें हे भागवतोक्त धर्माचें उद्दिष्ट होय निर्मत्सर सताचा धर्म या ग्रथात सांगितला आहे असें भागवतकार म्हणतात तें याच उद्देशानें.

वेदोक्त ऋताच्या सदर्भात भागवतातील पहिल्या तीनच श्लोकाचा अर्थ लावला तरी ऋताराधन हे भागवतधर्माचें उद्दिष्ट आहे हे सहज लक्षात येतें भागवताच्या एकादशस्कधात तत्त्वचर्चा विस्तारानें आली असली

तरी इतर स्कधातूनहि प्रसगोपात भागवतोत्तम आणि भागवतधर्म याचीं जी लक्षणे सागण्यात आली आहेत त्यावरूनहि या पुराणाच्या ऋतनिष्ठेचे स्वरूप लक्षात येतें सर्वभूतमात्राचें ठिकाणीं भगवद्भाव ठेवावा हे मुख्य-सूत्र सागताना परतापहरण हे भगवद्भक्ताचें उद्दिष्ट असावे या गोष्टीवर भागवतकारानी विशेष भर दिला आहे 'झाडाच्या मुळाना घातलेले पाणी शाखोपशाखाना पोंचतें त्याप्रमाणें भूतमात्राच्या तापहरणानें परमेश्वराचें पूजन घडते'[७] असे भागवतकार सागतात परमेश्वराविषयीचें प्रेम आणि भूतमात्राविषयीचे प्रेम परस्परपूरकच नसून अभिन्न आहेत असा भागवताचा निष्कर्ष आहे प्रह्लादाने दैत्यपुत्रास केलेल्या उपदेशातहि 'तस्मात्सर्वेषु भूतेषु दया कुरुत सौहृदम्' (भागवत, ७-६-२४) असे भागवतधर्माचें तात्पर्य सागण्यात आलें आहे भूतमात्रावरील प्रेमावर असलेला कटाक्ष समाजविन्मुख पण परमेश्वरनिष्ठ असलेला भक्त अपूर्ण ठरतो हेच दर्शवितो

## गृहस्थाश्रमाचें महत्त्व

हे मध्यवर्ती सूत्र लक्षात घेतले म्हणजे कर्मसन्यास या धर्मात विहित नाही हे निराळे सागण्याची आवश्यकता नाही भागवतधर्मात उपदेशिलेली निवृत्ती ही साक्षात् कर्मापासून अथवा ससारापासून नसून ती फलाशा आणि वासना यापासून मिळवावयाची आहे कर्मापासून निवृत्त झालेला भक्त परतापहरणाचें वा इतर कोणतेच कार्य करण्यास असमर्थ ठरतो म्हणूनच भागवतात निष्काम कर्माचा उपदेश आग्रहानें करण्यात आला आहे ब्रह्मदेव सृष्ट्युत्पत्ती विषयी अनुत्सुक असताना स्वत भगवतानीं त्यास सृष्टिकर्माचा उद्योग करण्याचा उपदेश केला आहे असे वर्णन दुसऱ्या स्कंधात आले आहे[८] भगवताचा उपदेश ब्रह्मदेवानें एका अटीवर मानला आहे' कर्माचें बंधन जेणेंकरून लागणार नाही असें रहस्य भगवतानी सागावें हे रहस्य सागण्यासाठीं द्वितीय स्कधातील चतुःश्लोकी भागवताचा उपदेश करण्यात आला आहे परमेश्वरार्पणपूर्वक कर्म केलें म्हणजे कर्माचे बधन लागत नाही असा चतु श्लोकी भागवतातील उपदेशाचा निष्कर्ष आहे

ब्रह्मदेवानें सनत्कुमारास प्रजोत्पत्ति करण्याचा आग्रह केला. त्यानीं तो

मानला नाही त्यामुळें ब्रह्मदेव रागावला स्वायंभूव मनूनें मात्र ब्रह्मदेवाच्या आज्ञेचें पालन केले त्यामुळे ब्रह्मदेव त्याचेवर संतुष्ट झाला[९] ही कथा तिसऱ्या व चौथ्या स्कंधात आली आहे पाचव्या स्कंधातहि प्रियव्रताच्या कथेत ब्रह्मदेवास प्रपंचनिर्मिती करण्याचा उपदेश भगवतानी कसा केला याचें वर्णन आलें आहे 'जितेंद्रियाना संसाराची भीति का वाटावी? विषयाचा उपभोग घे संगरहित होऊन आत्मस्वरूपीं रममाण हो' असें या ठिकाणी आलेल्या उपदेशाचे तात्पर्य आहे[१०]

भागवतोक्त धर्मात गृहस्थाश्रम वर्ज्य नाही हे वरील काहीं उदाहरणा-वरून स्पष्ट होते आदर्श गृहस्थाश्रम नाथाच्या वाङ्मयात आणि जीवनातहि साकारलेला होता म्हणूनहि गृहस्थाश्रम पावन मानणाऱ्या भागवताकडे त्याचें लक्ष वेधले असावे नाथाच्या वाङ्मयसेवेस प्रारभ झाला तो चतु-श्लोकी भागवतावरील प्राकृत टीकेनें आणि त्याचे संपूर्ण व्यक्तिमत्व साकारलें तें एकादशावरील टीकेत एका आणि एकादश याचे घटित-गोत्र एक असल्याचा उल्लेख एकनाथी भागवतात (१–११०) आला आहे तो समर्पक अ ' असेंच म्हणावें लागेल

## 'सकाळांसी येथ आहे अधिकार'

गृहस्थाश्रमाप्रमाणेंच नरदेहहि भागवताने पावन गणला आहे[११] ज्या साधनानें नराचा नारायण होतो तें निंद्य मानणे तर्कविसंगत ठरतें वर्णाश्रमधर्मासंबधानेंहि भागवतकाराची दृष्टि संकुचित किंवा सांप्रदायिक नसून प्रगमनशील आहे. जन्मसिद्ध जातीपेक्षा गुणाधिष्ठित वर्णव्यवस्था भागवतात प्रमाण मानली आहे. 'मूळ वर्ण एकच असून चार वर्ण नंतर अस्तित्वात आले' 'कर्मामुळेच शूद्रत्व येतें' 'जन्म आणि लक्षण या दोहोंच्या योगाने वर्ण सिद्ध होत असले तरी लक्षणावरून वर्ण जाणावा' असा या संबंधीचा भागवताचा निष्कर्ष आहे[१२]

वर्णव्यवस्था ही गुणकर्मानुसारी असली तरी भक्तीच्या क्षेत्रांत मात्र 'जाति अप्रमाण' आहेत या क्षेत्रात सर्वांनाच सारखा अधिकार आहे. वर्णबाह्य गणलेले किरात, हूण, आंध्र, पुलिंद, पुलकस, अभीर, कंक, यवन

याना देखील भक्तीच्या सुलभ साधनाने मोक्ष संपादन करता येतो अशी ग्वाही भागवतानें दिली आहे [१३]

आश्रमधर्माच्या निरूपणात भागवतकारानीं दोन भेद केले आहेत सर्व आश्रमीयास सामान्य असलेला धर्म आणि विशिष्ट आश्रमास विहित असलेला आचार भागवतधर्माच्या निरूपणात सामान्यधर्माचें विवरण आलें आहे गीतेने दिलेल्या ज्ञानी, भक्त, योगी याच्या लक्षणाचा अतर्भाव परम भागवताच्या लक्षणात भागवताने केला आहे वर्णाश्रम धर्माप्रमाणें प्राप्त झालेलें कोणतेंहि कर्म हीन न लेखता तें परमेश्वरार्पणपूर्वक व निरहकारी वृत्तीने समाजकल्याणार्थ करावें कोणत्याहि यातिकुळात जन्म झालेला असला तरी निष्काम कर्मयोग आणि भक्ति याच्या साधनानें व्यक्तीस आत्मोद्धार व विश्वोद्धार करता येतो हे भगवतोक्त भागवतधर्माचे सार आहे [१४] उच्च ध्येय आणि उदात्त आकाक्षा ही केवळ जाणत्याचीच मिरास नसून प्रत्येक व्यक्तीस ध्येयसाधना करण्याचा अधिकार आहे हा विश्वास जनसामान्याच्या अत करणात भागवताने निर्माण केला धर्मपाडित्यापेक्षा धर्ममय जीवन जगणाराना या धर्माने अधिक महत्त्व दिलें म्हणूनच धर्मसस्थापना करणाऱ्या सर्वच युगपुरुषाची गणना भागवताने परमेश्वराच्या अवतारात केली आहे

## धर्मसंस्थापनेचे नर : तेहि ईश्वरी अवतार

गीतेच्या चौथ्या अध्यायात (श्लोक ७–८) आलेली अवतार–कल्पना भागवतानें अधिक व्यापक केली आहे श्रीकृष्णाच्या अवतारकार्याचें संकीर्तन करणें हे भागवताचे उद्दिष्ट असले तरी इतर युगपुरुषाची अवहेलना न करता जैन व बौद्ध या दोन्ही मताच्या प्रवर्तकाना भागवतानें परमेश्वराच्या अवतारात स्थान दिले आहे [१५] धर्मावताराचें कथन करताना मात्र मूळ ऋतप्रेरणेकडे दुर्लक्ष झाले नाहीं कृष्णाची महती सागताना कुरुस्त्रिया म्हणतात, 'जेव्हा अधर्मी राजे जगतात अशा वेळीं प्रत्येक युगात सृष्टीचें कार्य सुरळीत चालावें म्हणून कृष्ण अनेक रूपे धारण करून भग, सत्य, ऋत, दया, यश याची धारणा करतो.'[१६]

धर्माच्या रक्षणासाठीं अवतार घेणाऱ्या परमेश्वराप्रमाणें धर्मपरपरा

अखडित ठेवणाऱ्या ऋषीचेहि महत्त्व भागवतानें वर्णिलें आहे

> चतुर्युगान्ते कालेन ग्रस्तान् श्रुतिगणान् यथा
> तपसा ऋषयोऽपश्यन्तो धर्म सनातन —भागवत, ८–१४–४

'चार युगानतर श्रुति लोप पावतात ऋषि त्याना शोधून काढतात अशा रीतीने धर्मपरपरा अखडित राहते' असा उपरोक्त श्लोकाचा भावार्थ आहे कालचक्रात धर्माचें मूलस्वरूप मलिन होतें त्यास उजळा देणारे सत्पुरुष सत्यधर्म जागवीत असतात धर्म जागृत राहण्यासाठी अशा प्रयत्नाची आवश्यकता असतेहि उपरोक्त अवतार–कल्पनेंत गतिमान् धर्म अभिप्रेत आहे गतिमानता हे विष्णूच्या व्यक्तिमत्त्वाचें सार आहे तसाच ऋत या शब्दाच्या तो मूळ अर्थहि आहे [१७] म्हणूनच ऋताधिष्ठित भागवतधर्म हा गतिमान् धर्म ठरतो धर्मात हे वैशिष्ट्य निर्माण करणारे अथवा त्यास उजळा देणारे सर्व युगपुरुष भागवतानें परमेश्वराचे अवतार मानले आहेत त्याचें कारण भागवतधर्माची ऋतनिष्ठा हेच देता येईल.

भागवताच्या पहिल्या नऊ स्कधात आलेल्या विषयाचें सक्षेपानें दिग्दर्शन वर करण्यात आले आहे दशमस्कध पूर्वार्ध आणि उत्तरार्ध कृष्णचारित्रपर आहे. कृष्णाच्या बालक्रीडा आणि गोपींसह भगवतानीं केलेली क्रीडा याचें रसभरित वर्णन या स्कधात आलें आहे कृष्णभक्तीची परमावधि या स्कधात आढळते अनेक सत आणि कवि याना या स्कधानें मोहित केले आहे आधुनिक भारतीय भाषातील विख्यात कवींना याच स्कधातील विविध कथानीं स्फूर्ति दिली आहे असख्य भारतीय काव्याचें जन्मस्थान या स्कंधात आढळतें नवविधा भक्तीचे अक्षय्य निधान या दृष्टीने या स्कधाचें महत्त्व विशेष आहे.

## एकादशाचें महत्त्व

मराठी भाषेंत कृष्णाच्या बालक्रीडावर आधारलेलीं काव्यें बरीच आहेत रुक्मिणी–स्वयवराची कथा देखील अनेक पडित कवींनीं रसाळ वाणीनें वर्णिली आहे मराठी सतकवींनी कृष्णाच्या बालक्रीडा आपल्या काव्यात वर्णिल्या असल्या तरी दशमातील कथाभाग एकादशातील तत्त्वज्ञानाच्या पार्श्वभूमीवर कथन करण्याकडे सताचा कटाक्ष अधिक आहे केवळ

रागात्मिका भक्तीचा पुरस्कार महाराष्ट्राने कधीच केला नाही. म्हणून इतर भारतीय भाषातील काव्यात दशमाच्या आधारानें रागात्मिका भक्ति वाढली तर एकादशाच्या आधारानें भक्तिसह तत्त्वज्ञानाचा विस्तार मराठी काव्यात झाला एकादशास मिळालेल्या या महत्त्वामुळेंच मराठी सताच्या काव्यात आगळे वैशिष्टय निर्माण झाले.

भागवताच्या बारा स्कधात एकादश स्कधाचें स्थानहि महत्त्वपूर्ण आहेच वेदवेदाताचें सार भागवत आणि भागवताचे सार एकादश स्कध अशी भागवतधर्मीयाची निष्ठा आहे आदि, मध्य आणि अतीं मोक्ष असें या स्कधाचें स्वरूप आहे भागवताचे विख्यात टीकाकार श्रीधरस्वामी यानीं एकादशावरील टीकेच्या प्रस्तावनेत हाच अभिप्राय व्यक्त केला आहे .

> 'श्रीमद्भागवताच्या एकादशस्कधातील ३१ अध्यायामध्यें जायतेयाच्या इतिहासाच्या रूपानें कोठे सक्षेपानें तर कोठें विस्तारानें मुक्तीचें वर्णन आलें आहे मुक्तीचें रूप वासुदेवास नारदानें सागितले नतर कृष्णाने उद्धवास निरनिराळया दृष्टाताच्या योगानें विस्ताराने विशद करून सागितलें आहे '[१८]

एकादशाची महती सागताना नाथानीहि पुढील उद्गार काढले आहेत

> मथोनि वेदशास्त्रार्थ व्यासे केले महाभारत
> त्या भारताचा मथितार्थ श्रीभागवत हरिलीला ॥
> त्या भागवताचा साराश तो हा जाण एकादश
> तेथे वक्ता हृषीकेश परब्रह्म सुरम बोधी ॥ – ए भा ३१–४८९–९०

## साररूप भागवतधर्म

एकादशाचें महत्त्व भागवतात विशेष असल्यामुळें व एकनाथानीं भागवतावर विस्तृत टीका लिहिलेली असल्यामुळे मूळें एकादशाचें स्वरूप विस्तारानें विशद करणें आवश्यक ठरतें पहिल्या पचाध्यायींत साररूपानें भागवतधर्माचें निरूपण आलें आहे श्रीकृष्ण पिता वसुदेवानें भागवतधर्म सागण्याची नारदास विनती केली 'पूर्वी जायतानी विदेहास भागवतधर्माचें जें स्वरूप सागितले तेंच तुला सागतो' अशी प्रस्तावना करून निमिराजाच्या यज्ञास गेलेल्या नवयोगेश्वराची कथा नारदानी सागितली आहे

'हा धर्म विश्वभावन (विश्वास कल्याणकारक) असून त्या धर्माच्या श्रवणानें, ध्यानाने देवद्रोही देखील पावन झाले आहेत' असा नारदाचा अभिप्राय आहे. (भागवत ११–२–११ व १२)

विदेहाच्या यज्ञासाठी आलेल्या नऊ योगेश्वराना भागवतधर्म सागण्याची विनति राजानें केली या योगेश्वराना राजानें पुढील नऊ प्रश्न विचारले

(१) भागवतधर्म म्हणजे काय ?
(२) भगवताचे भक्त कसे असतात ?
(३) मायेचें स्वरूप कोणते ?
(४) माया तरून जाण्याचा उपाय कोणता ?
(५) ब्रह्म म्हणजे काय ?
(६) कर्मांचे स्वरूप कोणतें ?
(७) अवतार म्हणजे काय ?
(८) वासनात्मक जीवाची गति कोणती ?
(९) युगधर्म कोणते ?

या नऊ प्रश्नाची उत्तरें अनुक्रमें कवि, हरि, अतरिक्ष, प्रबुद्ध, पिप्पलायन, अविर्होत्र, द्रुमिल, चमस आणि करभाजन या ऋषभपुत्रानी दिली आहेत एकादशाच्या दुसऱ्या अध्यायापासून पाचव्या अध्यायापर्यंत या नऊ प्रश्नाच्या उत्तरात साररूप भागवतधमाचें विवरण आलें आहे

**भागवतधर्म म्हणजे काय ?** अज्ञानी जीव मुक्त होऊन त्यास आत्मस्वरूपाची प्राप्ती व्हावी यासाठी भगवतानीं सागितलेले जे सुलभ उपाय त्यास भागवतधर्म म्हणतात या धर्माचे आचरण करणारा भक्त सर्व कर्में ईश्वरार्पण बुद्धीनें करीत असतो अखड ईशचिंतन, मनन आणि भजन करणाऱ्या भक्तास भक्ति, विरक्ति आणि भगवत्प्रबोध एकच वेळीं प्राप्त होतात असा भक्त परमशाती पावतो. मृत्युलोकी कोणतेंच भय त्याला नसते तो कधींच पतन पावत नाही. (११–२–३३ ते ४३)

**भागवत कसा असतो ?** गीतेच्या दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं अर्जुनानें केलेल्या प्रश्नास उत्तर देताना भगवतानीं स्थितप्रज्ञाचीं जीं लक्षणें सागितलीं आहेत तशींच लक्षणे थोडया फार फरकानें या प्रश्नाच्या उत्तरात

भागवतात आली आहेत सर्वभूते भगवत्स्वरूपी मानतो तो उत्तम भागवत परमेश्वरावर प्रेम करून भक्ताशी मैत्री ठेवणारा पण अभक्ताची उपेक्षा करणारा भक्त मध्यम प्रतीचा. मूर्तीतच परमेश्वर आहे असे मानून भूतमात्रावर प्रेम न करणारा भक्त अधम प्रतीचा भक्ताचे हे तीन प्रकार सांगितल्यानंतर भागवतोत्तमाचीं लक्षणें विस्तारानें देण्यात आली आहेत गीतेतील भक्ताच्या लक्षणाशी भागवतातील आदर्श भागवताच्या लक्षणाचे बरेंच साम्य आहे (गीता १२–१३ ते १९ व भागवत ११-२-४८ ते ४९)

भागवतोत्तम संसारात वावरत असतानाहि प्रापंचिक कर्मांचे वा वासनेचें बंधन त्याला बाधत नाही हरिस्मरणाच्या योगाने तो कर्मबंधातीत होतो जन्म, कर्म, वर्ण, आश्रम इत्यादिकाच्या योगे उत्पन्न होणारा अहंकार त्याला जडत नाहीं तो सर्वांशी समबुद्धीनें वागतो तो शांत असतो त्रिभुवनाचे राज्य मिळालें तरी तिकडे लक्ष न देता तो परमेश्वराचे अखंड स्मरण करीत असतो व आपल्या एकनिष्ठ भक्तीनें परमेश्वरास प्रेमशृंखलेनें बद्ध करून आपल्या हृदयात ठेवीत असतो (११–२–४५ ते ५५)

**माया म्हणजे काय ?** देहात्मभाव आणि सकाम कर्म याच्या योगानें जीव मायेच्या जाळ्यात गुरफटतो प्रलयाचे वेळी व्यक्तसृष्टीस सूक्ष्म कारणरूप प्राप्त होते व सर्गादिकाचे वेळी कारणरूपाचा कार्यरूपाने विस्तार होतो मायेची शक्ति भयंकर असते (११–२–१ ते १६)

**माया तरून जाण्याचे उपाय** सुखप्राप्तीसाठी धडपडणारा मानव अज्ञानानें कर्म करतो आणि मायेच्या पाशात गुरफटतो यातून सुटका करून घेण्यासाठी पुढील उपायाचा अवलंब करण्यात यावा :

(१) ब्रह्म आणि उपशम याचा आश्रय करणाऱ्या सद्‌गुरूस शरण जावें

(२) गुरू हाच आत्मा आणि दैवत मानून त्याचेकडून भागवतधर्माचा उपदेश घ्यावा, या धर्माचे आचरण करावे गुरुसेवेनें श्रीहरि प्रसन्न होतो.

(३) विषयवैराग्य, संतसमागम, अनाथावर दया, भूतमात्रांवर प्रेम, श्रेष्ठाविषयी आदर या गुणाचा प्रादुर्भाव भागवतधर्माच्या आचरणानें होतो.

(४) स्वत स प्रिय असणारी सर्व सुखें आणि आचरलेले सर्व कर्म श्रीहरीस समर्पण करावें भागवतधर्माच्या आचरणानें पराभक्तीचा उदय होतो पराभक्तीची परमावधि झाल्यानंतर नारायणनिष्ठ भक्तास नारायणाची माया तरून जाता येते (११-३-१८ ते ३३)

माया तरून जाण्याचे हे उपाय म्हणजे समूळ भागवतधर्म होय' असे या श्लोकावरील भाष्यात एकनाथानीं सागितलें आहे [१९] याठिकाणीं आलेलीं आदर्श भागवताची लक्षणे व गीतेंतील ज्ञान व दैवसिपत्ति याची लक्षणें अगदीं सारखी आहेत [२०]

**ब्रह्म किंवा नारायणाचे स्वरूप** निर्गुण, निराकार, वाचातीत परब्रह्म म्हणजेच नारायण परमेश्वराची भक्ति केली असताना बुद्धि विशुद्ध होते आणि शुद्धतर अशा आत्मतत्त्वाचा उदय होतो (११-३-३५ ते ४०)

**कर्मयोग** ' ज्या कर्माच्या योगाने कर्मनाश होऊन नैष्कर्म्य प्राप्त होतें तो कर्मयोग मला सागा' या प्रश्नाचे उत्तर देताना वेदोक्त, तन्त्रोक्त पूजादिक कर्मे करावीत पण त्यात आसक्ती मात्र ठेवू नये असा उपदेश करण्यात आला आहे ईश्वरार्पणपूर्वक कर्म करणें म्हणजेच नैष्कर्म्य अशी नैष्कर्म्याची व्याख्याहि या सदर्भात अली आहे. (११-३-४३ ते ५५)

या श्लोकावर टीका करताना श्रीधरस्वामी लिहितात, 'भक्ति ही कर्मयोगाधीन असल्यामुळे कर्मयोगाविषयी प्रश्न करण्यात आला आहे' (भक्तेः कर्माधीनत्वात् त पृच्छति कर्मयोगमिति ।) भक्तीच्या दृष्टीनें कर्मयोग अनिवार्य आहे असाच त्याचा अर्थ होतो

**भगवताचे अवतार** परमेश्वराचे अवतार व कर्मे अवर्णनीय आहेत. आपणच निर्मिलेल्या पचमहाभूताच्या साहाय्यानें ब्रह्माडरूपी नगर निर्माण करून हरि त्यात प्रवेश करतो म्हणूनच आदिदेव नारायणास 'पुरुष' हे नाव प्राप्त झालें त्याच्या शरीराच्या द्वारा त्याच्याच शरीरामध्यें त्रिभुवनाची सुदर रचना झाली आदिदेवाच्या ज्ञानकर्मेंद्रियापासून देहधारी मानवास ज्ञानकर्मेंद्रियाची प्राप्ती झाली रज (ब्रह्मदेव), सत्व (विष्णु) आणि तम (रुद्र) या त्रिगुणात्मक त्रैमूर्तींच्या योगानें आदिदेवानें विश्वोत्पत्ति केली

हा विचार स्पष्ट करताना एकनाथानी सुदर दृष्टात देऊन मूळ कल्पना स्पष्ट केली आहे

जो शेताची पेरणी करी तोचि देखरेख करी
तोचि पाळलियावरी सवगणी करी सर्वांची ॥
तेवि उत्पत्तिकाली तोचि ब्रह्मा स्थितीकाली तोचि विष्णुनामा
प्रलयकालीहि रुद्रप्रेमा ये पुरुषोत्तमा तेचि नामे ॥
—ए भा ४—६१—६२

अवतार कथाना नरनारायणाच्या जन्मकथेने प्रारभ झाला आहे दक्षप्रजापतीची कन्या मूर्ति व धर्म याचें लग्न झाल्यानतर त्याना नरनारायण हे जुळें झालें हे थोर ऋषि नैष्कर्म्याचें आचरण करीत व उपदेशहि नैष्कर्म्याचाच करीत असत जगाच्या कल्याणासाठी परमेश्वर अवतार धारण करीत असतो त्या प्रमाणे त्याने हस, दत्त, सनकादिक, ऋषभ, हयग्रीव मत्स्य, वराह, कूर्म, नृसिंह, वामन, परशुराम, राम आणि कृष्ण हे अवतार धारण केले असून भविष्यकाळात बुद्ध आणि कल्की याचा अवतार होणार आहे या सर्व अवताराच्या स्वरूपाचें आणि कार्यांचे विवरण या सदर्भात करण्यात आलें आहे. (११–४–१७ ते २३)

**अभक्ताची गति कोणती** ? या प्रश्नास उत्तर देताना प्रथम पुरुषसूक्तातील वर्णनाप्रमाणें चातुर्वर्ण्याची उत्पत्ति सागितली आहे नतर आलेलें अभक्ताचें वर्णन गीतेतील असुरी सपत्तीच्या वर्णनाशीं जुळणारें आहे.[२१] भक्ति न करणारे अधोगतीस जातात असा या बाबतींतला भागवतकाराचा निर्णय आहे. (११–५–१ ते १८)

**युगधर्म** . विदेहानें विचारलेला हा शेवटचा प्रश्न कोणत्या युगात कोणत्या प्रकारे परमेश्वरपूजन करावे असा राजाचा मूळ प्रश्न आहे या प्रश्नाच्या उत्तरात चार युगातील धर्मांचे—भागवतधर्माचें—स्वरूप विशद करण्यात आलें आहे. वैदिकधर्माची परिणती भागवतधर्मात कशारीतीने झाली हे चार युगाचा इतिहास सागताना स्पष्ट झाले आहे भागवतधर्माच्या इतिहासाच्या दृष्टीनें ५ व्या अध्यायातील मूळ २१ ते ४२ हे श्लोक महत्त्वाचे आहेत

## युगधर्माचें वैशिष्ट्य

कृत, त्रेत, द्वापार आणि कलि या चार युगांतील पूजनाचे प्रकार साग-

ताना ध्यायन्, यजन् यज्ञैः अर्चयन् आणि संकीर्तयन् असे अनुक्रमाने प्रत्येक युगातील धर्मस्वरूपाचें वर्णन आलें आहे मूळभागवतधर्म एकच असला तरी वैदिक कालापासून कलियुगापर्यंत धर्माचे स्वरूप कसे बदलत गेलें याची कल्पना या विवरणावरून येते कृतयुगात ध्यान, त्रेतायुगात यज्ञ द्वापारात मूर्तिपूजन आणि कलियुगात संकीर्तन असा मूळ भागवतधर्म युगसापेक्षतेने आढळतो संकीर्तन हे कलियुगातील भागवतधर्माचें स्वरूप असलें तरी ते अध्यात्मचिंतन्, यज्ञयागादिक कर्मकांड व मूर्तिपूजन यातून परिणत झालें आहे हे भागवतकारानी सांगितलें आहे

परमेश्वराच्या भिन्न युगातील नावात आणि पूजेच्या प्रकारातहि हीच ऐतिहासिक दृष्टि भागवतकारांनी ठेवली आहे हे पुढील कोष्टकावरून ध्यानात येईल

| युगाचे नाव | देवाचे स्वरूप | देवाची नावे | पूजनाचा प्रकार |
|---|---|---|---|
| कृत | शुभ्रवर्ण, ब्रह्मचारी | हंस, सुवर्ण, धर्म, वैकुंठ ईश्वर, पुरुष अव्यक्त आणि परमात्मा | ध्यायन् तप, शम, दम इत्यादिकांच्या योगे पूजन |
| त्रेत | यज्ञस्वरूप, ताम्रवर्णीय | विष्णु, यज्ञ, पृश्नि गर्भ, उरुक्रम वृषाकपि, उरुगाय | यजन् यज्ञैः वेदोक्त यज्ञविधीनें |
| द्वापार | श्यामवर्ण, पीतांबरधारी | वासुदेव, संकर्षण, अनिरुद्ध, नारायण, विश्वेश्वर, सर्वभूतात्ममूर्ति | अर्चयन् वेदोक्त मंत्र व आगमोक्त तंत्र यानी मूर्तिपूजा |
| कलि | वर्ण काळा पण धवल कीर्तीचा | कृष्ण | संकीर्तयन् संकीर्तनाच्या यज्ञानें पूजन |

युगधर्मांच्या इतिहासात आणखीहि एक वैशिष्ट्य आढळतें पुराणांतरी कलियुगाचे 'पापयुग' असें वर्णन आलें आहे भागवतानें मात्र कलियुगास पापयुग मानलें नाही उलट, या युगात नामस्मरणाने मोक्ष मिळत असल्यामुळे 'पूर्वीच्या युगातील प्रजा देखील या युगात जन्म घेण्याची इच्छा करते' असा कलियुगाचा गौरव भागवताने केला आहे कारण, 'कलियुगामध्यें नर नारायणनिष्ठ होणार आहेत' असें भागवताचें भविष्यकथन आहे [२२]

पहिल्या पचाध्यायीत साररूपाने भागवतधर्माचा उपदेश आला आहे पुढील अध्यायात याच विषयाचा निरनिराळया कथाच्या आधारानें विस्तार करण्यात आला आहे म्हणूनच पहिली पचाध्यायी म्हणजे भागवताचें पचप्राण आहेत असें एकनाथानीं या पाच अध्यायाचें महत्त्व वर्णिले आहे [२३]

सहाव्या अध्यायापासून श्रीकृष्णोद्धव–सवादास प्रारभ होतो कृष्णाचें अवतारकार्य सपल्याची सूचना देवाकडून मिळते कृष्णाने निजधामास यावे अशी देव प्रार्थना करतात. श्रीकृष्णहि आपण त्याच तयारींत असल्याचें देवाना सागतो कृष्णाचा परमभक्त उद्धव कृष्ण निजधामास जाणार हे ऐकून खिन्न होतो 'तुझा विरह मला सहन होणार नाहीं मलाहि तुझ्याबरोबर घेऊन चल'[२४] असा उद्धवाचा आग्रह सुरु होतो. त्याचें सात्वन करण्यासाठीं श्रीकृष्णानें केलेल्या उपदेशाचा विस्तार ७ व्या अध्यायापासून २९ व्या अध्याया पर्यंत झाला अहे.

## निष्काम कर्मयोग

सात, आठ आणि नऊ या तीन अध्यायात अवधूताने केलेल्या २४ गुरूचा कथाभाग सागितल्यानतर १० व्या अध्यायात निष्कामधर्माचें विवरण व प्रवृत्तीमार्गाचें निरूपण करण्यात आलें आहे १० व्या अध्यायापासुनच भागवतातील तत्त्वज्ञानास प्रारभ झाला आहे या अध्यायात पहिल्या सात श्लोकात भगवद्भक्ताच्या वर्तणूकीचे वर्णन आले आहे अगदीं पहिलाच श्लोक गीतेंतील निष्काम कर्मयोग किंवा ईशोपनिषदातील 'तेन त्यक्तेन भुजीथा.' या उपदेशाची आठवण करून देणारा आहे. 'मी

वेळोवेळी सांगितलेले धर्म, वर्णाश्रम, कुलाचार भक्तानें आचरावेत परंतु हा आचार करताना भक्त अकामात्मा असावा' असा पहिल्या श्लोकाचा भावार्थ असून याच भावाचे स्पष्टीकरण पुढील सहा श्लोकातील भक्ताच्या वर्णनात आले आहे

सकाम कर्म निरयगतीस कारणीभूत होत असतें स्वर्गाच्या कामनेनें केलेले पुण्यकर्म देखील मनुष्यास जन्ममृत्यूच्या बंधनात ठेवतें आत्मा सर्वगत, नित्य व सर्वव्यापी आहे मायेच्या क्षोभानें गुणाचा उद्भव होतो गुणामुळे कर्म करण्याची प्रेरणा होते अज्ञानानें केलेलें कर्म बंधनकारक होतें कर्मांच्या बंधनातून मुक्त होण्यासाठी परमभागवताचा आदर्श पुढें ठेवून त्याप्रमाणे वागलें पाहिजे बद्ध, मुक्त, साधु आणि भक्त यांची लक्षणे याच हेतूने ११ व्या अध्यायात सांगण्यात आली आहेत.

## 'द्वा सुपर्णा'

बद्ध आणि मुक्त हे गुण मायेचे आहेत आत्म्याला बंधनच नसल्या-मुळें मोक्षाचा प्रश्नच निर्माण होत नाही बंधनाचा आभास अविद्येमुळें होतो ज्ञानाने त्याचें निराकरण करता येतें हा भाव स्पष्ट करण्यासाठीं ऋग्वेद व उपनिषदें यातून आलेला दोन पक्षांचा दृष्टांत भागवतकारांनी दिला आहे [२५] जीव परमेश्वराचा अंश असूनहि दुःख का भोगतो ? हा साधकावस्थेतील महत्त्वाचा प्रश्न आहे परमेश्वराचा अंश असूनहि जीवानें दु:ख भोगणे म्हणजे 'समर्थांच्या कांतेनें कोरान्न मागण्या'सारखें आहे. या शंकेचे निराकरण दोन पक्षांच्या दृष्टांतानें सुंदर रीतीनें करण्यात आलें आहे एकाच वृक्षावरील दोन पक्ष्याप्रमाणें जीव आणि शिव आहेत. जीव, संसारवृक्षाची फळें चाखतो म्हणून दु खी होतो दुसरा पक्षी या वृक्षाची फळें खात नसल्यामुळें सुखरूप असतो असे या दृष्टांताचें तात्पर्य आहे.[२६] जीवेश्वर भिन्नत्व अज्ञानामुळे भासतें ज्ञानानें अभेदाचा प्रत्यय येतो सर्वश्रेष्ठ स्वरू-पाशी तादात्म्य पावावयाचे असेल तर मी कर्ता मी भोक्ता, हा अहंभाव सोडला पाहिजे म्हणजे अज्ञानबंधनात सापडलेला जीव बंधमुक्त होतो.[२७] 'जनीं आहे जनार्दनः त्यातें पहावया सांडी अभिमान' या अभंगात नाथांनीं हाच अभिप्राय व्यक्त केला आहे.[२८]

## संतांची महती

मुक्त होण्यास आवश्यक असलेली निरहंकारी वृत्ति आणि समदर्शित्व ब्रह्माचें ठिकाणी मन निश्चल केल्यानें संपादन करता येतात परंतु तें न जमल्यास सर्व कर्मे परमेश्वरार्पणपूर्वक बुद्धीनें केल्यानें देखील स्थितप्रज्ञावस्था प्राप्त होते. संतांच्या सहवासातहि या वृत्तीची जोपासना होत असते संत आणि भक्त यांची लक्षणें यांच संदर्भांत भगवंतांनी सांगितली आहेत

कृपालु, सर्वोपकारक, समदर्शी, सर्वधर्मांस सोडून परमेश्वरास शरण जाणारा, वासनांच्या योगानें ज्याची बुद्धि विचलित होत नाही, जो परम कारुणिक असतो तो खरा संत गीतेतील संतांची लक्षणें भागवतानेंहि थोड्या फार फरकानें दिलीं आहेत सारांश, अनन्यभक्ति आणि साधुसंतांचा सहवास यांचा आश्रय केला म्हणजे मुक्तावस्था संपादन करण्यास कालावधि लागत नाहीं असा निष्कर्ष या विषयाच्या समारोपांत दिला असून 'तू सर्व कर्मे सोडून मला शरण ये म्हणजे निर्भय होशील' असें आश्वासन भगवंतांनी उद्धवास दिलें आहे

यावर उद्धव म्हणतो, 'वर्णाश्रमधर्माप्रमाणें कर्म कर असें तू म्हणतोस आणि सर्व कर्मे सोडून मला शरण ये असेंहि सांगतोस! त्यामुळे माझें मन संशयांत सांपडलें आहे' (गीतेच्या पांचव्या अध्यायांत अर्जुनानें अशीच शंका उपस्थित केली आहे गीता, ५-१) उद्धवाच्या शंकेचें निरसन करण्यासाठी पुन्हा वेदांत सांगण्यांत आला आहे. पंचप्राणांची व्युत्पत्ति, सूक्ष्मांतून होणारा स्थूलाचा उदय, संसारतरूस येणारीं सुख-दुःखरूपी फळें, त्यापैकी शुद्ध सुखाच्या फळाचा आस्वाद घेणारे परमहंस, परमेश्वरी मायेनें निर्माण झालेला संसारवृक्ष, इत्यादि विषयांचें विवेचन बाराव्या अध्यायांत आलें आहे 'हे ज्ञान गुरूपासून एकनिष्ठ सेवेच्या द्वारें तू प्राप्त करून घे म्हणजे तू कृतार्थ होशील' असा कृष्णाचा उपदेश आहे.

## त्रिगुणात्मक प्रपंच

तेराव्या अध्यायाच्या प्रारंभीं सत्वरजस्तमादि त्रिगुणांचा प्रपंच करण्यांत

आला आहे गुण हे बुद्धीचे आहेत आत्म्याचे नाहीत रज आणि तम या गुणाचा पराभव करून सत्वगुणाची वृद्धी झाली असताना जीवाला परमेश्वराची अनन्य भक्ति लाभते तोच त्याचा धर्म बनतो अधर्माचा पराभव तेणे करून होतो कारण, सत्वाचा परमोत्कर्ष म्हणजेच धर्म होय

यावर उद्धवाचा प्रश्न असा हे सारे माहित असताना जीव वासनाच्या आहारीं का जातो? अहंकार आणि अज्ञान यामुळें बुद्धि रजस्तमादि गुणाच्या आहारी जाते व माणूस दुःखी होतो असें श्रीकृष्णानें वरील प्रश्नाचें उत्तर दिले आहे अहंकाराचे निर्मूलन करून सर्वत्र एकमेव अद्वितीय परमात्मा भरलेला आहे या भावनेनें परमेश्वराचे भजन करणे हा मुक्तीचा मार्ग आहे याच संदर्भात 'मी ऋत सत्य याचे परमाधिष्ठान आहे' असें श्रीकृष्णानें सांगितलें आहे. (या श्लोकातील ऋत व सत्य या शब्दावर टीका करताना श्रीधराचार्यांनीं 'ऋत प्रमीयमान धर्म सत्य अनुष्ठीयमान धर्म' अशी ऋत-सत्याची व्याख्या दिली आहे)

## भक्ति: परमश्रेय

'ब्रह्मवादी अनेक श्रेय सांगतात त्यामुळें बुद्धीचा निश्चय होत नाहीं म्हणून परमश्रेय कोणते?' असा प्रश्न चौदाव्या अध्यायाच्या प्रारंभीं उद्धवाने केला आहे या प्रश्नास उत्तर देताना भगवतानीं भक्ति हे परमश्रेय असल्याचा निर्वाळा दिला आहे 'भक्तीच्या योगानें सर्व पापाचा परिहार होतो चांडाल सुद्धा भक्तीने पावन होतो विषयवासना भक्ताचा पराभव करू शकत नाही एका भक्तीच्या योगाने परमेश्वराची प्राप्ती होते' असें भगवान् सांगतात याच अध्यायात शेवटीं गीतेच्या ६ व्या अध्यायात आलेला ध्यानयोगहि सांगितला आहे

मोक्षप्राप्तीच्या मार्गात अडथळा आणणाऱ्या ऋद्धी-सिद्धीपासून भक्तानें अलिप्त राहिलें पाहिजे असा इषारा पंधराव्या अध्यायात देण्यात आला आहे सोळाव्या अध्यायात विभूतियोगाचा विस्तार असून 'गीतेंत सांगितलेलाच विभूतियोग पुन्हां सांगतों' असा स्पष्ट उल्लेख या संदर्भात करण्यात आला आहे

आश्रमधर्म, ज्ञानलक्षण, भक्तीनें प्राप्त होणारी गुणातीत अवस्था याचें विवरण १७ ते १९ या तीन अध्यायात केल्यानतर विसाव्या अध्यायात ज्ञान, कर्म आणि भक्ति या योगत्रयाचें विवरण आले आहे याच सदभांत भगवान् म्हणतात, 'जीवाचें कल्याण करण्याच्या सदिच्छेनें मी ज्ञान, कर्म व भक्ति हे तीनच योग सागितले आहेत मोक्षास आवश्यक असणारी जी चित्तशुद्धी ती सिद्ध होण्यास चौथा कोणताहि उपायच नाही' (११-२०-६) भागवतधर्मात भक्ति ही स्वतत्र निष्ठा मानलेली आहे 'भक्ति ही स्वतत्र निष्ठा होऊ शकत नाही' या लोकमान्याच्या मताचा परामर्श घेताना या सबधी पूर्वी आवश्यक ते विवेचन करण्यात आले आहे भागवतकाराचे या अध्यायातील वरील उद्‌गार नि सदिग्ध असल्यानें या बाबतीत अधिक विवेचन करणें अनावश्यक ठरेल एकादशाच्या याच अध्यायात पुढें या प्रश्नाचा विचार अधिक स्पष्ट करण्यात आला असून, 'कर्म, ज्ञान, तप, वैराग्य आदि साधनाच्या योगाने जें प्राप्त होते तेंच भक्तियोगानें विनाप्रयास (अजसा) लाभते' असा निष्कर्ष दिला आहे

देश, काल, द्रव्य आणि आचार याच्या गुणदोषाचा विचार एकविसाव्या अध्यायात केल्या नतर बाविसाव्या अध्यायात साख्यमतानुसार प्रकृति-पुरुष व तत्त्वसख्या याचें विवरण आलें आहे नाना मताचा आणि तत्त्वाचा निर्णय गुरु आणि श्रुति याच्या साहाय्याने करून घेऊन आत्मोद्धार करावा असें सागितल्या नतर मुमुक्षूचें वर्णन करण्यात आलें आहे 'शरीराचा कितीहि छळ झाला तरी मोक्षावरील लक्ष ढळू देऊ नये' हा उपदेश तेविसाव्या अध्यायात भिक्षूचें उदाहरण देऊन दृढ केला आहे

## भक्ति : श्रेष्ठ साधन

अत्यत कृपण असलेल्या ब्राह्मणास वैराग्य प्राप्त होतें साधकावस्थेत त्याचा बराच छळ होतो परतु तो आपल्या ध्येयापासून ढळत नाहीं. त्याने केलेल्या १८ श्लोकाच्या उपदेशासच भिक्षुगीत म्हणतात 'मनावर विजय मिळविणें हेच सर्वात मोठें फळ आहे सुख किंवा दु ख दुसरा कोणीहि देऊ शकत नाहीं· आत्मा अद्वितीय असल्यानें त्याचे ठिकाणी अपपरभाव सभवत नाहीं ज्ञात्यानें अस्तित्वात नसलेल्या सुख-दु खाची भीती बाळ-

गण्याचे कारण नाही परमेश्वराच्या एकनिष्ठ भक्तिरूपी अनन्य साधनाने अज्ञानमय व दु:खमय भवसागर तरून जाता येतो' असें भिक्षुगीताचें तात्पर्य आहे

चोविसाव्या अध्यायात 'सकळ संशयाचा उच्छेद करणाऱ्या सांख्य-दर्शना'चें विवरण आलें आहे पंचविसाव्या अध्यायात सत्वरजस्तमादि गुणांचा मनावर व वृत्तीवर होणारा परिणाम व त्रिगुणांनीं मिळणारी गति यांचा विचार आला आहे गीतेच्या चौदाव्या अध्यायातील गुणत्रय विभाग सतराव्यातील श्रद्धात्रय आणि अठराव्यातील त्रिगुणात्मक कर्मादिकांची लक्षणें एकादशाच्या २५ व्या अध्यायात साररूपानें आलीं आहेत या विषयाचा समारोपहि 'निरहंकारी वृत्तीनें भगवद्भजन करावें' या आदेशानें करण्यात आला आहे

सज्जनांच्या सहवासानें योगनिष्ठा वाढीस लागते आणि दुष्टांच्या सह-वासात ती भंग पावते हा विषय ऐलगीताच्या दृष्टांतानें सव्विसाव्या अध्या-यात सांगितल्या नंतर सत्ताविसाव्या अध्यायात क्रियायोग, पूजाविधि, मंदिराची उभारणी इत्यादि विषयाचा विस्तार आला आहे

अठ्ठावीस आणि एकोणतीस हे दोन अध्याय महत्त्वाचे आहेत ज्ञान-योगाचे साररूप आणि संकलित विवरण अठ्ठाविसाव्यात आलें असून एकोणतिसाव्या अध्यायात भक्तियोगाचा संक्षेपत विचार करण्यात आला आहे एकनाथांनीं अठ्ठाविसाव्या अध्यायाचें महत्त्व अनेक दृष्टांत देऊन सांगितलें आहे

तो हा ब्रह्मज्ञानाचा कळसु अध्याय जाण अठ्ठाविसु
बाप विदाणी हृषीकेशु तेणें देउळासि कळस मेळविला ॥
सकळसाराचा निजसारांश तो हा एकादशी अठ्ठाविस
जेवीं यतीमाजी राजहंस तेवी अष्टाविंश भागवतीं
ब्रह्मरसें रसाळ कथा निरूपिलें भागवता
त्यामाजी ब्रह्मरसतल्लीनता जाण तत्त्वतः अष्टाविंश

— ए भा २८–६९३, २८–७१८, २८–७३०

'साधकानें कोठेंहि आसक्ती ठेवूं नये निःसंग होऊन रहावें जगात आत्म्या-व्यतिरिक्त दुसरें कांहींच सत्य नाही' हा कृष्णाचा उपदेश ऐकल्यावर

उद्धवानें शका प्रदर्शित केली की, 'आत्मा निर्गुण असल्याने त्याला ससार नाहीं देहादि नाश पावणारे म्हणून त्याना ससार असू शकत नाहीं मग ससार आहे कोणाला ?' 'ससार अज्ञानी व्यक्तीस जाणवतो आणि बाधतोहि' असे श्रीकृष्णाने वरील शकेस उत्तर दिले आहे ज्ञानी सुखदु ख विरहित असतो तो आत्मानदात रत असतो शरीरास सुदृढ करणारा योग ज्ञानावाचून व्यर्थ आहे अनन्य भावानें परमेश्वराला शरण जाऊन ज्ञानयोगाचा अभ्यास करावा ज्ञानयोगी भक्ताला कोणत्याहि प्रकारची विघ्नें बाधू शकत नाहीत ज्ञानयोग सिद्ध करण्यासाठी देखील भक्तीची आवश्यकता असते हे या अध्यायातील विवेचनात ध्वनित झालें आहे या अध्यायावरील टीकेचा समारोप करताना श्रीधराचार्यांनी हाच अभिप्राय व्यक्त केला आहे :

> 'सर्व उपनिषदाचे सारसर्वस्व असणारा जो आत्मयोग त्याचा उपसहार करताना भगवतानी आपला मित्र जो उद्धव त्यास पुन्हा उपदेश केला कीं, मुक्ति पुरुषार्थ साध्य करण्याचें मुख्यतम साधन भक्ति हे आहे'

## भागवतोक्त धर्माचें सार

भागवतात प्रसगोपात सागितलेला भक्तियोग साररूपानें एकादशाच्या एकोणतिसाव्या अध्यायात आला आहे. 'ज्या धर्माचा आश्रय केला असताना तू मृत्यूवरहि विजय मिळविशील असा माझा सुमगल धर्म तुला सागतो' अशी प्रस्तावना करून भगवतानीं या अध्यायात साररूप भागवत-धर्म उद्धवास सागितला आहे या साररूप धर्मात पुढील विशेष प्रामुख्यानें आले आहेत

(१) सर्व कर्मे परमेश्वराकरिता करावींत
(२) परमेश्वराचे ठिकाणी मन समर्पित करून भागवतधर्मात मन रंगवावें
(३) साधूनी अलकृत केलेल्या पुण्यक्षेत्रात वास करावा
(४) देव, दानव आणि मानव यामध्यें असलेल्या भगवद्-भक्तानी केलेल्या आचाराचें अनुसरण करावें
(५) सर्वभूताचे ठिकाणी आणि आत्मस्वरूपातहि भगवंत

आहे हे दर्शन घडावे

(६) सर्व भूतात्मभावानें समदृष्टि प्राप्त होते व जग विष्णुमय आहे असा प्रत्यय येतो

(७) सर्व भूतमात्राचे ठिकाणी भगवद्भाव जोवर निर्माण होत नाही तोपर्यंत कायावाचामनेंकरून अत्यंत निष्ठेनें भगवताची उपासना करावी

(८) सर्वत्र भगवान् भरला आहे ही भावना दृढावली म्हणजे भागवत कर्मातीत होतो

(९) हा धर्म परमेश्वरानेंच सांगितला असल्यानें या धर्मात दोष रहात नाही

(१०) कोणतेंहि कर्म परमेश्वरास अर्पण करणें हा उत्तम धर्म होय

(११) मर्त्य देहाच्या योगानें अमृतस्वरूपाची प्राप्ती करून घेणें हीच बुद्धिवंताची बुद्धि असून जीवनाचें कौशल्याहि तेंच आहे

'हे साररूप ब्रह्मज्ञान आहे भागवतधर्मानें ब्रह्मप्राप्ती होते, भक्त कर्मातीत होतो व सायुज्य मुक्तीचा अधिकारीहि बनतो.' अशी भागवत-धर्माची फलश्रुती या अध्यायात सांगितली आहे हे ज्ञान श्रवण केल्यानंतर उद्धव छिन्न संशय झाला व भगवताच्या आदेशानुसार बदरिकाश्रमास जाऊन लोकसंग्रहार्थ भागवतधर्माचें आचरण तो करू लागला.

एकादशाच्या ३० व ३१ या अध्यायात कृष्णाच्या निजधामगमनाचें वर्णन आले आहे धर्मस्वरूपाच्या दृष्टीनें या दोन अध्यायास महत्त्व नसल्यामुळें त्याचा परामर्श घेण्याचें कारण नाहीं.

## भागवतोक्त धर्माचे विशेष

वेदोक्त ऋतप्रेरणेचा वारसा घेऊन श्रीमद्भगवद्गीतेंतील उपदेशाच्या रूपाने प्रगट झालेला भागवतधर्म उत्तरकालातील वैचारिक उत्क्रांति लक्षात घेऊन व सर्वांगीण समाजविकासास आवश्यक असलेला समन्वय व समतोल साधून भागवतपुराणात सांगण्यांत आला आहे. गीता आणि

भागवत यांच्या विचारात असलेलें साम्य विवेचनाच्या ओघात त्यात्या-ठिकाणी निर्देशिलें आहेच एकादशस्कंध आणि भगवद्गीता यातील समान स्थळाची माहिती परिशिष्टात देण्यात आली आहे

ज्ञान आणि कर्म या दोन निष्ठाबरोबर गीतेनें भक्ति ही स्वतन्त्र निष्ठा सांगितली ज्ञानाची दुर्गमता आणि कर्मांची गहनगति टाळून सुगम असा मार्ग साधकास कसा साधता येईल याचें विवेचन गीतेने केलें. ज्ञानाच्या महतीचा परिणाम कर्मांची महती कमी करण्यात झाला होता ज्या निष्काम कर्मानें धर्म जगतो तो निष्काम कर्मयोग गीतापूर्वकालात गौण लेखण्यात आल्याने धर्मावर जें संकट आलें होते त्या संकटाचें निवारण गीतेनें निष्काम कर्मयोगाच्या पुरस्काराने केलें हा कर्मयोग सुलभ व्हावा यासाठीं भक्तिनिष्ठा सांगितली गीतेचा बारकाईने अभ्यास केला असताना असे दिसेल कीं गीतेनें कर्मयोग दोन भूमिकावरून सांगितला आहे" ज्ञानाच्या आणि भक्तीच्या द्वंद्वातीत होऊन स्थितप्रज्ञ बुद्धीनें कार्य केले असताना कर्मांचें बंधन लागत नाहीं" हा ज्ञात्यासाठी सांगितलेला निष्काम कर्मयोग आहे. आत्मतत्त्वाच्या ज्ञानानें बुद्धि स्थिर करावी व फलाविषयी उदासीन राहून प्राप्तकर्तव्य निष्काम बुद्धीनें करावें असा उपदेश दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायातील विवेचनात गीतेने केला आहे आत्मतत्त्वाचें ज्ञान व बुद्धीचें स्थैर्य ही पूर्वयोग्यता या ठिकाणी अभिप्रेत आहे म्हणूनच चौथ्या अध्यायात कर्माकर्मांचें विवरण व ज्ञानाचें महत्त्व सांगितले आहे 'ज्ञानाग्नि सर्व-कर्माणि भस्मसात् कुरुतेऽर्जुन' (गीता ४–३७) असा ज्ञानपूर्वक कर्माचा निष्कर्षहि या अध्यायात आला आहे आत्मवतास कर्म बाधीत नाहीं म्हणून हृदयातील अज्ञान ज्ञानानें दूर करून तू या योगाचा आश्रय कर असा आदेश या अध्यायाच्या शेवटीं भगवतानीं दिला आहे (गीता ४-४१-४२) आठव्या अध्यायापर्यंत आणि नवव्या अध्यायाच्या प्रारंभीं याच प्रकारच्या ज्ञानाचें विवरण भगवतानी केलें आहे

नवव्या अध्यायाच्या २२ व्या श्लोकापासून भक्तीचें महत्त्व वर्णिलें आहे भक्तिभावानें कर्म करणारा पापी, दुराचारी असला तरी तो तरतो. कारण, 'न मे भक्त प्रणश्यति' (९–३१) असा विश्वास भगवतानी व्यक्त केला आहे. बाराव्या अध्यायात तुलनेनें सर्व मार्गांचा उल्लेख केला असून, ज्ञानानें

अथवा ध्यानानें युक्त होऊन तूं कर्म कर असे सांगितले आहे हेंहि जमले नाही तर 'मत्कर्म पर हो, माझ्यासाठी कर्म केलेस तरी तुला सिद्धी मिळेल' (गी १२-१०) असे भगवान् सांगतात निष्काम कर्मयोग आणि परमेश्वरार्पणपूर्वक कर्म यांत हा सूक्ष्म भेद गीतेने दर्शविलेला दिसून येईल दोन्ही ठिकाणी कर्मयोगच अभिप्रेत आहे परंतु निष्काम कर्मयोग ज्ञानानें सिद्ध होतो तर परमेश्वरार्पणपूर्वक कर्म हे भक्तीने साधता येते हा भेद आहे

महाभारतातील नारायणीय धर्माने भक्तियोगाचा अधिक विस्तार केला अवैदिक पंथानी आचारधर्मावर अधिक भर दिला परंतु आचारधर्मावरच सर्व लक्ष केंद्रित झाल्यानें ज्ञानाची संगती सुटली. धर्म आचारप्रधान बनला आणि पुढे या पंथात जडता आली भागवताने भक्तीचे महत्त्व प्रतिपादिलें परंतु कर्माची संगती सुद्धा दिली नाही त्याच प्रमाणे ज्ञानाची बैठक ढळू दिली नाही म्हणूनच युगसापेक्ष धर्माचा आणि पूर्वपीठिकेचा समन्वय साधण्यात भागवत पुराणास यश मिळाले

वेदोत्तर कालात ऋतास प्राप्त झालेल्या कर्म, ब्रह्म, सत्य, यज्ञ आदि अर्थांचे विवेचन पूर्वी आलें आहेच भागवताने कर्म-ब्रह्माचा समन्वय याच दृष्टिकोनातून प्रतिपादिला आहे पहिल्याच स्कंधात 'ईश्वरे भावित कर्म तापत्रयचिकित्सितम्' असा सिद्धांत सांगून नारद म्हणतात

> यदीश्वरे भगवति कर्म ब्रह्मणि भावितम्
> यदत्र क्रियते कर्म भगवत्परितोषणम्
> ज्ञानं यत्तदधीनं हि भक्तियोगसमन्वितम्॥ भागवत १-३२-३१

'ईश्वरार्पण पूर्वक केलेले कर्म ब्रह्मप्राप्ती करून देतें हेंच ज्ञानरूप होतें व त्याचे ठिकाणीं भक्ति आणि योग यांचा समन्वय झालेला आढळतो' भगवतास संतुष्ट करणाऱ्या कर्मांचे स्वरूप भागवतात ठिकठिकाणी विस्तारानें स्पष्ट करण्यात आलें आहे या कर्मांत भूतदयेस फार महत्त्वाचे स्थान आहे भगवताच्या निवासस्थानात 'भूतानि अलब्धशरणानि' (३-१६-१०) निराश्रित, दीन मानव यांस भागवताने स्थान दिलें असून दीनोद्धरणाचें कार्य हा श्रेष्ठ धर्म असल्याचें पर्यायाने सूचित केलें आहे विरक्त वृत्तीनें लोककल्याणार्थ देह झिजविणाऱ्या सत्पुरुषास 'उत्तमश्लोकपरायण' ही पदवी भागवतानें दिली आहे (१-४-१२) 'दयया सर्वभूतेषु' सर्व भूतावर

केलेल्या दयेने ईश्वर सतुष्ट होतो (४–३१–१९) पुण्यश्लोकानीं उपासिलेला अव्यय धर्म म्हणजे भूतदया (६–१०–८ व ९) दीनाचें परिपालन करणे हा साधूचा परम धर्म आहे (८–७–३९–४०) दीनाविषयींच्या अनुकपेनें परमेश्वराची उपासना करावी (३–२९–१७) या सारख्या वचनातून साधूच्या कर्तव्याचे जे प्रतिपादन आले आहे त्यावरून केवळ आत्मविकास हे भागवतधर्माचें ध्येय नसून विश्वविकासाचे ध्येय पुण्यश्लोक भागवतानी साधावयाचें आहे हे स्पष्टच होतें वेदोक्त ऋताच्या अभिव्यक्तीशीं हे ध्येय सुसंगत तर आहेच. त्याच ध्येयाचे विस्तृत विवरण भागवतधर्माच्या रूपाने भागवतकारानी केले आहे असें वरील आधारावरून सिद्ध होते या धर्माच्या रक्षणासाठी भगवान् अवतार घेतो (३–१–४४) अशी भागवताची निष्ठा आहे प्रेममयी भक्तीचें सरस, प्रासादिक आणि श्रद्धायुक्त वर्णन भागवतात असले, अशा भक्तीचा गौरव भागवतकारानीं केला असला तरी, ज्या साधूचा आदर्श पुढे ठेविला आहे अथवा भागवतोत्तमाचीं जी वर्णनें दिलीं आहेत त्यात ऋतप्रेरणेचा प्रभाव आढळतो भूतमात्राचे कल्याण साधूनी साधावें आणि वर्णाश्रमधर्म विधियुक्त पाळावेत परतु त्यात आसक्ती मात्र ठेवू नये. विश्व नारायणात्मक असल्यानें भूताच्या रूपाने नारायणाचे दर्शन घ्यावे (भागवत १–५–२०, २१) 'जग हे परमेश्वररूप आहे आपण त्या परमेश्वराचे अशभूत आहोंत. आपण त्या आत्म्याशी तादात्म्य पावून विश्वाचे कल्याण होईल अशा प्रकारे भगवताचे गुणवर्णन करावें ' या निष्ठेनें वागलें म्हणजे मन प्रसन्न होतें आणि मनाची प्रसन्नता हेंच विष्णूचें श्रेष्ठ असें स्थान आहे– 'पद तत्परम विष्णोर्मनो यत्र प्रसीदति' (२–१–१९) हे आदेश ऋतप्रेरणेतूनच देण्यात आले आहेत

पौराणिक काळानंतर आचार्यांच्या युगास प्रारभ होतो आठव्या शतकानतर होऊन गेलेल्या भिन्न मताच्या आचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा महाराष्ट्रातील भागवतधर्मावर विशेष परिणाम झाला नाही परतु शकराचार्या खेरीज इतर आचार्यांच्या तत्त्वप्रणालीतून आधुनिक भारतीय भाषातील भागवतधर्मीय वाङ्मयाचा उदय झाला असल्याने मध्ययुगीन भागवतधर्माचें स्वरूप समजून घेण्यासाठी आचार्यांचें तत्त्वज्ञान व त्याचा भागवतधर्मावर झालेला परिणाम यांचा आढावा घेणें आवश्यक ठरते ● ●

## ७. टीपा

१ हरिभाऊ उपाध्याय, **भागवतधर्म** (हिंदी), प्रस्तावना, पृ ५

२ Winternitz, *History of Indian Literature,* Vol I, P 556

३ Farquhar, *Outline of Religious Literature of India,* P 229

४ "Le Bhagwata Purana or History Poetique de Krishna, 1840-47"

५ **ब्रह्मसूत्राणि,** १-१-२, १-१-४ व १-१-५ (आनंदाश्रम ग्रंथावलि)

६ "Truth o Reality – सत्यम् – is used interchangable with ऋतम्, the natural or moral Law or order by which the Universe is regulated"— Griffith *Hymns from Atharvaveda,* P 159

७ यथाहि स्कंधशाखाना तरोर्मूलावसेचनम्
अेवमाराधन विष्णो सर्वेषामात्मनश्च हि – **भागवत,** ८-५-४९

८ **भागवत,** ३-९-२९, २-९-१८ ते २२

९ **भागवत,** ३-१३-११, ४-३०-२५ ते १९.

१० **भागवत,** ५-१-१७ ते २०,

११ **भागवत,** ७-७-२३,

१२ **भागवत,** ९-१४-४८ व ४९, ९-२-९, ७-११-३५

१३ **भागवत,** २-४-१८

१४ **भागवत,** ७-११-७ ते १२, ३-२७-१७ ते २३, ३-१६-१८ ते २४

१५ **भागवत,** १-३-१३, २-७-१०, ६-१८-१९,

१६ **भागवत,** १-१०-२५

१७ ऋ-इयर्ति, जाणें गति असणें

१८ भागवत, एका स्कंध, **श्रीधरी** टीका, प्रस्तावना, श्लोक २ व ३

१९. **ए. भा.,** ३-३७९.

२० **गीता**, १३–७ ते ११, १६–२ व ३

२१ **भागवत**, ११–५–७ ते १८ आणि **गीता**, १६–७ ते १६

२२ **भागवत**, ११–५–३६ ते ३८.

२३ **ए भा**, ५–५५३ ते ५६६

२४ **भागवत**, ११–६–४२ ते ४९

२५. **भागवत**, ११–११–६ ते ८, **ऋग्वेद**, १–१६४–२०,
**मुण्डकोपनिषद्**, ३–१–१ ते २,
**श्वेताश्वतरोपनिषद्**, ४–६ व ७

२६ निरूक्तकार यास्काचार्य, सायणाचार्य आणि आद्यशकराचार्य यानी या दृष्टानाचें हेच तात्पर्य दिले आहे ऋग्वेदातील ऋचेवर भाष्य करताना सायणाचार्य लिहितात

'अत्र लौकिकपक्षिद्वयदृष्टान्तेन जीवपरमात्मानौ स्तूयेते। ससारे अह कर्ता सुखी दु खी इति जन्ममरणे अनुभवति। यदा तु ससार-शोकातीतमीश परमेश्वर पश्यति तदा वीतशोक सन् '

'मी कर्ता, सुखी दु खी अशी भावना असते तोपर्यंत जन्ममरणाचा अनुभव येतो शोकातीत होऊन परमेश्वराचा अनुभव घेतल्यानतर मात्र जीव शोकरहित होतो

श्रीमद् आद्यशकराचार्य मुण्डकोपनिषदावरील भाष्यात लिहितात,
'निरनिराळ्या योनीत सापडलेला जीव अनेक जन्मामध्यें आपल्या शुद्धधर्म-सचयामुळे किवा परम कारुणिक अशा गुरूच्याद्वारा योगमार्गाचे दर्शन घडल्यामुळे अहिसा, सत्य, ब्रह्मचर्य, सर्वत्याग, शमदमादि यानी सपन्न आणि समाहित चित्त होऊन समारधर्मशून्य बनतो सर्वभूताच्या ठिकाणी अस-लेला, सर्वांत समान असलेला आत्मा मीच आहे असे त्यास ज्ञान होते माझे स्वरूप हेंच परमेश्वराचे स्वरूप आहे परमेश्वराचे स्वरूप तेच माझें आहे असे त्याम दर्शन घडते म्हणून तो शोकसागरातून मुक्त होतो कृतकृत्य होतो '

**मुण्डकोपनिषद्**, गोरखपूर प्रत, पृ ८८–८९
**श्वेताश्वतरोपनिषद्**, गोरखपूर प्रत, पृ १९३–१९४

२७ **भागवत**, ११–११–९ व १०

२८. आवटे, **एकनाथगाथा**, क्र २३५२

## ८. 'भाष्यकारांतें वाट पुसतु'

भागवताचे वाढते महत्त्व–शांकरवेदान्त आणि भक्ति–रामानुजाचे विशिष्टाद्वैत–भक्ति माध्य आणि माधन–द्वैताद्वैती निंबार्काचार्य–माध्वाचार्याचे अद्वैत–मधुराभक्ति–निष्काम कर्मयोगाची उपेक्षा–

पौराणिक काळानंतर धर्मतत्त्वाचे विवरण भिन्नभिन्न मताच्या आचार्यांनीं केले आहे पुराणाच्या रचनेनंतर धार्मिक वाङ्मयातील नवनिर्मितीची प्रेरणा जवळपास लुप्त झाली असेच म्हणावें लागेल त्या ऐवजी ब्रह्मसूत्रे, उपनिषदे आणि भगवद्गीता या प्रस्थानत्रयीच्या विवरणास आणि त्यावर केलेल्या भाष्यास अधिक महत्त्व आले प्रस्थानत्रयीत एकाच तत्त्वप्रणालीचें विवरण करण्यात आले आहे हे भिन्नभिन्न मताच्या आचार्यांनीं आपल्या भाष्याच्या आधारानें प्रतिपादिले आहे अशारीतीने त्रयीविद्या अथवा ऋग्यजु साम ह तीन वेद याच्यापेक्षा प्रस्थानत्रयीस धर्मक्षेत्रात अधिक प्रामाण्य मिळाले या ग्रथाच्या आधारानें निरनिराळया आचार्यांनीं धर्मतत्त्वाचे विवरण ७ व्या शतकापासून ते १६ व्या शतकापर्यंत केले आहे आठव्या शतकात आद्य शंकराचार्यांनी 'ब्रह्म सत्य जगन्मिथ्या जीवोब्रह्मैव नापर' हा सिद्धात प्रस्थान-त्रयीवरील भाष्याच्या आधाराने मडला ११ व्या शतकात रामानुजाचार्यांनीं विशिष्टाद्वैत मताच्या प्रतिपादनासाठी ब्रह्मसूत्रें व भगवद्गीता यावर भाष्ये लिहिलीं बाराव्या शतकाच्या सुमारास ब्रह्मसूत्रावर भाष्य लिहून आपला द्वैताद्वैत सप्रदाय निंबार्काचार्यांनी विशद केला तेराव्या शतकात मध्वाचार्यांनी प्रस्थानत्रयी व भागवतपुराण यावर भाष्ये लिहून द्वैतमताचें मडन केले पधराव्या शतकात वल्लभाचार्यांनीं ब्रह्मसूत्रे व गीता यावर भाष्यें लिहून आपला 'शुद्धाद्वैत' सिंद्धात माडला.

## भागवताचें वाढतें महत्त्व

उपरोक्त पाच आचार्यांपैकीं शेवटच्या चार आचार्यांनी आपल्या भाष्यात पुराणाचे आधार बरेच दिले आहेत मध्वाचार्य आणि वल्लभाचार्य यानीं तर भागवतावर भाष्येंच लिहिली आहेत त्यावरून या काळात प्रस्थानत्रयीइतकेच पुराणाना विशेषत. भागवत पुराणास प्रामाण्य आले होतें असे म्हणता येईल. हे चारहि आचार्य निरनिराळ्या उपासनापथाचे प्रवर्तक होते चौघेहि वैष्णवच परतु तत्त्वज्ञानासबधी– जीव, जगत् आणि परमेश्वर याच्या अन्योन्यसबधाच्या बाबतींत त्याचे निष्कर्ष वेगळे होते भक्तीचे महत्त्व या चारहि आचार्यांना मान्य होतें अर्वाचीन देशी भाषातील वैष्णव सप्रदाय याच चार आचार्यांच्या तत्त्वप्रणालीतून उदयास आले महाराष्ट्राने मात्र कोणत्याहि आचार्यांचें अनुयायित्व स्वीकारले नाहीं त्यामुळेंहि इतर भाषातील भागवतधर्मापेक्षा मराठी भाषेंतून विकसित झालेल्या भागवतधर्माचे स्वरूप निराळे दिसून येते

## शांकर वेदांत आणि भक्ति

महाराष्ट्रीय भागवतधर्म अद्वैती असला तरी शकराचार्यांच्या अद्वैतमताचा व तत्त्वज्ञानाचा मराठी सतानी पुरस्कार केला नाही हे लक्षात ठेवले पाहिजे कारण, भक्तीनें मोक्ष प्राप्त होतो ही महाराष्ट्रीय सताची निष्ठा असली तरी शकराचार्यांनी चित्तशुद्धीचे एक साधन यापेक्षा अधिक महत्त्व भक्तीस दिले नाही शकराचार्यांनीं अनेक स्तोत्रें रचलीं आहेत हरिमीडे स्तोत्र तर साक्षात् विष्णुभक्तिपर आहे 'स्तोष्ये भक्त्या विष्णुमनादिं जगदादिम्' असा या स्तोत्राचा प्रारभ आहे.

हित्वा हित्वा दृश्यमशेष सविकल्प मत्वाशिष्ट भादृशिमात्रगगनाभम्
त्यक्त्वा देहे यं प्रविशन्त्यच्युतभक्तास्तं ससारध्वान्तविनाश हरिमीडे[1] ॥

असें अच्युताचें स्तवनहि त्यानी केलें आहे हे खरें परतु उपासनेस विशिष्ट मर्यादेंतच त्यानीं मान्यता दिली आहे भक्ति म्हणजे सतत चिंतन[2] भक्ति म्हणजे स्वस्वरूपानुसधान (स्वस्वरूपानुसधान भक्तिरित्यभिधीयते–विवेकचूडामणि). उपास्योपासक भाव हा अद्वैतास बाधक आहे म्हणून अद्वैत-

प्रत्ययात देव आणि भक्त हे नातें सभवत नाहीं (ब्रह्मसूत्र, १–२–४ वरील शाकरभाष्य) अशी शकराचार्यांची भक्तिविषयक भूमिका आहे महाराष्ट्रातील सताना ही भूमिका मान्य नाही अद्वैतावस्थेंत देखील भक्ति उरतें असा ज्ञानेश्वर व एकनाथ याचा सिद्धात आहे [3] सगुणोपासना किंवा प्रतीकोपासना आचार्यांना मान्य असली तरी (ब्रह्मसूत्र ४–१–३ वरील शाकरभाष्य) या उपासनेने मोक्ष मिळत नसून ब्रह्मलोकाची प्राप्ती होते असे आचार्य मानतात [4] ब्रह्मलोकात जीव आणि परमेश्वर याचा भेद कायम राहतो पुढें या अवस्थेतून क्रममुक्ति मिळते सद्योमुक्ति मात्र प्राप्त होत नाही मोक्ष ज्ञानानेच मिळतो (ज्ञानादेव तु कैवल्यम्) म्हणून ज्ञानाखेरीज कोणतीच निष्ठा बधमोचक ठरू शकत नाही ज्ञान म्हणजे अद्वैत–प्रतीती या अवस्थेत कर्म सभवत नाही म्हणून चित्तशुद्धीसाठीं कर्म केल्यानतर सर्व कर्मांचा सन्यास केला पाहिजे ज्ञानप्राप्तीनतर कर्म करणें म्हणजे मुक्तावस्थेंतून बद्धावस्थेत उतरण्यासारखे आहे कर्मानें मोक्ष मिळत नाही तसें असतें तर कर्म हेंच अतिम साध्य बनले असते [5] कर्म आणि ज्ञान एकत्र नादू शकत नाही [6] असें शकराचार्य सागतात तर कर्मांची खती करणे हा दुराग्रहच आहे असे ज्ञानेश्वरप्रभृति सताचें म्हणणें आहे एकनाथानीं तर सन्यास म्हणजे कर्मसन्यास नव्हे असे अनेक ठिकाणी स्पष्ट केलें आहे

> भूता अभयदान उपक्रमु मवाभूतों मा आत्मा परमु ।
> हा सन्यासाचा मुख्यधर्मू तो धर्म पुरुषोत्तम स्वये मा म्हणे ॥
> भूतासी कायावाचा मने दुःख नेदूनि सुख देणे ।
> या नांव सन्यास धर्म म्हणणे तो धर्म मी म्हणे गोविंद ॥

(ए भा १६–२०९, २१०)

किंवा,

> ज्ञाननिष्ठा का मद्भक्त इहीं आश्रमधर्म दंडादियुक्त ।
> त्याग करावा हृदयी समस्त बाह्य लोकरक्षणार्थ राखावे ॥
> आश्रमधर्म समस्त करी परी विधिकिंकरत्व तो न धरी ।
> प्रतिबिंब कापता जळांतरीं आपण बाहेरी कांपेना ॥
> तेवी स्वधर्म कर्म कर्तव्यता करी परी नाही कर्मठता ।
> आपुली कर्मातीतता जाणे तत्त्वता निजधर्मी ॥

यपरी स्वधर्म कर्म करी परी विधीचे भय तो न धरी।
विधिनिषेध घालुनि तोडगी कर्मे करी अहैतुके ॥

(ए भा १८-१९१-९५)

त्याच प्रमाणे, भक्ति अद्वैतास विरोधी नसून चारी पुरूषार्थाचा तो मुकुटमणि आहे, ती सर्वश्रेष्ठ उपासना आहे ( देवो देवेचि पूजिजे देव होउनि देवा भजिजे-एभा २१४-९२) अशीहि महाराष्ट्राच्या सतांची निष्ठा असल्यामुळे (या बाबतीत शाकरमताचे व ज्ञानेश्वरादिक सतांचें मुळीच एकमत नाही अधिक विवरण परिशिष्टात दिलेल्या "शकराचार्य व ज्ञानेश्वर" या प्रकरणात करण्यात आले आहे ) शाकर मत आणि महाराष्ट्रीय सत याच्या तत्त्वज्ञानविषयक भूमिकेंत असलेला भेद लक्षात येईल.

## रामानुजांचें विशिष्टाद्वैत

शकराचार्यांनी सकुचित अर्थाने कोणत्या देवतेच्या उपसनेचा अथवा अन्य सप्रदाय रूढ केला नाही तत्त्वार्थावर त्यानी अधिक भर दिला म्हणून त्याना षण्मतस्थापनाचार्य असें म्हणण्याचा प्रघात आहे. शैव, वैष्णव, सौर, शाक्त, गाणपत्य आणि कापालिक या सप्रदायानी आचार्यांचा अद्वैत सिद्धात स्वीकारलेला आहे [७] रामानुजाचार्यांचें मात्र तसें नाहीं त्यानी विशिष्टाद्वैताचा पुरस्कार केलेला असला तरी श्रीविष्णूची उपासना स्वीकारली आहे वासुदेवाचे अनन्यभक्त असलेल्या आळवाराच्या परपरेंतून रामानुजाचार्य उदयास आले त्याचे आजेगुरु यामुनाचार्य यानीं आपल्या ग्रथामधून पांचरात्र सिद्धाताचा पुरस्कार केला आहे पाचरात्रमत हे वेदविरोधी असल्याचा शकराचार्यांचा सिद्धात यामुनाचार्यांस मान्य नाही. रामानुजानींहि ब्रह्मसूत्रावरील भाष्यात पाचरात्र सिद्धात वैदिकच असल्याचें ठाम मत दिलें आहे महाभारतातील शातिपर्वाचा अधार देऊन (४४९-६८) या पाचरात्राचा वक्ता स्वतः नारायण असल्यामुळें हे मत वेद विरोधी होऊ शकत नाही असें ब्र सू २-२-४२ वरील भाष्यात रामानुजाचार्य सागतात तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनेंहि शकराचाचार्याच्या सिद्धाताशीं हा सप्रदाय विरोधी आहे जगत् ही माया आहे अथवा मिथ्या आहे हे शाकरमत

त्यास मान्य नाहीं परमेश्वर हा चिदाचिद्विशिष्ट आहे जड आणि चेतन हे त्याचे गुणधर्म आहेत दृश्य जगत् हे त्याचें शरीर आहे जग सत्य आहे आणि नित्यहि जीवात्मा हा परमेश्वराचा गुणधर्म आहे परमेश्वर सर्वांतर्यामी असून परस्वरूप ( वैकुंठवासी नारायण ) व्यूहस्वरूप ( पांचरात्रोक्त चतुर्व्यूह ) विभवरूप (रामकृष्णादि अवतार) अंतर्यामी स्वरूप (सर्वांच्या अंतःकरणात वास करणारा) आणि मूर्तिस्वरूप या पांच रूपांत व्यक्त होत असतो परमेश्वर अद्वितीय असला तरी चिदचित् या गुणांनीं युक्त आहे शंकराचार्य एकमेवाद्वितीय पण निर्गुण परब्रह्म मानतात म्हणून एकाचें विशिष्ट अद्वैत तर दुसऱ्याचें अद्वैत मत तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत प्रसिद्ध आहे

रामनुजाचार्यांनीं कर्माचा तिरस्कार केला नाही. त्याचप्रमाणें कर्म-संन्यासावर भरहि दिला नाही उलट कर्मत्यागास विरोधच केला आहे गीता २–४१ वर भाष्य करतांना मोक्ष प्राप्तीसाठीं आसक्तिविरहित कर्म केलें पाहिजे असें रामानुजाचार्य सांगतात गीता, ३–८ वरील भाष्यांत, 'कर्मयोगांत अध्यात्म-ज्ञानाचा अंतर्भाव असल्यामुळें तोच श्रेष्ठ आहे' असा सिद्धांत मांडला आहे याच अध्यायांत २० व्या श्लोकावरील भाष्यांत ते म्हणतात, 'मुमुक्षु ज्ञानयोगाचा अधिकारी नसल्यामुळें कर्मयोगच त्यास आवश्यक असतो हे सांगून नंतर ज्ञानयोगापेक्षाहि कर्मयोगच श्रेष्ठ आहे हे युक्तीनें सांगितलें आहे'[८] हाच विचार पुन्हा ३–२९ वरील भाष्यांत मांडला आहे परंतु याच्याहि पलीकडे जाऊन कर्मयोग हा **स्वधर्म** असून ज्ञानयोग हा **परधर्म** आहे असें मत (५३–३५) त्यांनीं मांडलें आहे 'कर्मयोग जीवास सुसाध्य असतो. विगुण असला तरी त्याच्या योगें प्रमाद घडण्याची शक्यता नसते ज्ञानयोग दुःसाध्य आहे, परधर्म आहे गुणयुक्त असूनहि प्रमादयुक्त आहे म्हणून ज्ञानयोगापेक्षा कर्मयोगच श्रेयस्कर आहे'[९] पांचव्या अध्यायाची प्रस्तावना करतांना, 'आत्मज्ञान कर्मयोगान्तर्गत आहे, कर्मयोगांत प्रमाद नाहीं तो सुखसाध्य आहे. इतर सधनाची त्यास आवश्यकता नाहीं म्हणून ज्ञानयोगाच्या अधिकाऱ्यासाठीं सुद्धा कर्मयोगच श्रेष्ठ आहे' अशी कर्मयोगाची महती रामानुजाचार्यांनीं वर्णिली आहे सहाव्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकांतील 'यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव' या चरणावर

भाष्य करतांना 'ज्ञानयोग हाच कर्मयोग आहे' असें रामानुजाचार्यांनीं स्पष्टीकरण केलें आहे.

## भक्ति : साध्य आणि साधन

रामानुजाचार्यांनीं कर्मयोग आवश्यक गणला असून भक्ति हे परमसाध्य मानले आहे गीताभाष्याची प्रस्तावना करताना आचार्य म्हणतात, 'अर्जुनाला युद्धास प्रवृत्त करण्याच्या निमित्तानें परमपुरुषार्थ मोक्षाचा साधनरूप असलेला वेदान्तवर्णित, ज्ञानकर्मयोगाचेद्वारा साध्य, स्वविषयक भक्तियोग भगवतानीं प्रकट केला' म्हणजे भक्तियोग हाच गीतेंत प्रतिपादिला आहे अशी त्याची भूमिका आहे बाराव्या अध्यायाच्या प्रस्तावनेंत उपासनेचें साध्य परमेश्वर हा सर्वश्रेष्ठ असल्यामुळें भक्ति ही सर्व श्रेष्ठ आहे असा निष्कर्ष काढला आहे मोक्ष भक्तीनेंच प्राप्त होतो ज्ञान आणि कर्म हीं भक्तीचीं साधनें आहेत भक्तीमध्येंहि साधनभक्ति आणि पराभक्ति असे दोन भेद त्यानीं केले आहेत साधनभक्तीच्या द्वारें चित्तशुद्धि होऊन पराभक्तीची पात्रता अंगीं येते रामानुजपथात भक्तीचा मार्ग हा सर्ववर्णिकासाठीं खुला ठेवण्यात आला आहे कित्येक ठिकाणीं भक्ति आणि प्रपत्ति असे भेद करण्यात आले असून सर्वभावानें परमेश्वरास शरण जाण्याचा, तो योग्यवेळीं आपला उद्धार करील या विश्वासाने परमेश्वराची अनन्य शरणागती स्वीकारण्याचा प्रपत्तीचा मार्ग हा सर्ववर्णिकाकरिता असून भक्तीचा मार्ग मात्र त्रैवर्णिकाकरिता मर्यादित आहे असेंहि या पथाचें प्रतिपादन आहे

रामनुजाचे शिष्य आणि भाचे वेंकटनाथ यानी सर्वार्थसिद्धीनामक आपल्या ग्रथात रामानुजप्रणित भक्ति सप्रदायाचें विस्तारानें विवरण केले आहे मोक्ष भक्तीनेंच प्राप्त होतो 'महनीयविषये प्रीतिर्भक्तिः' अशी भक्तीची व्याख्या त्यानीं केली आहे[१०] भक्ति म्हणजे सततचिंतन (ध्रुवानुस्मृति) तें ज्ञानाचें कारणहि आहे आणि फलहि आहे कर्माचरण भक्ति वाढविण्यासाठीं करावयाचें असतें कर्मयोग हा मोक्षकारक नसून कर्मानें वाढणारी भक्ति ही मोक्षकारक आहे[११] भक्ति ही भावना नसून तो ज्ञानविशेष आहे अशी रामानुजाची भूमिका आहे[१२] जीव

परमेश्वराचा अंश आहे हे जाणणे म्हणजे ज्ञान परमेश्वर अविभाज्य असल्यामुळे त्याच्यापासून विभक्त झालेला अंश अशी अंशाची कल्पना नसून विशेषण-विशेष्य असे जीव-परमात्म्याचे संबंध आहेत परमात्म्याचा गुणधर्म जीव आहे हे ज्ञान प्राप्त झाल्यानंतर ध्रुवानुस्मृति किंवा सतत चिंतनाच्या योगानें त्याची भक्ति करणें हाच मुक्तिप्रद असा श्रेष्ठ योग आहे या भूमिकेवरून रामानुजाचार्यांनी भक्तियोगाचा पुरस्कार केला आहे.[13]

## द्वैताद्वैती निंबार्काचार्य

रामानुजाचार्यांनंतर आणि मध्वाचार्यांपूर्वी भक्तियोगाचा पुरस्कार करणारे दुसरे एक आचार्य होऊन गेले त्यांचे नाव निंबार्क इ स ११६५ हा निंबार्कांचा निर्वाणकाल मानला जातो[14] रामानुजांच्या मताचा निंबार्कांवर बराच परिणाम झालेला असला तरी त्याचें विशिष्टाद्वैत मत मात्र निंबार्कांनीं स्वीकारलें नाहीं द्वैताद्वैत संप्रदाय किंवा सनकादिक संप्रदाय या नावानें निंबार्कांचा पंथ प्रसिद्ध आहे त्यांनी प्रेमभक्तीचा पुरस्कार केलेला असल्यामुळें राधाकृष्णास या संप्रदायात बरेंच महत्त्व प्राप्त झालें त्यांच्या मताप्रमाणे जगहि सत्य आहे परमेश्वरहि सत्य आहे आणि जीव नित्य आहे मुक्तावस्थेत जीव परमेश्वरतादात्म्याचा अनुभव घेतो आणि भगवताच्या शक्तीचा अंश म्हणून त्याच्यात वास करीत असतो म्हणजे तो निराळाहि असतो आणि एकरूपहि असतो ही मुक्तावस्था भक्तीच्या योगाने प्राप्त करता येते ज्ञानप्राप्तीपर्यंतच वेदोक्त कर्मांची आवश्यकता साधकास असते ज्ञानप्राप्तीनंतर ज्ञानी माणसास वेदोक्त कर्म करण्याची आवश्यकता नाहीं अशी निंबार्कांची भूमिका आहे

## मध्वाचार्यांचें द्वैत

तेराव्या शतकातील मध्वाचार्यांनीं प्रस्थानत्रयी आणि भागवत पुराण यावर भाष्यें लिहून द्वैताचा सिद्धांत मांडला जग मिथ्या नसून सत्य आहे जीव-परब्रह्म एकरूप नसून त्याच्यात सदैव द्वैत आहे ते एकरूप होऊ शकत नाहींत बद्ध, मुक्त आणि नित्य अशा क्रमानें जीव प्रगति करु

शकतो. ज्ञान आणि भक्ति याच्या योगाने परमेश्वर प्रत्यक्ष होतो हरि आणि जीव याच्यात वायु हा मध्यस्थी करतो. वायु हा हरिसुत आहे लक्ष्मी ही विष्णुची शक्ति आहे भगवताच्या सर्जनशक्तीचें तें सगुणरूप आहे ज्ञानाने परमेश्वराच्या सामर्थ्याची कल्पना येते या ज्ञानातून भक्तीचा उदय होतो (ब्रह्मसूत्र–३–३–४९ व ३–३–५३ वरील माध्वभाष्य) असा त्याचा सिद्धात आहे वेदाध्ययनाचा अधिकार त्रैवर्णिकासच असला तरी वेदाताचा अभ्यास मात्र सर्वानी करावा अशी मध्वाचार्याची भूमिका आहे आपल्या भाष्यामधून त्यानी रामानुजाप्रमाणेच पुराणावर अधिक भर दिला आहे त्यावरून या काळात वेदोपनिषदें मागे पडत चालली होती व पुराणाचें प्रामाण्य वाढत होते असें म्हणण्यास हरकत नाही.

चौदाव्या शतकात होऊन गेलेल्या विज्ञानभिक्षूनेहि शकराचार्याच्या अद्वैतास विरोध करून द्वैत हेंच सत्य आहे असें प्रतिपादिले आहे [१५] परमेश्वर तपाने किंवा यज्ञाने प्राप्त होत नसून तो भक्तीनेंच प्राप्त होतो भक्ति ही प्रेमलक्षणात्मक आहे (अत्युत्तमा भाक्ति प्रेमलक्षणा) परमेश्वराचें नामस्मरण, गुणसकीर्तन, स्वरूपचिंतन इत्यादिकाचा भक्तीत अतर्भाव होत असून प्रेमानें परमेश्वराची सेवा करणे हेहि भक्तीचे मुख्य स्वरूप आहे असा विज्ञानभिक्षूचा सिद्धात आहे भक्तीच्या बाबतीत विज्ञानभिक्षूनें प्रेमावर अधिक भर दिला आहे रामानुजानी मानलेला व्यूहसिद्धात विज्ञानभिक्षूनें मानला आहे परतु वासुदेव–व्यूह हाच श्रेष्ठ असून इतर तीन व्यूह हे भगवताचे अशावतार आहेत वासुदेव व्यूह हाच परमेश्वराचा पूर्णावतार आहे असें विज्ञानभिक्षूचे म्हणणे आहे भक्ति ही प्रेमस्वरूप असते हीं नारदशाडिल्यादि सूत्रकाराची भक्तीची व्याख्या विज्ञानभिक्षूस अभिप्रेत दिसते

## मधुराभक्ति

विज्ञानभिक्षुप्रमाणेंच वल्लभाचार्यांनींहि भक्ति प्रेमलक्षणात्मक मानली आहे पधराव्या शतकात पुष्टिसप्रदायाचें प्रवर्तन करणाऱ्या या आचार्यांनीं शुद्धाद्वैताचा सिद्धात माडला पुष्टिसप्रदाय या नावानेंहि वल्लभाचार्यांचा पथ प्रसिद्ध आहे जग हे सत्य असून परब्रह्माशीं एकरूप आहे अशी त्यांची

भूमिका आहे. वृंदावनातील गोपीक्रीडा हे परब्रह्माच्या लीलेचें उत्कट स्वरूप आहे परमेश्वरावर आत्यंतिक प्रेम केल्यानें तो भक्तावर अनुग्रह करतो त्यासच पुष्टि असे म्हणतात त्यातूनच भक्ति निर्माण होते प्रेम, आसक्ति व व्यसन या भक्तीच्या तीन अवस्था वल्लभाचार्यांनी मानल्या आहेत राधाकृष्ण-भक्तीस या संप्रदायाने बरेंच महत्त्व दिलें. त्यामुळें पुढच्या काळात बरेंच विकृत स्वरूपहि या पंथास प्राप्त झालें. प्रस्थानत्रयी बरोबरच भागवत पुराणावर वल्लभाचार्यांनीं बराच भर दिला आहे

भक्ति हीच खरी मुक्ति आहे असा चैतन्यसंप्रदायाचा सिद्धांत आहे. माध्वसंप्रदायापासून स्फूर्ति घेऊन चैतन्याने पंधराव्या शतकात भक्ति-संप्रदायाचा पुरस्कार बंगालप्रांतात केला भागवतपुराणावर विशेषत कृष्णाच्या लीलेवर चैतन्याच्या भर अधिक आहे कृष्ण हेंच परब्रह्म असून ल्हादिनी शक्ति हे कृष्णाच्या चिच्छक्तीचे अत्युत्कट व श्रेष्ठ रूप आहे राधा या शक्तीचें सारसर्वस्व आहे. परमेश्वर अद्वितीय आहे जगदुत्पत्तीच्या दृष्टीनें विचार केला असताना परब्रह्म हाच भगवान् आहे केवळ तत्त्वाच्या दृष्टीनें विचार केला असताना भगवान् हेच परब्रह्म आहे परमेश्वराच्या शक्तिमुळें विश्व व जीव उदयास येतात जीव परमेश्वरापासून भिन्न असला तरी तो परमेश्वरावर अवलंबून आहे परमेश्वराच्या मायाशक्तीनें तो बद्ध होतो भक्तीच्या योगाने जिवाची कर्मबंधापासून मुक्तता होते कारण, भक्ति हीच खरी मुक्ति आहे असें या संप्रदायाचें मत आहे.

## निष्कामकर्मयोगाची उपेक्षा

आठव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंतच्या आठशें वर्षांच्या कालावधींत वैष्णव भक्तीचा विकास कोणत्या प्रकारें झाला याचें स्थूलमानानें दिग्दर्शन या प्रकरणात करण्यात आलें आहे आठशें वर्षांच्या कालावधींत झालेला विकास लक्षात घेता विष्णुभक्तीनें साधनाच्या स्थानापासून साध्याच्या स्थानापर्यंत प्रगति केल्याचें दिसून येईल. कर्माप्रमाणेंच भक्ति चित्त शुद्धीचें साधन आहे असा शंकराचार्यांचा सिद्धांत असून भज्य-भजक भाव अद्वैतास बाधक असल्यामुळें अद्वैतानुभवाच्या साध्यावस्थेंत भक्ति संभवत नाहीं असें त्याचें म्हणणें आहे. सतत चिंतन हे रामानुजाचार्यांनीं भक्तीचें

लक्षण मानलें आहे. भक्तीनेंच मोक्ष प्राप्त होतो अशी रामानुजाची निष्ठा आहे निंबार्कांनी प्रेमभक्तीचा पुरस्कार केला आहे ज्ञान आणि भक्ति याच्या योगानें परमेश्वर प्रत्यक्ष होतो अशी मध्वाचार्यांची भूमिका आहे भक्ति प्रेमलक्षणात्मक असून परमेश्वर भक्तीनेंच प्राप्त होतो असें विज्ञानभिक्षूचें म्हणणें आहे वल्लभाचार्यांनीहि प्रेमलक्षणात्मक भक्ति मानली आहे भक्ति हीच खरी मुक्ति आहे असा चैतन्याचा सिद्धात आहे. याचाच अर्थ असा की, मुक्तीच्या साधनापासून ते मुक्तीच्या स्वरूपापर्यंत भक्तीची प्रतिष्ठा या आठशें वर्षांत वाढत गेली केवळ चिंतनपरता हे भक्तीचे लक्षण प्रेमस्वरूप बनलें आणि भक्ति म्हणजे विष्णुविषयीं अत्यत प्रेम ही भावना पधराव्या शतकात प्रधान बनली.

भक्तीस मोक्षाचें स्वरूप प्राप्त होत गेलें तसतसें भागवतपुराणाचें महत्त्वहि वाढत गेलें निष्काम कर्मयोग हे भागवतधर्माचे स्वरूप गौण बनू लागलें आणि एकनाथ म्हणतात त्याप्रमाणे 'भक्तिप्रधान भागवत शास्त्र' ही भूमिकाच—भक्ति प्राधान्याची भूमिका हेच भागवतधर्माचे प्रधान लक्षण बनलें. भक्ति आणि निष्काम कर्मयोग विरोधी नसून परस्पर—पूरक आहेत ही गीतोपदिष्ट भागवतधर्माची भूमिका या काळात राहिली नाहीं भक्तीचें माहात्म्य वर्णिण्यासाठींच भागवतपुराणाचा अवतार झाल्यामुळें भक्तियोगाचा महिमा भागवतात मोठ्या प्रमाणात वर्णिला जाणें अपरिहार्य होतें तथापि, नैष्कर्म्याचा अनादर भागवत पुराणानें केला नाहीं. भागवतधर्माचीं लक्षणें ज्या ज्या ठिकाणीं सागण्यात आली आहेत त्या त्या ठिकाणीं निष्काम कर्मयोग किंवा परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करण्याचा आदेश भागवतकारानीं दिला आहेच. महाराष्ट्रातील सत वगळले तर इतर वैष्णवसंप्रदायात निष्काम कर्मयोगाकडे दुर्लक्ष झाले असेंच म्हणावें लागेल महाराष्ट्रातील आणि विशेषत एकनाथानी पुरस्कारिलेल्या भागवतधर्मातील या वैशिष्टयाचा विस्तार करण्यापूर्वी मध्ययुगात आधुनिक भारतीय भाषानीं पुरस्कारलेल्या वैष्णवभक्तीचा आढावा घेणें आवश्यक ठरते भागवतानें स्त्रीशूद्रानाच नव्हे तर परराष्ट्रिक व परधर्मीय याना भागवतधर्माचा अधिकार असल्याचें घोषित केलें होतें त्यामुळें सस्कृत विद्येपासून वचित झालेल्या सर्व वर्णांना धर्म सागण्यासाठीं प्राकृत भाषातून धर्मग्रथाची रचना होऊ

लागली कर्मठानीं व संस्कृतभाषाभिमान्यानी या नव्या प्रवृत्तीस विरोध केला असला तरी सामान्याचा उद्धार करण्याची भागवतधर्माची मूळ प्रेरणा इतकी प्रबळ होती की, या विरोधाचा या प्रवृत्तीच्या विकासावर पतिकूल परिणाम मुळीच झाला नाही भक्तिभागिरथीच्या पवित्र जलौघात सारा समाज पावन झाला, कृतार्थ बनला या धन्यतेचे सहजोद्गार देशीभाषातील कवनाच्या रूपानें बाहेर पडले "उस डोंगा परि रस नाही डोंगा" या चोखोबाच्या उक्तीप्रमाणे भक्तिरसानें रसरसलेलें हे वाङ्मय प्रवृत्ति, प्रात व भाषा याच्या भेदानें भिन्न भिन्न रूपात बाहेर पडले तरी भक्तिरस हा मात्र सर्वत्र समानच होता. मध्ययुगात या एकाच भावनेनें प्रेरित झालेलें वाङ्मय निर्माण झाले

## ८. टीपा

१ बापटशास्त्री (स) **"हरिमीडेस्तोत्रम्"**, श्लोक ११

२ "उपासन नाम यथाशास्त्र उपास्यस्य अर्थस्य विषयीकरणेन सामीप्य उपगम्य तैलधारावत् सामान्यप्रत्ययप्रवाहेण दीर्घकाल यदासन तदुपासन आचक्षते" गीता, १२–३ वरील **शाकरभाष्य**

३ तैसी क्रिया कीर न साहे तऱ्ही अद्वैती भक्ति आहे
हे अनुभवाचि जोगे नव्हे बोला ऐसे ॥ – **ज्ञानेश्वरी**, १८–२०५.
आपुली आपण भक्ती करीतसे अनन्यप्रीती
हेचि निरूपण वेदाती अद्वैतभक्ति या नाव ॥ **ए भा.** २–७१७

४ ब्रह्मसूत्र ४–३–१, ४–१–४, ४–३–१५ यावरील **शाकरभाष्य**

५. **Kokileshwar Shastri**, *An Introduction to Advaita Philosophy*, **P. 160**

६. **कित्ता**, १४२.

७ Dr Radhakrishnan, *Indian Philosophy*, Vol II, P 653

८ **श्रीमद्भगवद्गीता** (रामानुजभाष्य सहित) गोरखपुर प्रत, पृ ११२

९ गीता–३–३५ वरील **रामानुजभाष्य.**

१० Dasgupta, *History of Indian Philosophy*, Vol. III P. 292

११ **कित्ता**, पृ २९३

१२ **कित्ता**, पृ १६१

१३ याच पथाच्या आळवाराच्या भक्तीचे स्वरूप पुढील प्रकरणात विशद करण्यात आले आहे

१४ Dasgupta, *History of Indian Philosophy*, Vol III, P 399.

१५ **कित्ता**, पृ ४५०–४९५

# १. भागवतधर्माचें मध्ययुगीन स्वरूप

—तामीळ आळ्वार—तेलुगु भाषेतील अभाव—कानडी हरिदास—हिंदी भाषेतील भक्तिपर वाङ्मय—कृष्णभक्तिपर हिंदी काव्य—भक्ति संप्रदायाचे पथ्य—सूफी संप्रदाय—बंगालमधील चैतन्य संप्रदाय—भक्तिसंप्रदायातील आरोह व अवरोह—राधा आणि रुक्माई—मराठी संताची लोकाभिमुखता—भक्ति आणि कर्मयोग—'भाव तैसा देव'—

भारतातील भक्तिगंगेच्या तीरावरून दक्षिणोत्तर प्रवास करीत असतां मनोवेधक दृश्य पहावयास सापडतें उत्तर आणि दक्षिण एकाच भारतीय संस्कृतीचे घटक असले तरी दहा कोसावर भाषा बदलते त्याप्रमाणें भिन्न भाषांच्या क्षेत्रात एकाच भारतीय संस्कृतीचा भाषा व प्रांत वैशिष्ट्याना अनुसरून विकास झालेला दिसतो. आर्यांच्या भरभराटीच्या काळात धार्मिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या उत्तरेकडून दक्षिणेस प्रकाश मिळाला बौद्धपंथाच्या वैभव काळात वैदिकधर्मास दक्षिणे खेरीज अन्य आश्रयस्थान नव्हतें. पुढें उत्तरेंत वैदिकधर्माच्या पुनरुज्जीवनाच्या काळात जैन आणि बौद्ध पंथाना दक्षिणेनें आश्रय दिला दक्षिणेनें 'वैदिक' व 'अवैदिक' या सर्व पंथाना सारख्याच मनानें व औदार्यानें वागविलें वैदिक, जैन व बौद्ध या त्रिवेणी—संगमातून वेरूळ आणि अजिंठ्यासारखें चिरंतन कलावैभव जन्मास आलें. समुद्रवलयांकित पृथ्वी हीच आपल्या महत्त्वाकांक्षेची सीमा न मानता सागरांच्या सीमेचेंहि उल्लंघन करून परराष्ट्रात भारतीय संस्कृतीचें बीजारोपण करण्याची प्रेरणा दाक्षिणात्यानीं भारतास दिली. इंडोनेशिया व इंडोचायना सारख्या पौर्वात्य प्रदेशात अद्यापहि दिसून येणारे भारतीय संस्कृतीचे अवशेष याच विक्रमशाली वृत्तीची साक्ष देतात. राक्षसतागडीच्या लढाईत विजयनगरसाम्राज्याचा मोड होईपर्यंत वैदिक संस्कृतीचें संरक्षण करण्याची

परपरा दाक्षिणात्यानीं चालविली आणि त्यानतर शिवछत्रपतींच्या महा- राष्ट्रानें हे व्रत चालविलें उत्तर–भारतातील मध्ययुगीन भक्तिसंप्रदायाना प्रेरणा देणारे सर्वच आचार्य दाक्षिणात्य होते हेहि या सदर्भात ध्यानात ठेवण्यासारखें आहे

भक्तिप्राधान्य हे मध्ययुगीन भारतीय वाङमयाचें वैशिष्ट्य आहे इ स. च्या ४ थ्या शतकापासून सस्कृत वाङमयातहि भक्तिप्राधान्य आढळून येतें. दहाव्या शतकापर्यंत म्हणजे देशी भाषाच्या विकास–काळापर्यंत सस्कृत वाङ्मयात ही प्रवृत्ति वाढत्या प्रमाणात प्रत्ययास येते प्रचलित भारतीय भाषानीं आपला ससार प्रामुख्यानें भक्तीचा प्रपच करूनच थाटला त्यामुळें सस्कृत आणि प्राकृत या दोन्ही भाषातील वाङ्मयात भक्तिगगा दुथडी भरलेली दिसून येईल सास्कृतिक विकासाच्या दृष्टीनें मराठी, कानडी, तामीळ, बगाली आणि हिंदी या पाच प्रमुख भाषातील भक्तिप्रधान वाङ्मयाचा तौलनिक अभ्यास उद्बोधक ठरेल इ. स च्या दुसऱ्या तिसऱ्या शतकापासून ते १६ व्या शतकापर्यंत म्हणजे सुमारे चौदाशें वर्षें- पर्यंत भिन्न प्रातातील वाङ्मयावर भक्तीचा प्रभाव स्थिर स्वरूपात पडलेला दिसतो स्वभावभेदानें अथवा प्रातिक वैशिष्ट्यामुळें किंवा भाषाभेदानें भक्तीचें स्वरूप बदलत गेलें असलें तरी भक्तिप्राधान्यास कोठेंहि बाध आला नाहीं. भारतीय सस्कृतींत असलेली अभिन्नतेंतील विभिन्नता आणि एकात्मकतेंतील विविधता भारतीय भाषातील भक्तिसप्रदायाच्या तौलनिक अभ्यासानें सहज प्रत्ययास येते त्याप्रमाणें कर्मठ दाक्षिणात्य, बुद्धिवादी व समाजहितदक्ष मराठे, रगेल 'हिंदुस्थानी' आणि स्वप्नाळु बंगाली हे स्वभावविशेषहि या वाङमयात प्रतिबिंबित झाले आहेत या दृष्टीनेंहि हा तौलनिक अभ्यास उद्बोधक ठरेल

## तामीळ आळवार

कालानुक्रमाचा विचार केला तर प्राकृत भाषेंतून विष्णुभक्तीचा प्रसार करणारें प्राचीनतम वाङमय तामीळ भाषेंत आढळतें तामीळ आळ- वाराच्या कालासबधीं विद्वानांत मतैक्य नसले तरी इ स. च्या दुसऱ्या तिसऱ्या शतकापासून आळवारानीं आपलीं कवनें रचली असे मानण्याकडे

जाणत्याचा अधिक कल दिसून येतो.[१] भागवतात आणि पद्मपुराणात द्राविड देशातील 'नारायणपर' भक्ताचा उल्लेख आढळतो तामीळ आळवाराना उद्देशून हा उल्लेख असण्याची शक्यता अधिक आहे

सामान्य जनास सहज समजणारा भावनामय भक्तिधर्म आळवारानीं आपल्या कवनामधून प्रतिपादिला आहे 'परमेश्वराच्या ज्ञानानें ओतप्रोत भरलेला आणि ईशचिंतनात गढून गेलेला' असा आळवार या शब्दाचा अर्थ हूपर याने दिला आहे[२] परमेश्वरचिंतनात गढून गेलेल्या या आळवारानी अनेक कवनातून आपले अनुभव ग्रथित केले आहेत महाराष्ट्रातील भागवतपरपरेप्रमाणेंच आळवारानीहि सर्व वशाच्या, वर्णाच्या व जातीच्या लोकाना आपल्या परपरेंत स्थान दिलें आहे या आळवारातील सर्वश्रेष्ठ गणलेला नम्म आळवार हा वर्णानें शूद्र होता, कुळशेखर आळवार हा त्रावणकोरचा राजा होता, अन्दाल ही स्त्री होती ती श्रीरगम्‌च्या देवळात गुप्त झाली अशी आख्यायिका आहे विठ्ठलभक्त कान्होपात्राच्या आख्यायिकेची आठवण यावरून सहज होण्यासारखी आहे.

महाराष्ट्रातील सताप्रमाणेच आळवारानीं गुरूला आणि साधुसतानाहि महत्त्वाचें स्थान दिले आहे आळवार हे प्रामुख्यानें विष्णूचे उपासक असले तरी 'हरिहरा नाही भेद' ही भावना कित्येक आळवाराच्या कवातून दिसून येते. पेय आळवार म्हणतो, 'तिरुपतीच्या पवित्र शिखरावर शिव आणि विष्णू एकरूप झाले आहेत, वनमालाधारी विष्णु हा त्रिशूलधारी नागाविभूषित शिवासारखा दिसतो' 'विठोनें शिरीं वाहिला देवराणा' असें महाराष्ट्रातला सत म्हणतो, तर पोकीं आळवार या द्राविड साधूस 'शिव आणि विष्णु 'हे एकाच शरीरातून कधीं विभक्त होतात तर कधी एकरूप होतात शिव आणि विष्णु एकाच शरीरात निरंतर वास करतात' असें वाटतें

उपास्य दैवताविषयींची ही उदार वृत्ति मात्र पुढें फार काळ टिकली नाहीं. रामानुजाच्या उदयानतर 'श्रीविष्णु'–पूजेविषयीं आत्यतिक आग्रह या परपरेंत निर्माण झाला त्याचप्रमाणें साध्या भोळ्या भक्तीच्या भावनेवर कठोर तत्त्वचर्चेचें पुट चढलें व लोकाना सहज समजणारी तामीळ भाषा जाऊन सस्कृत भाषेला प्रतिष्ठेचें स्थान प्राप्त झालें.

रामानुजाचार्यांचे आगोदर नाथमुनि यानीं इ. स. ९२० च्या सुमा-

रास आळवाराच्या कवनाचा गाथा सकलित केला त्यास 'नालायिर प्रबंधम्' असें सबोधण्यात येतें चार हजार कवनाचा हा सग्रह भक्तिपथाची सर्वश्रेष्ठ गाथा गणली जाते श्रीवैष्णवाच्या देवालयात वेदाप्रमाणेंच या प्राकृत सग्रहाचे पठन होत असतें

रामानुजाचार्यानतर या वाङ्मयास ओहटी लागली कारण, याच सुमारास आळवार आणि आचार्य असे दोन वर्ग या पथात निर्माण झाले आचार्यांच्या पाठीशीं विद्येचें आणि सामाजिक प्रतिष्ठेचें पाठबळ असल्यामुळे सामाजिक नियत्रण या वर्गाकडे गेलें त्यामुळे कर्मठपणा, व्यावहारिक दृष्टया वर्णभेदाचें परिपालन हे दोष या पथात शिरले व त्याची गतिमानता रुद्ध झाली आणि हा पथ कर्मठ ब्राह्मणाचाच एक उपासनापथ बनला

या व इतर अनेक कारणामुळे समाजविकासाच्या दृष्टीनें तामीळ आळवाराना भरीव कामगिरी करता आली नाहीं महाराष्ट्रातल्या भागवतधर्मानें जनसामान्याचे जीवन घडविलें, सुलभ, सोपा आचारधर्म त्यानी उपदेशिला व 'धर्माची व नीतीशीं शेस भरली' तसें कार्य आळवाराना करता आलें नाही आळवाराच्या भक्तींत उत्कटता आहे परतु व्यक्ति आणि समाज याचा सर्वांगीण विकास साधणें हे जें भागवतधर्माचें उद्दिष्ट आहे तें मात्र आळवारानीं दृष्टिआड केलेले दिसतें आळवारानी समाजधर्माचा विचार केला नाहीं भक्तीला नीतीची जोड पाहिजे भक्तीवर समाजाला धडे देण्याची जबाबदारी असते ही जाणीव महाराष्ट्रातील सतामध्यें तीव्रतेनें दिसून येते या जाणीवेचा अभाव आळवाराच्या वाङ्मयात जाणवतो हे तौलनिक अभ्यास करताना लक्षात आल्यावाचून रहात नाहीं

## तेलुगु भाषेंतील अभाव

रामानुजाचार्यांच्या नतर दक्षिणेतील भक्तिसप्रदायास आन्ध्रप्रदेशीय निंबार्काचार्यानीं आपल्या विशिष्ट दृष्टिकोनानें निराळें वळण दिले. राधाकृष्णभक्तीस निंबार्कानें प्रेम रूप मधुराभक्तीचें रूप देऊन द्वैताद्वैत सप्रदायाची प्रतिष्ठापना केली परतु त्याना आपल्या प्रातात विशेष अनुकूल भूमि मिळाली असें दिसत नाहीं आन्ध्र कवींची दृष्टि राजवैभवानेच सदासर्वकाळ स्तिमित झालेली दिसते आन्ध्रप्रातात भक्त झाले नाहींत असें नाही. परंतु

भक्तकवींची संख्या इतर प्रांताच्या मानानें अत्यल्पच म्हणावी लागेल. त्यामुळे त्या त्या भक्तांच्या हयातीतच लोकजीवनावर त्यांचा जो परिणाम झाला असेल तेवढाच भक्तकवींची परंपरा आंध्रदेशाला लाभली नाहीं त्यामुळे भक्तीचा आणि समाजजीवनाचा विकास एकाच वेळी परस्पराव-लंबी व परस्परपूरक अशा स्वरूपात या प्रांतात कधींच होऊं शकला नाहीं इ स. १४०० ते १४५० च्या सुमारास संपूर्ण भागवतावर रचना करणारा एकच भक्तकवि या प्रांतात होऊन गेला त्याचें नांव पोतना आपले ग्रंथ एखाद्या राजाला वा जमीनदाराला अर्पण करून सुखी जीवन व्यतीत कर-ण्याचा रूढ मार्ग या भक्तानें स्वीकारला नाहीं त्यामुळे बराच काळ तो अज्ञातहि राहिला. त्याच्या एका शिष्याने एकादशस्कंधातील कांही भाग व द्वादश-स्कंधावरील पोतनाची टीका पूर्ण केली 'माझ्या ग्रंथाला पुनर्जन्म लाभणार नाहीं' अशी पोतनानें प्रतिज्ञा केली होती ती वाच्यार्थानें देखील पूर्ण झाली ! जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्ति मिळावी म्हणून संस्कृत भाग-वताचा पोतनानें तेलुगु भाषेंत अनुवाद केला. त्याच्यानंतर तेलुगु भाषेंत एकाहि कवीने भागवतावर रचना केली नाहीं !

## कानडी हरिदास

रामानुजाचार्यानंतर दोनशे वर्षांनीं कर्नाटक प्रदेशांत मध्वाचार्यांनी द्वैत-संप्रदायाची मुहूर्तमेढ रोवली प्रस्थानत्रयीवर संस्कृत भाष्यें लिहून शंकरा-चार्यांचा अद्वैत सिद्धांत, रामानुजाचार्यांचा विशिष्ट अद्वैत पंथ व निंबार्कांचा द्वैताद्वैत मार्ग यांचें निर्मूलन करून जीव आणि परमेश्वर यांचें सनातन द्वैत प्रतिपादणाऱ्या या आचार्यानें विष्णुभक्तीचा प्रसार केला

मध्वाचार्यांपासून स्फूर्ति घेऊन बऱ्याच कानडी कवींनी भक्तिप्रधान वाङ्मय लिहिलें त्यांना 'हरिदास' असें म्हणतात. महाराष्ट्रांतील संतांचें आणि हरिदासांचें पुष्कळ बाबतींत साम्य दिसून येतें हरिदासांनीं आपल्या भक्तिप्रधान कवनांनी कानडी वाङमय समृद्ध केलें आहे. ज्या संस्कृत-प्राकृत ग्रंथरचनेच्या वादास ज्ञानेश्वरापासून एकनाथापर्यंत सर्वच संतांना तोंड द्यावें लागलें होतें तोच वाद हरिदासांनीं ग्रंथरचना केली त्याहि वेळीं होता. नरहरि तीर्थ आणि जगन्नाथदास यांनीं एकनाथाप्रमाणेंच प्राकृत

भाषेविषयीं अभिमानाचे उद्गार काढले आहेत सगीत आणि नाट्य याचा समन्वय हरिदासाच्या वाङमयात दिसून येतो

पढरपुरच्या पाडुरगानें महाराष्ट्र आणि कर्नाटक याना अधिक जवळ आणलें आहे. पाडुरग हा कानडी की मराठा हा अद्यापहि विद्वानाच्या वादाचा विषय असला तरी सतानीं तो वादातीत करून ठेवला आहे [३] पाडुरगभक्ति महाराष्ट्राप्रमाणें कर्नाटकातहि प्रचलित होती श्री पंचमुखी याच्या मतें हा पाडुरग कानडी देव असून तो कर्नाटकात 'अभग विठ्ठल' या नावानें ओळखला जातो मराठी सतानीं अभगरूपानें त्याची स्तुति केली म्हणून हे नाव पडलें नसून शिल्पाच्या प्रकारावरून हे नाव पडलें आहे पंडित भगवानलाल इद्रजी यानी पढरपुरच्या विठ्ठलाचें शिल्प ६ व्या शतकातले ठरविलें असले तरी पचमुखी याच्या मतें हे शिल्प चौथ्या किंवा फार तर पाचव्या शतकातील आहे [४]

इ स ८५० च्या सुमारास 'कविराजमार्ग' या चपूधर्तीवर लिहिलेल्या ग्रथाच्या रूपानें कानडी वाङमयास आरभ झाला असला तरी विष्णुभक्ति-पर रचना करणारा पहिला कानडी कवि रुद्रभट हा मानला जातो 'जगन्नाथ विजय' हा विष्णुपुराणावर अधारलेला चपुग्रथ त्यानें रचला राइस याच्या मतें त्याचा काळ इ स ११७२ ते १२१९ असा आहे. इ स. १३०० च्या सुमारास पाडुरगभक्त चौंडरस होऊन गेला त्यानें दडीच्या दशकुमारचारित्रावर आधारलेला 'अभिनव दशकुमारचरिते' हा ग्रथ कानडींत लिहिला या ग्रथात 'अभगविठ्ठलभृत्य' असा त्यानें स्वत चा उल्लेख केला आहे त्याचप्रमाणें पढरीच्या विठ्ठलाचें वर्णनाहि त्यानें आपल्या ग्रथात केलें आहे. (परिशिष्टात या काव्यातील पढरपुरच्या वर्णनाचा आवश्यक भाग दिला आहे) चौदाव्या शतकाच्या नतरच्या काळात ज्ञान-मार्गीय आणि भक्तिमार्गीय अशा दोन परंपरा कानडीवाङमयात रूढ झाल्या. त्याना 'व्यासकूट' आणि 'दासकूट' असे सबोधण्यात येतें [५]

दासकूटाचा आरभ नरहरितीर्थापासून मानण्यात येतो. नरहरितीर्थ हा १४ व्या शतकात होऊन गेला परतु एकदोन पदाव्यतिरिक्त त्याचें वाङ्मय उपलब्ध नाहीं त्यामुळें श्रीपादराय यासच दासकूटातील पहिल्या कवीचा मान देण्यात येतो. [६] हे सर्व दास माध्वसप्रदायी होते [७] मध्वा-

चार्यांनी ज्ञानयोग आणि भक्तियोग याचा समन्वय केला आहे आचार्यांचा ज्ञानयोगी हा भक्तियोगी आणि कर्मयोगीहि आहे साधकानें कर्तव्य म्हणून कर्म केले पाहिजे. ज्ञात्यानें लोकसग्रहासाठीं तें केलें पाहिजे परमेश्वरावर ज्याचा विश्वास नसतो असेच कर्मयोगाचा तिरस्कार करतात अशी मध्वाचार्यांची शिकवण आहे. या शिकवणीचे पडसाद विशेषत भक्तिप्राधान्य हरिदासाच्या वाङ्मयात आढळून येतें

व्यासरायाचे शिष्य पुरदरदास आणि कनकदास हे हरिदासवाङ्मयातील श्रेष्ठ कवि आणि सत होऊन गेले पुरदरदासाचा जन्म महाराष्ट्रात पुरदरगडावर झाला शके १४८६ च्या सुमारास त्याचा मृत्यु मानला जातो ते एकनाथाचे समकालीन होते. एकनाथानी निदकास गुरु म्हणून गौरविलें आहे त्याचप्रमाणें पुदररदासहि निदकास गुरु मानतो 'तो आमचे पाप धुणारा आहे' असे उद्गारहि त्यानें काढले आहेत हिंदुतुर्कसवादात 'पाच वक्त खुदाचे इतर काय चोराचे' असा सवाल नाथानीं केला आहे. पुरदरदासानेंहि तोच प्रश्न टाकला आहे श्रेष्ठ भक्त म्हणूनहि त्याचा लौकिक आहे तो इतका की दास म्हणजे पुरदरदास असें समीकरण कानडीवाङमयात रूढ आहे एकनाथानीं अनेक जोहार लिहून खरा महार कसा असतो याचें दिग्दर्शन केलें आहे पुरदरदास आपल्या एका कवनात म्हणतो, 'महार हा गावाबाहेर रहात नाही तो गावातहि असतो दुराचारी माणूस हाच खरा महार. गुरूची निंदा करणारा श्रेष्ठ महार. आत्मस्तुति, परनिंदा, परद्वार, करणारे महारच

'होलेया होरगाहने ऊरोळ गिल्लवे
होलेगेम्मियलु होलेया होले तिल्लवे
पुरदर विठ्ठल नेन्नदेव पापी होलेया'

नाथांनीं गुरु आणि परब्रह्म एकरूप मानले आहेत त्याचप्रमाणें वैष्णव आणि परब्रह्म एकच असल्याचें पुरदरदास सागतो, 'पाण्यात दुध मिसळलें तर त्यास पाणी म्हणावें काय? मोती पाण्यातून निर्माण झालें तरी त्यास पाणी म्हणता येत नाहीं. त्याचप्रमाणें भक्तांस नर म्हणता येत नाही. भक्त हा चरब्रह्म असतो. त्यास नर मानणारा रौरावाचा धनी होतो.

नोडिरै कल्प भूरूहर । नाटो लगच्युत दासरु नरें
परब्रह्म विष्णु चरब्रह्म वैष्णव । परि किसलरियरू मतिभ्रष्टरु
धरेयलु पुरदर विठ्ठल न दासर । नरेरदवगे घोर रौरव नरक८

परमेश्वर हा भक्ताधीन असल्यामुळें भक्त परमेश्वरापेक्षा श्रेष्ठ आहे असे विचार एका कवनात पुरदरदासाने व्यक्त केले आहेत तो म्हणतो,

'नीने बल्लदिनु हरि, निन्नदास बलिदरो '

एकनाथाच्या भारूडाप्रमाणें रूपकगर्भ भाषेत अध्यात्मज्ञान सागणारा प्रसिद्ध कवि कनकदास हा याच काळात म्हणजे शके १४४२ च्या सुमारास होऊन गेला अशा रूपकास कानडीत मुडगी म्हणतात कनकदास हा जातीचा धनगर उडपीच्या कृष्णमदिरात त्याला प्रवेश मिळाला नाहीं. कर्मठ ब्राह्मणाचा त्यास विरोध होता म्हणून आपल्या भक्तिसामर्थ्यानें कनकदासानें कृष्णमदिराचें तोंड फिरविलें अशी आख्यायिका आहे नामदेवानें औंढयाच्या नागनाथमदिराचे तोंड फिरविलें या आख्यायिकेचें वरील आख्यायिकेशीं बरेंच साम्य आहे जन्मजात श्रेष्ठकनिष्ठता मानणें किती वेडेपणाचें आहे हे एका कवनात कनकदासानें सुदर रीतीनें सागितलें आहे. तो म्हणतो, 'कुळाचा का बडीवार माजविता? आत्म्याला कुळ असतें? जिवास कोठें कुळ असतें? अंतरांत असलेला भगवान् प्रसन्न झाल्यावर कुळाचा विचार करण्याचें कारणच नाहीं.

कुल कुल कुल व्यन्नुति हरो
कुल यावुदु सत्यसुख सज्जनरिगे
आत्म याव कुल, जीव याव कुल
तत्त्व पचेंद्रिय कुल यावुदु
अतरात्मा न्यलेयादि केशव
आत नोलिद्मोले या नर कुलवो

भक्तिपर मधुर कवनाव्यतिरिक्त मोहनतरंगिनी, नलचरित्रे, कृष्णचरित्रे आणि विष्णुभक्तिसार हे ग्रथहि त्यानें रचले

मानवजातीविषयीं अथाग प्रेम, व्यापक अनुभव आणि परमेश्वराच्या भक्तिवर अनन्य निष्ठा हे पुरंदरदास आणि कनकदास याच्या वाङ्मयाचें

वैशिष्टय म्हणता येईल. हरिदासाची परंपरा अठराव्या शतकापर्यंत चालू राहिलेली दिसत असली तरी विजयनगरसाम्राज्याच्या लोपानतर म्हणजे कनकदास आणि पुरदरदास याच्या कालानतर हरिदास वाङ्मयातील मूळ तेज लुप्त झाल्यासारखें दिसते नतरच्या काळात या वाङ्मयात साप्रदायिकता आणि कृत्रिमता अधिक प्रमाणात आढळून येते त्यामुळें पुढच्या कालात व्यापक समाजनिष्ठेची दृष्टि राहिली नाहीं कर्मठपणा अधिक आला त्यामुळें समाजास प्रेरणा देण्याचे कार्य या पथास पुढच्या काळात करता आलें नाहीं

## हिंदी भाषेंतील भक्तिवाङ्मय

दक्षिणेंत रामानुजाच्या भक्तिसप्रदायाची परपरा उत्तरेत रामानदानीं चालविली रामानद हे हिंदी भाषेंतील भक्तिवाङमयाचे अध्वर्यू मानले जातात ते स्वत रामानुजपथीय असले तरी उपासनेसाठीं त्यानीं श्रीरामचद्र हे दैवत स्वीकारलें होतें तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें देखील त्यानीं रामानुजाचे सिद्धात जसेच्या तसे मान्य केले असतील असें म्हणता येत नाहीं विशिष्टाद्वैत सिद्धान्तापेक्षा अद्वैतास रामानद अधिक जवळचे वाटतात त्याच्या शिष्यपरपरेत कबीरासारखा निर्गुण उपासनेचा कट्टर पुरस्कर्ता उदयास आला त्याची तत्त्वप्रणाली अद्वैतपर आहे इतकेंच नव्हे तर ज्ञानेश्वराच्या तत्त्वप्रणालीशीं त्याचें विलक्षण साम्य आहे असें श्री रा द. रानडे यानीं आपल्या एका ग्रथात दर्शविलें आहे [९] कबीरानें आपल्या बीजक ग्रथात नामदेवाचा उल्लेख केला आहे [१०] कबीराचा जन्म इ. स. १३६८ सालीं झाल्याचें विद्वानानीं निश्चित केलें आहे नामदेवाचा समाधिकाळ इ स १३५० असा आहे त्या दृष्टीनें नामदेव हा हिंदी वाङ्मयात भक्तिप्रधान काव्यरचना करणारा पहिला कवि ठरतो हिंदी भाषेंतील विद्वानानींहि हे मत आता मान्य केलें आहे [११] नामदेवाच्या काळापर्यंत हिंदी काव्यात भक्तिरसाची भावना अस्पष्ट होती, नामदेवाच्या काव्यात ती स्पष्ट स्वरूपात दिसून येते, नामदेवाच्या काव्यानें सतकाव्याला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली असें सागून डॉ भटनागर लिहितात, 'इस प्रकार हम कह सकते हैं कि भक्तिकालके आरंभ में ही सतमत की प्रतिष्ठा हो चुकी थी। इसका

साहित्यिक रूप पढरपुर महाराष्ट्रमे प्रतिष्ठित हुआ।[१२]

महाराष्ट्राचा आद्य कीर्तनकार व पढरपुरच्या वाळवटात अठरापगड जातीच्या भक्ताना सघटित करणारा नामदेव हिंदी भक्तिकाव्याचा अध्वर्यू ठरतो. नामदेवाच्या काव्याचा हिंदीचे प्रभावी कवि, विख्यात सत याच्या वाङमयावर बराच परिणाम झालेला दिसून येतो कबीरानें शुक, उद्धव, शकर इत्यादि विष्णूच्या श्रेष्ठ भक्ताच्या पक्तीस नामदेवास बसविलें आहे ही एकच गोष्ट नामदेवाविषयीं कबीराच्या मनात किती आदर होता हे स्पष्ट करते कबीर म्हणतो

> जागे सुक उधव अक्रूर, हणवत जागे लै लगूर
> सकर जागे चरण सेव, कलि जागे नामा सदैव ॥

तसें पाहिलें तर नामदेव कबीराचे समकालीन नव्हते आणि गुरु तर नव्हतेंच पढरपूरच्या वाळवटात भक्तिप्रेमाची गगा आषाढी–कार्तिकी यात्रेच्या पर्वकाळीं भरून जात असे त्या वेळीं उत्तरभरातातील बरेच सत ही पर्वणी साधीत व स्वत.स पावन करून घेत कबीर पढरपुरास आल्याच्या आख्यायिका सतमडळात रूढ आहेत त्याच्या मुलानें–कमालनें पढरपुरच्या विठोबाचें केलेलें वर्णन आज उपलब्ध आहे महाराष्ट्राच्या सतपरपरेनें उत्तरभारतावर साक्षात् परिणाम केला होता हे एक सत्य आहे

नामदेवानतरचा हिंदी साहित्यातील श्रेष्ठ कवि कबीरच कबीर रामानदाचा शिष्य हे रामानंद रामानुजाचार्यांच्या सप्रदायातले परतु रामानुजाचार्यांच्या श्री–विष्णु या उपास्य देवताच्या ऐवजीं त्यानी सीताराम या उपास्य देवताचा अवलंब केला. रामानंदाचें वाङ्मय दोन पदाव्यतिरिक्त फारसें उपलब्ध नाही एक पद शिखाच्या आदिग्रथातील सग्रहात असून निर्गुण निराकार परब्रह्माचें वर्णन करणारें आहे दुसरें पद हनुमताच्या स्तुतिपर आहे रामाच्या सगुण देहधारी मूर्तीपेक्षा निर्गुण निराकार परब्रह्मरूपी रामाची उपासना रामानदानीं पुरस्कारिली असावी. त्यांच्या प्रमुख बारा शिष्यात हिंदु आणि मुसलमान या धर्मांचे तसेच सर्व वर्णांचे लोक होते सर्व जातींविषयी आणि धर्मांविषयीं समान भावना हे रामानदाच्या उपदेशाचें प्रथम सूत्र असल्यामुळें मुसलमानी आक्रमणामुळें खिळखिळया

झालेल्या समाजावर त्यांचा बराच प्रभाव पडला असें मानण्यास बराच आधार आहे

रामानदाच्या शिष्यात कबीर (इ स १४४० १५५८) हा श्रेष्ठ गणला जातो त्याप्रमाणें निर्गुणोपासक भक्तकवींत त्याचें महत्त्व अनन्य-साधारण असे आहे समाजातील ढोंगावर, कर्मठ ब्राह्मणावर, दाभिक आचारावर, धर्माच्या सकुचित कल्पनावर इतके कडक कोरडे ओढणारा कवि हिंदी काव्यात दुसरा झालाच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. समाजातील दोष दूर व्हावेत, समाजानें सन्मार्गाने वागावें ही तळमळ कबीराच्या काव्यात आहे परतु समाजाचें नेतृत्व करण्यास लागणारी सर्व-सग्राहक वृत्ति त्याच्या वाङमयात दिसून येत नाहीं एकनाथ–तुलसीदासानी समाजाला कधी रागाने झिडकारले तर अनेकदा प्रेमानें कुरवाळलें आहे. क्षुद्र देवता, यज्ञयागादिक विधि याचा उघड निषेध न करता त्यास आध्या-त्मिक रूपकाची प्रतिष्ठा देऊन सर्वत्र परमेश्वर पाहण्याचा व्यापक दृष्टिकोन एकनाथ–तुलसीदासाच्या काव्याप्रमाणें कबीराच्या काव्यात आढळून येत नाहीं त्यामुळें त्याचें काव्य थोडेसें एकातिक स्वरूपाचें बनलें आहे

या एकातिक वृत्तीमुळेंच कदाचित् त्याच्या परमेश्वराविषयक कवनात उत्कटताहि अधिक दिसून येते परमेश्वराविषयींच्या प्रेमातच ‘मस्तकलदर’ बनण्याकडे कबीराचा ओढा अधिक दिसून येतो पिता, माता, सखा या नात्यानें कबीराने परमेश्वराची उपासना केली. प्रियकर या नात्यानेंहि त्यानें परमेश्वरास उत्कटतेनें आळविलें आहे ‘ब्रह्म प्रेममय असून सर्व जगास व्यापून राहिलें आहे त्याचें पूर्ण दर्शन प्रेमाच्या दृष्टीनें होण्यासारखें आहे’ हा सिद्धात कबीराच्या काव्यातून प्रामुख्यानें दिसून येतो.[१३]

> एक अड उभारनें सब जग भया पसार। कहहि कबीर सब नारी रामकी,
> अविचल पुरुष भ्रतार

किंवा,

> जो पै पतिव्रता है नारी। कैसे ही रहो सो पियहिं पियारी
> तनमन जोबन सौंपि सरीरा। ताहिं सुहागिन कहे कबीरा॥

अथवा,

> लाली देखन मेरे लालकी, जित देखी तित लाल
> लाली देखन मैं गई, मैं भी होगई लाल

अशा प्रकारचे अनुभव कबिराच्या काव्यात विपुल आहेत 'रामरस पाइयारे, ताने बिसरि गयी रस और' अशी रामभक्तीच्या योगाने कबिराची अवस्था झाली आहे

सूफी पथाचे सस्कार कबिराच्या काव्यावर झाले आहेत अशी कित्येक विद्वानानीं आपली समजूत करून घेतली आहे भारतीय तत्त्वज्ञानाची बैठक कबिराने कोठेंच सोडली नाहीं ही या बाबतीतली वस्तुस्थिति आहे कबीर–काव्यात परमेश्वराविषयींचे प्रेम आहे पण, सुफींचा 'इष्क' नाहीं सुफी साधु स्वत स प्रियकर मानून व परमेश्वरास प्रेयसी कल्पून उपासना करीत असतात कबिराच्या काव्यातील प्रेम तशा प्रकारचें नाही नारदभक्तिसूत्रात सागितलेली 'कातभक्ति' त्याच्या काव्यात आढळते म्हणूनच कबीर जन्मानें मुसलमान असला तरी त्याची भक्ति मात्र अस्सल वैदिकपरपरेतील आहे असेच म्हणावें लागेल [१४]

कबीराच्या नतर हिंदी भक्तिकाव्याचा प्रवाह तीन भिन्न पात्रांतून वहात असल्याचें दृश्य आढळतें·

१) निर्गुण रामोपासनापर काव्य,

२) सगुण रामोपासनापर काव्य, आणि

३) कृष्णभक्तिपर काव्य.

निर्गुण रामोपासनेच्या प्रवाहात कबीर प्रमुख ठरतो तसाच सगुण रामोपासनेंत तुळसीदास हा श्रेष्ठ सतकवि होऊन गेला. भक्त, कवि, सत, धर्मप्रसारक, समाजनेता इत्यादि विविध भूमिका तुळसीदासाच्या व्यक्तिमत्त्वात एकवटलेल्या दिसून येतात तुळसीदासाच्या काव्यात उत्कट भक्ति आहे त्याचप्रमाणें समाजोद्धाराची तळमळ आहे समाजाला नीतीचा उपदेश तुळसीदासानीं केला आहेच परतु त्याबरोबरच रूढ धार्मिक समजुतीचा अधिक्षेप न करता एका व्यापक भूमिकेवरून सर्वांचा समन्वय तुळसीदासानीं साधला आहे· आज सुमारें साडेतीनशे वर्षे तुळसीदासाच्या रामायणास-रामचरित मानस या ग्रथास–जी लोकप्रियता लाभली आहे ती हिंदी भाषेंतील इतर कोणत्याहि भक्तिप्रधान ग्रथाच्या वाट्यास आली नाहीं· एवढा रसाळ ग्रथ लिहिताना तुळसीदासाचें समाजजीवनाकडे मुळीच दुर्लक्ष झालें नाहीं· समाजाविषयीं एवढी व्यापक सहानुभूति असलेला कवि हिंदी

वाङ्मयात दुसरा सापडणार नाही. ज्या प्रतिकूल परिस्थितीतून समाजाचा उद्धार करण्याचें कार्य एकनाथांनीं केलें तशीच सामाजिक परिस्थिति तुळसीदासाच्याहि पुढें होती कारण, दोघेहि समकालीनच परधर्माचें व परराज्याचें सांस्कृतिक व राजकीय आक्रमण वाढतच होतें कर्णाच्या रथाप्रमाणें हिंदु समाज वरचेवर खालींखालींच खचत चालला होता अशा परिस्थितीत केवळ उपदेश. केवळ तत्त्वज्ञान अथवा केवळ एकांतिक भक्ति निरर्थकच ठरली असती. लोकांना उपदेश करणाऱ्या साधुसंतांची वाण नव्हती त्यांना प्रेमानें कुरवाळून, जिव्हाळयानें वाट दाखवून योग्य मार्गास लावणाऱ्या कर्मयोगी पण कर्मकठोर नसलेल्या, भक्तियोगी परंतु आत्मकेंद्रित नसलेल्या, ज्ञानयोगी पण अहंकारी नसलेल्या, श्रेष्ठ संत असूनहि लोकांचा सखा बनलेल्या कर्तबगार राष्ट्रपुरुषाची आवश्यकता होती महाराष्ट्रात हे कार्य एकनाथांनीं केलें आणि उत्तर भारतात तुळसीदासांनी आदर्श राष्ट्रपुरुषाची उणीव भरून काढली. 'तुळसीदासाच्या काव्यात आदर्श कुटुंब, आदर्श समाज आणि आदर्श राज्य (रामराज्य) यांचें सुंदर चित्रण आढळून येतें या चित्रणातून समाजसुधारक आणि लोककल्याणाची चिंता बाळगणाऱ्या तुळसीदासाचे दर्शन आपणास घडतें' महाराष्ट्रीय संतांच्या परंपरेशी सर्वस्वी जुळणारे विचार तुळसीदासाच्या रामायणात आढळतात कृष्णभक्तिपर काव्य रचणाऱ्या कवींची 'मस्त भक्ति' तुळसीदासाच्या काव्यात नाहीं ती नेमस्त भक्ति आहे असे आचार्य विनोबा सांगतात तुळसीदासानें आपलें रामायण लिहिताना वाल्मिकी रामायणापेक्षा अध्यात्मरामायणाकडे दृष्टि अधिक ठेवली आहे एकनाथी भागवत आणि तुळसीरामायण यांत विचारसाम्यहि पुष्कळ आहे महाराष्ट्रीय संतांशीं यथार्थ रीतींनें ज्यांची तुलना करता येईल असा एकच हिंदी कवि आहे तो म्हणजे तुळसीदास आचार्य विनोबा भावे म्हणतात, नाथाचें भागवत आणि तुळसीरामायण यांत विचाराचें साम्य विशेष आहे नाथांनीं रामायणहि लिहिलें आहे परंतु नाथाचा आत्मा उतरला भागवतात नाथ कृष्णभक्त, तुळसीदास रामभक्त. नाथांनीं कृष्णभक्तीची मस्ती जिरविली हा नाथाचा विशेष. ज्ञानदेव, नामदेव, नाथ सांगळेच कृष्णभक्त आणि असें असूनहि अत्यंत मर्यादा-

शील म्हणून या बाबतींत तुळसीदासजीपेक्षा त्याना दोन मार्क देणें गैर नाहीं'[१५]

कृष्णभक्तिपर हिंदी काव्यात देखील दोन भिन्न प्रवाह दिसतात सात्विक कृष्णभक्ति गाणारे काव्य आणि उत्तान शृंगारपर भक्तिकाव्य कालानुक्रमानें नरसी मेहता हा कृष्णभक्तिपर काव्य करणारा पहिला कवि हिंदी साहित्यिकानीं मानला आहे नरसी मेहता हा गुजराथचा त्यानें गुजराथी भाषेंत काव्य केले परतु हिंदी साहित्यिक त्यास हिंदीचाहि कवि मानतात [१६] या नरसी मेहत्यास पढरीच्या भक्तमेळाव्यापासून स्फूर्ति मिळाली होती नरसी मेहत्याच्या काव्यात नुसतीच विठ्ठलभक्ति आढळून येत नाही नामदेवादिक सताची 'हरमाळा' या ग्रथात त्याने स्तुतिहि केली आहे नरसी मेहता आपल्या वाङ्मयात काहीं रूपे मराठीसारखीं वापरतो असे गुजराथी सशोधकाचें मत आहे [१७] तो ज्ञानदेव-नामदेवाचा समकालीन असल्याच्या आख्यायिका गुजराथ आणि महाराष्ट्र या दोन्ही प्रातात रूढ आहेत तुकाराम आणि महिपति याच्या वाङमयात आलेले नरसी मेहत्याचे उल्लेख वारकऱ्यापैकींच एक श्रेष्ठ सत या नात्यानेंच येतात याचा अर्थ असा होतो कीं, हिंदी काव्यातील निर्गुणोपासक रामभक्तीचा सप्रदाय किंवा कृष्णभक्तीपर काव्य घेतलें तरी या दोन्ही प्रकारच्या काव्यास महाराष्ट्रापासून स्फूर्ति मिळाली होती हे एक ऐतिहासिक सत्य आहे

नरसी मेहत्यानतर कालानुक्रमानें मीराबाई येते (इ स १५००१५००) मीराबाईची पदें महाराष्ट्रात आणि उत्तर भारतात सारखींच लोकप्रिय आहेत. गोकुळातील गोपींच्या भक्तीचा आदर्श मीराबाईने आपल्यापुढे ठेवला आहे तिच्या काव्यात कृष्णगोपींचा सयमपूर्वक शृगार आहे परतु दास्यभावना ही अधिक प्रबळ आहे. शातिरसावर आधारलेला शृगार आणि परमेश्वराविषयींचे दास्यभावनेवर आधारलेलें उत्कट प्रेम हे विशेष मीराबाई-च्या काव्यात दिसून येतात स्वतःचें देहभान विसरून एकाच प्रेमानदात मग्न असलेल्या या कवयित्रीच्या काव्यात नामदेव, मुक्ताबाई या महाराष्ट्रातील सताचा व कबीराचाहि उल्लेख आढळतो [१८]

उत्तान शृगारप्रधान कृष्णभक्तिपर काव्यरचना करणारात वल्लभ-संप्रदायी अधिक दिसून येतात प्रेमलक्षणात्मक भक्ति किंवा पुष्टिमार्ग हा

वल्लभाचार्यांच्या संप्रदायाचा विशेष आहे. प्रेमलक्षणात्मक भक्तीचा अवलंब केल्यानंतरच परमेश्वराचा अनुग्रह होतो या अनुग्रहासच पोषण किंवा पुष्टी असें म्हणतात केवळ प्रेमावर या संप्रदायाचें लक्ष असल्यामुळे लोकरक्षण अथवा धर्मरक्षण याकडे या संप्रदायाचें लक्ष जाणें शक्य नव्हतें उलट, लोकमार्गाचा त्याग केला पाहिजे असा वल्लभाचार्यांचा उपदेश आहे स्वतः वल्लभाचार्य यानीं हिंदी भार्षेत रचना केली नाहीं परंतु त्याचे शिष्य आणि पुत्र यानी मात्र पुष्टिसंप्रदायाच्या तत्त्वप्रणालीस अनुसरून बरेंच काव्य केले आहे

सूरदास हा या पंथाचा श्रेष्ठ कवि मानला जातो तुळसीदासाच्या वाङ्मयाप्रमाणेंच सूरदासाच्या ग्रंथातहि श्रेष्ठप्रतीचें काव्य आढळते मराठींतील पंडितकवींच्या काव्यात काव्याला प्राधान्य व भक्तिभावनेला गौणस्थान मिळालें आहे त्याचप्रमाणें सूरदासाच्या काव्यातहि काव्यात्मक प्रवृत्तीनें भक्तिभावनेवर मात केली आहे असें दिसून येते काव्यरसाच्या दृष्टीनें सूरदासाच्या काव्यात शृंगाररस प्रधान आहे[१९] त्यास अध्यात्माची पार्श्वभूमि आहे ही गोष्ट खरी परंतु शृंगाराच्या उत्कट वर्णनाच्या ओघात सामान्य वाचक आध्यात्मिक पार्श्वभूमि विसरतो आणि शृंगाराच्याच प्रवाहात वहात जातो हेंहि नाकारता येत नाहीं सूरसागर हा भागवतांतील कृष्णलीलावर आधारलेला अत्यंत काव्यमय असा ग्रंथ आहे वल्लभाचार्य हे वस्तुतः वात्सल्यभावनेचे पुरस्कर्ते होते बालकृष्ण हा त्याचा आदर्श होता परंतु त्याच्या शिष्यानीं बालकृष्णाच्या स्थानीं राधाकृष्णाची प्रतिष्ठापना करून वात्सल्यभावावर शृंगाराचें पुट चढविलें याच काव्यपरंपरेत पुढें राधाकृष्णाच्या नावावर बीभत्स शृंगाराचीं वर्णनें होऊं लागलीं भगवान् श्रीकृष्ण, गोपालकृष्ण ही कृष्णाच्या व्यक्तिमत्त्वाची उदात्त अंगें मागे पडली आणि केवळ राधाकृष्ण भक्तमंडळींच्या काव्यात आणि हृदयात लीला करूं लागले अशा प्रकारच्या काव्यात सामाजिक प्रेरणेचा शोध करणे शशशृंगाचा शोध घेण्यासारखेंच ठरणार नाहीं काय ?

## भक्तिसंप्रदायाचें पथ्य !

हिंदीतील राधाकृष्ण संप्रदायाचे काव्य वाचल्यानंतर एक गोष्ट निश्चित

रूपानें प्रत्ययास येते "धर्मभावनेने असो अथवा आध्यात्मिक तत्त्वप्रणालीच्या द्वारें असो उपासनेच्या क्षेत्रात स्त्रीतत्त्वास महत्त्वाचें स्थान मिळालें म्हणजे अशा प्रकारच्या उपासना-पथाच्या अनुयायात मूळ उपासना-पंथाचें विकृत स्वरूप आढळून येतें शाक्त पथ आणि राधाकृष्ण सप्रदाय अशा प्रकाराचे उदाहरण म्हणून देता येईल काही वैष्णव सप्रदायानीं ही सभाव्य विकृती टाळली आहे महाराष्ट्राच्या सतपरपरेंत राधेला विशेष महत्त्व नाहीं हिची जागा कृष्णपत्नीने– रुक्मिणीनें घेतली असून रुमिणीस-हि या सतानीं फारसें महत्त्व दिले नाही रामानदानीं राधाकृष्णाच्या ऐवजी रामसीता हे उपास्य दैवत स्वीकारल्यामुळें ही परपराहि विकृतीच्या दोषा-पासून अलिप्त राहिली आहे"[२०]

## सुफी पंथ

वैष्णवभक्तीशी सबधित नसला तरी हिंदी काव्यातील आणखीहि एका सप्रदायाचा विचार करणें आवश्यक आहे हा सप्रदाय म्हणजे इस्लामी धर्माच्या प्रसाराबरोबर वाढलेला सुफी पथ या पथाचा भागवतधर्माशीं तसा काहींच सबध पोंचत नाही परतु भारतीय भक्तिपरपरेवर या सप्र-दायाचा बराच परिणाम झाला आहे असा गैरसमज अनेक विद्वानानीं करून घेतला आहे या समजुतीस सत्याचा आधार नाहीं वस्तुस्थिति अशी आहे कीं, सुफी सप्रदायातील प्रेमलक्षणात्मक भक्ति ही भारतीय भक्तिपरपरेहून भिन्न आहे परिणामच शोधावयाचे झाल्यास भारतीय परपरे-चाच परिणाम सुफींवर जास्त झाला आहे असेच म्हणावें लागेल. (परिशि-ष्टात या सबधींचें अधिक विवेचन करण्यात आलें आहे)

## बंगालमधील चैतन्य संप्रदाय

उत्तरेंत प्रचलित असलेली सगुण–निर्गुण रामभक्ति, कृष्णोपासना आणि सुफींची प्रेमोपासना याच्याबरोबरच बगाल प्रातात थोडया निराळ्या स्वरूपात विष्णूची भक्ति चालू होती. बगालचा सप्रदाय चैतन्य महाप्रभु यानीं स्थापिला ते मध्वाचार्यांच्या परपरेंतील असले तरी भक्तीच्या विविध सांप्रदायिक वैशिष्ट्यांवर भर टाकण्याचें श्रेय चैतन्याना (इ स १४८५–

१५३३) द्यावें लागेल एकनाथांच्या जन्माच्या सुमारास चैतन्य समाधिस्थ झाले होते. चैतन्याच्या पूर्वीहि बगालात वैष्णवभक्ति प्रचलित होती चैतन्याच्या पूर्वी शभर वर्षे चण्डीदास हा विख्यात वैष्णव कवि होऊन गेला. त्यानें व इतर वैष्णव मतानीं रचलेलीं गीतें आजहि बगाली वाङ्‌मयात उपलब्ध आहेत तथापि, त्यामुळे एक वैशिष्टयपूर्ण सप्रदाय या नात्याने चैतन्य सप्रदायाचें महत्त्व काहीं कमी प्रतीचें ठरत नाहीं

ब्रह्म निराकार नसून तें चिदाकार आहे हा या पथाचा सर्वात महत्त्वाचा असा सिद्धात आहे [२१] सृष्टि आणि प्रलय हे चक्र सतत चालणारें असून त्यासच परमेश्वराची लीला म्हणण्यात येते या लीलेसाठींच परमेश्वर स्वत द्विविध होतो मायावाद या पथास मान्य नाहीं रागात्मिका भक्ति या पथास संमत आहे 'सर्वत्र परमेश्वरास पाहणें एवढीच बगाली वैष्णवाची भक्तीची कल्पना नसून परमेश्वराच्या सर्व भावनात प्रीतीच्या द्वारें भक्ताचें ऐक्य साधणे म्हणजे भक्ति हा या पथाचा सिद्धात आहे'[२२] अपूर्ण जिवाची परिपूर्ण परमेश्वराशीं एकरूप होण्याची जी उत्कट इच्छा असते तीस भक्ति म्हणावें असेंहि हा पथ प्रतिपादितो' 'निखिल रसामृत मूर्ति' हे चैतन्य सप्रदायानें, मानलेलें परमेश्वराचें स्वरूप आहे 'रसो वै सः।' हा तैत्तिरीय उपनिषदातील रससिद्धात चैतन्यभक्तीचा आधार आहे. रस ही आत्म्यात सतत वास करणारी अतर्गत शक्ति असते भक्तीच्या योगानें ती जागृत व आस्वाद्यमान होते प्रीति अथवा रति हा रसाचा आधार आहे. म्हणून पाच प्रकारच्या रतीपासून पाच रस निर्माण होतात— शात, दास्य, वात्सल्य, मधुर हे ते पाच रस होत यापैकीं मधुर रसाला या पथात आधिक महत्त्व मिळालें आहे

चैतन्यानीं सर्व वर्णांना समान मानण्याचा उपदेश केला होता परंतु हा समानतेचा उपदेश त्याच्या निर्याणानतर फार काळ व्यवहारात आस्तित्वात राहिला नाहीं तामीळ भक्ताच्या परपरेंत आचार्यांना महत्त्व प्राप्त झाल्याबरोबर ज्याप्रमाणें कर्मठपणा शिरला त्याचप्रमाणें चैतन्याच्या निर्याणानतर कर्मठ ब्राह्मणानीं या पथात वर्चस्व मिळविलें आणि जे जातिभेद मिटविण्यासाठीं चैतन्यानीं वैष्णवभक्तीचा प्रसार केला होता तेच जातिभेद या पथात पुन्हा रूढ झाले व शूद्र वैष्णव, ब्राह्मण वैष्णव अशा स्वरूपाच्या

नव्या जाति या पथात निर्माण झाल्या म्हणूनच या पथाच्या कार्याचें मूल्यमापन करताना लोकमान्याचे राजकारणातील सहकारी श्री. बिपिनचद्र पाल म्हणतात, 'चैतन्याच्या चळवळीस आपले उद्दिष्ट साध्य करण्यात अपयश आले कारण, वेदात आणि उपनिषदें यातील श्रेष्ठतम अशा अनुभूतीवर ही चळवळ आधारलेली नव्हती'[२३] निखिल रसामृत-मूर्तींची परमेश्वराची कल्पना आणि त्या रसाच्या अनुभूतीसाठीं अवलबिण्यात आलेली मधुरा भक्ति ही वैषयिक भावनेपासून फार काळ अलिप्त राहूं शकली नाहीं. उत्तर भारतात राधाकृष्ण भक्तीस ज्याप्रमाणें कालातरानें विकृत स्वरूप प्राप्त झालें त्याचप्रमाणें हा पथहि सामाजिक समतेचा पुरस्कार करणारा पथ न राहता राधाकृष्णाच्या प्रेमात डुबणारा एक भाव-सप्रदाय एवढेंच स्वरूप त्यास प्राप्त झालें

## भक्तिसंप्रदायांतील 'आरोह-अवरोह'

देशी भाषाच्या उदयापासून ते सोळाव्या शतकापर्यंत भारताच्या प्रमुख भाषातून भक्तीचा प्रसार कोणत्या स्वरूपात झाला याचें विवेचन वर करण्यात आलें आहे या विवेचनात काही विशिष्ट गोष्टी विशेष ध्यानात भरतात• त्यापैकीं महत्त्वाची गोष्ट म्हणजे बहुतेक सर्वच प्रातात काहीं सत-कवींचे अपवाद वगळले तर भक्तीचें स्वरूप बरेंच एकातिक असें दिसून येतें 'सा तु अस्मिन् परमप्रेमरूपा' हे भक्तिसूत्रातील भक्तीचें लक्षण बहुतेक प्रातात वैष्णव कवींनीं प्रामुख्यानें आपल्यापुढें ठेवलेलें दिसून येतें• तामीळ प्रदेशातील आळवार, कर्नाटकातील हरिदास, बगालमधील चैतन्य संप्रदायी, उत्तर हिंदुस्थानातील कृष्णभक्ति-परपरेंतील कवि या सर्वांनीं प्रेमस्वरूप भक्ति गायिली आहे. सुफी सप्रदाय हा वैष्णव पथ नसला तरी या संप्रदायात देखील जिवाशिवाच्या 'इष्का'स महत्त्व आहे आत्यतिक प्रेमाचा गुणधर्म असा आहे की, त्याच्या प्रभावानें इतर गोष्टींचा विसर पडतो आणि व्यक्ति आत्मकेंद्रित बनते तोच प्रकार या भक्तिवाङ्मयात आढळतो भक्त आणि परमेश्वर या दोहोंच्या परस्परावरील प्रेमामुळें हे भिन्नप्रातीय भक्त इतर सामाजिक कर्तव्यापासून दुरावले आहेत भक्ति हा भक्ताचा स्वभावधर्म असला तरी भक्त हा एक सामाजिक घटक असतो

त्या नात्यानें त्याचें काही कर्तव्यहि असतें समाज सुस्थिर करण्यासाठी त्या कर्तव्याचें परिपालन आवश्यक असतें याची जाणीव या संताच्या वाङ्मयात आढळत नाहीं

दुसरी गोष्ट या साहित्यात आढळते ती म्हणजे, थोड्याच कालावधीत बहुतेक प्रातातील भक्तिसप्रदायात कर्मठपणा तरी शिरला किंवा त्या सप्र दायातील भक्तीस शबल स्वरूप तरी प्राप्त झाले आहे. आळवाराच्या भक्तिपथाला आचार्यांची परपरा लाभल्यानें तत्त्वज्ञानाची बैठक मिळाली परतु आचार्य प्रभावी ठरल्याबरोबर हा पथ कर्मठ ब्राह्मणाचा पथ बनला पूजा, अर्चा, दैनदिन कर्मठ आचरण आणि अन्य दैवताविषयींची असहिष्णुता या पथात प्रभावी ठरली साध्या-भोळ्या जीवाना भवसागर तरून जाण्याचा सुलभ मार्ग म्हणून ज्या भक्तीचा उदय झाला तीच भक्ति कर्मठाची मिरास बनली त्यामुळे सामान्य जनतेसाठी मोकळा असलेला हा मार्ग देखील वैदिक वाङ्मयासारखाच दुष्कर बनला कर्नाटकातील हरिदासाच्या सप्रदायात हेंच घडलें. या माध्वसप्रदायी सतानीं प्रारभी आपलें धोरण उदार ठेवलें असले तरी कनकदास वगळला तर सामन्य जनाचा प्रातिनिधिक असा एकहि साधाभोळा भक्त पुढच्या काळात प्रभावी होऊ शकला नाहीं. यावरून उत्तर काळात हा पथ देखील कर्मठाचाच एक मार्ग होऊन बसला असेंच अनुमान करावे लागतें

वैदिक कर्मकाडाच्या अभिमान्यास आपण सामान्यत कर्मठ म्हणतो परंतु वैदिकातच कर्मठपणा होता असे नाहीं समाजाच्या विकासाकडे दृष्टि न ठेवता केवळ पारंपरिक आचारधर्म पाळण्याची यात्रिक वृत्ति ज्या ज्या पथात उदय पावते त्या सर्वातच कालातरानें जडता निर्माण होते व त्याची विकासक्षमता कुठित होते असे प्रकार केवळ वैदिक कर्मकाडाच्या अनुयायातच घडले असें नाही इतर सप्रदायानें देखील विचार आणि विकास याकडे लक्ष न देता केवळ पारपरिक आचारावर ज्या ज्या वेळीं भर दिला त्या त्या वेळीं अशी कर्मठता सर्वच संप्रदायात निर्माण झाली भागवत पुराणाचेंच उदाहरण घेतलें तर या बाबीवर प्रकाश पडतो 'सामान्य माणसास सुलभरीतीनें भगवत्प्राप्ती व्हावी' हे भागवताचें उद्दिष्ट त्यासाठी भक्ताच्या विविध कथांच्या द्वारें भागवतधर्माचें रहस्य या पुराणानें सांगितलें

आहे आणि वेळोवेळीं सांगितलेल्या तत्त्वज्ञानाचें संकलन एकादशस्कंधात करण्यात आलें आहे या पुराणाच्या रचनेनंतर वैदिक कर्मकांडावर भर देणारा वर्ग आणि भागवताप्रमाणें सुलभ भक्तीचा पथ आक्रमणारा वर्ग असे दोन वर्ग दिसतात परंतु कालांतरानें दुसराहि एक कर्मठाचा वर्ग निर्माण झाला तो म्हणजे भागवतातील पूजाविधि, आचार इत्यादिकांचें काटेकोरपणें पालन करणाराचा. सुलभ भक्तीची भावना मागें पडली आणि षोडशोपचार पूजा मात्र कांही कर्मठ संस्कृत पंडितांनी पुरस्कारिली. ते स्वतः भागवतधर्मीय झाले भागवतातील भावभक्तीपेक्षा विशिष्ट पद्ध-तीचे अर्चन, व्रतें, उपवास इत्यादिकांना त्यांच्या दृष्टीनें महत्त्व अधिक आलें व मूळ भागवताचें उद्दिष्ट मागें पडलें तेराव्या शतकातील महा-राष्ट्रात असा वर्ग अस्तित्वात होता रामदेवाच्या दरबारीं असलेली हेमाद्रि–बोपदेवाची जोडी या परंपरेतूनच निर्माण झाली होती त्याचप्रमाणें कांहीं देशी भाषेतील भागवतधर्मीय साधुसंतांतहि कालांतरानें कर्मठपणा शिरला आणि त्यांची विकासक्षमता नष्ट झाली

## 'राधा' आणि 'रुखमाई'

दुसरा प्रकार भक्तीच्या शबल स्वरूपाचा राधाकृष्णाच्या भक्तीस जेथें महत्त्व प्राप्त झालें त्या ठिकाणीं राधाकृष्णाचा शृंगार हा प्रथम भक्ती-च्या आधारानें शुद्ध स्वरूपात भक्तांनी गायिला परंतु पुढें पुढें सामान्य माणसाच्या शृंगारिक भावनांना राधाकृष्णाच्या शृंगाराच्या रूपानें वाट मिळाली त्यामुळें विषयवासनेस उत्तेजन देणारी बीभत्स शृंगारिक काव्यें हीं भक्तिरसपर काव्यें म्हणून गौरविलीं जाऊं लागलीं अशा भक्तिवाङ्मयात सामान्याचें चित्तपरिशुद्ध करण्याचे सामर्थ्य असणार तरी कसें ? चैतन्याच्या मधुरा भक्तीस असेंच बीभत्सस्वरूप नंतरच्या काळात आलें वल्लभसंप्रदायी राधाकृष्णाच्या भक्तीची देखील तीच गत झाली श्रेष्ठप्रतीचा भक्त हा स्वतः शृंगारापासून अलिप्त राहूनहि देवभक्ताच्या शृंगाराचें रसाळ वर्णन करूं शकतो परंतु भक्तीचा मार्ग हा केवळ श्रेष्ठांकरिता मोकळा असतो असें नाहीं सामान्य प्रतीचा भक्त हा अशा मार्गातील भक्ति विसरतो आणि शृंगाराचेंच चर्वितचर्वण करूं लागतो अधःपात हा अशा मार्गानें

सुरू होतो यासाठीं अधःपातास अवकाश मिळणार नाहीं आणि फार कष्ट न पडता वृत्ति उन्नत बनतील अशीच भक्तिसप्रदायाची बैठक असणें आवश्यक असतें महाराष्ट्रातील सतानीं राधाकृष्णाच्या ऐवजी विठ्ठलरुख-माईचा जयजयकार का केला याचे रहस्य या पार्श्वभूमीवर ध्यानात येण्या-सारखें आहे

## मराठी संतांची लोकाभिमुखता

कोणत्याहि सप्रदायात कर्मठपणा न येऊ देण्याकरिता समाजविकासाची दृष्टि अढळ राहणे जसें आवश्यक असतें तसेंच भक्तिसप्रदायातील भक्ति ही उन्नत ठेवण्याकरिता तिची तत्त्वज्ञानाशी अभेद्य सागड असणें अगत्याचें असतें. भारतातील भिन्नभाषीय भक्तिसप्रदाय तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें द्वैती अद्वैती अथवा विशिष्टाद्वैती होते हे खरे असलें तरी भक्तीच्या प्रागणात उतरल्यावर तत्त्वज्ञानाची बैठक ढळल्याचे दृश्य अधिकतर दिसून येतें हिंदीतील निर्गुण सगुण रामोपासक यास अपवाद असले तरी इतर प्रातात मूळ तत्त्वज्ञानाची बैठक भक्तीच्या प्रवाहात वहात गेल्यासारखी वाटते उत्कट भक्तीस तत्त्वज्ञाचा बंध न राहिल्यानें भक्ति निरकुश झाली आणि तत्त्वज्ञान निराधार बनलें महाराष्ट्रात हा प्रकार घडला नाहीं. भक्ति आणि तत्त्वज्ञान महाराष्ट्रीय सताच्या साहित्यात प्रकृति-पुरुषाच्या जोडीप्रमाणें अभेद्य स्वरूपात नादताना दिसून येतें त्यामुळेंहि महाराष्ट्रातील भक्ति-सप्रदायात शबलता येऊ शकली नाहीं

## भक्ति आणि कर्मयोग

महाराष्ट्रात भक्तीस तत्त्वज्ञानाची जोड मिळाली त्याचप्रमाणें कर्म-योगाशीं भक्तीची सागड ज्ञानदेवादिकानीं घातल्यामुळें महाराष्ट्रातला भक्तिसप्रदाय इतर प्राताहून निराळया स्वरूपाचा राहिला या बाबतींत भिन्नमार्गीय आचार्यांच्याहि पुढचें पाऊल महाराष्ट्रानें टाकलें शकराचार्यांनीं ज्ञानोत्तर कर्मयोग गौण मानला इतर आचार्यांनीं उपदेशिलेला कर्मयोग हा क्रियायोगात—भजनपूजनादिकांत-परिवर्तित झाला. परतु महाराष्ट्रानें मात्र गीतेंतील निष्काम कर्मयोग शुद्ध स्वरूपात उपदेशिला गीता आणि

उपनिषदें याचे आदर्श महाराष्ट्रातील सतासमोर असल्याने गीतेंतील निष्काम कर्मयोग आणि उपनिषदातील अद्वैत तत्त्वज्ञान याची बैठक मराठी सतवाङमयात कोठेहि ढळली नाहीं एकनाथानीं एकादशस्कधावर भाष्य करताना देखील गीतेंतील निष्कामकर्मयोगाचा विसर पडू दिला नाहीं. त्यामुळें व्यक्ति आणि समाज याच्या जीवनाच्या सर्वांगीण विकासा-कडे महाराष्ट्रीय सतानी जेवढें दक्षतेनें लक्ष पुरविलें तेवढी दक्षता इतर प्रातातील भक्तिसप्रदायात राहिली नाहीं हें वरील विवेचनावरून स्पष्ट होण्यासारखें आहे

या दृष्टिकोनामुळेच धर्मसघटना करण्याची जाणीव महाराष्ट्रात अधिक प्रमाणात आढळते समाजाला भक्तीचा उपदेश करावयाचा एवढेंच ध्येय मराठी सतानीं आपल्यापुढें ठेवले नव्हतें. ज्ञानोबापासून तुकोबापर्यंत सर्वांनींच धर्मसस्थापनेचा उद्देश आपल्या वाङमयाच्या द्वारें स्पष्ट केला आहे ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात निरनिराळ्या मताचा परामर्श याच हेतूनें ज्ञानेश्वरानीं घेतला 'धर्माची वाट मोडून अधर्म शिगेला पोंचला असताना आम्ही सत अवतार घेतो' असें एकनाथ म्हणतात ते याच उद्देशानें 'ऋषिमुनींनीं सागितलेला धर्म साचभावें वर्तण्यासाठी वैकुठवासी संत पृथ्वीवर येतात' असे तुकोबा सागतात तें याच कारणासाठी. म्हणून, महारष्ट्रीय सतानीं केलेल्या सर्वव्यापी जागृतींतून स्वराज्याची परिणती झाली आणि इतर प्रातातील भक्तिसप्रदाय मात्र परकीय सत्ता झुगारून देण्यास असमर्थ ठरले.

## 'भाव तसा देव'

भिन्नप्रातीय भक्तिसप्रदायाच्या अभ्यासानें आणखीहि एक मनोरजक सत्य प्रत्ययास येतें तें म्हणजे त्या त्या भाषिकाचा मूळ स्वभाव अत्यत भावनाप्रधान अशी बगाली लोकाच्या स्वभावाविषयीं ख्याती आहे. चैतन्य सप्रदायाचें भक्तीचें स्वरूप या स्वभावास शोभण्या-सारखें आहे 'निखिलानदरसैकमूर्ति' हा चैतन्यसप्रदायी भक्तीचा आदर्श आहे भोगप्रधान भक्तिपरपरा उत्तरभारतात वाढली. केवळ प्रेममयी आणि कर्मठ भक्ति दाक्षिणात्यानीं पुरस्कारिली बुद्धि-प्रधान महाराष्ट्रात

मात्र समाजहित, तत्त्वज्ञान आणि भक्ति यांच्या समन्वयांतून उदयास आलेली भक्ति प्रभावी ठरली 'भाव तैसा देव' हें जसें सत्य आहे त्याच-प्रमाणें 'स्वभाव तैसा भाक्तिभाव' हे सत्य भिन्नप्रातीय भक्तिपरपरेंतून प्रत्ययास येतें· महाराष्ट्राखेरीज इतर प्रांतात भागवताच्या दशमस्कधास आधिक महत्त्व आलें असून महाराष्ट्रानें मात्र दशमस्कधांतील कृष्णाची बालक्रीडा आणि एकादशस्कध यावर भर दिला आहे त्यावरून देखील महाराष्ट्र आणि इतर प्रातातील भागवतधर्म यामधील भेद स्पष्ट होण्या-सारखा आहे

## ९. टीपा

१ डॉ भांडारकर यानी आळवाराचा काळ इ स चे ७ वें ८ वें शतक मानला आहे श्री कृष्णस्वामी आयगार याना हे मत मान्य नाही खिस्तोत्तर दुसरे शतक हा काळ त्यानीं मानला आहे डॉ राधाकृष्णन् यानीं देखील हाच काळ मानला आहे श्री दासगुप्ता यानी आठव्या शतकापूर्वी आळवाराचा काल नेता येत नाहीं असें आपलें मत दिलें आहे

२ Hooper, *Hymns of Alavars*, P 11.

३ कानडा या शब्दाचा अर्थ दुर्गम असा घ्यावा कर्नाटकेदेशस्थ असा घेऊ नये असें काहीं विद्वानाचें म्हणणे आहे श्री प्रियोळकर एका लेखात म्हणतात, " विठ्ठलाची मूर्ति मूळ कर्नाटकातील व मागाहून महाराष्ट्रात आली या मताला विशेष पुरावा मिळत नाही मात्र या मताच्या विरुद्ध पढरपूरची विठ्ठलमूर्ति विजयनगर राजानें अनागोदीस म्हणजे विजयनगरास नेली होती व पुढें एकनाथाचें पणजे भानुदास यांनी ती तिकडून आणून पुन पढरपुरास तिची स्थापना केली अशी मात्र दतकथा प्रचलित आहे "

— 'विठ्ठलाचा कानडातील निवास' **दिपावलि** १९५०

४. E. P. Rice, *History of Kanara Literature*, P. 59.

पचमुखी, **कर्नाटकद हरिदास–साहित्य** (कानडी) पृ ६९

५ *Karnataka Darshana*, P. 320

६ कित्ता, पृ १२७

७ E P Rice, *History of Kanarra Literature* P 59.

८ रगराव दिवाकर, **हरिभक्तिसुधे** या ग्रथातून कानडी पदें उद्धृत करण्यात आलीं आहेत

९ R D Ranade, *Pathway to God in Hindi Literature*, P 47.

१० सनकसनदन जयदेवनामा। भक्ति हेतु मन उनहून जाना ब्रह्मा वरूण नामदेव जयदेव दासा इनकी खबर कहत नहीं कोई, किधर किये बासा ॥

११ रामचद्र शुक्ल, **हिन्दी साहित्यका इतिहास**, पृ ८०

१२ डॉ रामरतन भटनागर, **हिंदी भक्तिकाव्य**, पृ ७६

१३ Tagore & Underhill, *One hundred Poems of Kabir*, Introduction

१४ रा द रानडे, "ज्ञानेश्वर आणि कबीर यांमधील साम्य" **प्रसाद** ऑगस्ट १९५३ या लेखात गुरुदेव रानडे यानी ज्ञानेश्वर आणि कबीर याच्या विचारात असलेलें साम्य आधार देऊन स्पष्ट केलें आहे सुफींचा 'इश्क' कबीर–काव्यात अभिप्रेत नाहीं हें पुढील कवनावरूनहि दिसून येईल •

दुलहिनी गावहु मगलचार हमघरी आये हो राजाराम भरतार तन रत करी मैं मन रत करी हू पचतत बराती रामदेव मेरे पाहुने आये मैं जोबन मैं माती सरीर सरोबर बेदी करू हू ब्रह्मा वदे उचार रामदेव सगीं भावर लेहू धनि धनि भाग हमार सुर तैतीस कौतिक आये मुनिवर सहस अठासी कहे कबीर हम ब्याही चले पुरिष एक अविनासी

भारतीय भक्तिपरपरेंतील भक्ति आणि सुफींची प्रेमरूप उपासना यासबधीं अधिक विवेचन सुफी सप्रदायासबधींच्या परिशिष्टात आलें आहे तें या सदर्भांत ध्यानांत ठेवल्यास दोन्ही उपासना–पथांतील भेद लक्षांत येईल.

१५ विनोबा–**मधुकर**– पृ ९३.

१६ रामरतन भटनागर, **हिंदी भक्ति काव्य,** पृ १०६.

१७. पांडुरग शर्मा, **चित्रमय जगत्**, १९२२, भारत इतिहास संशोधकमडळ, **त्रैमासिक,** वर्ष ६ वें.

१८ सुमिरे नामा और कबीरा तीसर मुक्ताबाई रे
मीरा के प्रभु गिरिधर नागर ज्योति में ज्योत मिलाई रे ॥
– रा द रानडे, **परमार्थ–सोपान,** पृ १५२
तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने अद्वैताचा पुरस्कार मीराबाईनें केलेला दिसतो वरील पदाचे शेवटीं 'ज्योतीमें ज्योत मिलाई' असा उल्लेख आहे इतर पदात देखील 'ज्योत में ज्योत मिलीजा' असा अनुभव मीराबाईनें वर्णिला आहे त्यावरून अद्वैताचाच बोध होतो **परमार्थ सोपान,** – पृ १४४, १४६

१९ रामरतन भटनागर, **सुरदास,** पृ १४१

२० Ramchandra Mujumdar, 'Religio–Philosophic Culture in India,' *Cultural Heritage of India* Vol III, P. 34.

२१ ब्रह्म शब्दे मुख्य अर्थे कहे भगवान्, चिदैश्वर्य परिपूर्ण अनुर्द्ध समान
ताहार विभूति देहे सब चिदाकार, चिद्विभूति आच्छादिया कहे निराकार
– **श्रीचैतन्य**

२२. Bipinchandrapal, *Bengal Vaishnavism,* P 53
आत्मेंद्रिय प्रीति इच्छा तारे बले काम
कृष्णेंद्रिय प्रीति इच्छा धरे प्रेम नाम – **श्रीचैतन्य**

२३. Bipinchandrapal, *Bengal Vaishnavism,* P. 139.

---

तृतीय खंड

# श्रीएकनाथप्रणीत भागवतधर्म

- ज्ञानदेवे रचिला पाया
- ‘धर्म जागो पढरीचा’
- ‘एकाजनार्दनाचा वृत्तात’
- वाङमयोपासक एकनाथ
- एकनाथकालीन राजकारण व समाजकारण
- एकनाथप्रणीत भागवतध : १
- एकनाथप्रणीत भागवतधर्म २ .
- एकनाथप्रणीत भागवतधर्म : ३ :
- ‘आता विश्वात्मके देवे’–

# १०. 'ज्ञानदेवें रचिला पाया'

भागवतधर्मानें महाराष्ट्रात केलेली क्रांति-समाजक्रांतीच्या तीन अवस्था-स्वराज्याचे परिणत फळ-ज्ञानेश्वरांचें अवतारकार्य-स्वधर्माची प्रतिष्ठा-निष्काम कर्मयोग-'भक्ति येथ सेरे जाति अप्रमाण'-समाजक्रांति आणि ज्ञानेश्वर-उदात्त भूमिकेवरून समतेचा उपदेश

आधुनिक भारतीय भाषातून भागवतधर्मांचा कोणत्या स्वरूपात पुरस्कार करण्यात आला आहे याचें विवेचन मागील प्रकरणात करण्यात आलें आहे या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील साधुसतानीं उपदेशिलेल्या भागवतधर्मांचा आभ्यास केला असताना महाराष्ट्राचें आगळें वैशिष्ट्य विशेषे करून जाणवतें महाराष्ट्रातील वारकरीपथाचें वर्तमान युगातील आचार्य प्रा. सोनोपंत दांडेकर म्हणतात, 'महाराष्ट्रीय भागवतधर्मांचें हे वैशिष्ट्य आहे कीं, त्याने भक्तीस अद्वैत तत्त्वज्ञानाची जोड दिली बाकीचे बहुतेक आचार्य हे द्वैती, कोणी विशिष्ट कोणी नुसते द्वैती आहेत महाराष्ट्रामध्यें हा मोठा लक्षात घेण्यासारखा मिलाफ आहे महाराष्ट्रीय साधूनी शुद्ध विमल असें तत्त्वज्ञान उपनिषदापासून घेतलें व त्यास भक्तीची जोड दिली त्यानीं कर्मांचा त्याग केला नाहीं ज्ञान, भक्ति आणि कर्म याचा समन्वय साधला म्हणून वीरशैव आणि वीरवैष्णव यासारखे विरोधी पथ महाराष्ट्रात रुजले नाहींत अद्वैत आणि भक्ति याच्या समन्वयाप्रमाणेंच धर्म आणि नीति याचा समन्वयहि महाराष्ट्राने साधला ''[१]

## भागवतधर्मानें महाराष्ट्रांत केलेली क्रांति

ज्ञान, कर्म आणि भक्ति याच्या समन्वयाप्रमाणेच मराठी मुलुखांतला सप्रदाय भावनेच्या दृष्टीनें अत्यत शुद्ध राहिला आहे परप्रांतीय आणि

परराष्ट्रिक विद्वानानी देखील महाराष्ट्राचें हे वैशिष्टय मान्य केलें आहे.[२] 'मराठी वाङ्मयातील मधुरा भक्ति ही स्वभावतः निकोप आहे बगाली वैष्णवाची एका टोकाला गेलेली भक्ति येथें दिसून येत नाहीं. मधुराभक्तीतील उनमत्तपणा, मूर्च्छा, भावावस्था इत्यादि प्रकारहि मराठी सतात दिसून येत नाहींत. पुष्टिमार्ग किंवा चैतन्य संप्रदाय यात उत्तरोत्तर अनाचाराचा प्रकार येऊन समाजाच्या पुढील आदर्श जसा भ्रष्ट झाला तसा प्रकार महाराष्ट्रात झाला नाहीं'[३] असे उद्गार तौलनिक अभ्यासानतर डॉ प्र न. जोशी यानींहि काढले आहेत

साराश, महाराष्ट्रात रूढ झालेला भागवतधर्म निराळ्या स्वरूपाचा होता. भक्तियोग, ज्ञानयोग आणि कर्मयोग याची सागड घालणाऱ्या महाराष्ट्रीय भागवत धर्मानें क्रियाशील धर्माप्रमाणेंच उच्च नैतिक आदर्श समाजापुढें ठेवला त्यामुळें दीर्घकाल शुद्ध स्वरूपात ही परपरा टिकून राहिली या सतानीं आपल्या आदर्शानें आणि शिकवणूकीनें जागृत केलेल्या महाराष्ट्रातच पुढे स्वराज्याचा उदय झाला इतर प्रातात मुसलमानी आक्रमण दृढमूल झाल्यानंतर स्वराज्याचे प्रयत्न फारसे झाले नाहींत विजयनगर साम्राज्याचा अपवाद वगळला तर झालेले प्रयत्न यशस्वी होऊ शकले नाहींत. साऱ्या भारताला दरारा बसविणाऱ्या मराठ्याच्या राज्याची पूर्वतयारी आगोदर तीनशें वर्षें हे सत करीत होते असें म्हणणें अवास्तव ठरणार नाही मराठ्याचे राज्य ही एका रात्रींतून घडलेली घटना नव्हे कित्येक शतकापासून 'महराष्ट्रधर्मांचा' ध्यास मराठी मनास लागलेला होता. या धर्माचें परिणत फल अटकेपार फडकलेल्या जरिपटक्याच्या रूपानें महाराष्ट्रास मिळाले म्हणूनच राजारामशास्त्री भागवत म्हणतात, 'महाराष्ट्रधर्म म्हणजे ज्ञानेश्वरानीं जीर्णोद्धार केलेला भागवती धर्म म्हणजे संताचा विशाल धर्म, कर्मठाचा कोता धर्म नव्हे'[४]

भागवतधर्माची मूळ प्रेरणा ऋतरक्षणात्मक आहे. समाजाच्या धारणेस आवश्यक असलेल्या तत्त्वाचें सगोपन करून त्यासाठीं देशकालपरत्वें योग्य त्या आचारधर्मावर भर द्यावयाचा हे या धर्माचें वैशिष्टय आहे महाराष्ट्रात भागवतधर्माची मूळ प्रेरणा अविकृत स्वरूपात प्रकट झाली म्हणून स्वधर्मरक्षण आणि स्वराज्यसस्थापना या महाकार्यांत त्याची परिणती होऊ शकली.

'भागवतधर्म हे वैदिक धर्माचें अत्यत मधुर स्वरूप होय परतु या भागवत-धर्माची आमच्या सतानी जी मराठी म्हणजे सुलभ आवृत्ति काढली तिच्यात मधुरतेची सीमा झाली सताच्या भागवतधर्माने मूळ भागवत-धर्माच्या माधुर्यात क्रातिकारक भर घातली आहे '[५]

## समाज-क्रांतीच्या तीन अवस्था

या क्रातिकारकात 'मार्ने पहिला' सत ज्ञानेश्वर हे आहेत ज्ञानेश्वरापासून तुकाराम—रामदासाच्या कालापर्यंत महाराष्ट्रात सामाजिक पुनरुत्थापनाच्या तीन अवस्था दिसून येतात

१ पहिली अवस्था ज्ञानेश्वराच्या कालाची या काळात महाराष्ट्रात स्वराज्य होतें भौतिक वैभवाची वाण नव्हती परतु धर्माला मात्र अवकळा आली होती व्रतवैकल्याच्या चौकटींत आणि वर्णाश्रमाच्या कठोर बंदि-खान्यात धर्म बादिस्त झाला होता कनिष्ठ वर्णीयाना धर्माचें ज्ञान नव्हतें बहुजन समाज धर्मातर्गत असूनहि धर्मबाह्य झाला होता त्याला धर्माभिमुख करण्यासाठीं ज्ञानेश्वरानीं भागवतधर्माच्या वास्तूची पायाभरणी केली ज्ञाने-श्वरींत जागोजाग स्वधर्मावर देण्यात आलेला भर या प्रवृत्तीचा निदर्शक आहे

२ दुसरी अवस्था महाराष्ट्राचें स्वराज्य नष्ट झाल्यानंतरची स्वरा-ज्याच्या अस्तानतर यावनी सत्ता महाराष्ट्रात दृढमूल झाली राष्ट्राच्या राजकीय पारतन्त्र्यानें परधर्मीय राज्यकर्त्यांचें समाधान झालें नाहीं त्याना या देशावर स्वतःच्या धर्माचें राज्यहि प्रस्थापित करावयाचें होतें पारतन्त्र्यात समाजाचें कर्तृत्व बोथट होते· असलेला पराक्रम परकीयाची सिंहासने बळ-कट करण्यात होत असतो. ब्रिटिश राजवटींत हा अनुभव नुकताच आला आहे नामदेवाच्या कालापासुन रामदासाच्या कालापर्यंत याच अवस्थेचा अनुभव महाराष्ट्रानें घेतला याच काळात एकनाथानीं महाराष्ट्राला स्वधर्माची जाणीव करून दिली समाजाची एकात्मता सजीव करण्यासाठीं व धर्माचा अभिमान जागविण्याकरिता मूळ स्वरूपातील भागवतधर्माचा पुरस्कार या महापुरुषानें केला

३ तिसरी अवस्था शिवछत्रपतींनी केलेल्या स्वराज्यसस्थापनेनतरची समाजांत माजलेल्या ढोंग-धतुऱ्यावर तुकारामानी कडक टीकास्त्र सोडलें.

शुद्ध वैयक्तिक धर्माचरणावर त्यानीं भर दिला याच काळात समर्थ रामदासानीं प्रपचासह परामार्थ नेटका करण्याचा उपदेश केला. दोन्ही क्षेत्रात पराक्रमाने पुरुषार्थ गाजवावा असें रामदासानी आवर्जून सागितलें

## स्वराज्याचें परिणत फळ

या तिन्ही अवस्थातून भागवतधर्म जागविण्यासाठीं महाराष्ट्रीय सतानीं जें वाङमय निर्माण केलें तें 'मानवजातीचे आश्चर्यस्थान बनल्या-वाचून राहणार नाहीं '[६] म्हणूनच सताच्या कार्यांचे मूल्यमापन करताना न्या रानडे यानी पुढील प्रमाणें यथार्थ उद्‌गार काढले आहेत.

'ही चळवळ ज्ञानदेवाचा जन्म झाल्यापासून तो गेल्या शतकाच्या अखेरीपर्यंत चालू राहून पारमार्थिक सद्‌गुणाची हळुहळू वाढ झाली या देशात प्राकृत भाषेंत एक बहुमोल वाङमय या चळवळीमुळेंच आम्हाला उपलब्ध झालें ज्ञातिजन्य श्रेष्ठत्वाच्या वेडगळ कल्पनाचा जोरहि या वाङम-यानेंच कमी झाला शूद्रवर्गाला पारमार्थिक शिक्षण देऊन, त्याचें समाजा-मध्यें महत्त्व वाढवून ब्राह्मणाच्या तोडीस या चळवळीनें आणून बसविलें कुटुबसबधानें पावित्र्य प्राप्त होऊन स्त्रियाची योग्यता वाढली या सर्व तऱ्हानीं– भक्ति आदिक साधनानीं– राष्ट्रास विचारशक्ति व आचारशक्ति यामध्यें श्रेष्ठत्व आणून देण्यास या चळवळीचा उपयोग झाला व परधर्मी सत्तेच्या ठिकाणीं एकजुटीची एतद्देशीय सत्ता पुन्हा प्रस्थापित करण्याच्या महत्कृत्यास पुढारीपण घेण्यास महाराष्ट्र देशाची तयारी करून दिली तशी तयारी हिंदुस्थानातील कोणत्याहि देशाची झाली नाहीं महाराष्ट्रधर्माचीं मूलतत्त्वें आम्हास हींच दिसतात.'[७]

## ज्ञानेश्वरांचें अवतार कार्य

महाराष्ट्रात भागवतधर्मानें साधलेल्या महान् कार्याचें श्रेय ज्ञानदेवानीं केलेल्या पायाशुद्ध भागवतधर्माच्या रचनेस दिलें पाहिजे मराठी सताचा भागवतधर्म साप्रदायिक संकुचित भावनानीं जड झालेला नव्हता तो गतिमान् धर्म होता कोणत्याहि आचार्याची मध्यस्थी न स्वीकारता साक्षात् वेदोपनिषदात आढळून येणाऱ्या या धर्माचें स्वरूप ज्ञानदेवांनीं उजळ

केलें. ज्ञानेश्वराच्या पूर्वी अस्तित्वात असलेल्या विष्णुभक्तींत प्रगमनशीलता लुप्त झालेली होती उदार धर्माचा पुरस्कार करण्यासाठी पुराणाचा अवतार झाला पण लवकरच पुराणोक्त धर्म कर्मठाचा आहारीं गेला आणि वेदोक्त यज्ञयागादिक विधीसारखीच पुराणोक्त आणि तन्त्रोक्त पूजा प्रचारात आली सर्व वर्णाच्या अनुयायासाठीं खुला असलेला धर्म पुन्हा वरिष्ठ वर्णीयाच्या बदिवासात नादू लागला आधुनिक भारतीय भाषाच्या उदय-काळात या परिस्थितीत बदल झाला परतु हा बदल अल्पजीवी ठरला आचार्याना महत्त्व आलें ।विष्णुपूजा ।विधिप्रधान झाली गुरूचें महत्त्व वाढलें आचार्य धर्माचे प्रवक्ते झाले राजाच्या हुकुमाने जहागीर मिळावी व कायदेमडळात मजूर झालेल्या ठरावानुसार ती रद्द व्हावी असा प्रकार धर्माच्या क्षेत्रात घडला भक्तीचा सोपा पथ व्रतवैकल्यादिकानीं जटिल झाला धर्माला अवकळा आली आणि शुक्लपक्षातील चद्राप्रमाणें अधर्म कलेकलेनें वाढू लागला अशा परिस्थितींत आमावस्येनतर सूर्योदय व्हावा त्याप्रमाणे धर्मसस्थापनार्थ ज्ञानेश्वराचा अवतार झाला. धर्मग्लानीच्या काळात अधर्माचा नायनाट करून धर्माची घडी नीट बसविण्यासाठीं परमेश्वर अवतार घेत असतो हे भागवतधर्माचें तत्त्व ज्ञानेशाच्या कार्यानें खरें करून दाखविलें म्हणूनच वारकरी संप्रदायी ज्ञानेश्वराना विष्णूचा अवतार मानतात.

## स्वधर्माची प्रतिष्ठा

या पार्श्वभूमीवर ज्ञानेश्वराच्या वाङमयाचा अभ्यास केला असताना स्वधर्माचें महत्त्व त्यानी ज्ञानेश्वरींत का सागितलें याचा उलगडा होतो. दुसऱ्याच अध्यायात स्वधर्माशिवाय तरणोपाय नाहीं, जीवनाचा तो एकमेव आधार आहे, असें ज्ञानेश्वर सागतात तिसऱ्या अध्यायायाचा समारोप करताना स्वधर्मासाठी प्राण गमवावे लागले तरी कचरू नये असा स्पष्ट आदेश देण्यात आला आहे [८] अठाराव्या अध्ययायातहि स्वधर्माची महती सागितल्यानतर 'मोक्षप्राप्तीची इच्छा ज्याना आहे त्यानीं स्वधर्माचरण करावें' असें प्रतिपादन आलें आहे :

तैसा स्वधर्मु जरी लोपला तरी सर्व सुखाचा थारा मोडला
जैसा दीपासवे हरपला प्रकाशु जाये ॥
जैसे जळचरा जळ साडे मग तत्क्षणी मरण माडे
हा स्वधर्मु तेणे पाडे विसबो नये ॥
जैसी भर्तारेवीण वनिता उपहती पावे सर्वथा
तैसी दशा जीविता स्वधर्मेवीण ॥

– ज्ञानेश्वरी २–११०, ११७ व १९९

स्वधर्माला नित्ययज्ञाची प्रतिष्ठा ज्ञानेश्वरानी दिली आहे. ब्रह्मदेवाने प्रजोत्पत्ति केल्यानतर 'देवा, आम्हाला आधार कोणता?' असे प्रजेनें विनविलें असता 'धर्म हाच तुमचा आधार आहे' असा उपदेश ब्रह्मदेवानें केलाः

देखे अनुक्रमाधारे निजधर्मु जो आचरे
तो मोक्षु तेणे व्यापारे निश्चित पावे ॥
स्वधर्मु जो बापा तो नित्ययज्ञ जाण पा
म्हणौनि वर्तता तेथ पापा सचारू नाही ॥
हा निजधर्मु जै साडे कुकर्मी रती घडे
तैचि बधु पडे • ससारिकु ॥
म्हणौनि स्वधर्मानुष्ठान ते अखड यज्ञयाजन
जो करी तया बधन कहीचि नाही ॥

– ज्ञानेश्वरी, ३–८० ते ८३

भूतमात्राच्या उद्धारासाठीं ब्रह्मदेवानें धर्म निर्माण केला आहे धर्माची उपासना केल्यानंतर अन्य कोणत्याहि साधनाची अवश्यकता नसतें :

तुम्हा वर्णविशेषें आम्ही हा स्वधर्म विहिला असे
याते उपासा मग आपैसे काम पुरतील ॥
तुम्ही व्रेत नियम न करावें शरीरातें न पीडावे
दूरी केंहि न वचावे तीर्थाते गा ॥
योगादिके साधने मत्र यत्र आराधने झणी करा ॥
देवतातरा न भजावें हे सर्वथा काहीं न करावे
तुम्ही स्वधर्मयज्ञी यजावे अनायासे ॥ – ज्ञानेश्वरी, ३–८८ ते ९१

पतिव्रता ज्या प्रमाणे पतीचें अनुष्ठान करते त्याप्रमाणें तुम्ही अहेतुकपणे धमानुष्ठान करा 'स्वधर्मरूप मखु' हाच भूताना सेव्य आहे. धर्माला भजल्यानें सर्व प्रकारची समृद्धी प्राप्त होईल असें भूतमात्राना ब्रह्मदेवानी आश्वासन दिलें आहे

ब्रह्मदेवानें विशद केलेल्या धर्मस्वरूपाचा ज्ञानेश्वरानीं जो विस्तार केला आहे त्यास मूळ गीतेतील फक्त एकच श्लोक आधारभूत आहे तो श्लोक असा .

सहयज्ञा प्रजासृष्ट्वा पुरोवाच प्रजापति
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ – गीता, ३–१०

या श्लोकानतर आलेले गीतेंतील श्लोक यज्ञाची महती वर्णन करणारे आहेत, त्यावरून उपरोक्त श्लोकाचा सबध यज्ञाशींच आहे हे उघडच आहे ज्ञानेश्वरानीं या श्लोकावरील भाष्यात यज्ञ या शब्दाचा 'विधिप्रधान याग' असा अर्थ घेतला नाहीं, 'स्वधर्मरूप याग' असा अर्थ त्यानीं दिला आहे ज्ञानेश्वराच्या धर्मविषयक दृष्टिकोनाच्या दृष्टीनें हा अर्थ महत्त्वाचा आहे यज्ञयागाचा अधिकार वरिष्ठवर्णीयानाच असतो अर्थात् सर्वसामान्य जनतेनें धर्माचरणाचा कोणता आदर्श पुढें ठेवावयाचा हा बिकट प्रश्न ज्ञानेश्वरानीं धर्माचा व्यापक अर्थ करून सोडविला आहे म्हणूनच 'स्वधर्मरूप मखु' म्हणजे वर्णाश्रमाप्रमाणें प्रत्येकाच्या वाटयास आलेलें कर्तव्य कर्म हाच श्रेष्ठ धर्म असून त्याचें अनुष्ठान सर्वांनीं करावें असें वरील श्लोकाचें स्पष्टीकरण ज्ञानेश्वरानीं केलें आहे या महत्त्वाच्या अर्थाबाबत सांदिग्धता राहू नये म्हणून 'व्रतनियम करण्याची आवश्यकता नाहीं शरीरास कष्ट देणें आवश्यक नाहीं, भिन्न देवताच्या अर्चनाची सुद्धा विशेष मातब्बरी नाहीं. स्वधर्मरूप यज्ञ करा म्हणजे इष्ट फलप्राप्ती होईल' असें ज्ञानेश्वर सागतात धर्माचे स्वरूप लोकाभिमुख करण्याचा ज्ञानेश्वराचा कटाक्षहि या भाष्यात दिसून येतो

## दुर्मत खंडन

यथार्थधर्मस्वरूपाचें वर्णन करण्यासाठीं चुकीच्या धर्मकल्पनांचें निराकरण करणें आवश्यक होतें ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात ज्ञानेश्वरानीं तें कार्य केलें आहे तेरावा अध्याय वस्तुतः क्षेत्रक्षेत्रज्ञ विचाराचा गीत च

आधारानें या अध्यायांत तो विचार ज्ञानेशानीं मांडलाच आहे परंतु दुर्मत-खंडनहि त्याबरोबरच केलें आहे तेराव्या अध्यायाच्या बाबतींत दुसरीहि एक महत्त्वाची गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे या अध्यायांत मूळ संस्कृत श्लोकांशीं ज्ञानेशाच्या ओंव्यांचें प्रमाण सर्वांत अधिक आहे नवव्या अध्यायाचा गौरव खुद्द ज्ञानेश्वरांनीच केला आहे अठरावा कलशाध्याय असूनहि तो एकाध्यायी गीताच आहे असें त्यांनीं सांगितलें आहे परंतु या दोन्ही अध्यायांत मूळ संस्कृत श्लोकांशीं असलेलें ओंव्यांचें प्रमाण अनुक्रमें १ १६ व १ २४ असें आहे परंतु मूळ संस्कृत श्लोकांशीं ओंव्यांचें सर्वांत अधिक प्रमाण म्हणजे १.३४ तेराव्या अध्यायांत आढळतें या विस्तारा-वरून चुकीच्या धर्मकल्पनांचें खंडन ज्ञानेश्वरांना किती महत्त्वाचें वाटत होतें याची कल्पना येईल [१०]

क्षेत्राविषयींचीं भिन्न मतें आणि अहिंसेसंबंधींच्या विपरीत कल्पना यांचें निराकरण तेराव्या अध्यायांत आलें आहे वैदिक, पाखंडी, संकल्पवादी, स्वभाववादी, कालवादी यांचीं क्षेत्रासंबंधींची मतें चुकीचीं असून त्यांना क्षेत्र म्हणजे काय हें समजलेंच नाहीं असें सांगून ज्ञानेश्वर म्हणतात

पैं परतत्त्वाआरौतें स्थावराआंतौतें
जें कांहीं होतें जातें तें क्षेत्रचि हें ॥ ज्ञा १३-१५८

अहिंसेसंबंधींच्या अपसिद्धांताचें खंडन करतांना ज्ञानेश्वरांनीं बराच विस्तार केला आहे जैन-बौद्धांच्या उदयापूर्वींच अहिंसेस महत्त्व आलें होतें ज्ञानेश्वरांच्या काळांत बौद्ध पंथ भारतांतून 'परदेशी' झाला असला तरी त्या काळांत दक्षिणेंत जैनांचें बरेंच प्राबल्य होतें कर्नाटकांत तर राजकारणा-तील निर्णायक सूत्रें जैन श्रेष्ठी व मुत्सद्दी यांच्या हातीं होतीं. त्यांनीं माज-विलेला अहिंसेचा बडीवार अज्ञ जनांचा बुद्धिभेद करणारा असल्यानें 'मुंड लुंचणाऱ्या' दिगंबर पंथीय जनांची हिंसा अर्थशून्य आहे असें मत ज्ञानेश्वरांनीं दिलें आहे वैदिक कर्मकाण्डीय अहिंसेच्या नांवावर हिंसा करीत म्हणून त्यांच्याहि मतांचें खंडन ज्ञानदेवांनीं केलें आहे ज्ञानेश्वर आणि एकनाथ यांना देखील याज्ञिकांच्या हिंसेचें खंडन करावें लागलें त्यावरून नाथकालापर्यंत देखील यज्ञसंस्थेचा पगडा विशिष्ट वर्गावर फार मोठ्याप्रमा-णांत होता असें दिसतें [११] 'अहिंसा हें पद तीन अक्षरांचें असूनहि त्या

संबधीं मतमतांतरें बरींच असल्यानें त्यांचें खंडन केल्याशिवाय सताजोगें व्याख्यान होणार नाहीं म्हणून हा विस्तार केला' (ज्ञा १३-३१७ व ३२८) असें या विषयावरील व्याख्यानाचा समारोप करताना ज्ञानेश्वरानीं उद्गार काढले आहेत.

ज्ञानेश्वराना अहिंसा मान्य नव्हती असें मात्र नव्हे अहिंसेविषयींच्या चुकीच्या मताचें निर्मूलन त्यानीं केलें आहे एवढेंच जैनपथीय किंवा कर्मठ वैदिक याच्याप्रमाणें अहिंसेची संकुचित कल्पना ज्ञानेश्वराना मान्य नव्हती खऱ्या अहिंसेचें विस्तृत वर्णन त्यानीं या अध्यायात केलेंच आहे (१३–२५० ते ३११), पुढें सोळाव्या अध्यायात अहिंसेची सूत्ररूप व्याख्याहि त्यानीं दिली आहे :

> आणि जगाचिया सुखोद्देशें शरीरवाचामानसें
> राहटणे ते अहिंसे रूप जाण ॥ १६–११४

केवळ हिंसेपासून निवृत्ती म्हणजे अहिंसा नव्हे 'जगाच्या सुखासाठी झटणे आणि झिजणें' हे अहिंसेचें रूप ज्ञानेश्वरास अभिप्रेत आहे म्हणूनच स्वधर्माच्या उपदेशाबरोबरच निष्काम कर्मयोगाचा आग्रह ज्ञानेश्वरानीं धरला आहे.

## निष्काम कर्मयोग

जैन, बौद्ध आणि शंकराचार्य याच्या उपदेशामुळें समाजात सन्यासाला बरीच प्रतिष्ठा प्राप्त झाली होती अज्ञाना धर्म समजत नव्हता आणि ज्याना थोडें फार ज्ञान होतें त्याचा ओढा सन्यासाकडे होता त्यामुळें कर्म-सन्यासास महत्त्व आलें होतें ज्ञानी समाजाविषयीं उदासीन होते तर समाजाचें नेतृत्व करण्याचें सामर्थ्य अज्ञ जनात नव्हतें त्यामुळें समाजाचें नेतृत्व शब्दप्रामाण्यावर विश्वास ठेवून व्रतवैकल्यादिक आचाराचें पालन करणाऱ्या कर्मठाकडे गेलें गीता कर्मयोगपर असूनहि तिचा सन्यासपर अर्थ होऊ लागला समाजात वावरणाऱ्या चालत्या–बोलत्या देवाचें महत्त्व घटलें व दगडा–धोंड्याच्या दैवतांचें माहिमान वाढलें या परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठीं कर्मत्याग म्हणजे सन्यास नव्हे या तत्त्वाचा पुरस्कार ज्ञानेश्वरानीं केला त्याग कर्माचा करावयाचा असून फलाशेचा करावयाचा असतो, तोच

खरा सन्यास आहे हे ज्ञानेश्वरींतील प्रतिपादनात स्पष्ट करून समाजाच्या विकासास आवश्यक असलेल्या पण अधर्मानें अभिभूत झालेल्या निष्काम कर्मयोगाचा आदर्श ज्ञानेश्वरानी समाजापुढें ठेवला

आम्ही समस्तहि विचारिले तव ऐसेंचि मना आले
जे न साडिजे तुवा आपुले विहित कर्म ॥
परी कर्मफळी आम न धरावी आणि कुकर्मी सगती न व्हावी
हे सत्क्रियाचि आचरावी हेतूवीण ॥२–२६५, २६६

जीवास प्रकृतीचा सग आहे तोवर कर्म सुटत नाहीं, म्हणून कर्म सोडणें हा दुराग्रह ठरतो जे उचित आणि 'अवसरप्राप्त' असेल तें कर्म निष्काम-बुद्धीनें आचरलेच पाहिजे (३–६३ ते ७८) देह लाभल्यानतर कर्माची खती करणें गावढळपणाचें ठरतें. निष्काम बुद्धीनें कर्माचरण करणे हाच योग्य मार्ग आहे (३–१४५ ते १५१) ज्ञात्याला स्वतःसाठीं कर्माची आभिलाषा नसतें तथापि, लोकाचें मार्गदर्शन करण्यासाठी त्याने निष्काम बुद्धीने कर्माचरण केलें पाहिजे श्रेष्ठाचा आचार सर्वसाधारण समाजास प्रमाणभूत असतो त्याच्या आचरणातून धर्माचें दर्शन घडतें अशी लोकाची समजूत असते अज्ञाचा बुद्धिभेद होऊ नये म्हणून जगाचें मार्गदर्शन करण्यासाठीं सतानीं विशेषे करून कर्मानुष्ठान केले पाहिजे. तरच जग योग्य मार्गास लागेल. (३–१५५ ते १७१)

विहित कर्मानुष्ठान हीच परमेश्वराची श्रेष्ठ पूजा आहे :

हे विहित कर्म पाडवा आपुला अनन्य ओलावा
आणि हेचि परम सेवा मज सर्वात्मकाची ॥
तया सर्वात्मका ईश्वरा स्वकर्मकुसुमाची वीरा
पूजा केली होय अपारा तोषालागी ॥ १८–९०६ व ९१७

कर्माचा सन्यास घडूच शकत नाही सन्यासाचें फळ कर्मत्याग केल्यानें लाभत नाहीं मनानें फळाशेचा त्याग केल्यानतरच सन्यासाचें फळ प्राप्त होतें

जो मने ऐसा जाहला सगी तोचि साडिला
म्हणौनि सुखे सुख पावला अखडित ॥
आता गृहादिक आघवे हे नलगे त्याजावें
जे घेते जाहले स्वभावें नि सग म्हणऊनि ॥

म्हणौनि कल्पना जै साडे तैंचि गा सन्यास घडे
इये कारणे दोन्ही सागडे सन्यास योगु ॥ –ज्ञानेश्वरी, ५–२१, २२ व २५

कर्माच्या बधनातून मुक्त होण्यासाठी कर्मत्याग करावा लागत नाहीं कर्मफल भगवतास अर्पण करणारा ज्ञानी कर्मातीत होतो (१२–७६ ते ७८), प्रवृत्ति आणि निवृत्ति याच्या आवर्तात तो कधींच सापडत नाहीं

इद्रिये न कोडी भोगाते न सोडि
अभिमानु न सटी स्वजातीचा ॥
कुलधर्मु चाळी विधि निषेध पाळी
मग सुखे तुज सरळी दिधली आहे ॥
म्हणौनि प्रवृत्ति आणि निवृत्ति इये ओझें न घेचि मति
अखड चित्तवृत्ति माझ्या ठायी ॥ –ज्ञानेश्वरी, १२–११५, ११६ व १२१

निष्काम कर्मयोग हा 'धुरेचा योग' आहे (१२–१३४) कर्मयोगी हा अनन्य भक्त असतो, तो मुक्त असतो आणि परमेश्वरास प्रिय असतो (१२–१५६) कर्माचें बधकत्व कर्माचा त्याग करून नाहींसें करता येत नाही परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करून मोक्ष मिळवावयाचा असता हे गीतेच्या चौथ्या अध्यायापासून ते ११ व्या अध्यायापर्यंतचें प्रतिपाद्य आहे असें ज्ञानेश्वर सागतात [१२]

## 'भक्ति येथ सरे : जाति अप्रमाण'

शंकराचार्यांचा कर्मसन्यास ज्ञानेश्वराना मान्य नाही [१३] त्याचप्रमाणें इतर आचार्यांची एकातिक भक्तिहि त्यानीं पुरस्कारिली नाही ज्ञानेश्वराची भक्ति 'अकर्मक' नाहीं ती 'सकर्मक' भक्ति आहे 'कर्में ईशु भजावा' हे तिचें सूत्र आहे स्थितप्रज्ञ होऊन निष्काम कर्मयोगाचें आचरण ज्याना अशक्य वाटते अशाना परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करण्याचा म्हणजे भक्तीचा भावगम्य मार्ग भगवतानीं गीतेंत उपदेशिला आहे भागवतधर्मानें कर्मयोगास भक्तीची जोड देऊन कर्मयोग सुलभ केला व भक्ति क्रियाशील बनविली त्यामुळे कर्म व भक्ति ही परस्परपूरक आणि समाजविकासास उपकारक बनली व या धर्माची ऋतरक्षणात्मक प्रेरणा त्यायोगें सफल झाली ज्ञानेश्वराची भक्ति या प्रेरणेंतून परिणित झाल्यामुळे भक्तियुक्त अंतःकरणानें

कर्म करणारा सायुज्याचा अधिकारी होतो असे ज्ञानेश्वर सागतात निष्ठेनें कर्माचरण केलें असताना परमेश्वराची पूजा घडते, या प्रसादानें ज्ञान लाभतें, ज्ञानानें भक्तीस बहर येतो, भक्तीने जीवब्रह्मैक्य घडतें आणि साधक सायुज्य मुक्तीचा अधिकारी होतो' अशी प्रक्रिया ज्ञानेश्वरीत साग- ण्यात आली आहे (१८–१२४७, १२४८ व १२५७) भक्तीच्या या महतीने ‘चौपुरुषार्थांच्या शिरी’ (१८–८६७) भक्तीस स्थान मिळालें आहे भक्त ईश्वरास आवडतो (१२–३३५–८), त्याच्यासाठीं परमेश्वर अवतार घेतो (१२–१८६–९१), त्याचेवरून जीव ओवाळून टाकावा असें भगवतास वाटतें, भक्तिवतास परमेश्वर शिरोधार्य करतो (१२–२१४) ईश्वराची उपासना करीत असताना भक्त सर्वत्र पर- मेश्वरास पाहतो कारण, सर्व भूतमात्राच्या ठिकाणीं भगवतास पाहणें हाच खरा भाक्तियोग आहे (१०–११८) अनन्य भक्त हा परमेश्वररूप होतो (११–६७ व १८–३९५) अशा स्वरूपाची भाक्ति हीच परमेश्वराची सहजावस्था आहे (१८–१११३), ईश्वराचा तो सहजप्रकाश आहे (१८–१११७), हीच भक्ति भगवतानी भागवतात ब्रह्मदेवास उपदेशिली (१८–११३२) या मूळ तत्त्वासच

ज्ञानी इयेतें स्वसंवित्ति शेव म्हणती शक्ति
आम्ही परम भक्ति आपली म्हणो ॥ १८–११३३

भक्तीच्या उत्कर्षावस्थेत घडणारें जीव-ब्रह्मैक्य संपादन करण्याचें सामर्थ्य प्रयेक व्यक्तीचे ठिकाणी असतें. देव मनुष्यरूप धारण करतो तो भक्ती- साठी व मनुष्य देवरूप होतो तो भक्तीनें नराचा नारायण होऊ शकतो. निष्ठा मात्र पाहिजे जाती कुळ कोणतेंहि असले तरी मानवाच्या विकासात त्याचा प्रतिबंध होत नाहीं कारण, देवकोटिपर्यंत स्वत ची उन्नति करून घेण्याचें सामर्थ्य मानवाच्या निष्ठेत असतें

म्हणौनि भक्ति गा येथसरे जाति अप्रमाण ९–४५२.
म्हणौनि कुळजातिवर्ण हे अवघेचि गा अकारण
एथ अर्जुना माझेपण सार्थक एक ॥
तैसी क्षत्री वैश्य स्त्रिया का अत्यजादि इया
जाती तवाचि वेगळालिया जव न पावती माते ॥

मग जातव्यक्ति पडे बिदुले   जेव्हा भावें होती मज मिनले ॥
जैसे लवणकण घातले   सागरामाजी ॥ ९-४५६, ४६० व ४६१

## समाजक्रांति आणि ज्ञानेश्वर

आपला विकास करून घेण्याचा हक्क प्रत्येक व्यक्तीस आहे ही भूमिका परपरेचा आविक्षेप न करता ज्ञानेश्वरानीं माडली आहे. वेद त्रैवर्णिकाचा लाडका झाल्यामुळे जी उणीव निर्माण झाली होती ती दूर करण्यासाठी गीता अवतरली असें ज्ञानेश्वराचें मत आहे त्याच प्रमाणे सर्ववर्णीका करिता धर्माच्या क्षेत्रात मुक्तद्वार नसल्यानें पागळया झालेल्या समाजास समर्थ करण्याकरिता ज्ञानेश्वरी अवतरली असे म्हणता येईल ज्ञानेश्वरानी वर्ण-व्यवस्था मानली आहे एवढयाच एका कारणावरून त्याना आणि त्याच्या अनुयायाना प्रतिक्रातिकारक ठरविणारे काही आधुनिक क्रातिवीर आहेत जातिभेदाचें उच्चाटन केल्याबद्दल महानुभावाना क्रातिकारकाच्या मडळात अग्रपूजेचा मान देणारे क्रातिपूजकहि आढळतात आचार्य भागवताना महानुभावाचा सन्यास क्रातिकारक वाटतो महानुभावानीं महाराष्ट्रात घडलेल्या क्रातीस कितीसा हातभार लावला हें मात्र त्यानीं स्पष्ट केलें नाहीं ते म्हणतात, 'वारकरी सतानीं सन्यासमार्ग सोडला व भक्तिमार्गाचा प्रसार करताना जातिबधनाचे पाश तोडण्याची आवश्यकता त्याना भासली नाहीं ही गोष्ट अधिक महत्त्वाची आहे अवैदिकाचा सन्यास त्या दृष्टीनें अधिक पुरोगामी आणि क्रातिकारक होता असें माझें मत आहे. हे क्राति कारकत्व वारकरी सताना उमगलें नाहीं शकराचार्याना ज्याप्रमाणे अद्वैता-साठी नवा सामाजिक देह निर्माण करण्याची आवश्यकता भासली नाही त्याप्रमाणें ज्ञानेश्वरानाहि भक्तिसुखाच्या आस्वादासाठी नवा सामाजिक देह निर्माण केला पाहिजे याची जाणीव झाली नाहीं ज्ञानेश्वराच्या समाजशास्त्रा-तील हा कच्चेपणा समजला पाहिजे शंकराचार्याचा ब्राह्मणधर्म आणि ज्ञानेश्वराचा नवा भक्तिपथ हे दोन्ही मार्ग नव्या समाजशास्त्रास जन्म देऊ शकले नाहींत ही गोष्ट मोकळेपणानें कबूल केली पाहिजे वारकरी सता-बद्दल राजवाडयानीं जे कठोर उद्गार काढले आहेत ते एका अर्थानें बरो-बर आहेत असेंच म्हणावें लागेल.'[१४]

समाजाला आपल्याबरोबर नेता आलें नाही तरी चालेल पण प्रस्था पित मूल्यांचा विध्वंस मात्र झाला पाहिजे एवढीच क्रांतिकारक समाजशास्त्राची कल्पना असेल तर अशा प्रकारचें क्रांतिकारकत्व ज्ञानेश्वरांनीं दाखविलें नाहीं हे मान्य केलेंच पाहिजे रूढ मूल्यांचा अधिक्षेप न करता समाजाला प्रगतिपथावर नेण्यासाठीं नवविचारांचें व नवीन मूल्यांचें दर्शन घडविणें हा क्रांतीचा अर्थ घ्यावयाचा असेल तर मात्र पुरोगामी दृष्टि ठेवूनच ज्ञानेश्वरांनीं भागवतधर्माच्याद्वारें समाजक्रांति घडवून आणली हे अमान्य करता येणार नाही ज्ञानेश्वरांनी वर्णाश्रमास दिलेली मान्यता कर्मठांच्या वर्णाश्रमासंबंधीच्या दृष्टिकोनाहून भिन्न आहे भारतीय समाजव्यवस्थेंत वर्णभेदाचीं मुळें इतकीं खोलवर रुजलेलीं आहेत की, आजच्याहि काळात व्यवहारत त्याचें उन्मूलन शक्य झालें नाहीं वर्णव्यवस्थेचा पगडा लोकांच्या मनावर एवढा होता की, त्यावर प्रत्यक्ष हत्यार चालविणारा कोणताहि पंथ कोलमडला तरी असता निदान मूठभर बहिष्कृतांपुरताच तो मर्यादित तरी राहिला असता 'परदेशी' झालेला बौद्ध पंथ किंवा ज्ञानेश्वर काळात महाराष्ट्रात असलेला महानुभाव पंथ यांच्या इतिहासावरून हाच बोध होतो ज्ञानेश्वरांना दोन्ही गोष्टी टाळावयाच्या होत्या संपूर्ण समाजाचा सर्वांगीण विकास हे त्यांचें ध्येय होतें म्हणून कोणत्याहि स्वरूपातील एकांतिकता ज्ञानेश्वरांनीं पुरस्कारिलेल्या भागवतधर्मांत आढळत नाहीं

वर्णव्यवस्थेसंबंधीच्या रूढ कल्पनांचा ज्ञानेश्वरादिकांनी जशाच्या तसा स्वीकार केला असें म्हणणें वस्तुस्थितीस सोडून होईल वरिष्ठ वर्णांचा गौरव त्यांनीं केला आहे परंतु, कनिष्ठ गणलेल्या वर्णांना त्यांनीं हीन लेखलें नाहीं आपल्या कर्तव्यांचें पालन करणारा प्रत्येक वर्ण सारख्याच योग्यतेचा आहे असा त्यांचा सिद्धांत आहे ब्राह्मणाचें धर्माचरण आणि शूद्राची परिचर्यावृत्ति सारख्याच योग्यतेची आहे [१५] शूद्र हा श्रुतिबाह्य वर्ण असल्याचें त्यांना मान्य नाही [१६] त्यांच्या दृष्टीनें वर्णांचे महत्त्व गौण होतें माणूस महत्त्वाचा होता. तो कोणत्या वर्णाचा आहे यापेक्षा तो कर्तव्यपालन करतो किंवा नाहीं यास महत्त्व अधिक आहे आपलें कर्तव्यपालन करणाऱ्या अनन्य भक्तास वर्णनिरपेक्ष मानाचें स्थान ज्ञानेश्वरांनीं दिलें आहे :

पै भक्ति मी एकी जाणे तेथ साने थोर न म्हणे
आम्ही भावाचे पाहुणे भलतेया ॥९–६९५

## उदात्त भूमिकेवरून समतेचा उपदेश

ज्ञानेश्वरादिक संतानी केलेला सामाजिक समतेचा उपदेश आर्थिक वा व्यावहारिक निकष लावून केला नाही परमार्थाच्या क्षेत्रातील समतेमुळे लौकिकातील वर्णभेद बोथट ठरले विग्रहातून वैभव वाढतें हा सिद्धांत त्याना मान्य नसल्यामुळें समाजाशी विग्रह करून वैर वाढविण्याचा मार्ग न अवलंबिता समन्वयानें व स्नेहानें सामाजिक समतेचे संगोपन करणारा भागवतधर्म ज्ञानेश्वरानी उपदेशिला ज्ञानामुळे आपण श्रेष्ठ झालों असा अहंकार बाळगणारास ज्ञानेश्वरानी कनिष्ठ लेखले आहे (९–३६८ व ३७८) उच्चनीच भेदभाव मानतो तो ज्ञानी नव्हेच मी उत्तम इतर हीन अशी भावना बाळगणारा सिद्धी पावत नाहीं [१७] ईश्वर हृदयस्थ आहे असा धर्मशास्त्रानीं निर्णय दिला आहे [१८] सर्वत्र समदृष्टीनें पाहतो तो ज्ञानी ईश्वर सर्वत्र आहे ही निष्ठा दृढावली म्हणजे ईश्वर आणि जीव यामधील द्वैताचा निरास होतो आणि सर्वत्र हरीच दिसू लागतो [१९] सामरस्याच्या या अनुभवात सागरात लवण विरघळून जावें त्याप्रमाणे देव–भक्ताची एकरूपता होत असते [२०] ही अवस्था प्राप्त करून घेण्याचा उत्तम आणि सुलभ मार्ग म्हणजे विठ्ठलाचें नामस्मरण .

हेचि भक्ति हेचि ज्ञान एक विठ्ठलची जाण [२१]

कर्माच्या बधातून मुक्त होण्याचा हाच सुलभ मार्ग आहे.[२२] सर्वभूतीं दया आणि वाचेनें नारायणाचा उच्चार हे भक्तीचें वर्म आहे [२३] जगच विष्णुमय असल्याने भूतमात्र सहोदर ठरतात :

तू विष्णु म्हणोनि रे जगचि केवळ येर सकळिक मज सहोदर [२४]

या वैष्णवधर्माच्या आचरणासाठी नित्य-नैतिक कर्म सोडण्याची गरज नाहीं. वर्णाश्रमप्राप्त कर्म सोडणें निरर्थक आहे नास्तिकाच्या मार्गास लागणें चुकीचें आहे. संत आणि सद्गुरू याच्या अनुसरणानें धर्माचें वर्म सांपडतें [२५] आणि 'अवघा संसार सुखाचा करीन' [२६] असा विश्वास भक्ताच्या अंत-करणात निर्माण होतो.

ज्ञानेश्वरानीं उपदेशिलेल्या भागवतधर्मात उदात्त भूमिकेवरून समतेचा उपदेश करण्यात आला आहे जन्मसिद्ध जातिभेदाना या धर्मात स्थान नाहीं विश्व आणि मानव, मानव आणि परमेश्वर यामधील भेद देखील शेवटीं उरत नाहीं विश्व ब्रह्ममय आहे म्हणून सर्व भूतमात्र सहोदर आहेत या भावनेनें विश्वाकडे आणि विश्वातील मानवमात्राकडे पाहण्यास शिकविणाऱ्या या धर्मात समतेची परमावधि आढळून येईल. आधुनिक युगातील समतेच्या पुरस्कर्त्यांना यापेक्षा अधिक उच्चतर भूमिकेवरून समतेचा पुरस्कार करता येईल असें वाटत नाहीं म्हणूनच 'संतमंडळास सामाजिक समतेची तळमळ नव्हती' अशा आशयाचा आचार्य भागवत यानी घेतलेला आक्षेप निरर्थक वाटतो [२७]

ज्ञानेश्वरानीं वर्णिलेला आदर्श ज्ञानी व भक्त हा एकांतिक भक्तींत न रमता विश्वाच्या सुखाची काळजी वाहतो याचें कारणहि विश्वोद्धार आणि आत्मोद्धार हीं उद्दिष्टें त्याना परस्पर विरोधी वाटत नसून परस्परपूरक वाटतात हेंच देता येईल दैवी संपत्तीच्या वर्णनात 'जगाच्या सुखासाठीं राहटणें' हें अहिंसेचे लक्षण सांगितल्यानंतर ज्ञानेश्वरानी दयेचें लक्षण पुढील प्रमाणें वर्णिलें आहे

निम्न भरलियाविणे पाणी ढळोंचि नेणें
तेवी श्राता तोषौनि जाणे सामोरे पा ।।
पै पायी कांटा नेहटे तंव व्यथा जीवी उमटें
तैसे पोळे सकटें पुढीलाचेनि ।।
का पावो शीतलता लाहे की ते डोळ्याचि लागीं होये
ऐसा परसुखे जाये सुखावीतु ।।
किंबहुना तृषितालागीं पाणी आरायिले असे जगी
तैसा दु खिताचे सेलभागी जिणे जयाचें ।।
तो पुरुष वीरराया मूर्तिमंत जाण दया— १६-१५८-६२

आपण नव्या पंथाचा उपदेश करीत आहोत असा अभिनिवेश न बाळगतां कालप्रवाहात मलीन झालेल्या भागवतधर्माचे पुनरुज्जीवन ज्ञानेश्वरानीं केलें पूर्वपरंपरेचा अधिक्षेप करण्याचें 'क्रांतिकारकत्व' त्यानीं दाखविलें नाहीं हे खरें परंतु त्यानीं 'नवा धर्म सांगितला नाहीं' असा

निष्कर्ष काढणें मात्र अज्ञानमूलक ठरेल अधर्माच्या प्राबल्यानें, धर्माविषयींच्या चुकीच्या कल्पनांनीं आणि यज्ञयागादिक कर्मकांडानें संकुचित केलेला धर्म ज्ञानेश्वरांनीं व्यापक केला अग्नीत आहुति देणें हा यज्ञ नसून 'स्वधर्माचरण हेंच अखंड यज्ञयाजन आहे' ही नवी व समाजाचें उन्नयन करणारी दृष्टि त्यांनी महाराष्ट्राला दिली विपरीत धर्मकल्पनांच्या प्रभावानें त्याकाळात कर्मसंन्यासास प्रतिष्ठा प्राप्त झाली होती· परंतु ज्ञानी समाजविन्मुख राहून लोककल्याण साधू शकत नाहीं असा ज्ञानेश्वरांचा विश्वास असल्याने संकल्पाचा त्याग करून निष्काम बुद्धीनें कर्मयोगाचा आश्रय करणें हाच खरा संन्यास आहे हे त्यांनीं आपल्या वाणीने व आचरणानें पटवून दिलें समाजापासून दूर 'आत्मसंतुष्ट' राहण्यात इतिकर्तव्यता नसून भूतमात्रांच्या सुखासाठी झटण्यातच जीवनसाफल्य आहे हे ज्ञानेश्वरोक्त भागवतधर्माचें सार आहे हे ध्येय साध्य करण्यासाठी साधनरूप भक्ति आणि जीवननिष्ठारूप भक्तियोग यांचा पुरस्कार ज्ञानेश्वरांनीं केला.

आदर्श जीवननिष्ठेसाठीं याति-पंथ इत्यादिकांचे अंतराय त्यांनीं मानले नाहींत ज्ञानेश्वरोक्त भागवतधर्म सर्ववर्णिकांसाठी खुला आहे तसाच सर्व पातळीवरच्या मानवांना त्याचें अनुष्ठान करता येईल इतका तो सुलभहि आहे जातींवर व्यक्तीचें महत्त्व अवलंबून नाहीं निष्ठेच्या श्रेष्ठ-कनिष्ठतेवरून माणसाचें मोल ठरविलें पाहिजे 'जग विष्णुमय आहे' ही प्रतीती आली म्हणजे सर्वांतर्यामी व अणुरेणूंत परमेश्वर कोंदलेला आहे याचा प्रत्यय येतो या प्रत्ययाने देव-भक्त, विश्व-मानव हे भेद लयास जातात 'मीच देव मीच भक्त' ही आनंदरूप जाणीव तेवढी उरते मानव देवाएवढा मोठा होतो आणि देव मनुष्यरूपानें वावरत असल्याचें दर्शन घडतें

ऋतप्रेरणेस उजळा देणारा ज्ञानेश्वरांचा भागवतधर्म पंढरीच्या विठोबाच्या रूपाने साकारला· चंद्रभागेच्या वाळवंटावर एकत्र आलेल्या अठरापगड जातीच्या साधुसंतांनी तो जागविला विठ्ठलाच्या गजरानें 'अवघी पंढरी दुमदुमली' आणि अखिल महाराष्ट्र 'धवळला'

## १०. टीपा

१ श वा दाडेकर, 'भागवतधर्म', **साहित्य गौरव**, खट १ ला, पृ ३८१

२ 'धर्माच्या क्षेत्रात स्त्रीतत्त्वास प्रमाणाबाहेर महत्त्व मिळाले आणि तें महत्त्व कितीहि उच्च आध्यात्मिक भुमिकेवरून मिळालेले असले तरी पथाच्या अनुयायाचा निश्चित अध पात होतो शाक्त आणि राधाकृष्ण सप्रदायानीं या गोष्टी सिद्ध केल्या आहेत ही गोष्ट लक्षात घेऊन काही वैष्णव सप्रदायानी या गोष्टी टाळल्या आहेत महाराष्ट्रातील वैष्णव पथाच्या सस्थापकानी राधेच्या जागी रुक्मिणीची– कृष्णाच्या विवाहित पत्नीची– स्थापना करून आपला सप्रदाय शुद्ध राखला आहे'

–Evolution of Religio–Philosophic Literature of India, *Cultural heritage of India*, vol III P 34, 35

महाराष्ट्राच्या भक्तिसप्रदायास अखड परपरा आहे असे मागून एक पाश्चात्य विद्वान् लिहितात, 'भागवताचा मराठी सतानी केव्हा उपयोग केला हे सागता येत नाहीं परतु, ज्ञानदेवाच्या वाङ्मयापासून सर्वच वाङ्मयावर भागवताचा परिणाम झालेला दिसून येतो तामीळ आणि कानडी सतापेक्षा महाराष्ट्रीय भक्तिसप्रदाय निराळा आहे नाभाजीच्या भक्तमालेंत ज्ञानेश्वर विष्णुस्वामीचे शिष्य असल्याचा उल्लेख आहे महाराष्ट्रीय सतात 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' या मत्राबरोबरच 'रामकृष्ण हरि' हा विष्णुस्वामीचा मत्र प्रचलित आहे परतु विष्णुस्वामीप्रमाणे राधेला महाराष्ट्राने मान्यता दिली नाहीं'

–Farquhar, *Outline of Relegious Literature of India*, P 229

३ डॉ प्र न जोशी, **नवभारत**, मे १९५५

४. भास्कर वामन भट, "**महाराष्ट्र धर्म**" पृ ३८८ वर उध्दृत केलेल्या उताऱ्यावरून

५ आचार्य विनोबा भावे, **मधुकर**, पृ ७३

६ R D Ranade, *Mysticism in Maharashtra*, P 21.

७ M G Ranade, *Rise of Maratha Power*, P 28.

८ जगी कीति रूढवी स्वधर्माचा मानु वाढवी
इया भारा पासौनि सोडवी मेदिनी हे ॥ ज्ञा ३–१९०
या स्वधर्माते अनुष्ठिता वेचु होईल जीविता
तोही निका वर उभयता दिसत आहे ॥ ३–२२९

९ **ज्ञानेश्वरी**, १८–९२२ ते ९५६

१० आपल्या हातून विस्तार होत आहे याची जाणिव ज्ञानेश्वराना होती पण विस्तार अपरिहार्य व समर्थनीय आहे असे सूचक उल्लेखहि त्यानी केले आहेत
आणि स्वमताचिया निर्धारा लागौनि धनुर्धरा
प्राप्त मतांतरा निर्वेचु कीजे ॥ १३–२४१
१३–३१४, ३२२, ३३६ व ३३७ या ओव्यातहि झालेल्या विस्ताराचे समर्थन ज्ञानेश्वरानी केले आहे

११ तैसी हिसाचि करूनि अहिसा निफजविजे हा ऐसा
पैं पूर्वमीमासा निर्णो केला ॥
जे अवृष्टीचेनि उपद्रवे गादले विश्व आघवें
म्हणोनि पर्जन्योष्टि करावे नाना याग ॥
तव तिये इष्टेचिया बुडी पशुहिसा रोकडी
मग अहिसेची कडी कैसी दिसे ?
पेरिजे नुसधी हिसा तेथ उगवेल काय अहिसा
परी नवल बापा धिवसा या याज्ञिकाचा १३–१२१ ते १२४
**ए. भा.**, ७–२८० ते ८४, १०–३८० ते ३९४

१२ जे देहवाचा मानसे विहित निपजे जे जैसे
ते एक ईश्वरोद्देशे कीजे म्हणितलें ॥
हेंचि ईश्वरी कर्मयोगे भजन–कथनाचे खागे
आदरिले शेषभागें चतुर्थाचेनि ॥

ते विश्वरूप अकरावा अध्यायो सपे जव आघवा
तव कर्मे ईशु भजावा हे जे बोलिले ॥ –ज्ञानेश्वरी १८–१४४२ ते १४४४

१३ या सबधी ‘शकराचार्य आणि ज्ञानेश्वर’ या परिशिष्टातील प्रकरणात सविस्तर विवेचन केले आहे ज्ञानेश्वरानी शाकरमताचे अनुसरण केले नाही, दोघाच्या तत्त्वज्ञानविषयक भूमिका भिन्न आहेत असे प्रस्तुत लेखकाचे मत असून ते उपरोक्त प्रकरणात साधार विवेचिले आहे

१४ बा र मुठणकर, **महाराष्ट्रीय सतमडळाचे ऐतिहासिक कार्य,** प्रस्तावना, पृ १४

१५ जैसा द्विजु षट्कर्मे करी शूद्र तयाते नमस्कारी
की दोहीसिही सरोभरी निपजे यागु ॥ ज्ञानेश्वरी १६–९६

१६ **ज्ञानेश्वरी,** १८–८२२

१७ विनोबा, **ज्ञानेश्वराची भजने,** क्र ७२

१८ **कित्ता,** क्र १२

१९ **कित्ता,** क्र १३०

२० **कित्ता,** क्र १४६

२१ **कित्ता,** क्र ७१

२२ आवटे, **ज्ञानेश्वरमहाराजाचा गाथा,** क्र १६९

२३ **कित्ता,** क्र १६८,

२४ **कित्ता,** क्र ३३०

२५ **कित्ता,** क्र ४४४ व ४९५

२६ **कित्ता,** क्र ३२४

२७ “आत्मसाक्षात्कार आणि सामाजिक समता याचा परस्पर सबध काय आहे हा अत्यत विचारणीय प्रश्न आहे सामाजिक बाबतींत सर्वांचेच विचार सारखे असत नाहीत त्यामुळें आत्मसाक्षात्कार हें जीवनाचे एकमेव मूल्य मानणे धोक्याचे होईल आत्मसाक्षात्काराबरोबरच सामाजिक समतेची तळमळ हे देखील जीवनाचे मूल्य म्हणून स्वतत्रपणे मान्य करण्यात आले पाहिजे असें माझे मत झाले आहे”

–**महाराष्ट्रीय सतमडळाचे ऐतिहासिक कार्य,** प्रस्तावना पृ १६.

# ११. 'धर्म जागो पंढरीचा'

पढरीचे प्राचीन दैवत– ज्ञानेशानी वाढविलेली पढरीची महती– पथ भिन्न पण धर्म एक– पढरीचा धर्म– नामदेवाचें कार्य– महाराष्ट्रातील नरनारायण– सताची अद्वैत–प्रतीती– परप्रातीय सत आणि पढरीचा धर्म– धर्मजागृतीचें केद्र पढरपुर– काही आक्षेपाचे निरसन

उदात्त भूमिकेवरून सामाजिक समतेचा पुरस्कार करून ज्ञानेश्वर स्वस्थ बसले नाहींत आपल्या विचारप्रणालीस भीमातटीं पाडुरग क्षेत्रावर त्यानीं सजीव आणि साकार केलें महाराष्ट्रात आणि कर्नाटकातहि ज्ञानेश्वराच्या पूर्वी विठ्ठलोपासना प्रचलित होती महादेव आणि रामचद्र या दोन याद-वाच्या राजवटीत अधिकारपदावर असलेल्या हेमाद्रीनें 'चतुर्वर्गचिंतामणि' नामक आपल्या ग्रथाच्या तीर्थखडात पढरीचें माहात्म्य वर्णिलें आहे महादेव आणि रामचद्र या यादवाधिपतीचे काल अनुक्रमें शके ११८२–११९३ व ११९३–१२३१ असे येतात हेमाद्रीच्या ग्रथात आलेली यादव राजाची वशावळ महादेवापर्यंतचीच असल्यामुळे हा ग्रथ महादेवाच्याच काळात म्हणजे शके ११८२–९२ या सुमारास रचला असावा असें मान-ण्यास हरकत नसावी [१] शके ११९५ च्या सुमारास कोरलेल्या चौऱ्याशीच्या शिलालेखात विठ्ठलमदिराच्या जीर्णोद्धारासाठीं देणगी देणाराचीं नावें कोरण्यात आली आहेत देणगीदारात भिन्नव्यवसायिकाच्या नावाचा भरणा अधिक असला तरी यादवराजा रामदेव व हेमाद्रि याचीं नावें त्यात आहेत या काळात देवळाचा जीर्णोद्धार चालला होता त्यामुळें देऊळ पूर्वीचेंच होतें हे उघडच आहे शके ११५९ चा एक शिलालेख याच देवळात असून सोमेश्वर नावाच्या राजाने तो कोरविलेला आहे. या लेखात पुडलिकाचें

माहात्म्य असलेलें स्थान असा पढरीक्षेत्राचा उल्लेख आहे आळदी येथील शके ११३१ मधील एका समाधीवर विठ्ठल-रुखमाईच्या मूर्ति आढळतात त्यावरूनहि ज्ञानेश्वराच्या पूर्वीहि या क्षेत्रास महत्त्व होतें[२] हे सिद्ध होतें पढरपुरचे देऊळ रामानुजाना आश्रय देणाऱ्या होयासाळ बिट्टीदेवाने शके १०४९–५९ या काळात बाधलें असावे असे श्री खरे याचे मत आहे[३] विठ्ठलाच्या मूर्तीचे शिल्प इ स च्या सहाव्या शतकातील असावे असा श्री भगवानलाल इद्रजी याचा अदाज आहे श्री पचमुखी याना हे शिल्प इ स च्या चौथ्या शतकातील वाटतें[४]

## ज्ञानेशांनीं वाढविलेली पंढरीची महती

पढरपुरचें विठ्ठलमादिर किती प्राचीन आहे हे आपल्या दृष्टीने विशेष महत्त्वाचें नाहीं ज्ञानेश्वरानीं ज्या विशिष्ट दृष्टीनें पढरीचा महिमा वाढविला हे लक्षात घेणें जास्त महत्त्वाचें आहे विष्णुवर्धन उर्फ होयसाळ बिट्टीदेव यानें हे देऊळ बाधल्याचे इतिहास सागतो विष्णुवर्धन हा रामानुजाचार्यांचा म्हणजे विशिष्टाद्वैत मताचा अनुयायी ज्ञानेश्वर–समकालीन कानडी हरिदास हे माध्व सप्रदायी म्हणजे द्वैतमतानुयायी हेमाद्रि अद्वैती खरा परतु स्मार्त धर्मांचा व यज्ञयागादिकाचा पुरस्कर्ता त्याचे तत्त्वज्ञान ज्ञानदेवाच्या तत्त्वप्रणालीस जुळणारें नाहीं म्हणजे ज्ञानेश्वरानीं वाढविलेल्या पढरपूरच्या माहात्म्यास पूर्वी प्रचलित असलेल्या कोणत्याहि विठ्ठलोपासकाची तत्त्वज्ञानपरपरा जवळची नव्हती विशिष्टाद्वैती, द्वैती आणि कर्मठाद्वैती अशा भक्ताचा भरणा ज्या विठ्ठलोपासकात होता त्याच विठ्ठलाची उपासना निष्काम कर्मयोग आणि सुलभ भक्ति याचा समन्वय साधून ज्ञानेश्वरानी वाढविली हे स्पष्टच आहे

## पंथ भिन्न पण धर्म एक

ज्ञानेश्वरानीं हे कार्य विशिष्ट हेतूनें केलें होतें यात शंका नाहीं भागवतधर्माचें पुनरुज्जीवन आणि सघटन हे त्याचें उद्दिष्ट होतें हे निर्विवाद.[५] ज्ञानेश्वर हे नाथपथीय म्हणजे शिवोपासक असतानाहि विष्णु स्वरूपी असलेल्या विठ्ठलाची उपासना त्यानी वाढविली त्याचे गुरु

निवृत्तिनाथ यानीं अनेक अभगात विठ्ठलभक्तीचे महत्त्व वर्णिलें आहे याचा अर्थ असा कीं, ज्ञानेश्वराना भागवतधर्माचें पुनरुज्जीवन करून समाजसघटना करावयाची होती म्हणून नवीन उपासनापथ काढण्याचा खटाटोप न करता ज्या दैवतास लोकाचें अधिष्ठान आगोदरच लाभलें होतें त्याच दैवताच्या भोंवती ज्ञानेश्वरानीं भागवतधर्माचें मदिर उभारले निवृत्ति-ज्ञानदेव हे पूर्णतेस पोंचलेले संत होते त्याच्या दृष्टीनें प्रतीकात्मक दैवतस्वरूपापेक्षा धर्मस्वरूपास महत्त्व अधिक होतें शिवाय, भागवतधर्म अन्यदैवतविषयक असहिष्णु वृत्तीस प्रोत्साहन देणारा नाही सर्व विश्वच वासुदेवमय आहे, सर्व देवता नारायणात्मक आहेत अशी या धर्माची शिकवण असल्यामुळें गुरुपरंपरेनें शिवोपासक पण भागवतधर्मीय निवृत्ति-ज्ञानदेवास विष्णुस्वरूपी विठ्ठलाची भक्ति मानवणारी नव्हती असे मानण्याचें कारण नाहीं ज्ञानेश्वरानी टीकेसाठीं घेतलेला श्रीमद्‌भगवद्‌गीता हा ग्रथच त्याची दैवतविषयक भूमिका स्पष्ट करतो ज्ञानेश्वराच्या आगोदर सुमारे दोन शतकें शैव आणि वैष्णव याच्या दैवतविषयक अभिनिवेशानें धार्मिक वातावरण बरेंच गढूळ झालें होते. शिवोपासक राजाच्या जुलमापायी रामानुजाना आपला मूळ प्रात सोडून होयसाळाचा आश्रय घ्यावा लागला होता वीरशैव पथाच्या सस्थापनेनतरीह असेंच तग वातावरण निर्माण झाले होते या पार्श्वभूमीवर शिव आणि विष्णु याची एकरूपता मानणारा विठ्ठल सप्रदाय रूढ करून ज्ञानेश्वरानीं किती महत्त्वाचें कार्य केलें याची कल्पना करणें अवघड नाहीं. विठ्ठलाचे शिरावर शिवलिंग आहे असें वारकरी सप्रदाय मानतो तर विठ्ठलाच्या शिरावर शिवलिंग नसून तो किरीट आहे असें माध्वसप्रदायी कानडी विठ्ठलभक्त मानतात हा भेद या सदर्भात ध्यानात ठेवण्यासारखा आहे.

व्यापक दृष्टिकोनातून विठ्ठलभक्तीचा उपदेश केल्यामुळें ज्ञानेश्वरानीं प्रवर्तित केलेल्या भागवतधर्मास दैवतविषयक अभिनिवेशाची बाधा झाली नाहीं विठ्ठलाचे ठिकाणीं सारे देव आणि सर्व देवताचे ठिकाणीं विठ्ठलाचें रूप सतानी पाहिले. 'ईशावास्यमिद सर्व' ही ईशोपनिषदाची भूमिका निवृत्ति-ज्ञानदेवानीं केलेल्या उपदेशात प्रतिबिंबित झाली आहे. देवाच्या वाणीद्वारें प्राचीन ऋषींनीं जे सदेश मानवाना दिले तेच प्राकृताच्या भाषेत

या संतांनी जनतेच्या हृदयावर कोरले महाभारतांत वर्णिलेलें शिवविष्णूचें ऐक्य निवृत्तिनाथाच्या अभंगांत उतरलें त्याचें हेंच कारण देतां येईल

पुण्डलिकाचे भाग्य वर्णावया अमरी नाहीं चराचरी ऐसा कोणी
विष्णुसहित शिव आणिला पंढरी केले भीमातीरीं पेखणे जेणे ६

पंढरीचा विठोबा शंकराचें लिंग मस्तकीं धारण करतो आणि शंकर रात्रंदिवस विष्णूच्या नामाचा जप करीत असतो [७] असें निवृत्तिनाथ सांगतात

याच संदर्भात एकनाथाचीहि गुरुपरंपरा लक्षांत घेण्यासारखी आहे एकनाथ हे जनार्दनस्वामींचे शिष्य जनार्दनस्वामी दत्तसंप्रदायी. परंतु आपल्या शिष्यास उपदेश करतांना त्यांनी

सर्वभावे करी पंढरीची वारी आणिक व्यापारी गुतूं नको ८

असें स्पष्ट सांगितलें पंढरीचा मार्ग सोपा आहे भक्तीचें वर्म या मार्गातच आहे [९] इतर पंथाच्या नादीं न लागतां पंढरीचा सोपा व पावन मार्ग धरावा कारण, या ठिकाणचा देव आणि तीर्थ सर्वश्रेष्ठ आहेत [१०] या जनार्दनस्वामींच्या उपदेशावरूनहि मराठी भागवतधर्मांत पंथ अनेक असले तरी धर्म एकच आहे, तो म्हणजे पंढरीचा भागवतधर्म हे सिद्ध होतें

## पंढरीचा धर्म

'धर्म जागो निवृत्तीचा'[११] या शब्दांनीं ज्या धर्माचा गौरव ज्ञानेश्वरांनीं केला आहे तो विठ्ठलाधिष्ठित आहे उपासनेच्या दृष्टीनें नाथपंथ हा शैव असला तरी लोककल्याण हे या पंथाचे उद्दिष्ट होतें 'या दृष्टीनें पाहतां नाथपंथानें जगाची व देवाची कधींच फारकत केली नाहीं जगास अर्थात् समाजास उचलून धरिलें आणि कर्तव्यनिष्ठेवरच आत्मोन्नतीचा मार्ग आखला त्या मार्गानें पूर्णत्व प्राप्त झालें तरी लोकसंग्रह अगर लोकसेवा पुढें सांगितली आहेच हे या पंथाचें वैशिष्टय आहे परमार्थाच्या मार्गांत आपल्यापुरतें पाहण्याची जी प्रवृत्ति निर्माण होते व कर्तव्यत्याग होऊन समाजाविषयीं जें औदासिन्य येतें त्याचा या पंथानें निषेधच केला आहे उलट, समाजस्थिति कायम रहावी, विषमता दूर व्हावी, 'भूतां परस्परें

जडो मैत्र जीवाचें' म्हणून नाथपथाने आपल्या संतास लोकसेवेचे व्रत पाळण्यास लावलें"[१२]

महाराष्ट्रात नाथपथाने केलेली लोकसेवा म्हणजे पढरीच्या धर्माची प्राणप्रतिष्ठा होय. स्वत ला प्राप्त झालेली गुरुगम्य खूण सागताना ज्ञानेश्वरानीं

सकळ नेणोनिया आन एक विठ्ठलचि जाण

हेचि गुरुगम्याची खूण एक विठ्ठलचि जाण

हेचि भक्ति हेचि ज्ञान एकला विठ्ठलचि जाण ॥

असें सागितले निवृत्तिनाथाना देखील आपल्या गुरूकडून हीच खूण प्राप्त झाली होती

जगासी तारक विठ्ठल हेचि एक केलासे विवेक सनकादिकी

ते रूप पढरी वोळलेसे देखा द्वैताची शाखा तोडियेली

उगविले विब अद्वैत स्वयभ नाम हे सुलभ विठ्ठलराज

निवृत्तीचे गुज विठ्ठल सहज गहनीरायें मज सागितले ॥ [१४]

कोणत्याहि भाष्यकाराची मध्यस्थी न स्वीकारता वेदोपनिषदातील तत्त्वज्ञान आमच्या संतानीं आत्मसात् केले होतें म्हणूनच नारायणीयोपनिषदाप्रमाणेच निवृत्तिनाथानाहि विश्व नारायणात्मक असल्याचे धन्योद्गार काढता आले

सर्व हरि ब्रह्म वेदादिक मती श्रुतीहि बोलती तेणे पथे

शास्त्रे समवाय उपनिषदे गाती चैतन्याची सृष्टी ब्रह्ममय

निवृत्ति निरूपण सर्व नारायण हरिवीण दिन रिता नाही ॥ [१५]

या अनुभवामुळे कर्मयोग कीं कर्मसन्यास अथवा प्रवृत्ति की निवृत्ति असा वादाचा प्रश्न या सतापुढें उभा राहिलाच नाहीं 'जनीं जनार्दन होचि खरें'[१६] असल्यामुळें सर्व भूतमात्रावर दया करणें हाच श्रेष्ठयोग या सतानीं मानला. या योगाच्या साधनेसाठी मुड मुंडण्याची आवश्यकता नाहीं शरीरास दडण्याचीहि गरज नाहीं. शिव हा जिवाच्या रूपानें भरलेला आहे या भावनेनें अभेदभावानें भजन करणें हाच महान् जप आहे [१७] अशा जपाचें अनुष्ठान करणारा भक्त जनी वावरत असूनहि विदेही असतो [१८] सर्व घटीं तो घनःश्याम पाहतो [१९] त्याचे घरी द्वैताचा दुष्काळ पडतो.[२०] धर्माचें हे वर्म सताच्या हातीं असतें [२१] साधूनीं धर्म धडौता केला

आहे [२१] म्हणून विवेक त्यानाच विचारला पाहिजे [२३] सत आणि सद्‌गुरु हे परमेश्वराचे चालते बोलते अवतार असतात त्याच्या अंतःकरणात धर्माचें साम्राज्य असल्यामुळें विवेक सागण्याचे अधिकारी तेच असतात नामस्मरणासारख्या सुलभ साधनानें भागवतधर्माविषयी निष्ठा जागृत झाल्यानतर सत आणि सद्‌गुरु याना शरण गेले असताना धर्माचें वर्म हाती येतें ते वर्म हातीं आल्यावर भक्तास सामरस्याचा अभिषेक होतो अशी विकासपरपरा सागण्यात आली आहे स्वत सत जगाच्या कल्याणासाठीं झटत असल्यामुळे आणि विश्वोद्धाराची तळमळ त्याना असल्यामुळेहि भागवतधर्माचें स्वरूप कसें असावे या विषयी कल्पना वाढविण्याची आवश्यकता नाही पढरीच्या सोप्या व सुलभ मार्गातील 'गुरुगम्य खूण' हाती आली म्हणजे जीवाचा उद्‌धार सहज होतो

रात्रदिवस देवाचा शेजार असलेल्या नामदेवाना देखील सद्‌गुरूचा उपदेश झाल्यानतर हे वर्म सापडले

आम्हा सापडलें वर्म करू भागवतधर्म
अरे हा भावाचा लपट मोडुनि आलासे वैकुठ
धरूनि हृदयी बाधवा सतसगती साधावा २४

असें नामदेव सागतात भागवतधर्माचें वर्म हाती आल्यावर जनी जनार्दन हा भाव जागृत होतो [२५] देवदेवतातराविषयी अभिनिवेश गळून पडतो, शिव–विष्णु एकरूप वाटतात

नामा म्हणे शिव विष्णु मूर्ति एक वेदाचा विवेक आत्माराम [२६]

असा नामदेवाचा अनुभव आहे.

## नामदेवांचें कार्य

महाराष्ट्रात ज्ञानदेवानीं प्रवर्तित केलेल्या भागवतधर्माच्या प्रसाराचें महान् कार्य नामदेवानीं केलें आहे विसोबा खेचर नामदेवाचे गुरु असले तरी त्याना कार्याची स्फूर्ति मात्र ज्ञानेश्वरापासून प्राप्त झाली होती हें ज्ञानेश्वरासबधीं त्यानीं लिहिलेल्या अभगावरून स्पष्ट होतें नामदेव थोर भक्त होते तसेच ते कुशल सघटक होते ज्ञानेश्वराच्या हयातींत त्याचेबरोबर भागवतधर्माचा प्रसार त्यानीं केलाच परतु, ज्ञानेशाच्या समाधीनतरहि महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेर त्यानीं विठ्ठलभक्तीचा ध्वज फडकाविला.

ज्ञानदेव–नामदेव यानी इतर सताबरोबर केलेली तीर्थयात्रा ही भागवत-धर्माच्या पुनरुज्जीवनाच्या दृष्टीने अत्यत महत्त्वाची घटना मानली पाहिजे या यात्रेनें अनेक भाषिक सताशी महाराष्ट्राचा संपर्क आला हिंदीभाषेंत काव्य करण्याची मराठी सतात आढळून येणारी परपरा या यात्रेच्या योगानेंच सुरु झाली असावी हिंदी भक्तिकाव्याचा प्रवर्तकत्वाचा मान नामदेवाना दिला जातो हे महाराष्ट्रास जितकें अभिमानास्पद आहे तितकेंच महाराष्ट्रातील भागवतधर्माच्या व्यापक दृष्टीचे तें निदर्शकहि आहे पजाबात नामदेवपथ स्थापणारा नामदेव, शिखाच्या धर्मास प्रेरणा देणारा नामदेव, यवनाच्या राज्यात आपल्या भक्तिभावाने स्वधर्मद्वेष्ट्याना थक्क करून सोडणारा नामदेव ही नामदेवाचीं विविध रूपे पाहिलीं म्हणजे निष्ठेच्या बळावर किती थोर कार्य होऊ शकतें याचा प्रत्यय येतो नराचा नारायण होऊ शकतो आणि धर्माकरिता नारायण नराचा अवतार घेतो या भागवत धर्मातील तत्त्वाचा अनुभव नामदेवाच्या अवतारकार्याच्या रूपानें येतो.

## महाराष्ट्रांतील 'नर-नारायण'

मराठी भाषेंत काव्यरचना करून ज्ञानेश्वरानीं सस्कृतातील अध्यात्म-विद्या मराठी भाषिकासाठीं सुगम केली ज्ञानेश्वरानीं प्रतिपादिलेलें तत्त्वज्ञान नामदेवानीं आपल्या वाणीनें सुबोध, रसाळ आणि मधुर बनविलें ज्ञानियाचे राजे असलेल्या ज्ञानदेवानीं ज्ञान सागितलें, कर्म सुप्रतिष्ठित केलें आणि भक्तीस श्रेष्ठ पुरुषार्थांचें ठायीं प्रस्थापित केलें नामदेवानीं भक्तीचा आलोट जिव्हाळा निर्माण केला त्यामुळें ज्ञान, कर्म आणि भक्ति या त्रिवेणी-सगमात वारकरी सप्रदाय 'सुस्नात' झाला भागवतधर्म तरुण दशेस आला सारा महाराष्ट्र पावन झाला ज्ञानेश्वर असमान्य प्रज्ञेचे योगी होते त्याच्या वाणीस पार्थिवतेचा स्पर्श जाणवत नाही ज्ञानेश्वराच्या रूपानें नारायण नररूपानें अवतीर्ण झाला तर नामदेवाच्या रूपानें नर नारायण स्वरूपापर्यंत उन्नत झाला या नरनारायणानी अधर्मानें आभिभूत झालेल्या भागवतधर्मास सजीव केलें. भागवतधर्माच्या इतिहासाची पुनरावृत्ती अशा रीतीनें महाराष्ट्रात झाली !

नामदेवानीं नामाला देवाची प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. पढरीच्या

धर्माचें महत्त्वहि त्यानीं वाढविले आधीं पढरीची रचना झाली नतर चराचर उदयास आलें वेदप्रतिपाद्य परब्रह्म पढरीच्या विठोबाच्या रूपानें साकारले आहे [२७] परब्रह्म नामाच्या योगानें सुगम होतें इतर साधनें उदड असलीं तरी ती कष्टप्रद आहेत नामाच्या क्षेत्रात उच्चनीच वर्णाचा वा सोवळ्या ओवळयाचा भेद नाही नामस्मरण करणारास वैकुठ प्राप्त होतो शकर रात्रदिवस रामनामाचा जप करतो [२९] मोठमोठे ऋषि-मुनि राम-नामानें तरले राम नारायण असा जप केल्यानतर जनीं जनार्दन हा अनुभव येतो [३०] सर्वभूतीं विठ्ठल आहे हा वेदाचा प्रत्यय आहे [३१]

सर्वभूती आहे एक वासुदेव पुसोनिया ठाव आहनेचा

अशा भावनेने वागतो तोच खरा सत हरिकथा, नामस्मरण, विठोबाची भक्ति हा भक्ताचा आचार असावा परतु केवळ भजन म्हणजे भक्ति नव्हे '

सर्वभूती समदृष्टि हेची भक्ति गोड मोठी [३२]

'जें जें भेटे भूत त्या त्या मानी भगवत' असा ज्ञानेश्वराचा भक्तियोग आहे तर सर्वभूतात्मभाव ही नामदेवाच्या दृष्टीनें श्रेष्ठ भक्ति आहे या भक्तीस अद्वैताचें अजोड अधिष्ठान आहे

देही धमी हित करी द्वैतभाव चित्ती न धरी

सर्वांभूती नमस्कारी एक आत्मा म्हणौनिया [३४]

अशी अद्वैत-प्रतीती नामदेवाच्या अभगात आढळते

## संतांची अद्वैत-प्रतीति

'अह ब्रह्मास्मि', 'सोहम्', 'अह सः' इत्यादि महावाक्यात अद्वैताचा उपदेश आला आहे सामान्य माणसास त्याचा बोध होणें दुष्कर आहे याचें कारण म्हणजे वेदातात झालेला अद्वैताचा विचार विश्वनिरपेक्ष आहे. विश्व परतें सारून हा विचार झाला आहे विश्व बदलणारें, आभासात्मक, मृगजळाप्रमाणें असल्यामुळें अद्वैताचा विचार करताना ज्ञानी वेदाती विश्व प्रेरक चैतन्याचा प्रामुख्याने विचार करतात दृश्य जगताचा विचार कर-ण्याची आवश्यकता त्याना वाटत नाहीं. विचार होतो तो केवळ 'अहम्' कोण ? ब्रह्म कोणतें ? याचाच हा विचार झाल्यावर 'तें ब्रह्म तू आहेस'

असा प्रतीतिबोध मुमुक्षूनें घ्यावयाचा असतो. ही प्रतीती बुद्धिगम्य अधिक आहे

अद्वैत-प्रतीतीस महाराष्ट्रीय सतानी भावगम्य स्वरूप दिलें आहे सताच्या अनुभवात जग मिथ्या म्हणून त्याची उपेक्षा झाली नाही उलट विश्वासह मानवाचा विचार त्यानी केला आहे[35] विश्वात दिसणाऱ्या द्वैताचा 'अहम्' चा विस्तार करून निरास करता येतो असे प्रतिपादन न करता 'अहम्' आणि 'त्वम्' याना व्यापून उरणाऱ्या ब्रह्माच्या रूपाने भासमान् होणाऱ्या द्वैताच्या मुळाशीं असलेल्या अद्वैताची जाणीव सतानीं करून दिली आहे मी ब्रह्माएवढा आहे असें प्रतिपादन न करता परब्रह्म मी व तू आणि विश्व याना व्यापून उरलें आहे असें सताचें प्रतिपादन आहे शब्दाची स्थानें बदलून निर्णय तोच आलेला असला तरी सताच्या या भूमिकेत परिणामाच्या स्वरूपाच्या दृष्टीने असलेलें अतर लक्षात घेतलें पाहिजे मी व्यापक आहे ही भूमिका धारण करणारा ज्ञानी उच्चतर भूमिके वरून वावरत असला तरी उच्चस्वरूपात का होइना एक प्रकारचा अहकार त्याचे ठिकाणीं उरण्याची शक्यता असतेच 'जनी आहे जनार्दन' या भूमिकेवरून अद्वैताचे मडन करताना सतानीं या अहकारास तिलाजली दिली आणि भूतमात्राविषयीं आत्मभाव जागृत केला अद्वैतातहि भक्ति उरते असे ज्ञानेश्वर सागतात अथवा अद्वैत प्रतीतीतहि भजन सुटत नाहीं असें सत मानतात याचें रहस्य वरील सिद्धातात आहे 'जनीं आहे जनार्दन : त्यातें पहावया साडी अभिमान' हे एकनाथाचें वचन याच संदर्भात ध्यानात येईल अहभावाचा विस्तार भगवताएवढा व्यापक न करता अहवृत्ति प्रथम भगवतात विलीन करावयाची म्हणजे विश्व नाराय-णात्मक असल्याचा अनुभव येतो लीन झालेला 'अहम्' बधमुक्त होऊन सर्वातर्यामी असलेल्या भगवताचें भजन आवडीनें करतो अद्वैतात भक्ति उरतें ती अशा रीतीनें भज्यभजक भाव अद्वैतास बाधक असल्याचें शंकराचार्य सागत असले तरी मराठी संताना मात्र अद्वैतप्रतीती आणि भजन विरोधी वाटत नाहीं त्याचें कारण त्यानीं स्वीकारलेली ही भूमिका होय हे देता येईल.

'सर्वात्मभावो मोक्ष.' अशी शकराचार्यानीं मोक्षाची व्याख्या दिली

आहे. महाराष्ट्रातील संतांनीं वरील क्षेत्रात आणखी एक पाऊल पुढें टाकलें आहे त्यानी मोक्षासहि तुच्छ लेखून भक्तीस गौरवाचें स्थान दिलें आहे याचा अर्थ असा कीं, सर्वात्मभावाचा प्रत्यय आल्यानंतर साधकानें आपल्या प्रयत्नाना विराम द्यावयाचा नसून त्यानंतरहि 'सर्व भूता नमस्कारी एक आत्मा म्हणौनिया' या भावनेनें भजन करावयाचें आहे म्हणूनच महाराष्ट्रीय भागवतधर्माच्या मताप्रमाणें अद्वैतात देखील भजन उरतें

या अद्वैत–भक्तीमुळेंच मानवी कल्याणासाठी करावयाच्या प्रयत्नाना संताच्या आचारात महत्त्वाचें स्थान मिळाले आहे व्यक्तिगत जीवन उपेक्षणीय नाहीं त्याप्रमाणेंच समाजपुरुषाचें जीवन देखील दुर्लक्ष करण्याजोगे नाही स्वत चें जीवन उन्नत करणें आवश्यक तर खरेंच परतु, समाजातील इतर मानवाचें जीवन प्रगत करणें अगत्याचें आहे कारण, 'अहम्' हा जसा परमेश्वराचा अंश आहे त्याचप्रमाणे समाजात वावरणारा 'त्वम्' देखील तदंशच आहे आत्मोन्नतीस 'अहम्' आणि 'त्वम्' या दोहोंची उन्नति आवश्यक असते प्रतिमेस परमेश्वराची प्रतिष्ठा येण्यासाठीं प्राणप्रतिष्ठा आवश्यक असते त्याप्रमाणें अज्ञानी व्यक्तीस ती परमात्म्याचा अंश आहे याची जाणीव करून देणे हे भजनाचें अंग ठरतें म्हणूनच कर्मयोग भक्तीस आवश्यक असतो आणि भक्ति कर्मयोगाधीन असते केवळ स्वतःच्या उद्धाराकडे लक्ष देणारा ज्ञानी एकनाथानीं भंड मानला आहे भूतदया हे भागवतधर्माचें आवश्यक अंग निवृत्ति–नामदेवानीं मानले आहे आणि जगाच्या सुखासाठीं शरीर, वाणी आणि मन यांच्या योगाने झिजणें व झटणें ही अहिंसा आहे असें ज्ञानेश्वर मानतात याचें रहस्य वरील भूमिकेंत अंतर्भूत आहे

महाराष्ट्रातील भक्तिसंप्रदाय अद्वैती राहिल्याबद्दल कित्येकाना कोडें वाटतें 'अहो आश्चर्यम्' या भावनेनें कित्येक विद्वान् याकडे पाहतात अद्वैतभक्तीचा वर दिलेला अन्वय आणि अर्थ लक्षात घेतला म्हणजे हे कोडें उलगडतें आणि निष्काम कर्मयोग आणि भक्ति याची अविभाज्य सांगड आमच्या भागवतधर्मात का राहिली याचेंहि रहस्य उमगतें

निवृत्तिनाथानीं जागविलेला, ज्ञानेश्वरानीं रुजविलेला, नामदेवानीं वाढविलेला पंढरीचाधर्म अशारीतीनें ज्ञानकर्मभक्तिसमुच्चयात्मक आहे या

धर्माने ज्ञानाचे महत्त्व कमी लेखलें नाही पण, ज्ञानासबधीं बिकट चर्चा करून लोकाच्या मनात ज्ञानाविषयीं दराराहि निर्माण केला नाहीं कर्मयोगाचा पुरस्कार केला पण कर्मठता वाढू दिली नाही भक्तीचें महत्त्व प्रतिपादिले पण एकातिक भक्तीचा बडीवर माजू दिला नाही सताची भक्ति अद्वैती खरी पण ती निष्काम-कर्माधिष्ठित आहे सताच्या भागवतधर्मात धर्म आणि नीति, विश्व आणि मानव याची सगती कुठेंच सुटली नाहीं ज्ञान हे कर्माचे डोळे तर भक्ति ही हृदयस्थानीं मानल्यानें पढरीचा धर्म ज्ञान भक्ति व कर्म याची परस्पर-पूरकता मानतो त्यामुळें ससारात राहूनहि भक्त ससारातून निवृत्त होत असतो असा विश्वास महाराष्ट्रीय सतानी व्यक्त केला आहे. सत प्रवृत्तिमार्गाचा पुरस्कार करणारे होते कीं ते निवृत्तिमार्गीय होते असे वाद पूर्वी होऊन गेले आहेत सत उभयमार्गी होते असा या वादाचा निर्णय देता येईल कारण, प्रवृत्ति याचा अर्थ प्रपचपरता असा घेतला तर प्रपच-त्यागाचा उपदेश या सतानी केलेला नसल्यामुळें त्याना प्रवृत्ति-मार्गीय म्हणता येईल आसक्ति किंवा ओढा असा प्रवृत्तीचा अर्थ घेतला तर मात्र ते निवृत्तिमार्गीय होते असेंच म्हणावें लागेल साक्षात् ससारातून निवृत्त होण्याचा उदेश सतानीं केला नाही त्याचा कटाक्ष ससाराविषयींच्या आसक्तीवर विशेष होता या आसक्तींतून सुटका करून घेणारी निवृत्ति सतानीं उपदेशिली प्रवृत्तिधर्माचा उपदेश त्यानीं केला तो व्यक्तीचा ससार सजविण्यासाठीं नसून विश्वाचा ससार पावन करण्याकरिता.

## परप्रांतीय संत आणि पंढरीचा धर्म

भागवतधर्माच्या या पावन सरितेनें ज्ञानदेव-नामदेवाच्या कालांत महाराष्ट्रास पावन केलें भिन्न जातिवर्णाचे लोक पढरीच्या राउळात एकत्र आले शिंपी नामदेवानें विठ्ठलभक्तीचा झेंडा अटकेपार फडकविला दासी जनाबाई वेदाताच्या ओव्या गाऊन अद्वैताचें दळण दळू लागली कुभार गोरा जीवन्मुक्तीचा आनद भोगू लागला माळी सावता भक्तीपुढें मुक्ति तुच्छ लेखू लागला. सोनार नरहरि जग ब्रह्मरूप आहे असें सागू लागला तर न्हावी सेना नामस्मरण श्रेष्ठ असल्याचें बोलू लागला महार चोखा

देहामाजीं देवाचे दर्शन घडल्यानें आनंदाने नाचू लागला तर गणिका कान्होपात्रा विठ्ठलपायी विलीन होऊन निवांत राहिली

महाराष्ट्रांतीलच सामान्य जनता पंढरपुराकडे आकृष्ट झाली होती असें नव्हे महाराष्ट्राबाहेरहि पंढरीचा महिमा बराच वाढला होता आजहि आषाढीकार्तिकीच्या वारीस महाराष्ट्राबाहेरील बरेच भाविक येतात पूर्वीच्या काळापासून चालत आलेली ही परंपरा आहे कबीराचीं विठ्ठलभक्तिपर पदें उपलब्ध आहेत 'सब अलम्का रखनेवाला विठ्ठल पंढरपुरवाला' असून 'वही हमारा आल्ला है मुरशद पीर पैगंबर है' असें तो म्हणतो [३६] आषाढी एकादशीचे दिवशीं आपण पांडुरंगभक्त झाल्याबद्दल त्यानें धन्यताहि व्यक्त केली आहे कबीरपुत्र कमाल आपण व आपला पिता विठ्ठलभक्त असल्याचें वर्णन करतो [३७] गुजराथच्या नरसीमेहत्याचा उल्लेख तुकारामाच्या अभंगांत आला आहे हा मेहता 'उठ उतावळो चाल्यने विठ्ठला' अशी विठ्ठलाची विनवणी करतो [३८] 'भक्ताचा उद्धार केला नाहींस तर तुझें ब्रीद जाईल अनेकांचा उद्धार तू केला आहेस, आता उशीर केलास तर तुझें हसें होईल असें पांडुरंगास सांगून जन्मोजन्मी विठ्ठलाची भक्ति लाभावी अशी मागणीहि तो करतो.[३९] उत्तरेचा दादूपिंजारी विठोबाची भक्ति करा असें कंठरवानें सांगतो [४०] सजन कसाई स्वत स विठ्ठलाचा दास म्हणवतो [४१] राजस्थानच्या मीरानें देखील 'विठ्ठलास वरलें' आहे

इ स. १२८० च्या सुमारास होऊन गेलेल्या रुद्रभट या कानडी कवीनें जगन्नाथ हाच विठ्ठल आहे असें वर्णन 'जगन्नाथविजय' नामक ग्रंथांत केलें आहे तेराव्या-चौदाव्या शतकांतील चौंडरसानें पंढरपुरच्या क्षेत्राचें सुंदर वर्णन केलें आहे (परिशिष्टांत यांतील आवश्यक भाग देण्यात आला आहे) हरिदास तर विठ्ठलभक्त होतेच आंध्रप्रांतांत कांहीं ठिकाणीं पांडुरंगाचीं देवालयें आढळतात पंढरपुरच्या संप्रदायांतून मिळालेल्या स्फूर्तीचा तो स्पष्ट परिणाम दिसतो बऱ्याच तेलुगु लोकगीतांतून पांडुरंग आणि पंढरी यांचें स्तवन आढळतें हीं गीतें केंव्हा रचण्यात आली हे समजण्यास मार्ग नसला तरी लोकजीवनांत विठ्ठलभक्ति रूढ झाली होती याची साक्ष या लोकगीतांतून मिळते.

## धर्मजागृतीचें केंद्रः पंढरपुर

साराश, मुसलमानी अमदानीपूर्वी आणि नतर पढरपुर हे धर्म-जागृतीचें केद्र बनलें होते. महाराष्ट्राचा तर तो जीवनाधार होता परप्रातीय देखील या ठिकाणीं आदरानें येत व धर्मजागृतीच्या प्रेरणेनें प्रभावित होत पंढरपुरच्या या महतीचें कारण म्हणजे सतानीं या ठिकाणी जागविलेला धर्म हेच होय या क्षेत्राच्या निमित्ताने दक्षिणेपासून उत्तरेपर्यंत झालेली धर्मसघटना लक्षात घेतली म्हणजे भागवतधर्माचें पुनरुज्जीवन करताना ज्ञानेश्वरादिकानी किती विशाल व व्यापक दृष्टि ठेवली होती याची कल्पना येईल.

स्वराज्याच्या काळात देशभक्ताना तोटा नसतो पारतन्त्र्याच्या काळात मात्र निष्ठा दृढ असल्याविना देशभक्तीचें वाण कोणी घेत नाही धर्माच्या आणि देशाच्या विपन्नावस्थेंत पाडुरगाविषयी आणि भागवतधर्मासबधानें लोकाची अढळ निष्ठा जागृत ठेवणाऱ्या धर्माचा पाया ज्ञानेश्वरानीं घातला भावभक्तीबरोबरच तत्त्वज्ञानाची जोड त्यानीं या पथास दिली धर्माचा अभिमान त्यानीं वाढविला, अनाचाराचा निषेध करून सदाचार सुप्रातीष्ठित केला आणि ऐहिक व परमार्थिक जीवन सुसवादी व परस्परपूरक बनविलें ज्ञानेश्वराच्या कार्याचे हे महत्त्व कोणासहि अमान्य करता येणार नाही पाया भक्कम असल्यानें या धर्मावर पुढें अनेक आघात झाले तरी तो पराभूत झाला नाही प्रतिकूल परिस्थितीचा प्रतिकार करीत व अनुकूल समयाची वाट पहात स्वराज्यसस्थापनेपर्यंत हा धर्म समाजाला स्फूर्ति देत होता कर्तबगार पुत्राने पैतृक मालमत्तेंत भर घालून पित्याचा नावलौकिक व स्वत चें वैभव वाढवावें त्याप्रमाणें उत्तरकालीन सतानीं या धर्माच्या वैभ-वात भर घातली.

अशा थोर विभूतींत एकनाथाचें स्थान अनन्यसाधारण आहे. ज्ञानेश्वराच्या नतर झालेल्या धार्मिक, सामाजिक आणि राजकीय आक्रमणानें जर्जर झालेल्या महाराष्ट्रास एकनाथानीं भागवतधर्माच्या रूपानें सजीवन दिलें 'एकनाथाच्या जीवितकार्याचें अवलोकन केलें असताना जगाच्या इतिहासात होऊन गेलेल्या लोकोत्तर पुरुषात त्याची गणना केली

पाहिजे असें वाटल्यावाचून रहात नाही अत करणाचा जिव्हाळा, मानवते-बद्दलची आत्यतिक तळमळ जीवानाकडे पाहण्याची विशाल दृष्टि, या गुणामुळें त्याच्या व्यक्तिमत्त्वास अलौकिकता प्राप्त झाली आहे त्याच्या अलौकिक व्यक्तिमत्वानें सताच्या चळवळीत त्यानीं नवें तेज ओतलें' असें उद्गार मार्क्सवादी दृष्टिकोनातून या चळवळीचें समालोचन करणारानी काढले आहेत [४२]

## कांहीं आक्षेपांचें निरसन

वरील उद्गारावरून एकनाथानी केलेल्या कार्याची महती ध्यानात येईल एकनाथानीं केलेल्या कार्याचें विवरण करण्यापूर्वीं संताच्या चळवळी-वर आणि त्याच्या कार्यावर घेण्यात येणाऱ्या काही आक्षेपाचा थोडक्यात विचार करणें अस्थानीं ठरणार नाहीं

महाराष्ट्रातील सतमडळानें केलेल्या क्रातिकार्याची महती आधुनिक काळातील महाराष्ट्राचे थोर द्रष्टे न्या रानडे यानीं निदर्शनास आणून दिली 'मराठ्याच्या सत्तेचा उत्कर्ष' या ग्रथात एका स्वतत्र प्रकरणात त्यानीं सतानीं केलेल्या कार्याचें मूल्यमापन केले आहे नतरच्या काही अभ्यासकाना मात्र सतानीं केलेल्या कार्याचें यथार्थ आकलन झालें नाहीं विशेषत. समर्थ रामदासाच्या कार्याने त्याची दृष्टि इतकी दिपली की, रामदासाचें कार्य ही ज्ञानेश्वरानीं प्रसृत केलेल्या विचाराची उत्क्रात अवस्था आहे हे भान त्याना राहिले नाहीं. म्हणून रामदासाखेरीज इतर सत केवळ 'टाळकुटे होते', 'त्यानीं राष्ट्र बुडविलें' अशा प्रकारचे आक्षेप भागवतधर्मीय सतावर घेण्यात येऊ लागले कै राजवाडे यानीं आपल्या ऐतिहासिक प्रस्तावनातून ही विचार-सरणी माडली महाराष्ट्रातील समर्थभक्तानी आणि कै राजवाडे याच्या शिष्यप्रशिष्यानी याच आक्षेपाचा विस्तार केला आणि 'स्वराज्यसस्थापनेस भागवतधर्म अथवा महाराष्ट्रधर्म कारणीभूत झाला व स्वराज्य स्थापन झाल्यावर स्वराज्याच्या प्रसाराचा हेतु भागवतधर्म अथवा महाराष्ट्रधर्म होता' ही न्यायमूर्ती रानडे याची विचारसरणी चुकीची आहे असे राजवाडे याचे शिष्य प्रतिपादन करूं लागले [४३] श्री भट यानीं एका स्वतत्र पुस्तकात या विषयाचा ऊहापोह केला आहे. तथापि,

या चर्चेचा निष्कर्ष काढताना त्यानी जे विचार माडले आहेत ते लक्षात घेतले म्हणजे समर्थभक्ताच्या आक्षेपाचें निराळें खडन करण्याची आवश्यकता रहात नाहीं श्री भट म्हणतात, "ह्या सप्रदायाच्या निर्मितीची आम्ही जी मीमासा वर केली आहे ती लक्षात घेतली असताना या सप्रदायाने केलेलें कार्य अप्रत्यक्ष रीतीनें स्वराज्यास पोषक झालें हे कबूल करावें लागेल मुसलमानानी आपलें राजकीय वर्चस्व महराष्ट्रावर प्रस्थापित केल्यानतर श्रुतिस्मृत्युक्त धर्मानुयायी महारष्ट्रीय जनतेचा मुसलमानी धर्मापासून बचाव करण्याकरिता वारकरी सप्रदायासारखा एखादा सप्रदाय अस्तित्वात आला नसता तर महाराष्ट्रीय जनतेची काय अवस्था झाली असती याची कल्पना करणें कठिण नाही" जेथे जेथे मुसलमानी राजवट रूढ झाली त्या त्या ठिकाणी इस्लामहि रूढ झाला असा इतिहासाचा दाखला देऊन श्री भट म्हणतात, 'परतु वारकरी सप्रदायाच्या हरिकथा-निरूपणी पुढाऱ्यानीं दोन अडीचशें वर्षें श्रुतिस्मृत्युक्त धर्माबद्दल महाराष्ट्रीय जनतेंत जो तीव्र अभिमान जागृत ठेवला व विठ्ठलनामस्मरण व विठ्ठलभजन या दोन अत्यत स्वल्प साधनाच्या योगाने स्वधर्माचा बचाव करून मुसलमानी गोटात शिरण्यापासून महाराष्ट्रीय जनतेस पराङमुख केलें त्यामुळे शिवाजी महाराजाच्या स्वराज्यसस्थापनेचें श्रुतिस्मृत्युक्त धर्मस्थापना हे जें ध्येय तें सिद्ध करणें शक्य झालें"[४४]

जुन्या पिढीत सतमडळाच्या कार्यावर घेण्यात येणाऱ्या आक्षेपाचें निर्मूलन खुद्द आक्षेपकाच्याच विचारसरणीनें होत असल्यामुळें त्याबाबत अधिक विचार करण्याची आवश्यकता नाहीं अलीकडे सतवाङमयाचा अभ्यास विशेष आस्थेनें होऊ लागला आहे भिन्न विचारप्रणालीच्या दृष्टि-कोनातून सतवाङमयाचे अन्वयार्थहि लावले जात आहेत श्री लालजी पेंडसे यानी मार्क्सवादी दृष्टिकोनातून प्रथम सताच्या कार्याचें मूल्यमापन केले याच तत्त्वप्रणालींतून अलीकडे श्री सुठणकर यानींहि असाच प्रयत्न केला आहे परतु दोघाचे निष्कर्ष मात्र निराळे आहेत वारकरी सत दलिताच्या अतिम क्रातीस बाधक ठरले असून रामदास मात्र पुनरुज्जीवनाचे प्रणेते व प्रवक्ते होते'[४५] असा श्री पेंडसे याचा निष्कर्ष आहे तर श्री सुठणकर याच्या मतें रामदास प्रतिक्रातिकारक ठरतात. तथापि, 'संतसप्र-

दायाच्या वाढीबरोबरच महाराष्ट्राचे तेज आणि पराक्रम वाढीस लागली होती हे ऐतिहासिक सत्य नाकारता येणार नाही'[४६] असा सताच्या कार्या बाबत त्याचा अभिप्राय आहे

तरीहि प्रतिकूल भौतिक व आर्थिक परिस्थितीमुळे महाराष्ट्रात भागवत धर्माचा उदय झाला असे श्री सुठणकर सागतात पढरीचा भागवत-धर्म कोणत्या परिस्थितीत जन्मास आला याचें विवेचन या व मागील प्रकरणात आलें आहे त्यावरून धर्मसघटनेच्या व समाजोत्थापनेच्या तीव्र तळमळीतून भागवतधर्माचे पुनरुज्जीवन ज्ञानेश्वरानी कसे केले हे लक्षात येईलच ज्ञानेश्वराचीच परपरा एकनाथी भागवतधर्माच्या रूपानें विकासित झाली रामदासाचा सप्रदाय देखील याच परपरेचे उत्कात फळ आहे असे असतानाहि श्री सुठणकर म्हणतात, 'सगळ्याच समाज घटकाचा योगक्षेम नीट चालेना हे सारे घटकचे घटक मोडकळीस आले त्याच्या-मध्ये अगतिकता, एक प्रकारची असाह्यता निर्माण झाली होती या निराशाग्रस्त आणि असहाय परिस्थितींतून भक्तिमार्गाचे उत्थापन झाले'

केवळ असहायतेंतून जन्मास आलेल्या कोणत्याहि पथात प्रेरकशक्ति असणें अशक्य असतें प्रतिकूल आर्थिक परिस्थितीचें कारण देखील अवा स्तव वाटतें ज्ञानेश्वराच्या काळात समृद्धी नव्हती असें इतिहास सागत नाही अल्लाउद्दीन खिलजीच्या पहिल्याच आक्रमणाचे वेळी त्यास मिळालेली अलोट सपत्ति तत्कालीन समृद्धीची साक्ष देते राजाच्या समृद्धीच्या मानानें प्रजाजन दरिद्री असतील असे म्हणवत नाहीं धनिक विरुद्ध निर्धन असा विग्रह ज्ञानेश्वराच्या काळात अस्तित्वात आल्याचे पुरावे उपलब्ध नाहींत ज्ञानेश्वरानी समाजातील दलिताचा कैवार घेतला हे खरें पण हे सर्व दलित अन्नाला महाग झाले होते असे म्हणणें काल्पनिक ठरेल ज्ञाने-श्वराना ज्या दलिताच्या उद्धाराची तळमळ लागली होती ते धनदरिद्री नव्हते ते धर्मदरिद्री होते त्याच्या उत्थापनासाठीं सतानी स्वयप्रेरित अकि-चनवृत्ति धारण केली होती त्याच्या दृष्टीने श्री सुठणकर म्हणतात त्या प्रमाणे भक्ति ही जीवनातील पळवाट नव्हती[३८] ती जीवन–निष्ठा होती अगतिक इतरांचें जीवन सुखी करण्याचा खटाटोपात सहसा पडत नाही तो स्वत च कल्पनेनें निर्माण केलेल्या विश्वात दग असतो महाराष्ट्रातील

भक्तिसप्रदायाच्या बाबतीत असे विधान करणें अन्याय्य ठरेल कारण, महाराष्ट्राची भक्ति केवळ परमेश्वर-प्रेमात दग राहिली नाही तिनें कर्मयोगाचा आश्रय केला आहे, समाजपुरुषाच्या रूपाने तिने भगवताचे दर्शन घेतलें आहे आणि समाजपुरुषाची सेवा हीच सर्वश्रेष्ठ भक्ति मानली आहे

भागवतधर्माची ऋतप्रेरणा ज्ञानेश्वरानी पुरस्कारिलेल्या भागवत धर्माचे मूळ आधिष्ठान होतें ज्ञानेश्वराच्या नतर परिस्थिति अधिकच बिकट झाली या बिकट परिस्थितीचा प्रतिकार एकनाथानी मूळ ऋतप्रेरणेस उजळा देऊन व जनमनात भागवतधर्माचें अधिष्ठान दृढ करून केला आहे एकनाथाचें अलौकिकत्व त्यानी केलेल्या या महान् कार्यात आहे

## ११. टीपा

१ M M Kane P V *History of Dharmashastra*, Vol I, P 357

२, Ranade R D *Mysticism in Maharastra* P 183-184

३ ग ह खरे, **श्रीविठ्ठल आणि पढरपुर**, पृ ७३

Ranade R D *Mysticism in Maharastra* P 41

४ पचमुखी, **कर्नाटकद हरिदास साहित्य** (कानडी) पृ ६६, ६९

५ विठ्ठलभक्त आणि शिवभक्त असे दोन ज्ञानेश्वर होऊन गेले असा वाद कित्येक वर्षे महाराष्ट्रात चालू होता अभगकार ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वराहून भिन्न होते असा या वादाचा पूर्वपक्ष होता परतु तो वाद आता निकालात निघाला आहे असे मानण्यास हरकत नाही कै गुरुदेव रानडे, प्रा सोनोपत दांडेकर, डॉ पेंडसे प्रभृति विद्वानानी या विषयावरील वादाचा समारोप करून अभगकार आणि ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वर एकच असल्याचा निर्वाळा

दिला आहे ज्ञानेश्वराच्या मातापित्याची नावे रुक्माइ व विठ्ठल होती यावरून तरी विठ्ठलाचा परिचय ज्ञानेश्वरीकाराना नव्हता असे म्हणता येणार नाही

६ आवटे, **निवृत्तिमहाराजाचा गाथा** (सकलसंतगाथांतर्गत) क्र २१४
७ **कित्ता,** क्र १६७, १८६ व १९२
८ आवटे, एकनाथगाथा **जनार्दनस्वामींचे अभंग,** क्र २५
९ **कित्ता,** क्र १६ १० **कित्ता,** क्र २३
११ विनोबा, **ज्ञानेश्वराची भजने,** क्र १५०
१२ सरदार मिरीकर, 'ज्ञानेश्वराचा नाथपथ,' **ज्ञानेश्वर दर्शन** खड १, पृ ५९
१३ आवटे, **ज्ञानेश्वरगाथा** क्र १८२
१४ आवटे, **निवृत्तिमहाराजाचा गाथा,** क्र २४७
१५ **कित्ता,** क्र ३१० १६ **कित्ता,** क्र २९३
१७ **कित्ता,** क्र ३०, १८ **कित्ता,** क्र २४५,
१९ **कित्ता,** क्र १३९, २० **कित्ता,** क्र १८९
२१ आवटे, **ज्ञानेश्वरमहाराजाचा गाथा,** क्र ९१
२२ **कित्ता,** क्र १९६, २३ **कित्ता,** क्र १९५
२४ आवटे, **नामदेवमहाराजाचा गाथा** क्र १४२९
२५ **कित्ता,** क्र १७०७, २६ **कित्ता,** क्र १८४५
२७ **कित्ता,** क्र ४१६, २८ **कित्ता,** क्र ७६१–२
२९ **कित्ता,** क्र ७७९, ३० **कित्ता,** क्र ७८९
३१ **कित्ता,** क्र ९०४, ३२ **कित्ता,** २०५५
३३ **ज्ञानेश्वरी,** १०–११८,
३४ आवटे, **नामदेवगाथा.** क्र ८१२
३५ या संदर्भात ज्ञानेश्वराच्या पुढील ओव्या लक्षात ठेवण्यासारख्या आहेत

म्हणौनि जग परौतें सांडोनि पाहिजे मातें
तैसा नव्हे उखितें आघवा मीचि ॥ **ज्ञानेश्वरी,** १४–१२७
म्हणौनि विश्वपण जावें मग तैं मातें घेआवें
तैसा नव्हे आघवें सकटचि मी ॥

या करणे भेदाते साडुनि अभेदचित्तें
आपणामकट मातें जाणावे गा ॥
ऐसेनि माते जाणिजे ते अव्यभिचारी भक्ति बोलिजे
तेथ भेद काही देखिजे तरी व्यभिचार तो ॥ ज्ञा १४-३८१-८३


३६ आवटे, सकलसतगाथातर्गत **कबीरगाथा** क्र ३ व ६
३७ आवटे, सकलमतगाथातर्गत **कमालगाथा,** क्र २ व ४
३८ आवटे, मकलसतगाथातर्गत **नरसी मेहता,** क्र ६
३९ **कित्ता,** क्र २८ व २९
४० आवटे, मकलमतगाथातर्गत **दादु**, क्र ३
४१ **कित्ता, सजन,** क्र ६
४२ बा र सुठणकर, **महाराष्ट्रीय सतमडळाचे ऐतिहासिक कार्य,** पृ ७७
४३ भास्कर वामन भट, **'महाराष्ट्रधर्म'** पृ २६ व ३९
४४ **कित्ता**, पृ ३८१-८२
४५ लालजी पेडसे, **साहित्य आणि समाज-जीवन,** पृ ७५ व ८२
४६ बा र सुठणकर, **महाराष्ट्रीय सतमडळाचे ऐतिहासिक कार्य,** पृ १२८
४७ **कित्ता,** पृ ३१
४८ **कित्ता,** पृ ३३

# १२. 'एकाजनार्दनाचा वृत्तांत'

एकनाथाची अलौकिकता– प्राचीनानी केलेला गौरव– नाथाचे आत्मचरित्र– दोन जुने चरित्रकार– नाथाचे बालपण– तपश्चर्येचे फळ–गृहस्थाश्रमी एकनाथ– प्रपच परमार्थ अभिन्न– नाथाची मनती– महाप्रस्थान–नाथाचे अर्वाचीन चरित्रकार– नाथवशावर नवा प्रकाश–

'नाथाचें भागवत जरी नि सशय महान्, तरी नाथाचे चरित्र त्याहूनहि महान् आहे सामान्य माणसाचें असें नसतें माणसाचा शब्द त्याच्या जीवनाहून नेहमीच उच असतो पण नाथाची स्थिति त्याच्या उलट दिसली नाथाच्या घरची उलटी खूण असे लोक म्हणतात'[1]

## एकनाथांची अलौकिकता

एकनाथाच्या वाङमयाचा अभ्यास करताना आचार्य विनोबा भावे यानीं काढलेल्या वरील उद्गाराचा प्रत्यय विशेषेंकरून येतो म्हणूनच नाथाच्या समग्र दर्शनात त्याच्या वाङमयाइतकेंच त्याच्या चारित्र्यासहि महत्त्वाचे स्थान आहे. एकनाथाची चरित्रें आतापर्यंत अनेकानी लिहिली आहेत या चरित्रकारात प्राचीन आणि अर्वाचीन, सत आणि पत, भक्त आणि चिकित्सक अशा अनेकाचा समावेश होतो भिन्न प्रकृतीच्या आणि प्रवृत्तीच्या लोकाना आपापल्या रुचीप्रमाणें नाथाची महती प्रत्ययास येते सतपतानी थोर भक्त आणि पडित म्हणून त्यास मान्यता दिली आहे भाविक विद्वानानीं त्याच्या आदर्श चारित्र्याचा गौरव केला आहे आधुनिक विचारवतास त्याचे सामाजिक कार्य महत्त्वाचें वाटतें भोळ्या श्रद्धावंताना तर ते साक्षात् विष्णूचे अवतार वाटतात.

महापुरुषाची महती त्याच्या अवतार-समाप्तीनंतर बहुधा प्रत्ययास येत असते नाथाच्या बाबतीत मात्र निराळा प्रकार आढळतो त्याच्या समकालीनानी देखील त्याचा गौरव केला आहे समकालीन दासोपतापासून ते अलीकडच्या चिकित्सक विद्वानापर्यंत सर्वांनी नाथाचें अलौकिकत्व मान्य केलें आहे भागवतात कंसवधासाठीं जाणारा कृष्ण प्रत्येकास कसा दिसला याचें वर्णन भागवतकारानीं अत्यंत मार्मिक रीतीने केलें आहे बालाना सवंगड्यासारखा, वृद्धाना पुत्रासारखा, तरुणींना वल्लभासारखा असा अनेकाना आपल्या आवडत्या माणसासारखा कृष्ण दिसला असें भागवतकार सांगतात तसाच थोडासा प्रकार नाथाच्या बाबतींत देखील घडला आहे थोर संत, प्रगाढ विद्वान्, अलौकिक चारित्र्यवान, माणूसकीचा जिवंत झरा असे नाथाच्या चारित्र्याचे विविध पैलू असले तरी सर्व दृष्टिकोनातून निष्कर्ष एकच निघतो एकनाथ अलौकिक महापुरुष होऊन गेले !

कै. न्या रानडे, कै वि ल भावे, कै पांगारकर, आचार्य भावे, सुठणकर, इत्यादि साहित्यसेवकाना नाथाचें वर्णन करताना प्रेमाचें भरतें आलें आहे 'सारस्वत'कार म्हणतात, 'अनेक दृष्टींनीं पाहता एकनाथ हा लोकोत्तर पुरुष होता त्याचें काम अगदीं बिनखोड आहे काव्य या दृष्टीने पाहता केवळ कल्पनेच्या भराऱ्या त्याच्या ग्रंथात फारशा मिळणार नाहीत पण त्याचे ग्रंथात काटेतोलपणा, व्यावहारिक चातुर्य, खोल अर्थ व सर्वव्यापी प्रमेयें ही सर्वभर आढळतील किंबहुना या अशाच सर्व बाबतीत एकनाथाचा केवळ हातखंडा आहे त्याची राहणी आणि वाणीहि अशीच अवर्णनीय दिसते तो जसा लौकिकात वागतो तसा ग्रंथात लिहितो आणि जसा लिहितो तसाच वागतो. हे असिधाराव्रत फारच कठिण आहे. पण, तें एकनाथानी साधून दाखविलें नवीन पंथाची मंडळी देखील त्याचे ग्रंथ मनापासून वाचतात असा हा एकनाथस्वामी केवळ अलौकिक पुरुष होता'[१] एकनाथ हे प्रथम त्याच्या चारित्र्यामुळे आवडतात आणि नंतर त्याच्या ग्रंथाकडे दृष्टि वळते असें सांगून कै पांगारकर म्हणतात, 'शंकराचार्य हे जसे संन्यासाश्रमाचे मंडन आहेत तसे एकनाथ हे गृहस्थाश्रमाचें मंडन

आहेत संन्यासाश्रमाला पहिल्यापासूनच पूज्यत्व प्राप्त झालें होतें पण गृहस्थाश्रमाला नाथांनीं पूज्यता प्राप्त करून दिली '[३]

## प्राचीनानीं केलेला गौरव

केवळ ग्रंथकर्तृत्वामुळे नव्हे तर आपल्या आदर्श चारित्र्याने एकनाथांनीं महाराष्ट्राच्या हृदयात अटळ स्थान मिळविलें आहे कै पांगारकर यांचा दृष्टांत देऊन सांगावयाचें झाल्यास 'पेढा आतबाहेर जसा गोड' तसेंच नाथांचे चरित्र सबाह्य मनोहर आहे म्हणूनच एकनाथांचे समकालीन व मराठी वाङमयातील 'लाखोपति' दासोपंत यानी त्यांच्या विषयीं आदराचे उद्गार काढले आहेत[४] मुक्तेश्वर त्यांचा नातूच त्यानें आपल्या ग्रंथात आजोबाविषयीं आदराचे उद्गार काढावेत यात नवल नाही[५] नाथांच्या आयुष्यातील एका प्रसंगावर आधारलेले श्रीखंडया आख्यान लिहून मुक्तेश्वराने आपल्या आजोबाविषयींच्या नितांत आदरास अमर केलें आहे एकनाथ परमेश्वराचे अवतार असून भक्तीचा महिमा वाढविण्याकरिता ते पृथ्वीतलावर अवतीर्ण झाले या श्रद्धेने या आख्यानाची रचना मुक्तेश्वरानी केली आहे[६] 'भानुदासाच्या वंशात जन्माला आलेले परब्रह्म असाहि नाथांचा उल्लेख एका पदात मुक्तेश्वरानी केला आहे[७] मुक्तेश्वरानीं लिहिलेल्या आरत्यात देखील नाथांच्या आगळया विभूतिमत्वाचें वर्णन आढळतें संत तुकाराम आणि त्यांचे शिष्य निळोबा यांनीं देखील एकनाथाविषयींचा आदर आपल्या अभंगातून व्यक्त केला आहे[८] श्रेष्ठ कवि मोरोपंत यानी नाथांच्या स्तवनपर रचलेल्या आर्यांत त्यांची गुरुभक्ति, शांति, भूतदया इत्यादि गुणांचा गौरव केला आहे[९]

## नाथांचें आत्मचरित्र

एकनाथांचे सर्वांत जुने चरित्रकार स्वत नाथच आहेत त्यांचें वाङमय हे त्यांचें विस्तृत आत्मचरित्रच त्यांच्या वाङमयीमूर्तीतून आढळून येणारे स्वभावविशेष संकलित केल्यास सर्वोत्कृष्ट नाथचरित्र सिद्ध होऊ शकेल. कोणताहि ग्रंथकार विविध विषयावर लिहीत असला तरी स्वभावास जुळणाऱ्या विषयात तो अधिक रंगता प्रमाणबद्धतेचें भान न राहून अशा

प्रसंगी अप्रमाणबद्ध असा विस्तारहि त्यांचे हातून होत असतो शब्द भराभर बाहेर पडतात अर्थ त्यांचा पाठलाग करीत असतो ज्ञानेश्वर म्हणतात त्याप्रमाणें 'अर्थ बोलाची वाट पाहे अभिप्रावो अभिप्रायातें विये' अशी अवस्था होते मनीचें गुज प्रगट केल्याच्या संतृप्तीने चित्त प्रसन्न होतें लौकिक दृष्ट्या प्रमाणाबाहेर विस्तार झाल्याची जाणीव होत असते त्याबद्दल मात्र खत वाटत नाहीं अशा विस्तारात ग्रंथकर्त्यांच्या स्वभावाचें दर्शन घडतें एकनाथांच्या ग्रंथात विशेषतः भागवतात अशा स्वभावनिदर्शक प्रसंगाची वाण नाही

या प्रसंगाच्या आधाराने नाथचरित्राचा शोध केल्यास नाथ परम गुरुभक्त होते हे प्रथमदर्शनी लक्षात भरतें भागवती टीकेच्या प्रत्येक अध्यायाचा प्रारंभ सद्गुरूच्या रूपकात्मक वर्णनाने झाला आहे इतरत्रहि विषयांतराचा दोष स्वीकारून देखील सद्गुरूचा महिमा नाथांनी वर्णिला आहे एकनाथी भागवताच्या नवव्या अध्यायात गुरुपरंपरा सांगत असताना गुरुकृपेचे रहस्यहि नाथ बोलून गेले आहेत आणि नंतर आपण चुकून रहस्य-स्फोट केला याची जाणीव त्यांना झाली आहे

कथेसी फाकलो सर्वथा हो कोप न मानावा श्रोता
प्रसंगे गुरुविवंचना होता मीहि गुरुकथा बोललो
मज तव चुकी पडली मोठी चुकूनि बोलिलो गुरुगोठी
तेही संस्कृत नव्हे मराठी वृथा चावटी न म्हणावी
त्या सद्गुरूची कथा चुकूनि जाहलो बोलता
थोर अपराध हा माझे माथा ए भा ९-३३९-४८

दहाव्या अध्यायात गुरु ब्रह्म एकरूप आहेत असे सांगून सद्गुरूचें वर्णन करताना शब्द थोटावतात अशी कबुली नाथांनी दिली आहे [१०] बाराव्या अध्यायात सुमारें शंभर ओव्यात गुरूचा महिमा नाथांनी वर्णिला आहे [११] अठराव्या अध्यायात ग्रंथरचनेचे श्रेय सद्गुरूस देऊन त्यांच्या कृपेने जिवा शिवाच्या अभेदाचे ज्ञान झालें व परब्रह्म हातांचे खेळणें बनले असे एकनाथ सांगतात [१२]

देवभक्ताच्या प्रेमाच्या वर्णनात आणि भक्तीची महती गाण्यात नाथवाणीस असेंच भरतें होते कृष्णोद्धवाच्या प्रेमाचे प्रसंग, भक्ताविषयीची

देवाची ममता, भक्तीने देवास होणारा आनद या विषयाचा विस्तार नाथाच्या स्वभावाचा निदर्शक आहे या विषयाचें वर्णन करताना विस्तार झाल्याची जाणीव देखील त्याना अधूनमधून होते

प्रेमळाची गोठी सागता विसरलो जी श्लोकार्था
कृष्णासी आवडली प्रेमकथा ते आवरिता नावरे
प्रेमाची तव जाती ऐसा आठव येऊ नेदी आठवणेशी
हा भाव नाणवे सज्जनासी ते भक्तिप्रेमासी जाणती
हो का ऐसेही असता माझा अपराध जी सर्वथा
चुकोनि फाकलो श्लोकार्था क्षमा श्रोता करावी ॥ अ भा ११–९८४–६

भागवतात एकास्थळी 'मद्गति' या एका शब्दावर नाथानीं ८२ ओव्याचें भाष्य केले आहे [१३] या ठिकाणीं देखील विस्ताराबद्दल श्रोत्याची क्षमा मागितली आहे भागवताप्रमाणेच स्फुटग्रथातहि देवभक्ताच्या अभेदाचीं व सामरस्याचीं वर्णनें विपुल आहेत [१४]नरदेहाचें माहात्म्य, अतिथि-पूजन, परोपकार, गृहस्थाश्रमाची महती, प्रपच–परमार्थसमन्वय या विषयाचा विस्तारहि नाथवाङ्मयात बराच आढळतो एकनाथाच्या स्वभावाची कल्पना यावरून करता येण्यासारखी आहे.

प्रसगोपात व्यक्त झालेल्या या स्वभाववैशिष्ट्याखेरीज स्वतःच्या वशासबधीं त्रोटक उल्लेख नाथानी केले आहेत रुक्मिणी–स्वयवराख्यानात रुक्मिणीचा विधियुक्त विवाह झाल्यावर भीमकराजानें वशपात्र–दान केलें त्यावेळीं एकनाथानाहि स्वत च्या वशाचें स्मरण झालें

पूर्वा पितामहाचा पिता त्यासी प्रसन्न सुभानु होता
तेणे भानुदास वश सरता केला तत्त्वता कृष्णचरणी
प्रह्लादाचे कृपेसाठी बळीचे द्वार राखी जगजेठी
तसीच हेही आहे गोठी कृपादृष्टि कृष्णाची
मागता वशपात्र दान लागले निजवशाचे अनुसधान
आमचे वशी वरदान परमभक्त हरीचे ॥
मी जन्मलो धन्यवशी म्हणोनि हरिभक्ति आम्हासी
सत मोइरे निजसुखासी वश कृष्णासी निरविला
जे जें जयासि निरविले तेणे ते पाहिजे साभाळिलें
आमुचे चालकपण कृष्णासी आले कामें लाविलें जनार्दनें ॥
–रु. स्व. १६–१६२–६६,

भागवती टीकेच्या प्रारभीहि एकनाथानीं भानुदासास वदन केलें आहे व भानुदासापासून स्वत पर्यंतची वशावळी सागितली आहे शुकाष्टकात देखील त्यानी स्ववशासबंधीं धन्यता प्रगट केली आहे [१५] भागवती टीकेच्या शेवटी लोकाच्या आपल्या सबधींच्या कल्पना सागताना एकनाथ म्हणतात

एकाजनार्दनाचा वृत्तात एक म्हणती भक्तियुक्त
एक म्हणती जीवन्मुक्त प्रपची निश्चिती मानती एक
अहो हा एकाजनार्दन नाही आसन न देखे ध्यान
नेमसुद्रा माळा जाण उपासना-लक्षण या नाही
कोण मत्र, असे यासी काय उपदेशी शिष्यासी
मत्र न दे कोणासी भुलली भाविके त्यासी या भावार्थे
नुसत्या हरिनामाचा घोख लावूनि भुलविले लोक
ऐसा नाना विकल्प जनार्दन देख उपजवि स्वयें – ३१–५०४ ते ५०७

## दोन प्राचीन चरित्रकार

एकनाथाच्या वाङमयात त्याचें विषयीं यापेक्षा आधिक माहिती आढळत नाहीं त्याचे स्वभाव–विशेष मात्र जागोजाग दृष्टीस पडतात त्याचे सर्वात जुने चारित्रकार केशव स्वामी महिपतीनें भक्तविजय आणि भक्तलीलामृत या ग्रथात दिलेलें एकनाथ–चरित्र केशवकृत नाथचरित्रावरच आधारलेलें दिसतें [१६] केशवकृत नाथचरित्राचा काल शके १६४२ च्या सुमारास मानण्यास हरकत नसावी. त्यानतर सुमारें ४२ वर्षानीं महिपतिकृत सत चरित्राचा काल येतो महिपतीचे भक्तविजय व भक्तलीलामृत हे ग्रथ अनुक्रमें शके १६८४ व शके १६९६ या साली पूर्ण झाले. या ग्रथातील एकनाथ–चरित्राचें केशवकृत नाथचरित्राशी बरेंच साम्य आहे केशवानें लिहिलेलें चारित्र एकनाथाच्या निधनानतर सुमारें सव्वाशें वर्षानीं पूर्ण झालें एकनाथाचा प्रत्यक्ष अनुग्रह केशवास झालेला नव्हता तरीहि केशवकृत नाथचरित्र एकनाथाविषयीच्या परमावधीच्या गुरुभक्तीनें ओथबलेले आहे ग्रथरचनेचें सर्व श्रेय त्यानें एकनाथास दिलें आहे [१७]

## चरित्रकारांनीं वर्णिलेलें नाथचरित्र

केशव आणि महिपति याच्या चरित्राच्या आधारें एकनाथाच्या जीवन-

चरित्राची रूपरेखा पुढील प्रमाणें देता येईल उभय चरित्रकाराची दृष्टि भाविकाची आहे विश्वाच्या उद्धारासाठी पाडुरगाने एकनाथ–रूपानें अवतार घेतला असें या दोन्ही चरित्रकारानी कथन केले आहे एकनाथ अवतारी पुरुष असल्याची समजूत समकालीनातहि असावी दासोपत आणि मुक्तेश्वर या दोघानींहि नाथ अवतारी पुरुष असल्याचे वर्णन केले आहे

भानुदासाच्या वशात मूळ नक्षत्रावर एकनाथाचा जन्म झाला त्याच्या जन्मानतर त्याच्या मातापित्यानी लवकरच इहलोकींचा निरोप घेतला. त्यामुळें एकनाथाच्या सगोपनाची जबाबदारी त्याच्या आजाआर्जीवर पडली भानुदासास मिळालेल्या वराप्रमाणें विठ्ठलाने एकनाथाच्या रूपाने भानुदास-कुलात अवतार घेतला असें महिपति सागतो [१८] जगाच्या उद्धाराकरिता झालेल्या या अवताराचे पालन–पोषण आजा–आजीच्या द्वारे होत होतें आजोबानीं आपल्या नातवास पिशाची लिपी (फारसी ?) शिकविली बाल एकनाथ या विद्येंत पारगत झाला

बालपणापासूनच एकनाथ जगाविषयी उदासीन होता देवपूजा आणि रामनामाचा जप याची मात्र विलक्षण आवड बाल एकनाथास होती बालवयातच अध्यात्मज्ञानाविषयीचे अनेक प्रश्न विचारून एकनाथानीं विद्वानाना कुठित केलें होतें त्यामुळें कोणी तरी योगभ्रष्ट अवनीतलाचा उद्धार करण्यासाठीं नाथरूपानें अवतरला आहे अशी लोकाची समजूत झाली [१९] नाथाची सहजसिद्ध तयारी पाहून 'तू गुरु कर' असे विद्वानानीं त्यास सागितले तेव्हापासून आपणास गुरु कोण, कसा व कोठे भेटेल याची रात्रदिवस चिंता एकनाथास लागली एके दिवशीं एका जुनाट शिवालयात प्रहर रात्र उलटेपर्यंत त्यानीं भजन केलें त्यावेळी देवगिरीच्या जनार्दनपंताचा उपदेश घेण्याचा दृष्टात त्याना झाला या दृष्टातानतर वृद्ध आजा-आर्जीना न विचारताच त्यानीं देवगिरीस प्रयाण केलें

देवगिरीचे किल्लेदार जनार्दनपत याच्या सानिध राहून एकनाथानीं आपल्या एकनिष्ठ भक्तीनें गुरूस प्रसन्न करून घेतले अर्धघडीचाहि आराम न घेता एकनाथ गुरूची परिचर्या करू लागले गुरूची सेवा चालू असतानाच त्याच्यावर एक कसोटीचा प्रसग आला एकेदिवशीं जनार्दनस्वामी देवपूजेंत

मग्न असताना परचक्र आल्याची वार्ता आली. गुरूस पूजेतून उठविणें नाथाना योग्य वाटलें नाही त्यानी जनार्दनपताचा पोषाख चढविला आणि तरवार गाजवून परचक्राचें निवारण केले. दुपारीं जनार्दनस्वामी सदरेंत असताना बादशहानीं त्याच्या शौर्याचा गौरव केला व वस्त्रें-भूषणें देऊन त्याचा सन्मान केला आपल्या एकनिष्ठ शिष्याची ही करामत जनार्दनस्वामीच्या लगेच लक्षात आली कचेरीची बारीक-सारिक कामें एकनाथावर सोपविण्यात आलीं गुरूची आज्ञा म्हणून ही कामेंहि त्यानी दक्षतेने पार पाडली एकेदिवशीं हिशेबात चूक राहून गेली ती चूक शोधण्यासाठीं एकाग्रचित्त होऊन त्यानीं प्रहररात्र होईपर्यंत जागरण केलें चूक सापडल्याबरोबर आनदानें चुटकी वाजविताच पाठीशी जनार्दन-स्वामी उभे असल्याचें एकनाथाच्या लक्षात आलें हा प्रसग साधून गुरूनें त्याना बोध केला . अडक्याच्या चुकीसाठीं एकाग्रचित्त होता येतें तर आयुष्याची चूक शोधण्यासाठी एकाग्रचित्त का होता येऊ नये ? तू "कृष्णीं लावावें चित्त" असा उपदेश जनार्दनस्वामींनीं केल्यानतर एकनाथाच्या जीवनास निश्चित दिशा लागली [१२]

## तपश्चर्येचें फळ

नाथाचें चिंतन चालूच होते गुरूच्या सेवेंतहि त्यानीं अतर पडू दिलें नाहीं गुरुकृपेमुळे एके दिवशीं नाथाना दत्तदर्शनहि झालें प्रथम-दर्शनाचे वेळींच दत्तात्रेयानें जनार्दनस्वामीस सागितले 'हा किशोर विठ्ठलाचा अवतार आहे त्याचे हातून विश्वाचा उद्धार होणार आहे'[२१] या प्रसगा-नंतर तपश्चर्या करण्याची आज्ञा एकनाथास झाली देवगिरीजवळ अस-लेल्या मार्कंडेय ऋषींच्या स्थानानजीक एकनाथानीं तपश्चर्येस प्रारभ केला तप चालू असताना एक भुजग नाथावर सावली धरीत असे समाधि उतरण्याचे वेळीं तो निघून जाई नाथाना नियमानें दूध आणून देणारा शेतकरी एक दिवस लवकर आला असता हा प्रकार पाहून घाबरला या घावपळीत भुजग निघून गेला आणि नाथाची समाधीहि उतरली नाथा-च्या एका अभगात देखील ही घटना सूचित झाली आहे

आम्हा टळू आला काळ तो काळांच झाला कृपाळ
भली ओळख झाली आता चित्त मिनले अच्युता
– तुकारामतात्या (म) एकनाथगाथा, क्र १३५

हाच अभग दोन्ही चरित्रकारानीं या घटनेच्या निमित्तानें दिला आहे.

तपश्चर्या पूर्ण झाल्यानतर एकनाथास तीर्थयात्रेस जाण्याचा आदेश मिळाला स्वत जनार्दनस्वामी शिष्याला पोचविण्याकरिता नासिकापर्यंत गेले तेथें चद्रभटाचे घरी मुक्काम असताना त्यानें चतु श्लोकी भागवतावर केलेलें प्रवचन जनार्दनस्वामींस फार आवडलें आपल्या शिष्यानें या ग्रंथावर मराठी टीका लिहावी ही जनार्दनस्वामींची इच्छा एकनाथानी पूर्ण केली. नाथानीं रचलेला हा पहिला ग्रथ चद्रभटास व जनार्दनस्वामींस फार आवडला

मतोषलो तुझिया निष्ठा प्रपच परमार्थ अति दृष्टा
माधिले उभयपक्षा उत्कृष्टा अधिकारी मोठा तू होमा ॥
– केशव विरचित एकनाथचरित्र, ५–७७

## गृहस्थाश्रमी एकनाथ

इकडे एकनाथाच्या घरी निराळेंच वर्तमान घडत होतें म्हातार-पणीचा आपला एकमेव आधार असलेला सुलक्षणी नातू घरातून एका-एकी नाहीसा झाल्यामुळें नाथाच्या आजा-आजीस परम खेद झाला त्यानी शोध पुष्कळ केला, पण तो निष्फळ ठरला एकनाथाची ज्या पुराणिकबुवावर विशेष श्रद्धा होती तो याच सुमारास पैठण सोडून गेल्यामुळें शोध घेण्याचें तेवढेंच एक स्थळ राहिले बऱ्याच कालानतर तो परत आल्यावर वृद्ध आजोबानें त्यास सारा वृत्तात कथन केला पुराणिक-बुवास एकनाथाचा स्वभाव माहित असल्यामुळें इकडे तिकडे शोध न करता ते सरळ देवगिरीस आले, जनार्दनस्वामींची भेट घेतली व त्याना एकनाथाच्या घरचें वृत्त निवेदन केलें जनार्दनस्वामींनी आपल्या शिष्याच्या नावे पत्र लिहून पैठणास स्थायी होण्याचा आदेश दिला उत्तरेची यात्रा सपवून पैठणमार्गे दाक्षिणेच्या यात्रेच्या विचारात असतानाच एकनाथास गुरूचा आदेश प्राप्त झाला गुरूची आज्ञा शिरोधार्य करून एकनाथ पैठणास स्थायी झाले

लवकरच कृष्णाष्टमी आली नाथानी अष्टमीचा उत्सव थाटानें करण्याचे योजिलें जनार्दनस्वामी या उत्सवासाठी आले तो अपूर्व सोहळा पाहण्यासाठी दत्त द्वारपाळ झाला उत्सव थाटाचा झाला भजनाचा गदारोळ, कीर्तनाचा सोहळा, भक्ताचा मेळा आणि गुरुशिष्य व देव याचा त्रिवेणीसगम पैठणतीर्थी झाला उत्सवोत्तर निरोप घेताना 'सकळाश्रमामाजी परम गृहस्थाश्रम अति उत्तम'[२२] स्वीकारावा अशी इच्छा गुरूनें व्यक्त केली सद्गुरूची ही इच्छा नाथानी पूर्ण केली विजापुरच्या एका ब्राह्मण–कन्येशी नाथाचा विवाह झाला गृहस्थाश्रम कृतार्थ बनला!

गृहस्थाश्रम आणि लोकोद्धाराचें कार्य याना नाथानी एकाच वेळी प्रारभ केला भानुदासाच्या पूजेत असलेल्या विठ्ठलमूर्तीची पूजा एकनाथ करू लागले शातवाहनाच्या काळापासून धर्मपीठ म्हणून नावाजलेल्या प्रतिष्ठान नगरीत कर्मठ आणि पडित याचें वर्चस्व असलेल्या समाजात भक्तीचा महिमा वाढविण्याचे अवघड कार्य एकनाथ करू लागले :

> प्रतिष्ठान ब्रह्मक्षेत्र पूर्ण कर्मठ तेथिचे सकळ ब्राह्मण
> त्यासी भक्तिमार्ग दावावया पूर्ण जाहला सगुण अवतार
>
> — भक्तलीलामृत, १६–९७

भक्तिमार्ग सुलभ असला तरी अशा क्षेत्रात त्याचा प्रसार करणें बरेंच अवघड होतें स्वत.च्या आदर्श चारित्र्यानें नाथानीं हे अवघड कार्य सुकर केलें मत्सरग्रस्त बुद्धिवतानी त्याचा छळ केला, कर्मठानीं अनेकप्रकारें त्याची सत्त्वपरीक्षा घेतली परतु या महापुरुषाची शाति मात्र ढळली नाही

> वदिती अथवा निदिती कोणी परी जनार्दनस्वरूप सर्वास मानी
> मानापमान योजिना जनी परि सुख दु ख न मानी तयाचे
>
> — भक्तलीलामृत, १७–४९

अग्निदिव्यानें सोन्याचा कस वाढावा त्याप्रमाणे या सत्त्वपरीक्षातून नाथाचें दिव्य तेज अधिकच प्रत्ययास आलें

पुढें लवकरच जनार्दनस्वामीनी इहलोक सोडला नाथाची शातवृत्ति ढळली नाही फाल्गुण वद्य षष्ठी हे महापर्व असून जनार्दनस्वामींचा जन्म, प्रयाण, नाथजनार्दन–भेट, नाथदत्त–भेट हे चार महत्त्वाचे प्रसग

याच तिथीस घडले पाचवा प्रसग पुढे घडेल असें आपल्या शिष्यास सागून तेव्हापासून फाल्गुण वद्य षष्ठीचा उत्सव त्यानीं सुरू केला [२३]

## प्रपंच-परमार्थ अभिन्न

सर्वत्र जनार्दन भरलेला आहे या भावनेने वागणाऱ्या एकनाथाची दिनचर्या आदर्श होती पचपच उष काली उठून भजन, प्रात काळी स्नान-पूजादि कर्मे सारून पुराणपठन, माध्यान्हीं गोदातटाकीं ब्रह्मयज्ञ आणि ब्राह्मण–पूजन, तदनतर युक्त भोजन, तिसरे प्रहरी ग्रथलेखन, सायकाळी हरिकीर्तन, आरतीनतर निद्रेस मान देऊन पुन्हा उष काळीं भजन अशा रीतीने

अहोरात्र परमार्थ आचरे लोकसग्रहार्थ
ऐसा श्रीएकनाथ समर्थ क्षणही व्यर्थ जावो नेदी ॥

–केशव विरचित श्रीएकनाथचरित्र, १९–२३

चतु श्लोकी भागवत, 'लेखी न करवें' एवढी अभगसख्या, हस्तामलक टीका, भागवत, रुक्मिणी स्वयवर आणि आयुष्याच्या उत्तरकाळात भावार्थरामायण, एवढी ग्रथरचना एकनाथानी केली भागवताच्या रचनेने काशीचा पडितवर्ग क्षुब्ध झाला होता परतु, दिव्यपरीक्षेसाठी गगेत-सोडलेलें भागवत गगेनें तारल्यामुळे पडिताचा गर्वपरिहार झाला. नाथभागवताची हत्तीवरून मिरवणूक काढण्यात आली सस्कृत भाषेच्या पीठाने मराठीभाषेचा आणि एकनाथाचा अपूर्व असा गौरव केला आपल्या ग्रथाच्या द्वारे एकनाथानी.

प्रपच परमार्थ अभिन्न यापरी हे ज्ञानलक्षण
प्रकट दाऊन विदान केले पावन जनलोका ॥

– केशव विरचित श्रीएकनाथचरित्र २४–७६

काशीस झालेल्या गौरवाने नाथाच्या दिनचर्येत अतर पडले नाहीं पैठणला परत आल्यावर भजन, पूजन आणि हरिकीर्तन हे नित्य कार्यक्रम पूर्ववत् चालू राहिले त्याबरोबरच दुर्मतखडन आणि दीनोद्धरणाचें कार्य चालूच होते या काळात त्यानी दाखविलेल्या काही चमत्काराचे वर्णनहि चरित्रकारानी दिले आहे. आपल्या भक्तियोगाने आणि आदर्श आचरणानें

नाथानी पाखंडी लोकाची दुष्टबुद्धि निरस्त केली असा या चमत्काराचा निष्कर्ष आहे

## नाथांची संतती

एकनाथाना तीन अपत्ये झाली: दोन मुलीं आणि एक मुलगा थोरली मुलगी विख्यात कवि मुक्तेश्वर याची आई पैठणासच दिली होती धाकट्या मुलीचे सासर कर्नाटक प्रातात होते हरिपाडित हा व्युत्पन्न पडित होता पित्याचे प्राकृत भाषा–सवर्धनाचें कार्य पुत्रास पसत नव्हते तो रुसून काशीस गेला उत्तरवयात नाथानी त्याची समजूत घालून पैठणास आणले एकनाथानी परान्न घेऊ नये, प्राकृत भाषेत कीर्तन करू नये अशा अटी परत येताना हरिपाडिताने घातल्या होत्या परतु लवकरच एका प्रसगाच्या निमित्ताने त्याला माघार घ्यावी लागली त्यानें आपल्या पित्यास निर्बंधमुक्त केलें एकनाथाच्या नगरीत भजन कीर्तनाचा गदारोळ पूर्ववत् सुरु झाला

प्रयाणकाळ जवळ येत चालला तसा रामकथा लिहिण्याचा आग्रह प्रभुरामचंद्रानीं एकनाथास केला भावार्थरामायणाची रचना सुरु झाली या ग्रथाच्या रचनेंत एकनाथ देहभान विसरून जात युद्धकाडाच्या ४४ अध्यायाची रचना पूर्ण झाल्यानतर एकनाथानीं महाप्रस्थान ठेवलें आपला काल लाबणीवर टाकण्याचें सामर्थ्य असूनहि तसें न करता त्यानी आपल्या शिष्यावर उर्वरित ग्रथ पूर्ण करण्याची जबाबदारी टाकली

## महाप्रस्थान

प्रयाणाचे दिवशी एकनाथ शात होते नित्याप्रमाणें पूजा आटोपून ते गोदातटाकीं गेले सारें प्रतिष्ठान गोदातीरीं लोटलें शिष्य स्फुदू लागले भाविक आक्रदू लागलें नाथ सर्वांचे सात्वन करू लागले भक्तानीं विचारलें, 'देवा, आता पुन्हा अवतार केव्हा ?' नाथानीं उत्तर दिलें

जै धर्माची वाट मोडे अधर्माची शीग चढे
तै आम्हा येणे घडे ससारस्थिती
नाना मतें पाषाड कर्मीठायी अतिबड

जे जे लीला विचित्र ते ते माझे चरित्र
देवभक्त एकत्र भेद नाही
सर्व भूतीं भगवद्भावो भक्ताचा निर्वाहो
धर्माचा अहंभावो वाढविणे
सर्वभूतीं भगवद्भक्ति प्रतिपादावी वेदोक्ति
हेचि एक निश्चिती करणे आम्हा
एकाजनार्दनी विश्वरूप गोविंद भेद धरी तो निंद्य अतिनिंद्य[२४]

भक्ताचा निरोप घेऊन, त्याना भागवतधर्माचा व ब्रह्मात्मैक्याचा उपदेश करून नाथानी जलसमाधि घेतली. आपल्या आचरणानें सर्वभूतीं भगवद्भावाचा आदर्श जनतेपुढें ठेवून, भक्तीचा महिमा वाढविण्यासाठीं व धर्मसंस्थापना करण्याकरिता एकनाथाचा अवतार झाला. अधर्मानें काजळलेला धर्म नाथानीं उजळ केला धर्मज्ञानापेक्षा धर्माचरणाने जीवन कृतार्थ होतें हे त्यानी आपल्या आचरणानें जगाच्या निदर्शनास आणून दिलें नाथाच्या जीवनाचें हे असाधारण वैशिष्टय आहे

## नाथांचें अर्वाचीन चरित्रकार

केशव आणि महिपति यानीं लिहिलेल्या चरित्रात अर्वाचीन चरित्र-कारानी माहितीच्या दृष्टीनें विशेष भर घातली नाहीं इ स १९०० च्या सुमारास महिपतीच्या ग्रथाच्या आधारानें श्री धोंडो बाळकृष्ण सहस्रबुद्धे यानीं एकनाथ–चरित्र लिहिलें हे चरित्र लहानच असले तरी त्या काळात तें बरेच लोकप्रिय झालें असावे काव्यसग्रहकार आणि ज्ञानकोशकार यानी या चरित्राचे आधार दिले आहेत १९११ सालीं पागारकरानीं एकनाथ-चरित्र प्रसिद्ध केलें. आजगावकरानीं महाराष्ट्रकविचारित्रात नाथाची ओळख करून दिली महिपति व इतर प्रकाशित साहित्य याच्या आधारानें ॲबट साहेबानीं एकनाथावर एक निबध लिहिला प्रा न. र फाटक यानीं १९५० सालीं 'एकनाथः वाङमय आणि कार्य' हा चिकित्सक दृष्टीनें लिहि-लेला महत्त्वपूर्ण ग्रथ प्रसिद्ध केला एकनाथाच्या चरित्रात्मक माहितीच्या दृष्टीनें केशव आणि महिपति यानीं दिलेल्या माहितीबाहेर फारशी माहिती या चरित्रग्रथातून प्रसिद्ध झाली नाही

म म. काणे यानी लिहिलेल्या 'धर्मशास्त्राच्या इतिहासा'त मात्र नाथवशासबधी एक महत्त्वाचा धागा सूचित केला आहे नाथचरित्रातील काहीं बाबींचा उलगडा त्यावरून होऊ शकतो एकनाथपुत्र हरिपडित याचा सस्कृत भाषा व धर्मशास्त्र याचे विषयींचा अभिमान परपराप्राप्त होता असें या आधारावरून म्हणता येईल नाथाचे वडील सूर्याजीपत नाथाच्या बाल पणींच निवर्तले एवढी माहिती उपलब्ध चरित्रातून मिळते हे सूर्याजी-पत व्युत्पन्न पंडित तर होतेच परतु काशीच्या विद्वान पडिताच्या एका परपरेच्या गुरुस्थानींहि होते अशी माहिती म म काणे याच्या इग्रजी ग्रथात मिळते.[२५]

## नाथवंशावर नवा प्रकाश

दलाधीश किंवा दलपति या नावाचा एक विद्वान् पडित व धर्म-शास्त्रकार होऊन गेला आहे त्याने 'नृसिंहप्रसाद' या नावाचा ग्रथ धर्मशास्त्रावर लिहिला आहे देवगिरीच्या निजामशाहीतलि मुख्यमत्रि सूर्याजीपडित आपला गुरु असल्याचें तो सागतो हा सूर्यपडित एक-नाथाचा पिता असणे असभवनीय नाही असें म म काणे याचें मत आहे या माहितीच्या आधाराने नाथचरित्राकडे पाहिले तर पुष्कळ गोष्टीचा उलगडा होतो एकनाथाची असीम भक्ती पाहून जनार्दन-स्वामीनी त्याचेवर अनुग्रह केलेला असला तरी जनार्दनस्वामीच्या हयातींत महत्त्वाच्या हुद्द्यावर असलेल्या सूर्यपडिताचा तो पुत्र आहे ही गोष्ट प्रारंभींच्या काळातील गुरुशिष्याच्या जवळिकेच्या दृष्टीने साहाय्यभूत झाली असावी हें असभवनीय नसावे.

दुसरी गोष्ट काशीसबधाने एकनाथानी लिहिलेल्या भागवताच्या पचाध्यायीचें काशीच्या घाटावर त्याचा कोणीतरी शिष्य अध्ययन करीत असताना प्राकृतात भागवतावर टीका झाल्याची वार्ता वाराणशीच्या पडितास लागली अशी माहिती चरित्रकारानी दिली आहे भागवताची पचाध्यायी काशीस नेणारा नाथशिष्य कोण होता याची माहिती मिळत नाही. नाथाच्या सहवासात आलेल्या अनेक व्यक्तीची नावें जुन्या चरित्र-कारानी दिली आहेत. परतु, नाथाची कीर्ति कागपिर्यंत नेणाऱ्या महा

भागाचे नाव मात्र त्यानी दिलें नाहीं  हा नाथशिष्य असण्यापेक्षा सूर्य-पडिताच्या शिष्यपरपरेतील असण्याचा सभव अधिक सूर्यपडिताची शिष्यपरपरा काशीस नादत असल्यानें आपल्या गुरुपुत्राचा ग्रथ त्याचे-पैकीच कोणीतरी श्रद्धेने महाराष्ट्रातून या पुण्यनगरीस नेला असावा याच शिष्यवर्गापैकी कोणीतरी हरिपडितास आपल्या आजोबाच्या परपरेंत पारगत केलें असावे भानुदासाची भक्तिपरपरा त्याच्या पणतवानें म्हणजे एकनाथानी वाढविली तर सूर्यपडिताच्या नातवाने त्याची पडिती परपरा चालविली असे म्हणता येईल १७ व्या शतकात देखील ही परपरा या घराण्यात चालू होती  'स्मृतिकौस्तुभ' या सस्कृत ग्रथाचा कर्ता अनतदेव हा स्वत स नाथवशीय म्हणवितो

आसीद् गोदावरीतीरे वेदविदिसमन्वित ·
श्रीकृष्णभक्तिमानेक एकनाथभिधो द्विज . २६

असा आपल्या पूर्वजाचा उल्लेख अनतदेवानें केला आहे. "वश-कृष्णासी निरविला" अशी आपल्या वशाची माहिती नाथानी 'रुक्मिणी-स्वयवरात' दिली आहे उपरोक्त सस्कृत श्लोकातील 'श्रीकृष्णभक्तिमान्' हें पद नाथानी केलेल्या उल्लेखास अनुरूप वाटते साराश, श्रीकृष्णपरायण भक्ताची आणि श्रुतिस्मृतिपरायण पडिताची अशा दोन्ही परपरा नाथा-च्या घराण्यात चालू होत्या भानुदास-एकनाथ हे पहिल्या परपरेचे व सूर्यपडित–हरिपडित हे दुसऱ्या परपरेचे प्रतिनिधि मानता येतील. माहितीच्या दृष्टीनें अर्वाचीन चरित्रकारानी जुन्या चरित्रकारापेक्षा अधिक काही सागितलें नसले तरी जन्ममृत्यु शकासबधीच्या वादास मात्र अर्वाचीन चरित्रकार कारणीभूत झाले आहेत परतु तो वादहि आता निका-लात निघाला आहे शके १४५४ व शके १५२१ हा अनुक्रमें नाथाच्या जन्माचा व निर्याणाचा काल निश्चित व सर्वमान्य झाला आहे

देहधारी एकनाथाच्या निर्याणास आज सुमारें साडेतीनशें वर्षांचा काला-वधि लोटलेला असला तरी त्याच्या वाङ्मयी मूर्तीनें कालावर मात केली आहे वर दिलेल्या सक्षिप्त चरित्रापेक्षा त्याच्या वाङ्मयाच्या रूपाने आढळणारें त्याचें जीवनचरित्र अधिक महत्त्वाचें आहे आपल्या जीवितावधीत एक-नाथानी अनेकाना लोकोद्धाराचें कार्य करण्याची स्फूर्ति दिली आहे तर

त्याची वाङ्मयी मूर्ति आज सोडतीनशे वर्षे लोकोद्धारकाचे स्फूर्तिस्थान होऊन बसली आहे म्हणून त्याच्या कार्यांचा विचार करण्यापूर्वी त्याच्या वाङ्मयी मूर्तीचे दर्शन घेणें अगत्याचें ठरते

## १२. टीपा

१ विनोबा, **एकनाथाची भजने**, प्रस्तावनाखड, पृ २ व ३

२ वि ल भावे **महाराष्ट्र सारस्वत** (नवी आवृत्ति) पृ ४८०-१

३ ल रा पागारकर, **मराठी वाङमयाचा इतिहास** खड दुसरा, पृ २९५

४ **कित्ता**, पृ १४८

५ मुक्तेश्वर, **आदिपर्व**, १-७७

६ एका जनार्दनाचा महिमा गूढार्थ वाटे पुराणागमा
शमदम करुणेची मामा जो स्वये जगद्‌गुरू नेणो विधीचा अवतारु
पूर्ण गुरुभक्तीचा सागर — मुक्तेश्वर, **स्फुटकाव्ये** पृ २७६

७ मुक्तेश्वर, **स्फुटकाव्ये** पृ २८६ व २९१-९३

८ शरण शरण एकनाथा चरणी माथा ठेविला
तुका म्हणे भागवत केले श्रुत सर्वांसी
भानुदासाचे कुळी महाविष्णूचा अवतार
— आवटे, निळोबाचा गाथा, क्र १५६२

९ **एकनाथ गाथा** (तुकाराम तात्या सपादित) पृ १२४

१० **ए भा** १०-११८ व १२४

११ **ए भा** १२-४८१-५८९

१२ **ए भा** १८-३९२-४

१३ **ए भा** २४-४१९

१४ **स्वात्मसुख**, ९२ ते ९६, ११२ ते १६३ **हस्तामलक**, ६७०-७३

१५ **ए भा** १-१२९ ते १३४, **शुकाष्टक** (काव्यसग्रहप्रत) पृ २१७

एका कूट अभगात नाथाना पुढाल प्रमाणे स्वत चा उल्लेख केला आहे
मुळीच्या मुळी एका जन्मला मायबापे थार थाक घेतला
कैसे मूळनक्षत्र आले कपाळा स्वये लागले दोहाच्या निमूळा
शाती करिता अवस्थाची झाली शाता मूळी लागोनिया लाविली ख्याती
एकाजनार्दनी मुळाच्या गोष्टी मायेसकट मगरा बापच घोटी
– पागारकर, **मराठी वाङमयाचा इतिहास** खड २ रा, पृ २१७

१६ केशवाने लिहिलले चरित्र महिपतीच्या एकनाथ–चरित्रावर आधारलेले आहे असे श्री प्रियोळकर याचे म्हणणे आहे केशव–विरचित एकनाथ-चरित्राच्या शेवटी दिलेल्या समाप्ति–शकावरून त्यानी हा निष्कर्ष काढला आहे (मुक्तेश्वर, **आदिपर्व** प्रस्तावना, (मुक्तेश्वराचा शाक) पृ ७ व ८) तुकारामतात्यानी सपादित केलेल्या एकनाथाच्या गाथ्यात केशवविरचित नाथचरित्र आले आहे या चरित्राचे शेवटी पुढील लेख आहे

"शके १७१४ परिधाविनाम सवत्सरे उत्तरायणे माघ शु १३
इदुवासरे, क्षेत्र पचवटी श्रीसीताराम सनिधाने सपूर्ण"

हा लेख प्रतलेखनाचा समाप्तीकाल दर्शवितो सामान्यत प्राचीन ग्रथकार ग्रथसमाप्तीचा काल पद्यातच देतात प्रतलेखनकाल बहुधा गद्यात व क्वचित पद्यात येतो त्यावरून वरील समाप्तिलेख ग्रथसमाप्तीचा न मानता प्रतलेख-नाचा मानणे श्रेयस्कर ठरेल श्री कोटनीस यानी केशवकृत चरित्राचा काल शके १६४२ मानला असून ('नाथाची चरित्रे', **एकनाथदर्शन** पृ २५२ व २५४) महिपतीने लिहिलेल्या चरित्रापूर्वी ते लिहिले आहे असे त्याचे मत आहे या चरित्रापूर्वीचे श्रीकृष्णदास जगदानदन विरचित प्रतिष्ठान–चरित्र असून ते साप्रदायिक नव्हते म्हणून लोकप्रिय झाले नाही असे ते म्हणतात त्याच्या मतें प्रतिष्ठान–चरित्राचा काळ शके १६२० आहे प्रतिष्ठान–चरित्राच्या कालनिर्णयाची चर्चा करण्याचे कारण नाही तें लोकप्रिय नसल्याने नाथाविषयीच्या माहितीस केशवमहिपतीची चरित्रेच आधारभूत आहेत शिवाय, कै० साधुदास यानी शके १६२० हा प्रतिष्ठान-चरित्राचा निश्चित केलेला काल अनुमानावर आधारलेला असल्याने कोल्हापुर कटील नाथवशजाच्या सग्रही सापडलेले प्रतिष्ठान–चरित्र विश्वसनीय असले तरी कालाच्या बाबतीत वादास बरीच जागा आहे

म्हणूनच केशव आणि महिपति यानी वर्णिलेल्या चरित्राचाच कालानुक्रमाने विचार करणे आवश्यक ठरते कालानुक्रमाने केशवचरित्र अगोदरचे आहे एवढेच तूर्त गृहीत धरण्यास हरकत नाही

१७ केशव, **श्रीएकनाथचरित्र,** २-८५, ७-११८ व ११९

१८ महिपति, **भक्तलीलामृत,** १३-११ व १४

१९ **कित्ता,** १३-४३

२० **भक्तलीलामृत,** १३-१४५

२१ केशवविरचित **श्रीएकनाथ-चरित्र,** ३-३८, **भक्तलीलामृत** १३-१९६

२२ **भक्तलीलामृत,** १५-१९७

२३ **कित्ता,** १६-७४, केशवविरचित **श्रीएकनाथचरित्र** १०-२२ ते २७

२४ दोन्ही चरित्रकारानी निर्याण प्रसगी दिलेला हा अभग नाथाच्या गाथ्यातहि स्वतत्रपणें आढळतो या अभगानतर पुढील एकनाथकृत आरतीहि दोन्ही चरित्रकारानी दिली आहे

आवलोकिता जन दिसे जनार्दन भिन्नाभिन्न कैचे गुणागुण
जयदेव जयदेव जय जनर्दना परमार्थे आरती अभिन्न भावना
ज्योतीच्याही ज्योती उजळोनि दीप्ती तेणे तेजें केली सतेज आरती
पाहता पाहणेपण पहावया स्थिती नुरेचि वेगळे देह आणि दीप्ती
सर्वदा दिसे परी न कळे मना जे जें दिसे तें तें दर्शन जाणा ।।

२५ M M Kane P V *History of Dharmashastra*, Vol I P 407

२६ **कित्ता,** पृ ४५३

# १३. वाङ्मयोपासक एकनाथ

काव्यविषयक दृष्टि– प्रभावी वर्णनशैलि– बोध आणि विनोद याची मागड– रसाळ काव्य भावार्थ रामायण– रामावताराचा व्याप्त– नाथाची रामभक्ति– चतु श्लोकी भागवत– स्फुट प्रकरणें–नाथाची आख्याने– रुक्मिणी–स्वयवर– भारूडाचा 'अजबखाना'– भारूडातील नाट्य आणि समाजदर्शन– नाथाची अभगवाणा– लोकोद्धाराची तळमळ– एकनाथी भागवत– मराठी भाषेचा अभिमान– सहज वाग्विभव

एकनाथाचा ग्रथविस्तार त्याच्या कर्तृत्वास साजेल असाच आहे त्याचे सर्व ग्रथ एकाच विशिष्ट वर्गास उद्देशून लिहिले नाहीत हें त्याचे वैशिष्टय आहे. सामान्यत वाचकाची विशिष्ट पातळी गृहीत धरून ग्रथकार ग्रथ-रचना करीत असतो एकनाथानीं आपल्या ग्रथात विविध पातळीवरच्या लोकाची मर्यादा लक्षात घेतली आहे. परमार्थाची साधना हे त्याच्या ग्रथाचे उद्दिष्ट असले तरी समाजातील सर्व वर्गास परमार्थज्ञान सुलभ व्हावें ही त्याची दृष्टि आहे व्युत्पन्न पाडित, वेदाती, भाविक, मुमुक्षु, भवचक्रात भ्रमणारा अज्ञ, कथाविनोदात रमणारा रसिक इत्यादि सर्व प्रवृत्तीच्या व सर्व थरातील जनतेस वेधून घेता येईल असे वाङमय नाथानी निर्माण केलें आहे ज्याला जें आवडेल तें त्यानें घ्यावें. आपल्या रुची-प्रमाणे आनद भोगावा आणि आपल्या मगदुराप्रमाणे भगवताची उपासना करावी, आत्मोन्नतीचा प्रयत्न करीत करीत परमार्थाची साधना करावी व विश्वाच्याहि कल्याणाची चिंता करावी ही नाथवाङमयाची प्रवृत्ति आहे

## काव्यविषयक दृष्टि

एकनाथ स्वतःला कवि म्हणवीत नाहीत आपल्या काव्याच्या कर्तृत्वाचे सर्व श्रेय त्यानी आपल्या सद्गुरूस दिले आहे [१] तथापि, कवित्वासबधीची त्याची कल्पना मात्र निश्चित होती काव्यरचना करणारा आणि पाडित असे कवि या शद्वाचे दोन रूढार्थ आहेत एकनाथानी दोन्ही अर्थानी कवि या शब्दाचा उपयोग केला आहे या अर्थापैकी पडित या अर्थाचे स्पष्टीकरण त्यानीं पुढील प्रमाणें केले आहे

वेदशास्त्राचे माथितार्थ झाले करतलामलक समस्त
तैसाच ब्रह्मानदें डुल्लत कवि निश्चित या नाव
उपनिषदाचा मथितार्थ ज्याच्या मुखाची वास पहात
परोक्षापरोक्ष ज्याचेनि सत्य कवि विख्यात त्या नाव

—ए भा १२–१०४८–४९

काव्य परमार्थपर असावें असें सर्व सतकवीप्रमाणे एकनाथाचेंहि मत आहे परंतु परमार्थाचा बोध करीत असताना देखील शब्दसौंदर्याकडे आणि आख्यानकौशल्याकडे लक्ष पुरविलें पाहिजे ज्याना परमार्थात 'रस' नाही अशाना निदान काव्यसौंदर्यानें समाधान वाटले पाहिजे अशी त्याची भूमिका आहे भावार्थरामायणात नाथाची काव्याविषयक भूमिका अधिक स्पष्ट झाली आहे

अफाट न करावा ग्रथ ग्रथी बोलावा मुख्यार्थ
पदी दावावा परमार्थ हा निजस्वार्थ कवित्वाचा — बालकाड, १–११८
कवित्व करिता धीटपाठ मेळविती कर्म कचाट
तेवी कवित्वाची कटकट श्रोते वीट मानिती
जे कवित्वी शब्दचातुर्यशोभा ते कथा नगदवा जग निववी
ज्ञानी निवती परमार्थ–गोवे पडित निवती पदबधें
लोक निवती कथा–विनोदे ग्रथ–सबधे जग निवे
मुख्यत्वे ग्रथीचे राखावे प्रेम प्रतिपदी प्रतिपादावे परब्रह्म
हाची कवित्वाचा कवित्व–धर्म श्रोते सप्रेम सुखी होतील

— बालकाड, १४–८१–८४

परमार्थ सांगावयाचा तो कशाहि रीतीनें सांगितला तरी चालेल अशी भूमिका एकनाथांनीं घेतली नाहीं परब्रह्म–प्रतिपादन हा कवित्व–धर्म खरा. परंतु शब्दसौंदर्य आणि आकर्षक शैलि यांच्या आश्रयानें तो धर्म प्रगट व्हावा या विषयी नाथांचा कटाक्ष आहे याच हेतूनें रुक्मिणीस्वयंवराची फलश्रुती सांगताना या ग्रंथानें भिन्न रुचींचे लोक संतुष्ट होतील असा विश्वास एकनाथांनी व्यक्त केला आहे [२]

## प्रभावी वर्णनशैलि

कथानिवेदन आकर्षक असावें, सामान्यांचें देखील चित्त वेधून घेण्या-इतके सौंदर्य त्यांत असावे हा कवित्वाचा निकष अगदी लहान–सहान प्रकरणांत देखील एकनाथांनी पाळला आहे भारुडासारख्या प्रासंगिक रचनेपासून ते भावार्थरामायणासारख्या ग्रंथराजापर्यंत त्यांनी हें वैशिष्ट्य दर्शविले आहे ज्ञानेश्वरांच्या काव्यांत आढळून येणारे मेरुमंदाराशी स्पर्धा करणारे उत्तुंग कल्पनाप्रासाद नाथांच्या काव्यांत फारसे आढळणार नाहीत त्यांच्या प्रतिभेचें ते वैशिष्ट्यहि नव्हे प्रफुल्ल वनराजीचें सहजसौंदर्य मात्र त्यांच्या रचनेंत जागोजाग दिसेल राधाकृष्णाचें हे वर्णनच पहा त्यांत अलंकार नाहीत, कल्पनेची भरारीहि नाही, चित्तवेधकता मात्र आहे :

वारियाने कुंडल हाले डोळे मोडीत राधा चाले
राधा पाहून भुललें हरी बैल दुभे नंदाघरी
हरि पाहून भुलली चित्ता राधा घुसळीत डेरा रिता
मन मिनलेंमे मना एका भुलला जनार्दना ॥

—आवटे, एकनाथगाथा, क्र ८४

अनुरूप शब्दयोजनेचें पुढील उदाहरण असेंच आकर्षक आहे .

भिंगाचें भिंगुलें खांद्यावर अंगुलें नाचत तान्हुलें यशोदेचें
येती गौळणी करिती बुझावणी लागती चरणीं कान्होबाच्या
गोविंद बाळिया वाजविती टाळिया आमुचा कान्हया देवराया
कडोदरा बिंदली वाघनखें साजिरीं नाचत श्रीहरि यशोदेचा

— आवटे, एकनाथगाथा, क्र १०८

कंसाचा वध करून श्रीकृष्ण गोकुळास परत आल्यानंतर गौळणींच्या

धादलीचें नाथानी केलेलें वर्णन त्याच्या प्रभावी वर्णनशैलीची साक्ष देणारें आहे.[3] सीताशुद्धीच्या प्रसगावर १३ अभगाचें एक प्रकरण नाथानी लिहिलें आहे रावणाचा वध झाला सीतेस आनद झाला ती रामचद्राच्या भेटीस निघाली. परतु रामचद्रानी तिचा स्वीकार केला नाहीं सीताशुद्धीचा प्रसग त्यांतून उद्भवला रामचद्राचे नाव घेऊन सीतेनें अग्नीत उडी घेतली. त्यावेळी :

तेथ बुझाली वानरें भ्याली निशाचरे सुरनर खेचरे चाकाटली
उडीसरसी देख सकळा पडली शक अवघीच टकमक पहात ठेली

सारेच्या जीव मुठींत धरून पहात होते लगेच चमत्कार घडला :

सीता अगमेळें अग्नीचे पाप जळे
हे पतिव्रता निर्दोख अग्नि झाला चोख
जयजयकारे घोष अवघे करिती
ते देखोनि राघवा जाकळिलें कणवा
आघवेपणें आघवा खेवा आला —आवटे, एकनाथगाथा, क्र ९३५

## बोध आणि विनोद याची सांगड

नर्मविनोद आणि मनुष्यस्वभावाचें यथार्थचित्रण रुक्मिणीस्वयवर व भावार्थरामायण या ग्रथात तर विपुल आहेच. अभंगात आणि स्फुट प्रकरणात देखील नाथाच्या या वैशिष्टयाचें दर्शन घडते सत्यभामाव्रत किंवा कृष्णदान या नावाचें एक लहानसें प्रकरण नाथानी लिहिलें आहे. सत्यभामेनें नारदाला कृष्णाचे दान केल्याची पौराणिक कथा त्यात आली आहे

कृष्णाचें दान मिळाल्याबरोबर नारद कृष्णावर मालकी हक्क गाजवतो

नारद म्हणे रे कृष्णा बोध बाधुनी घेई ब्रह्मवीणा
पैल माझ्या सिद्ध पादुका सावधाने जवळि घे का

कृष्णाचें दान केल्याबद्दल इतर नायिकाचें व सत्यभामेचें झालेलें भाडण, कृष्णाच्या सुवर्णतुलेसाठी सर्वांनी भराभर फेकलेले अलकार, रुक्मिणीच्या तुळसीपत्रानें झालेली कृष्णाची सुटका या वर्णनात एकनाथानी विनोदाची लयलूट केली आहे कृष्णाची सुटका झाल्याबरोबर दागिन्यावर पडलेली

सर्व नायिकाची झडप एकनाथाच्या स्वभाव-निरीक्षणाची साक्ष पटविते या गोंधळात रुक्मिणीसह कृष्ण केव्हा निघून जातो हे इतराच्या लक्षात येत नाही यावरून 'कनक-कामिनीच्या मोहास बळी न पडता कृष्णभक्ति करावी' असा बोध एकनाथानी केला आहे [४]

भारुडात तर विनोद व आत्मबोध याचा पाऊसच आहे जोहार, महारीण, हिंदु-तुर्क सवाद, या प्रकरणात हसत हसत आणि हसवीत हसवीत उपदेश आला आहे ब्राह्मण आणि महार याच्यात भेद करणें मूर्खपणाचें आहे,[५] धर्माचें अवडबर माजविणारे ढोंगी असतात,[६] हिंदु-मुसलमान हे भेद करणें परमेश्वर-निष्ठेचें निदर्शक नाही,[७] अशा प्रकारचे बोध नाथाच्या भारुडात सर्वत्र आढळतील

कल्पना-विलास हा नाथाच्या शैलीचा विशेष नसला तरी रसाळवर्णन, साधी अनलकृत भाषा, मानवाविषयी अपार जिव्हाळा, देवाविषयीं परम भक्ति, अध्यात्मात रगून गेलेली मनोवृत्ति, सामान्याच्या मनोविकाराचें सहृदय चित्रण, सामान्यास सन्मार्गास लावण्याची तळमळ हे विशेष त्याच्या काव्यात असल्यामुळे त्याचें तत्त्वज्ञान सागणारे ग्रथ आणि साधेसुधे अभग सारखेच परिणामकारक झाले आहेत

नाथाच्या ग्रथात काव्य असूनहि काव्याचा डौल नाहीं लावण्य असूनहि नटवेपणा नाही प्रभावी प्रतिपादन असूनहि प्रचारकारचा अभिनिवेश नाहीं थोडक्यात म्हणजे त्याच्या काव्यात कला आहे पण, कलेचें आडबर नाहीं सौंदर्य आहे पण, सौंदर्याचा दिमाख नाहीं रसवत्ता आहे पण, रसिकतेचे दिखाऊ प्रदर्शन नाही त्याच्या वाङमयात किती टक्के काव्य आहे याचा हिशेब समीक्षकार्नी लावावा ! त्याचे काव्य परिणामकारक आहे हे मात्र निश्चित !

## रसाळ काव्यः भावार्थरामायण

'वाक्य रसात्मक काव्य' ही काव्याची सर्वमान्य व्याख्या स्वीकारली तर नाथाचें भावार्थरामायण हें त्याच्या वाङ्मयसभारात सर्वश्रेष्ठ काव्य ठरतें नाथाच्या परिणत प्रज्ञेस आलेले हें शेवटचें अमृतफळ हा ग्रंथ त्यानीं लिहिला नाहीं• रामचद्रानीं त्याच्याकडून वदविला असे उद्गार

नाथानी वारंवार काढले आहेत अंत:करणात उदित झालेले भाव अनावर झाले म्हणजे कवि बेभान होतो तो पराधीन बनतो उत्कट भाव शब्दरूप धारण करून प्रगट होतात साहित्यशास्त्रज्ञ या उत्कट शक्तीस प्रतिभा म्हणतात. परमेश्वराचे भक्त ईश्वरी प्रेरणा या नावाने या शक्तीस संबोधतात. म्हणूनच एकनाथ म्हणतात.

न करी म्हणता रामायण श्रीराम आपण कथा प्रेरी
प्रेरिताही मी न करी जाण तंव स्वप्नामाजी रामायण
श्रीराम विस्तारी संपूर्ण ऊण खूण ग्रंथाची
जागृतीमाजी वर्तता पुढे प्रकाशे रामकथा
दुश्चितपणें ठेवो जाता राम तत्त्वता रामायण दावी – बालकांड ४–८ ते १५

किष्किंधाकांडाचे आरंभी हाच अनुभव त्यानी दिला आहे 'मी कथा करीत नाही असें म्हणत असता राम आपल्या सत्तेने आपली कथा लिहू लागला' ८

अशारीतीने या रामकथेचा जन्म झाला. भक्ति या काव्यातला निजरस परंतु 'येरा पातिकराचा' म्हणजे शृंगारासह इतर रसाचा मान संतश्रेष्ठ एकनाथ यानी राखला आहे. भक्तीच्या खालोखाल वीररसास स्थान मिळालें आहे आणि ते स्वाभाविक देखील आहे. कारण, श्रीराम म्हणजे मूर्त वीररस पराक्रमासाटीच रामाचा अवतार झालेला म्हणून रामजन्माआधी कौसल्येस डोहाळे लागले तेहि पराक्रम गाजविण्याचेच:

नाव एकोनि रावण येरी म्हणे दे दे धनुष्यबाण
करू लंकेचे निर्वाण मारू दारूण राक्षस
पाचारा वनिचे वानर मुकुटकुंडलें द्या अलंकार
राज्य देओनी धरा छत्र वानरभार चालवावा
केउते गेले रे जुत्पत्ति लंका उलथारे हातोहाती
पाडा पाडा चारी भिंती दुर्ग किती आम्हासी
राक्षसाच्या शिरकमळीं खेळू लंकेपुढें चेंडूफळी
साजुक रुधिराच्या कल्लोळीं तृप्त कंकाळी करू आजी
तोडा नवग्रहाची वेडी सोडा देवाची बांधवडी

उभवा रामराज्याचा गुढी आज्ञा धडफुडी तिहा लोकी
— बालकाट, ७–१० ते १९

## रामावताराचा ध्यास

राक्षसाचा घात करण्यासाठी आणि स्वधर्म वाटाविण्याकरिता रामाचा अवतार झाला हे कथेच्या प्रारभी एकनाथानीं स्पष्ट केले आहे [९] रावणानें देवादिकाची जी दशा केली होती तशाच प्रकारची दुर्दशा नाथ स्वत च्या कालात पहात होते या दुर्दशेचे निवारण करणारा 'राम' अवतारावा ही तळमळ त्याना लागली होती हे रामकथेशी झालेले त्याचे तादात्म्य सिद्ध करतेंच रामावतार ही त्या कालाची निकड होती. जनतेच्या हृदयात वास करणाऱ्या या अप्रगट आकाक्षाशी समरस झाल्यामुळे एकनाथाच्या भावार्थरामायणात आगळे सौंदर्य निर्माण झाले वीररसाला या काव्यात आलेला बहर नाथाच्या या ज्वलत आकाक्षेचेंच प्रतीक होय.

त्यामुळेंहि कदाचित् युद्धकाडावरच त्यानी भावार्थरामायणास विराम दिला असावा रावणाचा वध झाला विभीषण लकाधिपति झाला राजाराम सिंहासनावर बसला. हा कथाभाग युद्धकाडाच्या शेवटी आला आहे भावार्थरामायणाचें उत्तरकाड नाथशिष्यानें लिहिले आहे या विषयीं दुमत नाही परतु युद्धकाडातील किती भाग एकनाथानी लिहिला आहे या विषयी मात्र मतभेद आढळतात श्री ज. स करदीकर याच्या मतें सपूर्ण युद्धकाड नाथानी लिहिलेले असावें [१०] श्री न. र फाटक यानी आपल्या ग्रथात भावार्थरामायणाचें विवरण १२५ पानें केलें असलें तरी या मतभेदाच्या मुद्द्यासबधानें 'उभयपक्षी बरेंच सागता येण्यासारखें आहे' अशा थाटात विवेचन केलें आहे नाथाचा शिष्य गावबा यानें भावार्थरामायण पूर्ण केलें हें खरें असलें तरी युद्धकाडाच्या ५१ ते ५४ या अध्यायात आलेलें अहिमहि–आख्यान हे गावबाचें नाही. या आख्यानाच्या कर्ता 'जयरामसुत' असून नाथाच्या ग्रथात राहिलेली उणीव आपण दूर केली आहे असे तो स्वत.च सागतो [११] उपरोक्त अध्यायात आलेले अहिरावण–महिरावण आख्यान वगळून ४५ व्या अध्याया-

पासूनचे युद्धकाड व उत्तरकाड हे गावबारचित असलें पाहिजे म्हणजे एकनाथ, जयरामसुत आणि गावबा या तिघानी मिळून भावार्थरामायण पूर्ण केलें असे दिसते

युद्धकाडाच्या ४४ व्या अध्यायात एकनाथाना रामायणाची परिपूर्ति करता आली नाही तरी रामकथेची परिपूर्णता त्याच्या दृष्टीपुढें तरळत होती याचा प्रत्यय येतो लक्ष्मणास शक्ति लागली असताना रामचद्र शोक करतात वनस्पती शोधून आणण्याची कामगिरी हनुमान् पतकरतो त्यावेळचे वर्णन करताना एकनाथ म्हणतात

हनुमान साटोपता जीवॉ सुरदुदुभी त्राहाटिल्या देवी
पुष्पवृष्टि केली अववी निजवैभवी कपीद्रा
त्वर जावोनि कपिपति औषधी आणील निश्चिती
सौमित्र उठवील मारूती उदया गभस्ती न येता
लक्ष्मण उठालिया जाण श्रीरामस्वये आपण
निमिषार्धे वधील रावण राज्यी बिभीषण स्थापिल
फिटेल सकलाचा साकटी सुटेल देवाची बादवडा
म्हणोनिया अमरकोटी स्वर्गी गुढी उभारिती

—युद्धकाट, ४४–१२९ ते ३४

गाजलेल्या महाराष्ट्रात कोदडधारी रामाने अवतार घ्यावा, देवाचें आणि धर्माचें सकट दूर करावें आणि न्यायानें पृथ्वी–परिपालन व्हावें हें सुखस्वप्न वाणीने साकारल्यानतर नाथानीं इहलोकींची यात्रा पूर्ण करावी हे या अलौकिक पुरुषाच्या जीवनाशी आणि ध्येयाशी सुसगत वाटतें

## नाथांची रामभक्ति

एकनाथाचा पहिला ग्रथ चतुःश्लोकी भागवत आणि शेवटचा भावार्थ-रामायण कृष्णभक्तीने त्याच्या ग्रथरचनेस प्रारभ झाला आणि रामभक्तिपर ग्रथाची रचना करीत असताना त्यानीं इहलोकींचा निरोप घेतला नाथाच्या ग्रथरचनेच्या आदि-अतावरून आयुष्याच्या उत्तरार्धात एकनाथ रामभक्त बनले कीं काय अशी शका येणें अस्वाभाविक नाहीं 'जनीजनार्दन एक जाणें तो सुटला निःशेख' ही नाथभागवताची शेवटची ओवी त्याच्या

आध्यात्मिक क्षेत्रातील परिपूर्णतेची निदर्शक आहे कृष्ण किंवा राम यापैकी दैवत कोणतेंहि असले तरी आध्यात्मिक भूमिकेत त्यामुळें अतर पडत नाहीं भागवतात तर राम-कृष्ण एकरूप असल्याचें सुदर वर्णनाहि त्यानीं केलें आहे [१२]

तरीहि नाथाच्या रामभक्तीस एका दृष्टीने महत्त्व आहेच भावार्थ-रामायणाच्या रचनेच्या रूपाने ते रामभक्तीकडे वळले असे मात्र मानण्याचें कारण नाही प्रारभापासूनच रामभक्तीचा वेध त्याना लागलेला दिसतो रामनामाची महती गाणारे बरेच अभग त्यानी रचले आहेत कृष्णोद्धव-सवादात्मक भागवतात देखील रामाचा महिमा त्यानी वर्णिला आहे मूळ एकादशस्कधात विभूति-योगाच्या सदर्भात फक्त रामाचा उल्लेख आला आहे एकनाथी भागवतात मात्र रामाचे उल्लेख अनेक ठिकाणीं आले आहेत [१३] कृष्ण आणि राम विष्णूचेच अवतार असले तरी दोघाच्या अवतारकार्याचे स्वरूप थोडे निराळे आहे अध्यात्मिक उन्नतीस आवश्यक असलेल्या ज्ञान, कर्म आणि भक्ति या योगत्रयाच्या दृष्टीनें भगवान् श्रीकृष्णाचे चरित्र आदर्श आहे यात वादच नाही धर्म-रक्षणास आवश्यक असलेला मूर्त पराक्रम म्हणजे श्रीराम ही नाथाची दृष्टि दिसते म्हणूनच गीता आणि भागवत यातील ज्ञानाचा समन्वय आपल्या भागवती टीकेंत केल्यानतर पराक्रमशाली प्रभुरामचद्राचे आदर्श चारित्र्य नाथानी वर्णिलें आहे धर्माचे ज्ञान झाले, जनीजर्नादनाचें दर्शन घडले, विश्वी विश्वात्मा प्रत्ययास आला तरी सद्धर्मरक्षणाची प्रेरणा देणारा आदर्श समजापुढे ठेवणें अगत्याचें आहे असे वाटल्यावरूनच भावार्थरामायणाची रचना झाली असावी गाजलेल्या महाराष्ट्राची मुक्तता करण्यास कोदडधारी रामाचाच आदर्श आवश्यक असल्याची त्याची निष्ठा रामायणाची रचना करती झाली रामकथेशी नाथाची झालेली अपूर्व तन्मयता, राक्षसाच्या वर्णनावर तत्कालीन धर्मच्छलकाची पडलेली छाया, नाथाच्या वरील भूमिकेचाच परिपाक आहे सबध नसताहि भागवती टीकेन आलेले राममाहात्म्य याच प्रवृत्तीचें निदर्शक आहे

## चतुःश्लोकी भागवत

नाथाचा हा पहिला ग्रंथ सुमारें एकहजार ओव्यांचा आहे भागवताच्या द्वितीय स्कंधातील ९ व्या अध्यायात आलेल्या ३२ ते ३५ या श्लोकात भागवताचें सार आलें असून त्यासच चतुःश्लोकी भागवत म्हणतात. या चार श्लोकावरील मराठी टीकेच्या पहिल्या ४४० ओव्या प्रास्ताविक स्वरूपाच्या आहेत ब्रह्मदेवास कर्मांची नेणीव उत्पन्न झाली असताना त्यानें भगवान् विष्णूची भक्ति केली. भगवतानीं त्यास तप करण्यास सांगितलें. तप करूनहि गुरुकृपा न झाल्यानें ब्रह्मदेवास ज्ञान प्राप्त झाले नाहीं व भगवताचे साक्षात् दर्शनहि घडलें नाहीं भक्ताच्या मेळाव्यात त्याला ईशदर्शन घडलें नतर भगवतानी चार श्लोकात ज्ञानाचा उपदेश ब्रह्मदेवास केला असें मूळ कथानक आहे या सदर्भात एकनाथानी तपाची निराळी व्याख्या दिली आहे शरीरशोषण हें तप नसून हृदयीं चिद्रूप पाहणे, काम क्रोधादिक रिपूचे निर्दालन करणे हे खरें तप आहे अशी एकनाथाची भूमिका आहे सर्वभूती भगवद्भाव हीच खरी भक्ति असून भक्तीशिवाय ब्रह्मदेवास देखील ज्ञान प्राप्त झालें नाहीं असा नाथाचा निष्कर्ष आहे [१४] नाथाच्या या पहिल्या ग्रंथावर ज्ञानेश्वराच्या शैलीचा खोलवर ठसा उमटलेला दिसतो [१५]

## स्फुट प्रकरणें

चतुःश्लोकी भागवताच्या नतर आणि एकादशावरील टीका लिहिण्यापूर्वी नाथानीं काही स्फुट प्रकरणें लिहिली आहेत ग्रथाच्या स्वरूपावरून हीं प्रकरणे भागवताच्या पूर्वीची असल्यासारखीं वाटतात या सर्व स्फुट प्रकरणाची ओवी सख्या सुमारें चार हजार आहे [१६]

**शुकाष्टक** सुमारें अडीचशे ओव्याचें हे प्रकरण आहे 'निस्त्रैगुण्ये पथि विचारता को विधि. को निषेधः' हें पालुपद असलेल्या ८ सस्कृत श्लोकावरील हें मराठी भाष्य आहे 'आत्मानदाचा अनुभव घेतलेला ब्रह्मज्ञानी विधिनिषेधाच्या अतीत असतो हें या प्रकरणाचे सार आहे

**आनदलहरी :** सुमारे दीडशे ओव्याच्या या प्रकरणात अद्वयानदाचें

वर्णन आलें आहे सद्गुरूस शरण गेल्यानें 'याच देहीं याच डोळां मुक्तीचा सोहळा' पाहता येतो असा या प्रकरणाचा निष्कर्ष आहे

**स्वात्मसुख** . अद्वयानंदाचें वर्णन सुमारें ५०० ओव्यांच्या या प्रकरणात आले आहे 'साखर वेगळी करून तिची गोडी निराळी केली असताना ती सर्वांगानें गोड व्हावी त्याप्रमाणें निजानंद आहे'[१७] सच्चिदानंद अवस्थेंत देवाचें देवपण आणि भक्ताचें भक्तपण विरून जातें[१८] हा अनुभव सद्गुरूच्या कृपेनेंच मिळतो म्हणून सद्गुरु परब्रह्मापेक्षा श्रेष्ठ आहे या निरभिमान अवस्थेस समाधि म्हणतात समाधि-अवस्थेत साधूचे कर्म चालू असतें तो लोकोद्धाराचें कार्य सतत करीत असतो कारण, त्याच्या दृष्टीनें जन आणि जनार्दन यात भेद नसतो .

> एकाजनार्दन परिपूर्ण जनजनार्दन अभिन्न
> हे ज्यासी आकळे खूण स्वात्मसुख जाण तो लाभे – ५०९

**हस्तामलक** जन-जनार्दन एक आहेत प्रपंच आणि परमार्थ यात भेद नाहीं या भूमिकेचे प्रतिपादन सुमारें ६७५ ओव्यांच्या या प्रकरणातहि आलें आहे. शंकराचार्यांच्या १४ श्लोकांच्या प्रकरणावर नाथानी केलेली ही मराठी टीका आहे पूर्ण ज्ञान झाल्यानंतर ज्ञात्यानें कर्म करावें काय ? ज्ञानप्राप्तीनंतर लोकसंग्रहासाठीं कर्म करणें आवश्यक असतें असा गीतेचा सिद्धांत आहे ज्ञानोत्तर कर्म करण्याची आवश्यकता नाहीं अशी शंकराचार्यांची भूमिका आहे ज्ञानोत्तर कर्माची आवश्यकता नसती तर गीतेचा उपदेश केल्यानंतर भगवंतानीं अर्जुनाला युद्ध करण्यास लावलें नसते ताटस्थ्य म्हणजे जीवन्मुक्तावस्था नव्हे तसें असेल तर पाषाणालाहि ज्ञानी म्हणता आलें असतें[१९] ज्ञात्याला कर्माचा मळ लागत नाहीं त्याच्या कर्मानें लोकोद्धार होत असतो[२०] प्रपंचच परमार्थरूप होतो[२१]

> प्रपंच खणोनि काढावा मग परमार्थु मांडावा
> हा संदेह नलगे करावा प्रपंचुचि अवघा परमार्थु होय – ५७७

**अनुभवानंद** . ज्ञानोत्तर कर्माचा पुरस्कार करणारें अनुभवानंद किंवा आनंदानुभव या नावाचें एक प्रकरण नाथांच्या नावावर मोडतें 'हा ग्रंथ एकनाथांच्या आनंदलहरीपेक्षा फारच सरस असून त्यांनीं तो लिहिला असावा' असे 'काव्यसंग्रहकार' म्हणतात[२२] या प्रकरणातील विचारसरणी

नाथाच्या विचारास जुळणारी असली तरी शैली मात्र एकनाथाची वाटत नाहीं म्हणून हे प्रकरण नाथाचे नसावें असें वाटतें

ज्ञानी माणसाने केवळ आत्मानंदात मग्न न राहता जगाच्या उद्धारार्थ कार्य केलें पाहिजे सर्वभूती भगवद्भाव हे ज्ञानाचे रहस्य आहे [२३] जन आणि जनार्दन अभिन्न आहेत.[२४] प्रपंच आणि परमार्थ परस्पर–विरोधी नसून एकरूप आहेत हे सिद्धांत नाथांनी लिहिलेल्या स्फुट प्रकरणात कटाक्षानें प्रतिपादण्यात आले आहेत

## नाथांचीं आख्यानें

स्फुट प्रकरणाखेरीज बरीच लहानमोठीं आख्यानें एकनाथांनीं लिहिली आहेत मराठी आख्यानक कवितेचा पाया संत नामदेवांनी घातलेला असला तरी आख्यानक वाङ्मयास लोकाभिमुखता आणि लोकप्रियता एकनाथांनी प्राप्त करून दिली अध्यात्मज्ञान आबालवृद्धांना सुबोध करून सांगणें हे एकनाथी आख्यानाचें उद्दिष्ट आहे एकनाथ आख्यानात विशेष रमतात या वाङ्मयप्रकारात त्यांच्या भाषेला विशिष्ट प्रकारचा डौल येतो, वर्णनाला गति मिळते, आणि वाणीसहि स्फुरण चढतें सामान्य माणसाच्या मनाची पकड घेण्याचें सामर्थ्य नाथाच्या आख्यानात विशेषें करून प्रत्ययास येतें. वाङ्मयीन दृष्ट्याहि ही आख्यानें मोलाचीं आहेत

भक्त आणि संत यांची सुमारें २८ आख्यानें एकनाथी वाङ्मयात आहेत या आख्यानात कथाभागाइतकेंच अध्यात्माकडे नाथांनीं लक्ष पुरविलें आहे कथेच्या ओघात भागवतधर्म सुलभ रीतीनें सांगण्याचें कौशल्य या आख्यानात आढळतें आख्यानाचा प्रारंभहि आकर्षक करण्यात नाथाचा हातखंडा आहे चोखामेळ्याच्या आख्यानाचा हा प्रारंभच पहाना

> अमृतासी रोग स्वर्गीं जाहला पाहीं अमरनाथा तेंहि गोड नसे
>
> नारदातें प्रश्न करी अमरनाथ शुद्ध हें अमृत कोठें होय

देवेंद्राच्या पृच्छेला नारदानें उत्तर दिलें :

> पंढरी वैकुंठ आहे भूमीवरी पुण्डलिकाचे द्वारी देव उभा
>
> तया ठायीं जाता शुद्ध होय अमृत

नारदाच्या सांगण्याप्रमाणें देवासहित इंद्र पंढरीस आला. एकादशीचें पारणें

चोखोबाच्या घरीं सोडण्याच्या तयारीत पढरीनाथ होता चोखोबाच्या अगणात पगत बसली देवेंद्र तेथें गेला अमृताचें ताट पुढें करून त्यास शुद्ध करावें असें तो पढरीनाथास विणवू लागला· पंढरीनाथानीं चोखोबाकडे अमृत शुद्ध करण्याची कामगिरी सोंपाविली .

चोखामेळा म्हणे काय हे अमृत नामापुढे काय मात याची

शेवटी देवाचा आग्रह पडल्यानें त्याने अमृत शुद्ध केलें (एकनाथ–गाथा, क्र ३६६७–८२) असा थोडक्यात या आख्यानाचा आशय आहे या आख्यानात भागवतधर्मांची मूलतत्त्वें सहजतेनें सागण्यात आली आहेत हे लक्षात येईलच

## रुक्मिणी–स्वयंवर

नाथानी लिहिलेल्या आख्यानात 'रुक्मिणी–स्वयवराख्यान' अनेक दृष्टीनीं अप्रतीम आहे· कथा, काव्य आणि अध्यात्म असा त्रिवेणीसगम या आख्यानात आढळतो आधीच कृष्णकथा मधुर त्यात रुक्मिणी-स्वयवर म्हणजे तर नवरसाचें विश्रातिस्थान. त्यातूनहि एकनाथासारखा रसाळ वक्ता लाभल्याने या कथेस निराळेच सौंदर्य लाभलें आहे. आपल्या सेवेंत असलेल्या श्रीखडयाचे लग्न करावें अशी नाथाची इच्छा होती परंतु, हा श्रीखडया स्वत कृष्णच होता व द्वारकेच्या ब्राह्मणास नाथाच्या घरी दर्शन देऊन तो अतर्धान पावला त्याच्या लग्नाची अतृप्त इच्छा नाथानी हे आख्यान लिहून पूर्ण केली अशी या ग्रथासंबंधींची आख्यायिका आहे.

नाही ग्रथाचा सकल्प नव्हता श्रोतयाचा आक्षेप
ग्रथीं उजळला कृष्णदीप सुखरूप हरिकथा
जेणें हा ग्रथ करविला तो आरभींच उपरमला
पुढें ग्रथ कैसा चालिला बोलता बोला न बोलवे १८–७०–७१

१८ व्या प्रसगाचे शेवटीं आलेल्या वरील उल्लेखावरून या आख्यानासबंधीं-च्या आख्यायिकेस पुष्टी मिळते

शके १४९३ सालीं रामनवमीस काशीस हा ग्रथ पूर्ण झाला भागव-ताच्या दशमस्कधातलि १४४ सस्कृत श्लोकावर नाथानीं १७१२ ओव्याचें भाष्य केलें आहे कृष्ण–रुक्मिणीचा विवाह म्हणजे जिवा–शिवाचें लग्न हे

रूपकात्मक सूत्र या आख्यानात गोवण्यात आले आहे इतर वर्णनातहि त्यानी अध्यात्मिक रूपकाचा साज चढविला आहे [२५] विवाहाच्या वेळी उडविलेल्या शोभेच्या दारूच्या वर्णनात देखील आध्यात्माचा विसर त्याना पडला नाहीं.[२६]

उदात्त वर्णन आणि प्रभावी व्यक्तिचित्रण करण्याचे नाथाचें सामर्थ्य या आख्यानात चागलेच दृष्टोत्पत्तीस येते आठव्या प्रसगात युद्धाच्या वर्णनाच्या रूपानें वीररस अवतरला आहे विरोधी पक्षीयाच्या सवादात देखील आवेश जाणवतो ९ व्या व १० व्या प्रसगात रणक्षेत्राचें प्रभावी चित्रण आढळते. शात आणि वीर या दोन रसाच्या बरोबर विनोद खेळीमेळीनें वावरताना दिसतो ७, १५ व १८ या प्रसगात विनोदाची प्रतीती येते १८ व्या प्रसगातील वेश्या व सन्यासी याच्या सवादात तर विनोदाला उपरोधाची धार आली आहे [२७]

काव्य, तत्त्वज्ञान, भक्ति, बोध आणि विनोद याचा सुदर सगम नाथाच्या या आख्यानात आढळतो नाथोत्तरकालीन महानुभावेतर कवींनी रचलेल्या रुक्मिणी–विवाहापर काव्यावर एकनाथाच्या या आख्यानाचा बराच परिणाम झालेला दिसून येतो कृष्णदयार्णवानीं तर भागवताच्या दशमस्कधावरील टीकेंत नाथाचें रुक्मिणीस्वयवर जसेच्या तसेंच उद्धृत केलें आहे आणि तसें करताना नाथानी केलेल्या रचनेपेक्षा चागली रचना आपणास जमणार नाही अशी कबूलीहि दिली आहे :

> ऐसा महिमा अगाध जयाचा तिही रुक्मिणीस्वयवर वाचा
> वाखाणिले त्या ग्रथाचा विचित्र महिमा जग जाणे
> परमार्थ बुद्धि निष्काम पठण करिता लाहती अपरोक्ष ज्ञान
> अमोघ सिद्धीचे आयतन त्यावरी व्याख्यान केवि कीजे २८

कृष्णदयार्णवाच्या वरील उद्‌गारावरून समकालीन कविवर्गात देखील हा ग्रंथ किती लोकप्रिय झाला होता याची कल्पना येईल

## भारुडांचा ‘अजबखाना’

वरील रूपकात्मक ग्रथापेक्षाहि एकनाथी भारूडानी लोकप्रियतेचा उच्चांक गाठला आहे भजनी मडळीत अद्यापहि नाथाचीं भारुडें आवडीनें

गायिली जातात कै पागारकर यानी नाथाच्या भारुडास 'अजबखाना' असे नाव दिलें आहे ते मार्थ वाटतें कारण, या रचनाप्रकारात सारेच अजब व नवलाचे आहे. 'नाथाच्या घरची उलटी खूण' येथे विशेषे करून प्रत्ययास येते ही उलटी खूण समजल्याशिवाय भारुडाचा उकल होत नाही उकललीं नाहींत तरी वैचित्र्यामुळेंहि केवळ नाथाची भारुडें चित्त वेधून घेतात "देस वैसा भेस" हे सूत्र भारुडात पाळण्यात आले आहे ज्या ज्या व्यवसायावरचे भारूड आहे त्या त्या व्यवसायाची भाषा त्या त्या भारुडात वापरण्यात आली आहे चमत्कृती हे या प्रकाराचे वैशिष्टय असून अध्यात्म हा त्याचा आत्मा आहे

भारूड जेवढें गुतागुतीचें तेवढीच 'भारूड' या शब्दाची व्युत्पत्ति देखील जटिल वाटते बहु + रूढ, भार + गूढ, नाड + हाडू (ग्रामीण गीत–कानडी शब्द) अशी या शब्दाची व्युत्पत्ति कांहीं विद्वानानी सुचविली आहे [२९] शब्दाच्या व्युत्पत्तीच्या उबरठ्यावर न रेंगाळता भारुडाच्या मदिरात प्रवेश केल्यानतर मात्र आतील मनोहर भावमूर्तीचें दर्शन घडतें या मदिरातील मूळ देव (अध्यात्म) मनोवेधक आहेच पण पारिपार्श्वकाच्या (लोकाचार, लोकरूढि, समाजस्थिति, मानवीस्वभाव) मूर्ति देखील चित्ताकर्षक आहेत एकनाथाच्या पूर्वी आणि नतरहि भारुडाची रचना झाली परतु एकनाथी भारुडाची लोकप्रियता त्याना लाभली नाही. म्हणूनच भारूड म्हणजेच नाथाचें भारूड असें समीकरण जवळ जवळ रूढ झालें आहे मराठी वाङ्मयातील मोलाचा ठेवा एवढें स्थान या भारुडानीं प्राप्त करून घेतले आहे.

या भारुडात आलेले विषय आणि पात्रे वरवर नजरेखालून घातली तरी नाथानी दर्शविलेल्या विविधतेचा बोध होतो जोशी, बाळसतोष, मुका, अघळा, पागूळ, पिसा, दिवटा, मानभाव, कोल्हाटी, भुत्या, डोबारी, सन्यासी, गारुडी, वाघ्या, पोपट, पिंगळा, वटवाघूळ, साप, विचू, यलमा, महालक्ष्मी, येसकर, महार आदि विषयावर लिहिलेलीं सुमारें ३०० भारुडें नाथवाङ्मयात आढळतात

जोशानें पाटीलबुवास सागितलेला हा होरा ऐका [३०] तो सागतो : पाटीलबुवा तुमची एका बाईशी सगत जडली, तिने तुमचा महिमा बुड-

विला, तिची सगत टाकलीस तर तुला सुख लागेल इतके दिवस तिच्याशी ससार करतोस, काही सुख लागलय् का तुला ? तिच्यापासून दहा मुल झालीं, पण एकाच तरी सुख तुझ्या नशिबी आहे काय ? आता तरी डोळे उघड, विषमबुद्धीचा पैसा ओवाळून टाक आणि मला त्याचे दान दे म्हणजे तू सुखी होशील प्रकृति-पुरुषाच्या सयोगाने पुरुषाचे महत्त्व कमी झाले. प्रकृतीचा महिमा वाढला आणि त्याबरोबरच अशातताहि वाढीस लागली विषम बुद्धीचा त्याग केल्यानतरच प्रपंचात सुख लागेल असा या भारुडाचा भावार्थ आहे या नतरच्या जोशाच्या भारुडात ससारातील दग्या-फटक्याचे वर्णन आले असून सतास शरण जा व राम-नामाचा जप करा असा उपदेश करण्यात आला आहे जोशा-प्रमाणेंच दारोदार भिक्षा मागणारा **बाळसतोष** 'जुन्या देहाच्या अगीचें' दान मागतो [३१] **वासुदेव** देखील त्याच मालिकेतला [३२] डोळे असूनहि मायामोहाने झालेला **आधळा** सद्गुरूच्या आधाराने चालतो, सत-सगतीने भक्तीचे दान पावल्यामुळे त्याला परात्पराचें देखील दर्शन घडते [३३] पागळा, बहिरा, पिसा, मुका, याना देखील सद्गुरु आणि सत याच्या कृपेमुळे आपले व्यंग दूर सारता आलें.

आता डोंबाऱ्याच्या ढोलाचे बोल ऐका

लगे ढोल लगे ढोल जरी तुझा वस्ताद खोल
तरीच मशी बोल मी निराकाराचा
डोंगारी तिहीं लोकीं माझी फेरी
चार युगाच्या खबरी तुज सागेन रे गव्हारा ॥

विष्णूच्या अवताराचे वर्णन केल्या नतर डोंबाऱ्याचा खेळ संपतो हा खेळ खेळल्यामुळे :

खेळ खेळता अग हरपले चित्त मन उन्नत झालें
कीर्तनसुखें निवालें एका जनार्दनी ऐसे केले [३४]

डोंबाऱ्याप्रमाणेच कोल्हाटयाचा ढोल देखील 'सोह' चे बोल काढतो [३५] नाथाच्या सर्व भारुडात विशेष लक्षात भरण्यासारखी भारुडे आहेत महालक्ष्मीवरचीं या भारुडात सुदर कल्पना, तत्त्वज्ञान व तत्कालीन धार्मिक परिस्थिति याचा सगम आढळतो या आणि इतर भारु-

डातहि भगवतानीं धारण केलेल्या ९ व्या अवताराचें वर्णन विठ्ठलरूपाने केले आहे पौराणिक परपरेप्रमाणे नववा अवतार गौतमबुद्धाचा न मानता त्यानीं बौद्ध अवतार म्हणजे विठ्ठल मानला आहे हे नाथाचे वैशिष्ट्य आहे महालक्ष्मीच्या भारुडात भगवतानी पुडलीकासाठी नववा अवतार धारण केला असें सागून एकनाथ म्हणतात, 'या अवताराने भक्तीचे क्षेत्र सर्वांना मोकळें झाले

मग जगद्‌बा प्रसन्न झाली भक्तीची कवाडे उघडी केली
शख-चक्राकित शोभली रूपसुदर सावळी
कोटि चद्रसूर्य प्रभावळी [३६]

'भक्तजया कारणें जगदबेनें दार उघडावें कारण,
पुढे कलीचा प्रथम चरण दैवने राहिली लपून
तीर्थें साडून महिमान अठरा वर्ण एक झाले
म्लेंच्छे गाजिले देवभक्ता महिमा उच्छेदिला सर्वथा
न चले जपतप तत्त्वता एकरूप सर्व झालें

या दुरवस्थेत भर घालण्यासाठी काम-क्रोधादिक भुतावळी देखील मातली ही दैन्यावस्था तुला बघवेना म्हणून तर तू विटेवर कटेवर हात ठेवून स्वस्थ बसली नाहीस ना ? असा नाथाचा सवाल आहे [३७] नाथकालीन परिस्थितीचें हे वर्णन आहे हे निराळे सागण्याची आवश्यकता नाही

मरिआई, सटवाई, यलमा, यासारख्या देवता नाथानी विठ्ठलस्वरूपी मानल्या आहेत क्षूद्र देवताचा अधिक्षेप न करता त्याचे उदात्तीकरण करून सर्व विश्व नारायणात्मक आहे त्याचप्रमाणे सर्व देवता नारायणरूप आहेत हे भागवतधर्माचें सूत्र या रूपाने एकनाथानीं प्रतिपादिले आहे

## भारुडांतील नाट्य आणि समाजदर्शन

बोध आणि प्रबोध व परिणामकारक नाट्य याच्या दृष्टीनें नाथाचे जोहार विशेष अभ्यासण्यासारखे आहेत. महार, माग, वेसकर, महारीण इत्यादिकावर त्यानीं सुमारें ५० भारुडें लिहिली आहेत महार हा समाजातला अन्त्यवर्ण पडेल तें काम करावयाचें व मिळेल त्या शिळ्या तुकड्यावर जगायचें हा त्याचा धर्म परतु, समाजाला उपदेश करण्यासाठी

त्यालाहि नाथानी वेठीस धरले आहे नाथाचा हा महार कोणत्याहि पाढरीचा नाही तो पढरी किंवा निर्गुणपुरीचा आहे तो रामजी पाटलाच्या सेवेत असतो म्हणून उपदेश करण्याचा अधिकार त्याला प्राप्त झाला आहे 'शभर वर्षांचा कौल तुम्हाला मिळाला आहे त्यानतर येईल यमाजीची चिठ्ठी तेव्हा व्हाल कष्टी, जाल उठाउठी त्यासाठीं आतापासून काहीं तरी तजवीज करा सतानी अशा प्रकारची तजवीज केली म्हणून त्याना परत यावे लागलें नाही. त्याचा किता गिरविला, पढरीचा मार्ग धरला तर पुढच्या यातना चुकतील

> शेत तुमचे हानी हाय तव चोखट करूनी ठेवा भोय
> एका जनार्दनाचे पाय उगेच धरा कीजी मायाबाप
> एका जनार्दनाचा महार सागतो वर्तमान फार
> माझा खोटा नव्हे समाचार परब्रह्माची वास कराल कीजी मायबाप

प्राण्याची सृष्टी देखील एकनाथाच्या नजरेतून सुटली नाही नाथाचें पाखरू नवलाचें आहे ते डोळे नसून पाहतें, कान नसून ऐकते, पख नसून उडते त्याला आई नाहीं, बापहि नाहीं ओळखा बरें ते पाखरू ?

> सख्या त्याचें नाव कान्होबा कृष्ण म्हणती सर्व रे

नाथाच्या पिंगळा 'सोह बोधाचा' शकुन सागतो [३८] पिजऱ्यातील पोपट पाहून देहात बद्ध झालेल्या जिवाची आठवण त्याना होते सद्गुरूचा जप कर म्हणजे तुझा उद्धार होईल असें या पोपटास म्हणजे मानवास एकनाथ सागतात [३९] सापावर ससाराचें रूपक त्यानी केले आहे साप चावला आणि पाय स्वार्थ–सपत्तीने जड झाला. विषयनिंब कडू असून गोड लागू लागला. भजनगूळ गोड असून कडू लागू लागला कोण उतरणार हा साप ?

> गुरु गारुडी आला धावुनी बोध–वैराग्याचें पाजिले पाणी
> विवेक–अजन घातलें नयनीं सोह शब्द वाजवी नामध्वनी

या उपायानें साप उतरला आणि भ्रांतीचे निवारण झाले. [४०]

एकनाथाचा कुत्रा तर ब्राह्मणाशी वाद घालतो विटाळ होऊं नये म्हणून धनी त्यास दुरून भाकर घालतो पण, तो ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी

बोलतो. हरिभजन करा आणि अमर व्हा असा उपदेश तो आपल्या धन्यास करतो.[४१]

नाट्याच्या दृष्टीनेहि अत्यत प्रभावी असलेल्या या वाङ्मय प्रकारातील काही भारुडाचा केवळ वानगीदाखल उल्लेख या ठिकाणी केला आहे. अशीं अनेक रत्ने नाथाच्या भाडारात आहेत आत्मबोधाचें सूत्र सर्वत्र साभाळूनहि त्यात विविधता भरपूर आहे समाजाचे सर्व थर त्यात आहेत. तशीच प्रत्येक थराची विशिष्ट भाषाहि त्यातून आढळते चमत्कृती, विनोद, स्वभावचित्रण आणि समाजदर्शन त्यात आहे आत्म–प्रबोध हा त्याचा आत्मा आहे तीनशें भारुडाचा निष्कर्ष एकच आहे :

'नरदेह कष्टानें मिळाला आहे तो वाया घालवू नका विकारांच्या आहारी न जाता सद्गुरूस शरण जा भक्तिमार्गाचा अवलब करा. म्हणजे सर्व यातनातून मुक्तता होईल ब्रह्मानदाचें वैभव प्राप्त होईल.'

' ब्रह्मज्ञान नोहे लेकुराच्या गोष्टी ' हे खरें असलें तरी भक्तिमार्गाच्या योगाने तें सामान्याच्या आटोक्यात येऊ शकतें असा विश्वास नाथाच्या भारुडानी निर्माण केला आहे. या प्रकारात नाथाच्या ढगदार शैलीचें दर्शन घडते समाजजीवनाशी त्याची झालेली समरसता प्रत्ययास येते व सामान्य जनतेस सन्मर्गाला लावण्याची त्याना किती तळमळ होती याची जाणीवहि होते शैलीवरून माणसाच्या स्वभावाचे दर्शन घडते अशी एक इग्रजी म्हण आहे. भारुडाच्या शैलीवरूनहि एकनाथाच्या स्वभावाचा बोध होतो. मानवाविषयींच्या अपरपार जिव्हाळ्यानें भरलेला, बुडते जन पाहून अपार कारुण्यानें कळवळणारा, पण हळहळत स्वस्थ न बसता त्याच्या चालीनें चालून व त्याच्या बोलीनें बोलून हसत आणि हसवीत, स्वतः रगून जाऊन इतराना रंजवीत आत्मोद्धाराचा मार्ग समाजाला दाखविणारा महात्मा एकनाथी भारुडे वाचीत असताना आपल्या डोळ्यापुढें उभा राहतो

## नाथांची अभंग–वाणी

अभगरचनेंत तर या महात्म्याचें विशाल अतःकरण अधिकच स्पष्टपणें दिसतें. ' उपरि सकटक साचे परतु साचे जयात सुरसाचे' असें भारु-

डाचे वर्णन करता येईल. अभगाचे तसें नाहीं. ते आतबाहेर सारखेच गोड आहेत भारुडें आणि अभग मिळून सुमारें साडेचार हजाराचा एकनाथी गाथा आवटे यानीं प्रकाशित केला आहे तुकारामतात्याच्या गाथ्यात पावणेतीन हजाराचा सग्रह आहे काही भेसळ वगळली तर नाथाची अभग–भारुडाची रचना सुमारे साडेतीन हजाराच्या आसपास मानण्यास हरकत नसावी.

विषयाच्या दृष्टीने विचार केला असता भागवतधर्माचें निरूपण आणि स्वानुभव–कथन हेच अभंगाचें प्रमुख विषय आहेत स्फुट अभगापेक्षा आख्यानपर अभगात नाथवाणी अधिक रमते तुकोबाचे या उलट आहे तुकोबाच्या आख्यानापेक्षा त्याचे स्फुट अभग अधिक डौलदार व प्रभावी वाटतात. आख्यानपर अभगानतर एकनाथ अधिक रमतात ते सद्‌गुरूच्या व संताच्या वर्णनात एकनाथाची गुरुभक्ति विख्यात आहे. गुरु आणि परब्रह्म ते एकस्वरूपी मानतात. कित्येक ठिकाणी तर परब्रह्माचा प्रकाशक म्हणून गुरूस त्यानीं परब्रह्मापेक्षाहि श्रेष्ठ ठरविले आहे.[४२]

धर्मरक्षणासाठी आणि पाखडाचे निर्मूलन करण्यासाठी अवतार घेणाऱ्या सताचा माहिमा नाथाच्या अभगात अनेक ठिकाणी वर्णिला आहे[४३] सद्‌गुरूच्या कृपेनें ब्रह्मस्वरूप होता येतें[४४] त्याचप्रमाणे सत-संगतींत जीवितसाफल्य अनुभविता येतें[४५] ज्याला स्वतःचा उद्धार करून घ्यावयाचा आहे त्यानें सतास शरण जावें सताच्या चरणावर स्वत देव लोळण घेत असल्यामुळें[४६] त्याना शरण गेल्यानें परमेश्वरप्राप्ती सहज होतें.[४७]

सर्वभूती समदृष्टि आणि दया ही निवृत्ति–ज्ञानदेवाप्रमाणेच नाथानींहि साधूची लक्षणें मानली आहेत

> सर्वभूतीं दया साधु म्हणावे ऐसिया
> जग ब्रह्मरूप जाण हेंचि साधूचे लक्षण
> सर्वभुती समदृष्टी तोचि साधु इये सृष्टीं
> एकाजनार्दनी सत नित्य साधी आत्महित[४८]

प्रपच आणि परमार्थ समान मानणारा साधु शातीचें माहेर, सदा-चाराचें स्फूर्तिस्थान आणि ज्ञानाचें भाडार असतो[४९] त्याच्या चरण-

स्पर्शानें तीर्थांना तीर्थपण येतें त्याच्या सहवासात न मरता मोक्ष प्राप्त होतो नामसंकीर्तनाचा महिमाहि त्यानीं असाच तन्मयतेने वर्णिला आहे

## लोकोद्धाराची तळमळ

उपदेशपर अभगात लोकोद्धाराची तळमळ प्रामुख्यानें जाणवते जीवित कालानें मर्यादित केलेलें प्रपच नाशवताच्या गुतागुतींत गोवणारा जन्माच्या साफल्याचा विचारच त्यामुळें येत नाही आला तरी शरीर वळत नाही अशाश्वताच्या नादी लागल्यामुळें शाश्वत हातीं लागत नाही आणि अशाश्वत तर आधींच निघून जातें त्यामुळे कष्टानें प्राप्त झालेल्या नरदेहाचें सार्थक न होता जन्म वाया जातो. सुख अशाश्वतात नाहीं तें शाश्वतात आहे शाश्वताचा शोध करण्यासाठी प्रपचत्याग करण्याची आवश्यकता नाहीं देहास निंद्य मानून त्यास दडण्याचीहि गरज नाही जीवित हे कालाचें भक्ष्य आहे ही जाणीव ठेवून रामनामस्मरण केलें व सत आणि सद्गुरु याना शरण गेलें म्हणजे

प्रपच परमर्थ एकरूप होत आहे ज्याचा हेत रामनामी[५१]

अद्वैतप्रतीतीच्या वर्णनातहि नाथवाणीस बहर येतो याचें कारण त्याची अद्वैतप्रतीती केवळ बौद्धिक स्वरूपाची नसून तो त्याचा जिवत अनुभव आहे त्यानी अद्वैत जाणलें तसेच तें अनुभवले म्हणून अभगांतच नव्हे तर इतरत्रहि अद्वैतसुखाच्या वर्णनात ते स्वतःस विसरून जातात हे दिसून येतें बुद्धीनें जाणलेलें ब्रह्मज्ञान सोलीव स्वरूपात त्याच्या दृष्टिपुढे तरळते त्या निरुपम आनदाशी ते एकरूप होतात व सर्वत्र जनार्दन कोंदल्याचा प्रत्यय ते वर्णू लागतात[५२]

मानवी जीवनावर अलोट प्रेम, दलिताविषयीं जिव्हाळा, त्याना सन्मार्गाला लावण्याची तळमळ, विश्वी विश्वात्मा भरल्याचा प्रत्यय, रसाळ कथनपद्धति, ढगदार शैलि, समाजाच्या सर्व थराशी समरस होण्याचें कसब हे नाथाच्या अभंगवाणीचे विशेष सागता येतील (अभगात आढळून येणाऱ्या भागवतधर्माच्या स्वरूपाचे विवेचन स्वतत्र प्रकरणात येणार असल्यानें त्याचा येथें विचार केला नाहीं)

## एकनाथी भागवत

एकनाथाच्या वाङ्मयमणिमालेतील मेरुमणि म्हणजे भागवताच्या एकादशस्कंधावर त्यानीं लिहिलेली मराठी टीका एकनाथी भागवत म्हणजे प्रशात महासागरच सागराचे गाभीर्य, त्याचा विस्तार आणि त्याची रत्नगर्भता आदि वैशिष्टये या ग्रथात आढळतात सागराचा खारटपणा आणि दुर्लंघ्यता मात्र या ठिकाणीं नाहीं. माधुर्य आणि सहजगम्य अर्थ हे गुण असल्यामुळें या सागरात वाचक गटागळ्या खात नाही तर आनदाच्या उर्मीत बुडतो आणि जीवनाच्या महासुखाचा अनुभव घेतो. साध्या-भोळ्या भाविकाना भवसागर तरून जाता यावा यासाठी भागवताचा अवतार आहे. प्रपंच आणि परमार्थ या नाथाच्या दृष्टीनें एकरूप असलेल्या क्षेत्रात मोलाची ठरतील अशी अनेक रत्नें या सागरात आहेत. रत्नें सागराच्या तळाशी असतात तसा प्रकार मात्र येथे नाहीं. भागवती टीकेंत सहज अवगाहन केले तरी अनेक अनर्घ्य रत्नें हातीं येतात म्हणून तरून जाणारास सोपा, अवगाहन करणारास आनदप्रद आणि केवळ दृष्टिक्षेप टाकणारांस देखील सौदर्यामुळें मोहित करणारा असा हा नाथाचा शब्दमहोदधि आहे या शब्दमहोदधीच्या मंथनातून भागवतधर्मरूपी अमृत उदय पावलें आहे

## मराठी भाषेचा अभिमान

मूळ एकादशाचे १५०० श्लोक असल्याचे एकनाथ सागतात [५३] परतु, प्रत्यक्ष एकादशात १३६७ श्लोक आहेत. या श्लोकावर १८८४६ ओव्याचें भाष्य नाथानीं केले आहे ही टीका लिहिताना नाथानी ज्ञानेश्वराप्रमाणेंच मराठी भाषेविषयी आदर व्यक्त केला आहे. पहिल्याच अध्यायात सस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषा परमेश्वरानेंच निर्माण केलेल्या असल्यामुळें सस्कृत भाषेसच श्रेष्ठ मानण्याचें कारण नाहीं असें एकनाथ सागतात.[५४] भागवत हे प्राकृतात सागितलें म्हणून त्याची उपेक्षा करूं नये,[५५] सूर्य शिळा होत नाही, अग्नीच्या दृष्टीनें सोंवळें-ओवळे निरर्थक असतें, त्याप्रमाणे शुद्ध ज्ञान मराठी भाषेंत सागितल्यानें तें ओवळें

ठरत नाही,[५६] वेदाना अगम्य असलेलें ज्ञान मराठी भाषेत मी सागत आहे चक्रवर्तीच्या डोक्यावर कोणासहि बसणे शक्य नसतें पण, माशी मात्र चटकन् बसूं शकतें तसेंच मराठी भाषेत केलेले हे व्याख्यान आहे[५७] भाषा कोणतीहि असली तरी भाव महत्त्वाचा असतो त्या दृष्टीनें या ग्रथाकडे पहावे अशी एकनाथाची विनवणी आहे[५८] या विनयपूर्ण कथनास अभिमान आणि आत्मविश्वास याची जोड एकनाथानी दिली आहे.

माझी मराठी भाषा चोखटी परी परब्रह्मे फळली गाढी
सतसज्जन जाणती गोटी यालागी जोटा जोडिला ग्रथ

—अे भा ३०–१०३३

उपसहारात देखील असाच आत्मविश्वास आढळतो.

हे टीका तरी मराठी परी ज्ञानदाने होइल लाठी —अे भा ३१–५३७

## सहज वाग्विभव

कवित्वापेक्षा भागवताचा अर्थ सुगम करून सागण्याकडे एकनाथानी अधिक लक्ष पुरविलें आहे बुद्धीस थक्क करून सोडणाऱ्या विशाल कल्पना एकनाथी भागवतात आढळणार नाहीत परतु वेदातासारखा गहन विषय करतळीच्या आवळ्याप्रमाणें सुगम करून दाखविणारी शैली नाथभागवतात आढळते कठिण विषय सोपा करून सागणे हे येरागबाळाचें काम नव्हे. प्रतिभावतानाच ते शक्य आहे. म्हणूनच ज्ञानेश्वर आणि एकनाथ याच्या शैलीची तुलना करताना कै. भावे यानी काढलेले उद्‌गार यथार्थ वाटतात ते म्हणतात, 'आपल्या बोलाला रूप द्यावें, अतीद्रिय असलें तरी तें इद्रियाना भोगवावें ही ज्ञानेश्वराची हातोटी, व जे शब्दरूपानें दिसते आणि इद्रियानाच जाणता येतें ते सामान्य माणसानाहि वागविता येईल असें करावें ही एकनाथाची युक्ति ज्यानी ससाराची कुरवडी केली आहे, ऐहिक गोष्टीना तिलोदक दिलें आहे, अशासाठी ज्ञानेश्वरानी आपली ग्रथरचना केली आहे. पण एकनाथाचें तसें नाही तो आपले ग्रथ साधारण संसारिकाकरिता, भवभयानें गाजलेल्याकरिता, अनेक सिद्धातानीं गोंधळून गेलेल्याकरिता .. भोळ्याभाळ्याकरिता लिहितो तेव्हा ज्ञानेश्वराच्या ग्रथरचनेचें ध्येय निराळें आणि एकनाथाचें निराळे'[५९]

ज्ञानेश्वराच्या तोडीचें वाग्वैभव नाथाच्या ग्रथात आढळत नाही म्हणून एकनाथाची ग्रथ-सपदा कमी मोलाची आहे असें मानण्याचें कारण नाही एकनाथाच्या वाणीचा साधेपणा दारिद्र्यातून जन्मास आलेला नाहीं श्रीमतीची मस्ती जिरवून, वैभवाचा उन्माद पचवून सामान्य जीवनात समरस होणाऱ्या श्रीमताचा हा साधेपणा आहे एकनाथाना स्वत.च्या वाग्वैभवाचें प्रदर्शन करावयाचें नव्हतें, सामान्याच्या चित्तात असणारे चित्तत्त्व जागृत करावयाचे होते. त्याला अनुरूप अशी भाषाशैलि त्याच्या ग्रथात आढळते आत्मानदात न रमता विश्व मोहरे लावण्यासाठी त्यानी उपदेशिलेला व आचरलेला कर्मयोग त्याच्या भाषाशैलीच्या रूपाने देखील आविष्कृत झाला आहे. भागवतात झालेली पुनरुक्ति देखील नाथाच्या या भूमिकेस पोषक अशीच आहे

एकनाथाच्या थोरवीचें रहस्य त्यानीं निर्मिलेल्या ग्रथसपत्तीपेक्षा त्याच्या व्यक्तिमत्त्वात आणि ज्या परिस्थितीत भागवतधर्माचा प्रसार करून महाराष्ट्राची विस्कळित घडी त्यानीं सावरून धरली त्या कार्यात विशेष आहे त्यानी केलेल्या कार्याचे परिस्थितिनिरपेक्ष मूल्यमापन करणें एकागी ठरेल म्हणून नाथोक्त भागवतधर्माचा अभ्यास करण्यापूर्वी नाथकालीन समाजस्थितीची कल्पना डोळ्यासमोर असणे आवश्यक ठरते. ज्ञानेश्वराच्या नतर महाराष्ट्रावर सकटाची परपराच कोसळत गेली स्वराज्याचा अस्त झाला धर्माची बसत चाललेली घडी त्यामुळें विस्कळित झाली सताच्या भागवतधर्माने अठरापगड जातीत धर्माविषयीचा अभिमान आणि सच्चारित्र्याविषयींची निष्ठा जागृत झाली होती. परतु ही निष्ठा खोलवर रुजण्या पूर्वीच परचक्र आले आणि साराच डाव उधळला गेला धर्म उत्सन्न होण्याच्या मार्गास लागला समाज हतप्रभ झाला अशा आणीबाणीच्या परिस्थितींत धर्माचा ध्वज फडकत ठेवण्याचें महनीय कार्य नाथानीं केलें.



# १३. टीपा

१ **ए. भा** ३१, ४९७–९९, **रुक्मिणीस्वयवर**, १८–८३

२ हे कृष्णकथा अलौकिक महादोषाग्नि दाहक
भवरोगासी छेदक अर्धमात्रा सेवलिया
मुक्ताची तरी नित्यमुक्तता येरा ससारिया सर्वथा
नवरसे निववीन **रु स्व** १८–७६–७८

३ एकी त्या काजळ सूदल्या मुखी जावट कुकुम लाविती नाकीं
ताबुल विडिया खोविती मस्तकी कृष्णदृष्टि इद्रिया नाही ओळखी
रगी रगल्या आल्हादें भारी आपपर नाठवे तया सुदरी
–आवटे, **एकनाथगाथा**, क्र २६५

४ आवटे, **एकनाथगाथा**, क्र ३४०९

५ **कित्ता**, क्र ३८६३, ६ **कित्ता**, क्र ३९६९

७ **कित्ता**, क्र ३९७०

८ **भावार्थरामायण**, किष्किधाकाड, १–५ ते १०

९ **कित्ता**, बालकाड, १–४० ते ४३

१० **श्रीएकनाथदर्शन**, पृ १३२–१६९

११ एकनाथी रामायण केलें सप्तकाड कथन
त्यात अहिरावण महिरावण आख्यान काय म्हणो विसरले?
ऐसें न वदावे उत्तर ते तव विष्णूचा अवतार
त्यासी स्वप्नी नाही विसर महाचतुर ग्रथकर्ते
मग साक्षेपें जयरामसुतें करोनि घातलें अध्यायाते
हृदयीं धरोनि एकनाथें हें मज हातें करविले
– **भावार्थ रामायण**, युद्धकाड, ५४–३३३ ते ३३६

१२ **ए. भा.** ११–६१० ते ६२५

१३ उदाहरणार्थ, **ए. भा.** ४–२५३, ११–५९० ते ५९४,

१४ न करिता भगवद्भक्ति ब्रह्म्यासी नव्हे भगवत्प्राप्ती
इतरासी कोण गति अभजनी पावावया पै
भगवद्भाव सर्वभूतीं या नाव मुख्य माझी भक्ति
– **चतुःश्लोकी भागवत**, ५२ व ३९९

१५ चतु श्लोकी भागवतातील सद्गुरूचे माहात्म्य श्रोत्याची विनवणी, देवभक्ताचें ऐक्य, गुरुशिष्याचे प्रेम इत्यादि वर्णने ज्ञानेश्वरींत आलेल्या वर्णनासारखीं आहेत चतु श्लोकी भागवतातील ५८५ ते ५९५ या ओव्या ज्ञानेश्वरीच्या ७ व्या अध्यायातील १३२ व्या ओवीनंतर आलेल्या ओव्याशी ताडून पाहण्या सारख्या आहेत ६३० ते ३५ या ओव्यात नाथानी केलेलें परमेश्वराचे वर्णन ज्ञानेश्वरीच्या ९ व्या अध्यायातील १५५ ते १६२ या ओव्याना अधिक जवळचें वाटतें

१६ ला रा पागारकर, **मराठी वाङमयाचा इतिहास**, पृ २७९

१७ **स्वात्मसुख**, ओवी २८, १८ **कित्ता**, ओवी ९२

१९ **हस्तामलक**, ओवी ३५४, २० **कित्ता**, ३६७

२१ **कित्ता**, ५७६

२२ अनेक कविकृत **भक्तिपरमार्थपर कविता**, (काव्यसग्रहमाला) पृ १२२–३५

२३ **हस्तामलक**, ओवी २९५

२४ **स्वात्मसुख**, ओवी ५०९

२५ उदाहरणार्थ **रुक्मिणीस्वयवर**, १–१२ ते १४

२६ भरूनी रजतमाचें औषध करूनी अग्नियत्र सनद्ध
कृष्णापुढे अतिविनोद एक प्रबुद्ध दाविती
अग्नि लावुनि ठायी ठायीं ममता जाळिली हवाई
अतिलोभाच्या चिचुद्री अग्नि लावुनि टाकिती दूरी
देउनी उपशम अनळा जाळिती क्रोधाचा भुइनळा
– **रुक्मिणीस्वयवर**, १५–११७–२१

२७ **रुक्मिणीस्वयवर**, १८–२७

२८ पागारकर ल रा **एकनाथचरित्र**, पृ १४९–५१

२९, पागारकर ल. रा **मराठीवाङमयाचा इतिहास**, खड २ रा, पृ ४२३,

भावे विनोबा, **एकनाथाचीं भजने** प्रस्तावना, पृ ६
**श्रीएकनाथदर्शन,** पृ १७२–३

३० आवटे, **एकनाथमहाराजाचा गाथा,** क्र ३६८६ ते ९०

३१ **किता,** क्र ३६९१, ३२ **किता,** ३६९९–३७०६

३३ **किता,** क्र ३७०७ ते ९

३४ **किता,** क्र ३७३१–३५· ३५ **किता,** ३७२९–३०

३६ **किता,** क्र ३९१४, ३७ **किता,** क्र ३९१५

३८ **किता,** क्र ३७७७–८० ३९ **किता,** क्र २४५,

४० **किता,** क्र ३७८४–८५, ४१ **किता,** क्र ३७८६–७

४२ **किता,** क्र १८१०, १८११, १८०४, १८५३

४३ **किता,** क्र १७९०–९१, १७८८, १७३७, १७५२, १७७० इ

४४ **किता,** क्र १८८३

४५ **किता,** क्र १७६६

४६ **किता,** क्र १६३७ ४७ **किता,** क्र १६५७

४८ **किता,** क्र १५९३ ४९ **किता,** क्र १५५८

५० **किता,** क्र १५९० 'तीर्थी कुर्वन्ति तीर्थानि' या नारदभक्तिसूत्रातील भक्तवर्णनाची आठवण या ठिकाणी सहज होईल

५१ **किता,** क्र ३२६१ ५२ **किता,** क्र २५६६

५३ **एकनाथी भागवत,** ३०–४६६

५४ **ए भा ,** १–१२१, १२२, १२७

५५ **किता,** ३१–४९४–९८. ५६ **किता,** १३–७६९–७६

५७ **किता,** १४–१८–१९.

५८ **ए. भा.,** २७–३४६–४७,

५९. भावे वि ल **महाराष्ट्र सारस्वत,** (नवी आवृत्ती) पृ २७५–६.

# १४. राजकारण व समाजकारण

विकेंद्रित हिंदु सत्ता–मुसलमानाची असहिष्णु दृष्टि–विजयनगर साम्राज्याची कामगिरी–इस्लामचे दुहेरी आक्रमण–उध्वस्त समाजजीवन–कलियुगाचा प्रभाव–पुढाऱ्याचा अध पात–क्षूद्रदेवताचा बडीवार–नाथाचा उपाय भागवतधर्म

एकनाथानीं केलेल्या कार्याचें महत्त्व यथार्थरीतीने लक्षात येण्यासाठी व त्यानीं पुरस्कारिलेल्या भागवतधर्माच्या परिस्थिति–सापेक्षतेचें आकलन होण्याकरिता नाथकालीन राजकीय आणि सामाजिक परिस्थितीचा आढावा घेणें अगत्याचें आहे ज्ञानेश्वरोत्तरकालीन महाराष्ट्राच्या आणि त्या पूर्वीच्या काळातील उत्तरभारताच्या जीवनावर दूरगामी परिणाम करणारी जी घटना भारतात घडली होती तिनें सारा भारतीय समाज आमूलाग्र ढवळून निघाला होता इस्लामी सत्ता प्रथम उत्तरभारतात दृढमूल झाली आणि त्यानतर महाराष्ट्रावर ज्ञानेश्वरोत्तर काळात मुसलमानानीं आक्रमण केलें परकीयाच्या आक्रमणाची झळ भारतास यापूर्वी अनेकदा लागली होती परंतु या आक्रमणाचे परिणाम राजकीय क्षेत्राच्या पलीकडे फारसे जाणवले नाहीत भारतीय समाजजीवनावर त्याचा फारसा परिणाम झाला नाहीं. इस्लामी आक्रमण मात्र दुहेरी झालें: राजकीय आणि धार्मिक किंबहुना असेंहि म्हणता येईल की, धार्मिक आक्रमणासाठीच राजकीय सत्तेचा विस्तार मुसलमानानीं केला.

## विकेंद्रित हिंदुसत्ता

भारतीय राजामध्यें इस्लामपूर्वकाळात सत्तातराचे जे प्रकार घडले त्यांचा तर समाजजीवनावर मुळींच परिणाम झाला नाहीं एका घराण्याचे

राज्य जाऊन दुसरें घराणें सत्ताधीश झालें तरी लोकाचा आणि राजाचा धर्म एकच असल्यामुळे धार्मिक व सामाजिक क्षेत्रावर सत्तांतराचा प्रभाव पडू शकला नाही जैन, बौद्ध किंवा अन्य पंथाचे अनुयायी सत्ताधारी झाले तरी इतर पंथीयांविषयी कमालीची असहिष्णु वृत्ति त्यांनी क्वचितच दर्शविली आपापल्या पंथांना त्यांनी थोडे फार उत्तेजन दिले असेल तेवढेंच त्यामुळें सर्वसाधारण लोकजीवन आणि धर्मव्यवस्था यावर सत्तांतराचा कोणताच परिणाम होत नसे मुसलमानांच्या पूर्वी जे परकीय आक्रमक आले त्यांच्याहि राजवटीनें आमची समाजव्यवस्था परिणामित झाली नाही कालांतराने हे आक्रमक सांस्कृतिक दृष्ट्या भारतीय जीवनाशी समरस झाले मुसलमानांच्या बाबतींत मात्र तसें घडले नाही अनेक परकीयांना आपल्या पोटात समावून घेणारी भारतीय संस्कृति इस्लामी संस्कृतीस पचवू शकली नाहीं. भारतीय संस्कृतीच्या प्रवाहाशीं एकरूप न होता ही संस्कृति पृथक् राहिली आपली पृथगात्मता कायम ठेवण्याचा आग्रहपूर्वक प्रयत्न मुसलमानानीं केला आपल्या धर्माचा रंग भारतभर पसरविण्याची त्यांची महत्त्वकांक्षा होती व त्यासाठी राजकीय सत्तेचा उपयोगहि त्यांनीं केला.[1] त्यामुळे भारताचे राजकीय स्वातंत्र्य आणि भारतीय समाज–व्यवस्था व धर्मकारण यांना इस्लामी सत्ता विघातक ठरली

हिंदु राजांची सत्ता बऱ्याच अंशानें विकेंद्रित स्वरूपाची होती राज्यकारभाराचा प्राथमिक घटक ग्रामसंस्था होती स्थानिक स्वरूपाचा कारभार ग्रामसंस्था व ग्रामाधिकारी यांच्या सल्ल्यानें चाले हिंदु राजाच्या मंत्रिमंडळात असलेला धर्मसचीव धार्मिक क्षेत्रात राजकीय सत्तेचें मार्गदर्शन करीत असे राजाचें लक्ष दैनंदिन कारभारापेक्षा आपल्या पराक्रमास अनुकूल क्षेत्र धुंडण्याकडे अधिक केंद्रित झालेलें असे सामाजिक व धार्मिक क्षेत्रात राजाची ढवळाढवळ सहसा होत नसे त्यामुळें राजा बदलला तरी समाजव्यवस्थेत बदल होत नसे[2] कांहीं थोडे अपवाद वगळले तर हिंदु राजे धर्मांच्या बाबतीत सहिष्णु वृत्तीचे होते परधर्मांचेंहि संरक्षण करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे अशी त्यांची निष्ठा होती आपल्या राज्यातील मुसलमानांच्या समाजव्यवस्थेच्या देखरेखीसाठीं राष्ट्रकूटांनीं मुसलमान धर्माधिकाऱ्याची नेमणूक केली होती या एका गोष्टीवरून

भारतीय राजाच्या परधर्मविषयक दृष्टिकोनाची कल्पना येऊ शकेल [३]

## मुसलमानांची असहिष्णु दृष्टि

इस्लामी राजाच्या संपर्कानें ही परिस्थिति पार पालटली राजधर्म आणि प्रजेचा धर्म यात एकरूपता तर राहिली नाहींच उलट, पूर्वीच्या राजाची सहिष्णु वृत्ति देखील कांहीं अपवाद वगळले तर कोठेंच दिसून येत नाहीं. "इस्लामच्या प्रकाशाचा प्रसार करणें" हे या राजाचे ध्येय होतें [४] मुसलमान प्रजा आणि तदितर प्रजा असा पंक्तिप्रपंच बहुतेक राजानी केला आहे मुसलमानेतरावर तरवार चालविणें हे धर्मकृत्य मानलें जात असे. धर्मसहिष्णु म्हणून गाजलेला अकबरासारखा बादशहा देखील प्रारंभिच्या काळात या दोषापासून अलिप्त राहिला नाही [५] सोळाव्या शतकापर्यंत भारतावर राज्य करणाऱ्या सर्वच राज्यकर्त्यांचें धोरण धार्मिक बाबतींत बरेंच कडवें होतें अकबराच्या पूर्वी तीनशें वर्षे दिल्लीच्या तख्ता-वरून हुकुमत गाजविणाऱ्या पाच इस्लामी घराण्यानी हेच धोरण चाल-विलें अकबराच्या राजवटीत देखील इ स १५६२ नतर या धोरणात बदल झाला तत्पूर्वी गाजीपदासाठी मुसलमानेतराना ठार मारणें, उदार-मतवादी मुसलमानाना देखील कठस्नान घालणें या सारखे प्रकार अकबरा-च्या राजवटींत चालू होते [६] आपल्या सल्लागारांचें नियत्रण दूर सारून अकबर स्वतत्रपणें राज्य चालवू लागला तेंव्हा मात्र या धोरणास पायबद बसला. म्हणूनच '१५७८ पर्यंत अकबर सत्याचा शोधक होता इ स १५८४-८५ च्या सुमारास मात्र धर्मांचें नावनिशाण त्याचे ठिकाणी शिल्लक राहिलें नाही.' अशी तक्रार मुसलमान इतिहासकारानी केली आहे [७]

हिंदु आणि मुसलमान याना दिलेले सारखे हक्क हे या तक्रारीचे मुख्य कारण होतें अकबराच्या पूर्वी आणि नतर देखील अशा प्रकारची समानता अस्तित्वात नव्हती शासित प्रजा आणि शासक प्रजा असा पक्षपात मुसल-मान राजानीं केला असून त्याचें दृश्य चिन्ह म्हणून हिंदूकडून कर वसूल केला जात असे औरंगजेबानेंच अशा प्रकारचा कर लादला असे नसून पूर्वीच्या बादशहानी देखील जिझिया कर बसविला होता "या कराचा मुख्य उद्देश हिंदूचा तेजोभग करणें हा होता.. हिंदूंना अवमानित करण्यासाठी

व मुसलमानाचा मान वाढविण्यासाठी परमेश्वरानेच हा कर बसविला आहे'[८] अशी इस्लामी धर्मशास्त्रकाराची श्रद्धा होती ९ हिजरीत खुद्द पैगंबरानी आपल्या मुसलमानेतर प्रजेवर हा कर बसविला होता धर्माचें एक अग म्हणून तो पुढें चालू राहिला माडलिक राजाकडून घेण्यात येणाऱ्या खडर्णात या कराचा समावेश होत असे मुसलमानी राजाच्या प्रत्यक्ष अमलाखाली असलेल्या प्रजेला मात्र हा कर दरडोई द्यावा लागे

जिझिया कराखेरीज यात्रादिकाचे प्रसगीहि हिंदूना यात्राकर द्यावा लागे हिंदूच्या सार्वजनिक धर्मोत्सवाना कायद्याने बदी होती. नवीन देवळे बाधणे किंवा जीर्णोद्धार करणे हे बेकायदा होतें हिंदूची वेषभूषा मुसलमानासारखी नसावी यावर राज्यकर्त्याचा कटाक्ष असे खिलजी अल्लाउद्दीनने तर घोड्यावर व पालखीत बसण्यासहि हिंदूना बदी केली होती हिंदूना बाटविण्याचे प्रकार तर सर्वच इस्लामी सत्ताधाऱ्याच्या राज्यात चालू होते आपल्या प्रजेच्या धर्मव्यवस्थेत ढवळाढवळ न करण्याचे हिदुराजाचे धोरण आणि प्रजेचा धर्म नेस्तनाबूद करून आपला धर्म प्रजेवर लादण्याची मुसलमानी बादशहाची वृत्ती यामुळें दोन्ही राजवटीचे विरोधी परिणाम भारतीय समाजजीवनावर झाले

एकनाथाच्या पूर्वी कित्येक शतकें उत्तरभारतात आणि सुमारे तीन शतकें महाराष्ट्रात हिंदुधर्म केवळ अनाश्रितच नव्हता तर रात्रदिवस आणि पावलोपावलीं युद्धप्रसगास तोंड देण्याची पाळी त्यावर आली होती तेराव्या शतकाचे शेवटी इस्लामची वक्रदृष्टि दक्षिणभारताकडे वळली त्यापूर्वी पूर्व आणि पश्चिम किनाऱ्यावर व्यापाराच्या निमित्ताने अरबमुसलमानाची येजा सुरु होती युद्धाच्या दृष्टीनें घोड्यास महत्त्वाचें स्थान असल्यामुळे घोड्याचा व्यापार करणाऱ्या अरब-मुसलमानाना दाक्षिणात्य राजानी बऱ्याच सवलतीहि दिल्या होत्या हे व्यापारी भारतीय जीवनाशी विशिष्ट मर्यादेत समरसहि झाले होते हिदूची भाषा बोलणारे व त्याचा वेष वापरणारे मुसलमान दक्षिणेच्या स्वारीच्यावेळी मलिकाफुरास आढळले वीरबल्लाळाच्या फौजेत वीसहजार मुसलमान असल्याचे तत्कालीन मुसलमान इतिहसकार सागतात [९]

## विजयनगर-साम्राज्याची कामगिरी

दक्षिणेच्या राजकीय व सामाजिक जीवनावर प्रतिकूल परिणाम घडविणाऱ्या मुसलमानाची सर्व प्रथम आवक इ स १२९६ साली झालेल्या खिलजी अल्लाउद्दीनच्या आक्रमणानें झाली महाराष्ट्राच्या स्वातंत्र्यावर या स्वारीने केलेला आघात हिंदुधर्माच्या वर्मावरच झाला या स्वारीनतर झालेल्या आक्रमणात दक्षिणेतील हिंदुराज्ये एकानतर एक मुसलमानाच्या आधीन झाली याचे कारण दाक्षिणात्य राजाच्या मानानें इस्लामी सैन्य प्रबळ होतें हे नसून यादव, होयसाळ, पाडय व शेवटच्या घटका मोजित असलेलें चोलाचें साम्राज्य ही आपसात होणाऱ्या भाडणामुळें पोखरून निघालीं होतीं हे होय एक प्रकारच्या अदाधुदीच्या आणि अराजकाच्या परिस्थितीत मूसलमानाचें दक्षिणेवर आक्रमण झाल्याने ते यशस्वी झालें [१०]

मुसलमान इतिहासकार लिहितात तितका सहज विजय मात्र इस्लामी सैन्याला मिळाला नसावा परतु इ स १३१३ मध्ये देवगिरीचे राज्य जमीनदोस्त करून त्याठिकाणी मलिकाफुरने बाधलेली मशीद म्हणजे दक्षिणेंतील इस्लामी सत्तेचा पायाच होता असे मात्र म्हणता येईल तघलकाच्या काळात दक्षिणेवरील इस्लामी पकड बरीच घट्ट झाली. परतु लवकरच ती सैलहि झाली १३३५ पासून या सत्तेविरुद्ध बडास प्रारभ झाला हिंदु सामत आणि मुसलमान सुभेदार या बडात सामील झाले• या बडातून महाराष्ट्रात बहमनी राजवट उदयास आली आणि महाराष्ट्रा नजीक विजयनगरच्या साम्राज्याची मुहूर्तमेढ रोवली गेली

विजयनगरचे राज्य दाक्षिणात्य धर्मकारण व राजकारण याच्या दृष्टीने बरेच महत्त्वाचें ठरले हिंदुधर्माची स्थापना हे या साम्राज्याचे ध्येय असल्यामुळे मुसलमानी सत्तेशीं त्यास सतत सामना द्यावा लागला [११] धर्मपीठ आणि राजकारण याचा प्रभावी सगम या राज्यानें घडवून आणल्यामुळें दक्षिणेतील मुसलमान राजाना देखील आपले धर्मविषयक धोरण सौम्य ठेवावें लागलें [१२] शिवाय, दिल्ली विरुद्ध दक्षिण अशी तेढ मुसलमान राजातहि असल्यामुळे उत्तरेतील सत्ताधाऱ्याइतके धर्माच्या बाबतीत कडवें धोरण ठेवणे दाक्षिणेंतील मुसलमान राजाना परवडणारें नव्हते

बऱ्याच हिंदु सरदाराना मुसलमानी अमदानींत वाव मिळाला तो याच हेतूनें. तथापि, काजी–मुल्ला आणि पीर-अवलिया याच्या मार्फत होणारा हिंदुधर्माचा छळ थांबला होता असे मात्र नव्हे हिंदु सरदाराच्या पराक्रमास इस्लामी दरबारात वाव मिळाला तो हिंदुत्वाच्या रक्षणासाठी नव्हे. मुसलमानी सत्तेचें सरक्षण करण्याकरिता या पराक्रमाचा उपयोग करून घेण्यात आला हे लक्षात ठेवलें पाहिजे

## इस्लामचें दुहेरी आक्रमण

याच इस्लामी सत्तेच्या प्रत्यक्ष आश्रयाने सुफी साधुसतानीं हिंदु धर्माचा विध्वस चालविला होता सुफीना राजाश्रय होता याची साक्ष राजधानीच्या शहराभोंवती असलेली अनेक सुफी साधूची थडगी आजहि देतात म्हणजे राजाच्या धोरणात दिसून येणारा असहिष्णुतेचा अभाव हिंदुधर्माच्या दृष्टीने उपकारक न ठरता सुफीच्या आक्रमणास उत्तेजन देणारा ठरला ही गोष्ट विसरता येत नाहीं एकनाथापासून तुकारामापर्यंत हिंदु पिरास व दावामलकास भजत असल्याची तक्रार आपल्या सतानी केली आहे त्या वरून सुफीच्या धर्मसैन्याचें आक्रमण किती परिणामकारक ठरलें होतें याची कल्पना करता येईल [१३]

अशा बिकट परिस्थितीत धर्मसघटना करण्याचे अवघड कार्य ज्ञानेश्वरोत्तर कालीन सताना करावयाचे होते शिवछत्रपतीनी सस्थापिलेल्या स्वराज्याच्या रूपानें सताच्या प्रयत्नास मूर्तस्वरूप आलें असलें तरी ही मूर्ति घडविणाऱ्या शिल्पकार सताना अनेक सकटास तोंड द्यावें लागलें. मूर्तिभजकाच्या आघातानी ज्ञानेश्वरानीं घडविलेलें भागवतधर्माचे शिल्प छिन्नविच्छिन्न झालें होते एकनाथाचा अवतार झाला नसता तर हे शिल्प स्मृतिशेष देखील राहिलें नसतें एकनाथाची रचना सामान्य जनतेस उद्देशून झाली याचे कारण धर्मास समाजव्यापी स्वरूप देणे हे त्याचें ध्येय होतें जनशक्ति जागृत करून धर्माच्या पाठीशीं तिचे सामर्थ्य उभें करणे हे त्याचें उद्दिष्ट होते व्यक्तीच्या उद्धाराबरोबरच समाजाच्या उद्धारास एकनाथी भागवतधर्मात आलेलें महत्त्व भागवतधर्माच्या मूळ स्फूर्त प्रेरणेप्रमाणेंच तत्कालीन राजकीय व सामाजिक परिस्थितीतून परिणत

झालें होते

दक्षिणेतील इस्लामी आक्रमणाच्या प्रारभापासून एकनाथाच्या काला-पर्यंत सुमारे तीनशे वर्षांचा कालावधि लोटला होता या तीनशे वर्षांत दक्षिणेंतील इस्लामी सत्तेच्या तीन अवस्था दिसून येतात अल्लाउद्दीनच्या स्वारीने पहिली अवस्था सुरु होते. मिळेल तेवढी लूट घ्यावयाची, राज्य-कारभाराची प्रत्यक्ष जबाबदारी मात्र टाळावयाची अपरिहार्य होईल तेव्हाच एखादा मुलूख आपल्या राज्यास जोडावयाचा नसता लूट, खडणी, देवळाचे उध्वस्तीकरण यासारख्या ' पुण्य कृत्या ' वर समाधान मानावयाचें हे पहिल्या अवस्थेतील या सत्तेचें धोरण होतें

तघलकाच्या राजवटीने दुसऱ्या अवस्थेस आरभ होतो राज्यविस्तार हे तघलकाच्या धोरणाचें सूत्र होतें महम्मद तघलकानें दिल्लीहून देवगिरीस केलेले राजधानीचें स्थलातर याच धोरणाचें निदर्शक होतें आपल्या वतीनें राज्यकारभार चालविण्यासाठी ठिकठिकाणी मुसलमान सरदाराच्या नेमणूका त्यानें केल्या. दक्षिणेतील बराच मोठा भाग दिल्लीच्या तख्ताच्या आधीन झाल्याचे दृश्य काही काळ दिसले परतु मुसलमान सरदारानी बड केल्यामुळें या सत्तेला तडे गेले

तिसरी आवस्था दिल्लीच्या तख्ताविरुद्ध सुरु झालेल्या बडाची मुसलमान सरदाराबरोबरच हिंदु राजे व त्याचे अभिमानी यानींहि या बडाळीचा उपयोग करून घेतला या अवस्थेत महाराष्ट्रात बहमनी राज्य व महाराष्ट्राशेजारी विजयनगराचे साम्राज्य अस्तित्वात आलें दिल्लीपतीच्या आक्रमणाची टागती तलवार असल्यामुळें मुसलमान राजानी धर्मप्रसाराच्या पूर्वीच्या तत्रात थोडा बदल केला. या राजाच्या आश्रयाने सूफीची धर्म-सेना बऱ्यावाईट मार्गाने इस्लामचा प्रसार करण्याचें कार्य करीत असे

## उध्वस्त समाजजीवन

या तिन्ही अवस्थांतून हिंदुसमाजाचे धार्मिक व सामाजिक जीवन मात्र उध्वस्त झालें राजसत्तेने धर्मात केलेला हस्तक्षेप प्रथमच घडत असल्यानें धर्मरक्षणाचा ध्येयवाद ही दाक्षिणात्य मुसलमानेतराची प्रबळ प्रेरणा होती. ही प्रेरणा द्विविध रूपात आविष्कृत झाली. राजसत्तेच्या

बळावर धर्मरक्षण करण्याचे ध्येय विजयनगर साम्राज्यापुढे होतें लोकशक्ती-च्या सामर्थ्यावर धर्म जागता ठेवण्याची दृष्टि एकनाथानीं पुरस्कारिलेल्या भागवतधर्मांची होती व्यक्ति आणि समाज याच्या जीवनाचा सर्वांगीण विकास नाथाच्या भागवतधर्मास अभिप्रेत होता

तुर्कांच्या आक्रमणामुळे महाराष्ट्राचे जीवन किती उध्वस्त झालें होतें याची कल्पना महानुभावीय ग्रथातूनहि येते पढरीच्या विठोबानेहि बहुधा आत्मरक्षणार्थ विजयनगरचा आश्रय केला होता एकनाथाच्या प्रपितामहानी विजयनगराहून विठ्ठलमूर्ति परत आणली ही आख्यायिका असली तरी बरीच सूचक आहे विठ्ठलाचे सरक्षण होऊ शकेल असा विश्वास भक्ताना वाटत नव्हता त्या काळात विठोबाचें स्थलातर घडलें असावें हा विश्वास वाटू लागला तेव्हा विठ्ठलानें पढरीस वसती केली व परिस्थितीच्या दड-पणानें खडित झालेली वारी देखील पुन्हा सुरु झाली वारी चालू ठेवूनच केवळ धर्मरक्षण व समाजोद्धार होणें शक्य नव्हते परिस्थितीच्या पार्श्व-भूमीवर भक्कम पायावर आधारलेल्या नव्या समाजधर्माची त्या कालात अधिक आवश्यकता होती एकनाथानी पुरस्कारिलेल्या भागवतधर्मानें समाजाची ही निकड दूर केली धर्मरक्षणार्थ नव्या तेजाचा व समाजधर्मांचा प्रसार नाथानी आपल्या आदर्शानें व वाणीनें केला

## कलियुगाचा प्रभाव

ज्या भूमींत नाथाना आपल्या आदर्शांचे बीजारोपण करावयाचें होते त्या भूमीचे उपरोक्त राजकीय आघात-प्रत्याघातामुळे 'सत्त्वहरण' झालें होते नाथाच्या वाङ्मयात आढळून येणाऱ्या समाजस्थितीच्या चित्रणावरून त्याची कल्पना करता येते समाजाच्या सर्व थराचे एवढें ठसठशीत चित्र प्राचीन सतवाङ्मयात क्वचित्‌च आढळते

कलियुगासबधीची भाकितें पौराणिक वाङ्मयात बरीच आढळतात धर्मांचा लोप आणि अधर्मांचा प्रभाव हे कलियुगाचें महत्त्वाचे लक्षण या कालात प्रत्यक्ष वावरत होते पौराणिक भविष्यकाल या दृष्टीनें नाथ-कालीन प्रत्यक्ष वर्तमान होता म्हणूनच या युगाच्या प्रभावाचे वर्णन करताना नाथानीं स्वकालीन समाजस्थिति चित्रित केली आहे धर्मांच्या

नावाखाली अधर्माचें राज्य पसरले आहे, वेदशास्त्राची चाड राहिली नाही; स्मृति-पुराणें कोणाला कळत सुद्धा नाहीत, त्यामुळें ज्ञान, दान, जप, तप या साधनाचा लोप झाला आहे, 'आपुलाला धर्म' कोणी आचरीत नाही, कर्माकर्मांचा भेद नष्ट झाला आहे, वरिष्ठ वर्णानें आपलें अध्ययन सोडलें आहे, पोटभरण्यासाठी विद्येचा उपयोग होऊ लागला आहे, नीचाच्या सेवेला प्रतिष्ठा आली आहे, हीन कुलाना थोर गणले जात आहे, अज्ञान वाढत आहे, भाविकता लोप पावत आहे [१४] म्लेंच्छाच्या अत्याचाराने परिस्थिति अधिकच बिकट झाली आहे :

पुढे कलीचा प्रथम चरण दैवतें राहिली लपून
तीर्थें साडुनि महिमान अठरा वर्ण एक झाले
म्लेच्छे गाजिलें देवभक्ता महिमा उच्छेदिला सर्वथा
न चले जपतप तत्त्वता एकरूप सर्व झाले [१५]

## पुढाऱ्यांचा अधःपात

या बिकट परिस्थितींतून मार्ग काढण्यासाठी पुढाऱ्यानी प्रयत्न करावयाचे पण त्याचाच अध पात झालेला समाजाचें मार्गदर्शन ज्यानीं करावयाचें त्यानींच सोज्वल धर्म सोडला व खोटा व उफराटा धर्म धरला धर्म ही निष्ठा न राहता तो या वर्गाचा धदा होऊन बसला द्रव्यार्जन झालें कीं, 'सेखी धर्मासी आगोठा दाविती: द्रव्य वेचिती उदरार्थ' अशी त्याची अवस्था झाली आहे श्रीमत यजमान आले की या धर्ममार्तंडाच्या अग्निकुडातून धूर निघावयाचा! इतर वेळी अग्निकुड म्हणजे उंदिराचें क्रीडास्थान![१६] चहू वर्णामध्ये श्रेष्ठ असलेल्याची ही गत!

नाम बेचकर दाम लेते करनी उसकी हराम है[१७]

ब्राह्मण्य जातिकुळावर अवलबून नाहीच मुळीं [१८] पूर्णब्रह्म जाणतो तो ब्राह्मण [१९] परतु प्रत्यक्ष प्रकार पहावा तो उलटाच ज्ञानाचा आणि ब्राह्मणाचा अर्थाअर्थी सबधच राहिला नाहीं वेद पाठ केले, वेदात कठगत झाला, पुराणे जिव्हाग्री वसली, पण ज्ञानमात्र आचरणात उतरलें नाही कथेकरी आणि पुजारीच या परीचे आहेत असें नाही शिखासूत्राचा आणि संसाराचा त्याग करणारे महंत आणि सन्यासी देखील याच मालिकेतलें सर्वत्र नारायण

भरला आहे हे त्याना कळत नाही 'नारायण' 'नारायण' असा घोष करीत ते भीक्षा मागतात, भिक्षेचा सग्रह करतात आणि कामक्रोधाच्या आहारीं जातात अशाचा सन्यास म्हणजे 'व्यर्थ नाश कावेचा!'

गोसावी त्यातलेच! ते अगाला राख फासतात शिष्य गोळा करतात, भाग-घोटा पितात व महतीचा डागोरा पिटतात स्वत स गुरु म्हणविणारे तर याहून घातक आपण ज्ञानी असल्याचें अवडबर ते उभारतात व पाठ असले ल्या मत्राचा सौदा करतात स्वत लाच ज्ञान झालेले नसतें इतराना त्यानी ज्ञानदान काय करावें? कोरडा गुरु व शिष्यहि तसाच. दोघेंहि ढोंगाच्या आहारीं जातात व ज्ञानाऐवजी ढोंगाचा प्रपच मात्र विस्तारतो[२०] मानभावावर नाथाचा विशेष कटाक्ष आहे.[२१] जैन, जगम आणि फकीर याच्याहि दांभिकतेवर नाथानी खरमरीत टीका केली आहे

परमात्मा जवळ असूनाहि ढोंगी लोकानी मात्र त्यास दूर सारलें आहे. आत्माराम सबाह्य असतानाहि योगी उगीचच शिणतात व मीमामक कर्मठ-वृत्तीच्या आहारी जातात शिव-विष्णूत भेदभाव करणारे वैष्णव आत्म-ज्ञानास पारखे होतात शाक्त, क्षपणिक, दार्शनिक, काजी, मुलाना आणि सैद याना देखील धर्मांचे वर्म मुळींच सापडलें नाही :

> परमात्मा देही न पडेचि ठायीं पश्चिमे मारिती बोंबा
> आत्मज्ञानेंवीण न तुटेचि बधन व्यर्थ तनु विटबिती[२२]

## क्षूद्र देवतांचा बडीवार

समाजातील मार्गदर्शकाचा वर्ग चुकीच्या मार्गानें जात असल्यामुळें ज्ञान दुर्मीळ झालें आणि अज्ञानाचा सुकाळ झाला खरे देव मागे पडले आणि खोट्या देवाचा बडीवार माजला देव फार झाले नारळ-शेंदुराचा भडीमार होऊं लागला देवच जेथें लटका तेथें भक्त कोणत्या प्रकारचा असणार? हे देव सात धान्याचे कडबोळे मागतात, तेल, काजळ, कुकु, मलिदा आदि त्याना हवे असतात असे हे फजीतखोर देव भक्ताचा उद्धार काय करणार?[२३] खरा देव विठोबा सोडला आणि समाज येसाई—मेसा-ईची पूजा करू लागला. अमगल भक्षिणारे हे देव मंगल देणार काय? देव

जीवाचा पालक पण, हे फजीतखोर देव बळी मागतात जिवाचा या अधर्माने धर्म नासला व वेडाचार बळावला :

एकाजनार्दनी ऐसिया देवा जो पूजी गाढवासमान होय[२४]

क्षुद्र देवता बधमोचक नाहीत विठ्ठल हाच बधातून मुक्ति देणारा असून त्यालाच भजावे असा या सदर्भात नाथाचा उपदेश आहे

## नाथांचा उपाय : भागवतधर्म

एकनाथाच्या वाङमयात आढळून येणारे तत्कालीन समाजाचे चित्र थोडक्यात वरीलप्रमाणें आहे खोटा धर्म समाजात किती प्रतिष्ठित झाला होता याची कल्पना त्यावरून येईल पारतन्त्र्याच्या काळात दुर्गुणाची वाढ झपाट्यानें होत असते आणि सद्गुणाचा क्षयहि तितक्याच वेगानें घडत असतो तीनशें वर्षाच्या पारतन्त्र्याने समाजातील सद्गुणाचे कोळसे झाले होते. राज्यकर्त्यांनी या परागतीस प्रत्यक्षाप्रत्यक्ष हातभार लावलाच होता मानवजातीच्या उद्धारासाठी तळमळणाऱ्या एकनाथाना स्वधर्मीयाप्रमाणेंच परधर्मीयाची अधोगति देखील कष्टप्रद वाटत होती म्हणून परधर्मीयानी वाढाविलेल्या दाभिकपणावर देखील त्यानी टीका केली मुसलमानानी देखील आपला खरा धर्म सोडला अशी त्याची तक्रार आहे खरा धर्म भेदभाव करीत नाहीं असे हिंदु–तुर्क सवादातील त्याचें प्रतिपादन आहे. खऱ्या धर्मास धर्मपरिवर्तनाच्या चळवळी चालविण्याची गरज नसते. अशा चळवळीनी कोणाचेंच हित न होता सपूर्ण समाजाची अधोगति मात्र होते :

धेडामागा मान्यता झाल्या उत्तम योनी भिकेस लागल्या [२५]

अस्पृश्यवर्गात चालविलेल्या बाटवाबाटवीस उद्देशून नाथानी वरील उद्गार काढले आहेत हे उघड आहे हा वर्ग धर्मातराचे पहिले भक्ष्य बनत आला आहे हे अर्वाचीन काळातील इतिहासहि सागतो धर्मातराने राजमान्य बनलेला वर्ग अधिकारबळावर समाजास गाजतो व आपल्या धर्माच्या व समाजाच्या विनाशास कारणीभूत होतो असे नाथ सागतात

हिंदु करिता खुदा चुकला त्याहून थोर तुमच्या अकला

असा सवाल करून नाथानीं धर्मातराचें वैयर्थ्य हिंदु-तुर्क सवादांत पटवून दिलें आहे

एवढ्या बिकट परिस्थितीतून वाट काटण्याची जबाबदारी एकनाथानी उचलली होती खऱ्या धर्माविषयीचे अज्ञान हेच सर्व अनर्थाचे मूळ आहे असा निर्णयहि त्याच्या बुद्धीनें घेतला होता मानवाची व मानवी समाजाची सर्वांगीण उन्नति करणारा धर्म त्यानी जागविला व सुलभरूपात लोकाना उपदेशिला या धर्माला सुलभ रूप देताना त्याची मूलप्रेरणा ते विसरले नाहीत. स्वत च्या आरचरणानें आणि वाङमयाने ही प्रेरणा त्यानी अधिक उज्वल स्वरूपात माडली

हा खरा धर्म म्हणजेच श्रीएकनाथप्रणीत भागवतधर्म 

## १४. टीपा

१ "हिंदु सस्कृतिच्या ठिकाणी इतर सरस्कृतीना सामावून घेण्याची आश्चर्यकारक शक्ति आहे भूतकालात तिने असख्य परकीयाना आपल्या मस्कृतीशी एकरूप केले आहे भारतीय सरस्कृतीच्या विशाल प्रवाहात आज त्याचे निराळेंपण लुप्त झाले आहे परतु मुसलमानाचे मात्र तसे झाले नाही त्यानी निर्धाराने आपले स्वतत्र अस्तित्व टिकविले आणि धर्माच्या बाबतीत कोणतीहि तडजोड स्वीकारली नाही –" Habilullah, *The foundation of Muslim Rule in India*, P 49

२ Altekar A S. *Rastrakutas and their times* P 188, 199, 157, 169

३ *Ibid* P 187

४ Venkatramanaih N *The Early Muslim Expansion in South India*, P 49

५ Shriram Sharma, *Religious Policy of Moghals*, P 15

६. Ibid, P. 15, ७. Ibid, P. 49.

८ Quoted in *Religious Policy of Moghals*, P 62

९ Iyangar S Krishnaswami, *South India and Her Mohammadan Invaders*, P 72

१० Venkat Ramanaih N., *The Early Muslim Expansion in South India*, P 11–12

११ Pannikar K. M. *A Survey of Indian History* P 192

१२ Sardesai G S , *New History of Marathas* P 28–29
'हे राज्य धर्मरक्षणार्थ स्थापले आहे' असा एका शिलालेखात उल्लेख असल्याचे श्री शर्मा यानी एका ग्रथात लिहिले आहे
*The Making of Modern India*, P 193

१३ आवटे, **एकनाथमहाराजाचा गाथा,** क्र २८९२

१४ **कित्ता,** क्र २५७४ ते २५८३

१५ **कित्ता,** क्र ३९१५

१६ **कित्ता,** क्र ३९६९

१७ **कित्ता,** ३९६२

१८ **कित्ता,** क्र २८१९,

१९ **कित्ता,** क्र २८१६

२० **कित्ता,** क्र २६०९ ते २६९७

२१ **कित्ता,** क्र २६६६, २६६७, ३९६२ व ३८९१

२२ **कित्ता,** क्र ३९६२, २३६२

२३ **कित्ता,** क्र २५८४

२४ **कित्ता,** क्र २५९९

२५ **कित्ता,** क्र ३६८६

# १५. एकनाथप्रणीत भागवतधर्म :१:

नाथाची भूमिका जनी जनार्दन – ऋतरक्षण आणि भागवत धर्म – धवल भागवतधर्म – धर्मरक्षणार्थ भगवताचा अवतार – बौद्ध अवतार विठ्ठल – 'वेदि जैसा वर्णिला' – श्रेष्ठ मोक्षसाधन पढरी – नरदेहाची थोरवी – 'प्रपञ्चुचि अवघा परमार्थरूप होय' – तें वर्म सनाहाती आहे – सद्गुरूचें महत्त्व – नाथाचा भक्तियोग – कर्म ईशभक्तीचे वर्म – एकनाथानी केलेले धर्मरक्षण

एकनाथकालीन राजकारण आणि समाजकारण याचें दिग्दर्शन मागील प्रकरणात हेतुपुरस्सर करण्यात आलें आहे कोणतीहि तत्त्वप्रणालि ज्या कालात उदयास येते त्याकालाचा व परिस्थितीचा विचार केल्याखेरीज तिचें रहस्य ध्यानात येत नाहीं सर्व विचार हा एका दृष्टीनें परिस्थितीशीं झालेला सवादच असतो विचाराची प्रतिक्रिया परिस्थितीवर व परिस्थितीचा परिणाम विचारावर होत असतो तसेंच विशिष्ट परिस्थितीवर मात करण्याच्या हेतूनेहि विचाराचा उदय होत असतो विचारवंताची बुद्धि मानवमात्राच्या हितासाठी तळमळत असते हे खरें परतु, या बुद्धीपुढें असलेला मानव म्हणजे परिस्थितिनिरपेक्ष निर्गुण–निराकार नसतो. बिकट परिस्थितीच्या वेढ्यात सापडलेला मानव विचारवताच्या दृष्टीपुढें असतो' म्हणूनच कोणत्या परिस्थितीत असलेल्या मानवाच्या मुक्ततेसाठी विचारवताचे विचार प्रकट झाले आहेत हे समजून घेणें आवश्यक असतें नाथकालीन परिस्थितीचें दिग्दर्शन याच हेतूने करण्यात आले आहे सामाजाला वाईट परिस्थितींतून चागल्या मार्गाला लावावयाचे असेल तर प्रथम तो ज्या परिस्थितीत वावरतो ती वाईट आहे याची जाणीव करून देणें आवश्यक असतें त्यानतर उन्नत जीवनाची ओळख करून देणें अगत्याचें

असतें त्यानंतरचा उपाय म्हणजे ध्येय साध्य करण्याचा सुलभ मार्ग उपदेशावा लागतो ध्येय उच्च आणि मार्ग बिकट असेल तर न झेपणाऱ्या मार्गाने समाज जाणार नाही त्याला व्यवहारतः ते शक्य होणार नाहीं त्याचा परिणाम असा होईल की, परिस्थिति सुधारण्याचे सर्व उपाय पुराणातल्या वाग्याप्रमाणें वाङमयातच राहतील म्हणूनच यशस्वी लोक नेता उदात्त ध्येय आणि सुलभ मार्ग याची सागड नेहमी घालीत असतो काव्य परिणामकारक होण्यासाठी तें रसमय असणे आवश्यक असतें कवीचे अतःकरण त्या त्या उत्कट भावाने भारलेले असेल तरच त्याच्या काव्यात रसवत्ता आढळते लोकजीवनाशी समरस झालेला, व्यापक सहानुभूति बाळगणारा कवीच उत्कट काव्य निर्माण करण्यास समर्थ ठरतो त्याचें काव्य जनमनात सहकप निर्माण करू शकते समाजाला करावयाच्या उपदेशासहि हाच न्याय लागू पडतो. समाजजीवनाशीं समरस झाल्यानतर त्याचा उद्धार करण्याची तळमळ उपदेशकात नसेल तर त्याचा उपदेश जनमनात मूळ धरू शकणार नाही ज्या मार्गाचा उपदेश करावयाचा त्या मार्गाच्या यशाविषयी अपार निष्ठा उपदेशकाच्या अत.करणात नसेल तर त्याचा उपदेश परिणामकारक होणार नाही समाजाच्या उन्नयनाच्या मार्गात असलेल्या या सर्व अडचणींचा पूर्ण विचार करूनच नाथानी समाजाच्या उद्धारार्थ भागवतधर्माचा पुरस्कार केला आहे

## नाथांची भूमिका जनीं जनार्दन

एकनाथ स्वतः परमभागवत होते भागवतधर्म त्यानीं प्रथम आपल्या आचरणानें साकार केला या धर्मात ते स्वत रगले होते. आपण एकटयानेच या महासुखाचा अनुभव घ्यावा आणि आपल्या भोवती असलेल्या अज्ञ समाजाने मात्र या महासुखापासून वचित रहावें हे त्याच्या वृत्तीस आणि भागवतधर्माच्या ध्येयासहि मानवण्यासारखें नव्हते. म्हणून त्याचें वाङ्मय समाजाभिमुख बनले समाजाला उपदेश करताना थोर ज्ञात्याची भूमिका मात्र त्यानी घेतली नाही ज्ञानाची जाणीव कितीहि सूक्ष्म प्रमाणात राहिली तरी अहकारास वाव मिळतो अहकाराचे आस्तित्व कितीहि अल्प असले तरी दाभिकतेस अवसर मिळतो व त्यामुळे कालातरानें

शुद्ध हेतूस मालिन्य येतें लोकाना करावयाचा उपदेश हा आत्मोद्धाराचाच एक भाग आहे ही निष्ठा असली तर मात्र ही संभाव्य अधोगति टाळता येते नाथानी पुरस्कारिलेला भागवतधर्म या निष्ठेंतून उदयास आला आहे. "अवलोकिता जन दिसे जनार्दन" हा त्याचा अनुभव समाज परमेश्वर-स्वरूपी आहे ही त्याची निष्ठा समाजरूपी परमेश्वराची सेवा करण्यासाठीं भागवतधर्मांचा उपदेश आपण करीत आहोंत ही त्याची भूमिका. विश्व-नारायणात्मक आहे हे नाथाच्या दृष्टीनें केवळ बुद्धिगम्य असें तत्त्व नव्हते तो त्याचा प्रत्यक्ष अनुभव होता या अनुभवानें त्याचे जीवन प्रकाशमय झालें नाथवाङ्मयानें तोच प्रकाश समाजाला दिला आहे जनीं जनार्दनाचा प्रत्यय आल्यानें आपणहि जनार्दनं आहोंत हे कळले. म्हणून भक्त या नात्यानें परमेश्वरसेवा करण्याचें भाग्य आपल्याला लाभलें नाहीं अशी एकनाथाची गोड तक्रार आहे :

> मज करू दिली नाहीं सेवा दाविलें देवा देहींच
> जगव्यापक जनार्दन सदा वसे परिपूर्ण
> भिन्नाभिन्न नाहीं मनीं भरलासे जनीं वनी
> एकाजनार्दनीं शरण सर्वांठायीं व्यापक जाण ॥ [१]

सर्वभूतांचें ठायी जनार्दन आहे हे सत्य असल्यामुळे मानवात उच्च-नीच असा वर्णभेद करणें वेडेपणाचें ठरतें [२] अज्ञानामुळें सर्वव्यापक जनार्दनाचें दर्शन होत नाहीं ममता अहंकार व अज्ञान याचें निराकरण झालें म्हणजे

> साडी माडी नाही मग तू अवघा रामची होसी

या दृष्टिकोनातून जनीं जनार्दनाची सेवा करण्यासाठी एकनाथानी भागवत-धर्मांचा उपदेश केला आहे

एकनाथाची भक्ति रामनामस्मरणानें सुरु होते. विश्वीं विश्वात्मा व जनीं जनार्दन भरला आहे या प्रत्ययानें तिचा विस्तार होतो देहीं देव प्रकट झाल्यावर 'मीच देव मीच भक्तः पूजा उपचार मीच समस्त' असा एकात्मतेचा अनुभव येतो हीच भक्तीची परिसीमा—बुद्धिगम्य तत्त्व-ज्ञानाचा हाच भावगम्य आणि प्रत्यक्षावगम्य असा आविष्कार आहे भागवतधर्मांचें हे फळ तपस्येविना प्राप्त होत नाहीं. तपश्चर्येचा मार्ग

अवघड नाहीं एवढेंच. आत्मोद्धाराची तळमळ असलेल्या कोणत्याहि व्यक्तीस ही तपःसाधना करता येते. निष्ठा किंवा भावबळ मात्र पाहिजे निष्ठा डोळस म्हणजे ज्ञानपूर्वक असावी म्हणजे ती अतःकरणात मुरते आणि आचाराच्या रूपानें प्रकट होते व परमार्थाच्या क्षेत्राप्रमाणें प्रपचात देखील ती प्रतिबिंबित होते प्रपच आणि परमार्थ ही जीवनाची विलग व स्वतत्र अगें भागवतधर्मानें मानली नाहीत ती परस्परपूरक अशी आहेत 'रात्रीनें चद्र शोभतो, चद्रानें रात्रीस शोभा येते आणि चद्र व रात्र या दोहोंच्या योगानें आकाश शोभिवत दिसतें' या सस्कृत सुभाषिताप्रमाणें 'परमार्थानें प्रपच शोभतो, प्रपचानें परमार्थास शोभा येते आणि प्रपचपरमार्थ एकरूप झाल्यानें जीवन कृतार्थ होते' ही भागवतधर्माची मूलभूत भूमिका नाथाच्या जीवनात आणि वाणीत जेवढी स्पष्ट झाली आहे तेवढी इतरत्र क्वचित्‌च आढळेल महाराष्ट्रापुरताच विचार करावयाचा झाल्यास ज्ञानेश्वरादिक सतानी भागवतधर्माच्या विशिष्ट अगावरच अधिक भर दिलेला दिसून येईल. ज्ञानियाचे राजे ज्ञानेश्वर भागवत पुराणातील सनत्कुमारादिक वैराग्यशील संताच्या परपरेत शोभणारे नामदेव एकनिष्ठ भक्तः नारदाच्या पक्तीत बसणारे. तुकारामानीं गृहस्थाश्रमाचा स्वीकार करूनहि कडव्या निवृत्तीचा पुरस्कार केला समर्थ रामदासानी व्यक्तिप्रपंचाचा लोप करून राष्ट्राच्या ससारासाठी प्रयत्न आणि प्रत्यय याचा पुरस्कार केला पण, प्रपंच करूनहि परमार्थ साधणाऱ्या विदेहाची परपरा मात्र एकनाथानींच चालविली.

## ऋतरक्षण आणि भागवतधर्म

व्यष्टि आणि समष्टि याच्या जीवनाचा सर्वांगीण विकास हे भागवतधर्माचें उद्दिष्ट ऋतरक्षणाने हा विकास साधता येतो ही या धर्माची शिकवण सत्कर्माच्या आचरणाने व्यक्ति ऋतरक्षण करते व सद्धर्मांच्या योगानें समष्टीस ऋतसवर्धन करता येते असा व्यष्टिसमष्टीचा ऋतरक्षणाचे बाबतींत परस्परपूरक सबध आहे भक्तीचा पुरस्कार हे भागवतधर्माचें व्यक्तिनिष्ठ अग आहे. या स्वरूपातील भागवतधर्म भारतातील विविध प्रातीय सतानीं उपदेशिला आहे परतु सद्धर्मांच्या रक्षणाच्या रूपानें

भागवतधर्म साग करण्याची जाणीव महाराष्ट्रीय सताखेरीज इतरत्र फारच कमी प्रमाणात आढळते महाराष्ट्रीय सतमडळातहि नाथाच्या वाङ्मयात आणि जीवनात भागवतधर्मांचें मूलप्रेरणेसह समग्रदर्शन अधिक घडते म्हणूनच भागवतधर्माच्या आचार्यांत एकनाथांचें स्थान फारच महत्त्वाचें आहे.

समष्टिजीवनात ऋतप्रेरणा जागृत करण्याचे कार्य नाथानी कोणत्या प्रकारें केलें हे पाहणें बरेंच उद्बोधक ठरेल. पहिल्या तीन प्रकरणात ऋताच्या स्वरूपाचे व त्याच्या भिन्नकालीन अर्थांचें सविस्तर विवेचन करण्यात आलेंच आहे युगधर्माप्रमाणें सत्य, ब्रह्म, यज्ञ, कर्म आणि धर्म हे अर्थ ऋतास कसे प्राप्त झाले, पौराणिक कालापूर्वीपासूनच ऋताला सत्य हा अर्थ कसा आला व वैदिक ऋताची सर्व कल्पना धर्म या शब्दात अतर्भुत होऊन पुढच्या काळात धर्म हा ऋतवाचक कसा बनला यासबधीं प्रारभीच्या प्रकरणातून केलेल्या साधार विवेचनाची पुनरुक्ति करणें अनावश्यक ठरेल. [५] एकादश स्कधात आलेल्या 'ऋत' या शब्दाचा अर्थ 'सत्य' हाच नाथानीं दिलेला असला तरी भागवतधर्माची मूळ ऋतरूप प्रेरणा नाथानीं परपराप्राप्त 'धर्म' या शब्दानें व्यक्त केली आहे त्यानी केलेल्या धर्माच्या विवेचनात ऋतानिरूपण आलें आहे म्हणूनच नाथानीं धर्म आणि धर्मरक्षण यासबधीं व्यक्त केलेले विचार समजून घेणें अगत्याचें ठरतें

## धवल भागवतधर्म

सस्कृत भाषेंत गुणधर्म, व्यक्तीचें कर्तव्य, समाजधर्म असे धर्म या शब्दाचे विविध अर्थ होतात धृ हा मूळ धातु या शब्दात आहे त्यावरूनच 'धारणाद्धर्ममित्याहु:। धर्मो धारयते प्रजा' अशी धर्माची विख्यात व्याख्या करण्यात आली आहे समाजाची धारणा ज्याच्या योगानें होते, जो समाजाचें आश्रयस्थान आहे तो धर्म सस्कृत 'धृ' हा धातु मराठींत 'धरणें' या रूपात आला आहे हा धात्वर्थ लक्षात ठेवून नाथानीं 'डौर' या नावाचें सुदर भारूड लिहिलें आहे. भागवतधर्मांचीं मूलतत्त्वें या भारूडांत कौशल्यानें ग्रथित करण्यात आलीं आहेत :

ये खेपे आले धरा गा ये राया हो आले धराल तरी ढवळा धरा ढवळा धराल तरी मासा धरा मासा धराल तरी बादी धरा बादी धराल तरी जाते धरा जाते धराया कारणे मेंढा धरा मेंढा धराया कारणें बेटकुळी धरा हीं अवघी धराया करणे . अवश्य धरावें ग्रहण ग्रहण धराल तरी जीवेभावें धरा तेणेचि ग्रहणे अर्धोदय करा अगा सज्जन जन हो ॥

वर ज्या गोष्टी धरण्यास सांगितल्या आहेत त्याचे सर्व लौकिक अर्थ सांगून 'तें हे नव्हे' असें सांगितल्यावर नाथांनी प्रत्येकाचा खरा अर्थ दिला आहे

१ आलें म्हणजे मनुष्य देहीं आयुष्य आलें तें.
२ ढवळा म्हणजे जो निजधर्म चोखट.. जो भागवती वाखाणिला
३ मासा म्हणजे मनोमासा
४ बादी म्हणजे इच्छा बादी.
५ जातें म्हणजे आयुष्य जाते तें,
६ मेंढा म्हणजे काळ
७ बेटकुळी म्हणजे सेजेची बेटकुळी अर्थात् स्त्री
८. आणि ग्रहण म्हणजे- गुरुग्रहण

याचा थोडक्यात अर्थ असा की, मनुष्य देहाचें सार्थक करावयाचे असेल तर भागवतधर्माचें आचरण करा. त्यासाठीं मन, इच्छा आणि विषयवासना नियंत्रित ठेवा. मनुष्यदेह नश्वर आहे हे ध्यानात ठेवून काळाची झडप येण्यापूर्वी गुरूस शरण जाऊन जीवित साफल्याचे धनी व्हा असा हा उपदेश आहे. 'आलें' धरावयाचें कसें ? विवेक-वैराग्य हातीं घेऊन आणि सर्व भूती भगवद्भाव बाळगून. पण, 'आल्या' बरोबर ढवळाहि धरला पाहिजे हा ढवळा कोण ?

निजधर्म जो सोज्वला त्यासीच बोलिजे शुद्ध ढवळा जो भागवती बाखाणिला स्वयें रक्षिला परिक्षितीनें ॥

हा ढवळा खोटा, उफराटा, आडबाटा, आणि पोटा धरू नये म्हणजे नीच हेतूने, विपरीत अर्थानें, लौकिक वाढविण्यासाठी आणि धनार्जन करण्या करितां धर्माची कास धरू नये कायावाचामनेंकरून शुद्ध धर्माचें आचरण करावें 'जनीं जनार्दन पाहणें' हे या धर्माचें सार आहे :

शुद्ध धर्म जो सोज्वळ   त्याते श्रीभागवत म्हणे ढवळ
तो चतुष्पाद करावा सकळ   या नाव प्रांजळ परम धर्म

## धर्मरक्षणार्थ भगवंताचा अवतार

या धर्माचें महत्त्व एवढे आहे की, त्याचे रक्षण करण्यासाठीं भगवान् अवतार घेतो.[६] धर्मावर अधर्माची मात होऊ लागली म्हणजे धर्मरक्षणार्थ भगवान् अवतार घेतो हे तत्त्व गीता आणि भागवत या दोन्ही ग्रथात सागितलें आहे [७] एकनाथानी भागवतधर्मातील अवतार–कल्पनेंत स्वत-चीहि थोडी भर घातली आहे भागवतात आलेले दहा अवतार त्यानी मानलेच आहेत त्याबरोबरच सताचाहि भगवताच्या अवतारात त्यानीं समावेश केला आहे धर्मरक्षणासाठीं भगवान् अवतार घेतो त्याप्रमाणें सताचाहि अवतार धर्मरक्षणार्थ होत असतो 'धर्मरक्षाया कारणें साधु होती अवतीर्ण'[८] म्हणून 'सत ते देव आणि देव ते सत' असें नाथ सागतात

भागवतोक्त दशावतारात देखील नाथानी थोडी सुधारणा केली आहे ही सुधारणा लक्षात घेतली म्हणजे वारकरी सप्रदायास शुद्ध शास्त्रीय स्वरूप देण्याची नाथाची दृष्टि ध्यानात भरल्या वाचून रहात नाही भागवतधर्माचें मराठी भाषेंत विवरण करणें एवढेंच एकनाथाचे उद्दिष्ट नव्हतें परपरेचा यथोचित आदर राखून भागवतधर्मास कालानुरूप सुव्यवस्थित आणि शास्त्रीय स्वरूप देणारे ते एक थोर आचार्य होते हे अवतार–कल्पनेंतहि त्यानी जी सुधारणा केली त्यावरून लक्षात येण्यास वेळ लागत नाहीं एक-नाथाची दृष्टि केवळ निष्ठावत अनुयायाची नव्हती त्याची भूमिका समाज-धूरीणाची होती. म्हणूनच प्राचीन भागवतधर्माच्या प्रेरणेशीं सुसंगत पण कालानुरूप असा भागवतधर्म त्यानी सागितला लुप्त होत चाललेला धर्माभिमान त्यानीं जागृत केला, आचारविचाराच्या अराजकातून समाजाची मुक्तता केली, अधर्माच्या मिठींतून धर्मास सोडविले, देहीं देव पहावयास शिकविलें व जनीं जनार्दन पाहण्याची दृष्टि दिली त्यानीं केलेल्या अव-ताराच्या वर्णनात देखील एकनाथ हे थोर द्रष्टे होते याचा प्रत्यय येतो. धर्मरक्षणासाठी भगवान् अवतार घेतो हे गीतेनें सागितलें धर्माचा उद्धार-

करण्यासाठी विष्णूनें दहा अवतार घेतले हे भागवतानें कथिलें पंढरीचा विठ्ठल हा केवळ विष्णुस्वरूपी नसून धर्मरक्षणार्थ झालेला तो बौद्ध अवतार आहे ही नाथाची दृष्टि नाथपूर्वकालीन संतानी विठ्ठलास विष्णुस्वरूपी मानून त्याची आराधना केली नाथानीं देखील भक्तिभावानें पांडुरंगास आळविलें आहे परंतु, केवळ भक्तिप्राधान्यावर नाथ संतुष्ट राहिले नाहींत भक्तिपरंपरेप्रमाणेंच धर्मरक्षणाचें उद्दिष्ट त्याच्यापुढें होतें. म्हणून धर्म रक्षणाच्या हेतूशी सुसंगत अशी विठ्ठलरूपी बौद्ध अवताराची कल्पना नाथानीं प्रतिपादिली आहे

## बौद्ध अवतार : विठ्ठल

भागवतात व इतर पुराणात आलेलें बौद्ध अवताराचें स्वरूप निराळें आहे. बौद्धपंथाचा प्रवर्तक गौतम हा या पुराणाना अभिप्रेत आहे. देवद्वेष्ट्याच्या संमोहनासाठी विष्णूनें बुद्धाचा अवतार घेतल्याची कथा भागवत आणि विष्णु या पुराणात आली आहे[९] दैत्याना वैदिक धर्मापासून परावृत्त करण्यासाठीं विष्णूनें आपल्या शरीरातून मायामोह नावाचा पुरुष निर्माण केला. त्यानें दैत्याना वेदविरोधी मार्गाकडे आकृष्ट केलें 'वेदविरोधी मार्गासच तुम्ही योग्य (अर्ह) अहात' असें त्याने सांगितल्यामुळें अर्हताचा म्हणजे जैनाचा अवैदिक पंथ अस्तित्वात आला आणि 'हाच धर्म तुम्ही समजून घ्या' (बुद्ध्य) असें मायामोहाचें म्हणणे ज्यानीं मान्य केलें ते बौद्ध झाले अशी कथा विष्णुपुराणात आली आहे[१०]

बौद्ध अवताराचें एकनाथानी केलेलें स्पष्टीकरण भागवतधर्माच्या मूळ प्रेरणेशीं जास्त सुसंगत आहे धर्माच्या उद्धारासाठी भगवंताचा अवतार असल्यामुळें अधर्माचा उपदेश करणारा बौद्ध त्याना मान्य नाहीं अवताराच्या मालिकेंतील बौद्ध हा देखील धर्मरक्षक होता धर्माच्या पुनरुत्थापनार्थ त्याचा अवतार झाला तो विठ्ठलाच्या रूपानें असें नाथाचें प्रतिपादन आहे :

> नववा बैसे स्थिररूप तया नाम बौद्धरूप
> संत तयादारीं तिष्ठताती निरंतरीं
> पुंडलिकासठीं उभा धन्य धन्य विठ्ठल शोभा
>
> — एकनाथगाथा, क्र २५६०.

संस्कृतात दशावतारांचें वर्णन करणाऱ्या एका अभंगात नाथांनीं बौद्ध अवताराचे वर्णन पुढील प्रमाणें केलें आहे

म्लेंच्छ नित्यजान् मूर्छयते विश्वबोधरूपेण — क्र ३३४५

विठ्ठलानें कटीवर कर का ठेवला याची मीमांसा करताना एकनाथ म्हणतात, 'मत्स्यावतारात शंखासुर मारल्याने, वामनावतारात बळी पाताळात घात ल्यानें श्रम झाले म्हणून या बौद्ध अवतारात तू कटेवरी कर ठेवले आहेस'[11] कृष्णाच्या अवतारानंतर धर्माचा लोप झाला आणि अधर्म वाढला म्हणून बौद्धरूपानें अविनाश पंढरीक्षेत्रावर अबेनें अवतार घेतला[12] असें एका भारुडात नाथांनीं सांगितलें आहे :

धर्म लोपला अधर्म जाहला हे तू न पाहसी
यालागी बौद्धरूपें पंढरीं नांदसी — क्र ३९३२

नाथांचा 'गारुडी' आणि 'वैदु' देखील विठ्ठलावतारांचें हेंच रहस्य सांगतो[13]

विठ्ठल हा विष्णूचेंच एक स्वरूप आहे हे सांगणें निराळें आणि तो विष्णूचा बौद्धावतार आहे हे मानणें त्याहून निराळें आहे दोन्ही पद्धतींत विठ्ठलाचा आणि विष्णूचा अनिवार्य संबंध जोडण्यात आलेला असला तरी देवाचें स्वरूप आणि देवाचा अवतार या दोहोंचें कार्य भिन्न आहे. गीते-पासून भागवतापर्यंत देवाच्या अवताराचे विशिष्ट हेतूनें वर्णन करण्यात आलें आहे 'धर्मरक्षणासाठी देव अवतार घेतो' या निष्ठेंतून अवताराचा उदय झाला आहे त्यामुळें 'बौद्ध अवतार हा विठ्ठलाचा' या भूमिकेंत धर्माच्या रक्षणार्थ झालेला हा अवतार आहे ही जाणीव आढळते तशी तो केवळ विष्णुस्वरूपी मानण्यात आढळत नाहीं पूर्वपरंपरेच्या प्रकाशात पुराणांनीं अवतारांनीं संगती लावली त्याप्रमाणे नाथांनीं अवताराच्या भूमिकेंत विठ्ठलास बसविल्यामुळें वारकरी संप्रदायाची विठ्ठल–भक्ति आणि भागवतधर्माचें धर्मरक्षणाचें उद्दिष्ट याचा मेळ नाथांना घालता आला भागवतधर्माचे थोर आचार्य आणि द्रष्टे या दृष्टीनें एकनाथांचें महत्त्वाचें स्थान त्यांच्या या दृष्टिकोनावरून सहज ध्यानात येईल

## ‘वेदीं जैसा वर्णिला’-

विष्णूच्या अवतारकल्पनेंत विठ्ठलास स्थान देऊन नाथांनी धर्मरक्षणाच्या आदर्शास उजळा दिला त्याप्रमाणें विष्णूच्या प्राचीन अर्थाची विठ्ठलाच्या स्वरूपवर्णनाशी सागड घालून वैदिक कालापासून चालत आलेली विष्णुभाक्ति आणि विठ्ठलभाक्ति ही एकरूप असल्याचेंहि त्यानीं दर्शविलें आहे विष्णु या शब्दाची व्युत्पात्ति प्रारभीच्या एका प्रकरणात आली आहे.[१४] व्यापनशीलत्वामुळें ‘विष्णु’ हे नाव पडलें असा या शब्दाचा अनेक विद्वान् भाष्यकारानीं दिलेला अर्थ आहे’ विठ्ठलाचा तोच अर्थ नाथानी दिला आहे ‘व्यापक तो हरि पढरीये राहिला,’ ‘व्यापुनि जगीं तोचि उरला’ (क्र ५६१-६२), ‘जीव-शिव व्यापुनि राहिला वेगळा’ (क्र ६०८), ‘अणुरेणु पासोनि ब्रह्माडी भरला’ तो म्या देखिला विटेवरी’ (क्र ५२६), या शब्दात नाथानी विठ्ठलाचें वर्णन केलें आहे. परमार्थानें हे वर्णन मूळ सत्तत्त्वास लागू पडणारें असलें तरी ‘आपलें वर्णन वेदानीं केलेल्या वर्णनास धरून आहे’ असें एकनाथ आत्मविश्वासानें सागतात तें लक्षात घेतलें म्हणजें वैदिक वाङ्मयात आढळून येणारे ‘विष्णु’ या शब्दाचे अर्थ नाथानी विठ्ठलाच्या अर्थात समाविष्ट केले आहेत असेच म्हणावें लागतें

> वेदी जैसा वर्णिला तैसा विटेवरी देखिला
> पुराणें सागती ज्या गोष्टी . तो विटेवरी जगजेठी
> शास्त्रें वेवादती पाही तोचि विटे समपायी – क्र ५७३

वेदशास्त्रें, पुराणें, दर्शनें ज्याचें वर्णन करतात तोच हा विठ्ठल आहे[१५] असें वर्णन इतरत्राहि एकनाथानीं केले आहे ब्राह्मणग्रथातील विष्णुसबधीची कल्पना व उपनिषदातील परब्रह्म याचाहि त्यानी विठ्ठलस्वरूपाशीं मेळ साधला आहे[१६]

वेदापासून चालत आलेला धर्म आणि वेदानी ज्याचा महिमा वर्णिला आहे तो देव भागवतधर्म आणि विठ्ठल या रूपानें वर्तमान युगात नादत आहे हे एकनाथानीं केलेल्या भागवतधर्माच्या व विठ्ठलाच्या वर्णनाचें सार आहे. ऋतरक्षणार्थ देव बद्धपरिकर असतात हा वैदिक

देवताचा गुणधर्म धर्मरक्षणार्थ भगवान् अवतार घेतो व अशाच अवतारात विठ्ठलाची गणना होते या स्वरूपात नाथानी प्रतिपादिला आहे. या विकासक्रमातील उपनिषदातील तत्त्वज्ञानाची सगती देखील त्यानी सोडली नाही उपनिषदानीं वर्णिलेले परब्रह्म विठ्ठलरूपी आहे हे त्यानी सागितलें अशारीतीनें 'ऋत, सत्य, ब्रह्म, यज्ञ' हे ऋताचे पर्याय नाथानी भागवतधर्माच्या रूपानें साकार केले आहेत ऋत आणि सत्य याचा अतर्भाव त्यानी धर्मात केला, ब्रह्म विठ्ठलरूप मानलें व भक्तीच्या रूपानें यज्ञाची कल्पना विशद केली म्हणून ऋताधिष्ठित भागवतधर्माचें दर्शन नाथोक्त भागवतधर्मात घडतें असेंच म्हणावें लागतें

## श्रेष्ठमोक्षसाधन : पंढरी

ज्या परब्रह्माच्या प्राप्तीसाठी योगी देखील शिणतात ते सामान्याच्या आटोक्याबाहेरचें नाही हा विश्वास नाथवाङ्मयात आढळतो[१७] दुर्गम परब्रह्म, आगमनिगमाना अनाकलनीय असलेला ईश्वर भीमातीरी उभा राहिल्यानें तो सर्वाना सुलभ झाला आहे म्हणूनच पढरीचें माहात्म्य विशेष आहे वैकुठींचें वैभव पढरीस आलें आहे[१८] पुडलीकाच्या भावबळानें पंढरीस परब्रह्म अवतरलें आहे[१९] हीं विठ्ठलमूर्ति पूर्वकालापासून चालत आली आहे असें वेद गर्जना करून सागतात[२०] विठ्ठलाच्या मस्तकावर हर आहे[२१] प्रत्येक क्षेत्र आपापल्यापरीने मोठे असलें तरी प्रत्यक्ष हरिहराची भेट जेथे होते त्या क्षेत्राचे माहात्म्य काही आगळेंच आहे[२२] सप्तमोक्षपुऱ्याना पढरीची सर येणार नाही[२३] प्राण वेंचावा तेंव्हा कोठें काशी क्षेत्रीं मोक्ष मिळतो पढरीचें तसें नाहीं. या ठिकाणी मोक्षासाठी धन किंवा जीवित वेंचावें लागत नाहीं शुद्ध भाव पुरे आहे तो असला म्हणजे दर्शनानेंच येथें मोक्ष मिळतो.[२४] म्हणूनच पढरीची वारी हे श्रेष्ठ मोक्षसाधन आहे. वेदाध्ययनानें अभिमान वाढतो पुराणाच्या अभ्यासाने इतर देवताची निंदा करण्याची प्रवृत्ति बळावते. शास्त्राध्ययन करावें तर जीवित क्षणभगुर जीवितावधींत समग्र शास्त्राचें आलोडन होणें कठिण याकरिता 'साधन तें सार पढरीची वारी'[२५] याच निर्णयावर यावे लागते. भक्ताचा उद्धार करण्यासाठीं पढरीनाथ या क्षेत्रावर उभा आहे:

तारावया भोळे भक्त कृपावत पढरीनाथ
करूनि मिस पुडलिकाचें उभा उगाचि विटेवरि दिसे
ऐसा भक्तासी भुलला तारावया उभा ठेला
जनी जनार्दन शरण एकाजनार्दन — क्र. ४७४.

## नरदेहाची थोरवी

मुक्तीचा मार्ग सोपा खरा॰ परतु त्यामार्गानें जाण्याची उत्कट इच्छा मात्र पाहिजे जीवनाचें सार्थक करण्याची तळमळ अतःकरणात निर्माण झाली तरच मोक्षाच्या मार्गाचा अवलब करण्याची उत्कट इच्छा होईल म्हणून नाथानी प्रथम नरदेहाची थोरवी व त्याचें सार्थक करण्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे नरदेह पापमय असल्याची समजूत भारतीय तत्त्वज्ञानात कित्येक शतकें रूढ आहे प्रपच दु.खमय, देह दु.खमय, ससार दु.खमय असें सर्वत्र दु खच पसरलें असल्यानें या दुःखाचे मूळकारण असलेला मनुष्य–जन्म पुनःपुन्हा लाभणार नाहीं यासाठीं मोक्षसाधना केली पाहिजे अशा मोक्षाच्या कल्पना रूढ आहेत मोक्षासाठी प्रपच–निवृत्ती आणि कर्मसन्यास याचा अवलब करण्याचा उपदेश सन्यासवादी करतात बौद्धानीं देखील याच मार्गाचा उपदेश केला आहे वैदिकातोल सन्यासमार्ग या विचारसरणीतून उदयास आला आहे भागवतधर्मानें मात्र सन्यासनिष्ठा स्वीकारली नाहीं जीवन आणि ससार दुःखमय असल्याचा प्रत्यय येतो हे खरें परतु, त्याचें कारण जीवित पापमूलक किंवा नरदेह दुःखमूल आहे हे नसून जीवनातील आसक्तीमुळे व स्वार्थमूलकतेमुळें दु.ख भोगावें लागतें सकुचित स्वार्थाचा त्याग करून विश्वाच्या कल्याणासाठी प्रयत्न केला असताना 'याच देहीं याच डोळा' मोक्षाचा सोहळा पाहता येतो अर्थात्‌च या अनुपम सुखाची जोड देणारा मनुष्यदेह पापमूलक नसून तो परम पावन आहे असें भागवत-धर्माचें सागणें आहे॰

नाथोक्त भागवतधर्मात याच दृष्टीनें नरदेहाची थोरवी वर्णिली आहे देह नाशवत आहे हे खरें आभ्राच्या छायेसारखाच तो क्षणिक आहे यात वाद नाहीं [१] पचभूताचा हा मेळावा एखाद्या गधर्वनगरीसारखा

दिसतो पण त्रिगुणाचा हा खेळ एकदा खलास झाला म्हणजे शेवटीं कांहींच उरत नाही.[२७] जन्ममृत्यूच्या आवर्तात सापडलेल्या या देहाची कमाल मर्यादा शभर वर्षांची असते त्यातून अर्धा काल रात्रीत, बारा वर्षे बालपणात व तारुण्य विषयचेष्टत केव्हा निघून जातात याचा पत्ता लागत नाहीं नतर येते वार्धक्य. तें मरणापासून फार अतरावर नसतें यमराजाचें बोलावणें आल्यावर कोणतीच मात्रा चालत नाहीं सर्व काहीं जेथल्या तेथें सोडून द्यावें लागतें माझें माझें म्हणून ज्या आताचा व धनाचा सग्रह केलेला असतो त्यापैकी कोणीच या शेवटच्या घटकेस कामास येत नाही [२८] आणि –

फेरे फिरुनी नरदेहीं आला एकाजनार्दनी वाया गेला – क्र २९०८

अशी मानवाची स्थिति होते अर्थात् देह नाशवत आहे म्हणून शोक करीत बसल्यानें देहाचें सार्थक होणार नाहीं जीवनाच्या सार्थकाचें गुज नाथ सागतात तें ऐका :

हिताकारणें तुम्हा सागतसे गुज काही तरी लाज धरा आधी
अवचट नरदेह पावलें निधान काही सोडवण करी बापा
पूर्वसुकृताचें फळ तें पदरीं म्हणूनि हा देह निर्धारी प्राप्त तुज
एकाजनार्दनीं वाया जातो काळ काही तरी गोपाळ आठव वेगे
– क्र २९४१

पूर्वजन्मींच्या पुण्याईनें नरदेह प्राप्त झाला आहे पुण्यकार्यार्थ तो वेंचणें हेच जीवनाचें सार्थक आहे कारण,

गव्हाची राशी जोडलिया हातीं सकळ पक्वान्नें तैं होतीं
ऐसा नरदेह उत्तम जाण वाचें वदे नारायण – क्र १६६५

नरदेह लाभणें हे भाग्याचें लक्षण आहे देव सुद्धा नरदेहाची इच्छा करतात.[२९] या देहाच्या योगानें प्रत्यक्ष परमेश्वराची प्राप्ती होते [३०] देह वाईट आहे म्हणून त्याला त्यागावे तर मोक्षाला अतरावे लागतें सुंदर म्हणून भोगावें तर नरकाची साधना घडते म्हणून,

तें त्यागावें ना भोगावें ' मध्यभागीं विभागावें
आत्मसाधनीं राखावें निजस्वभावें हितालागी – ए भा ९–२५०–५३

नरदेह हा पुरुषोत्तमाचा गृहस्थाश्रम आहे वेदानी या देहाची स्तुति केली

आहे.[31] मनुष्यदेह लाभणें तर विशेष भाग्याचें आहे[32] पण, भाग्य टिकविणें हे मात्र आपल्या कर्तृत्वावर अवलबून असतें देह मोक्षालाहि नेतो तसा तो नरकाप्रतहि पोंचवितो विषयभोगात गुतलों, शरीराचे लाड केले तर नरक निश्चित आहे यासाठी –

देह साडावा ना माडावा येणे परमार्थची साधावा – ए भा २०–१२७

परमार्थाची साधना हेच नरदेहाचे सार्थक आहे हे शक्य तितक्या लवकर उमजले पाहिजे 'रात्र थोडी सोंगें फार' अशी या जीवनाची अवस्था आहे मृत्यु सारखा पाठीशीं लागलेला, केव्हा झडप घालील याचा नेम नाहीं· म्हणून भाग्यप्राप्ती करून देणारा नरदेह लाभल्यानतर काल व्यर्थ न दवडता परमार्थाच्या मार्गाला लागावें ही तळमळ नाथवाङ्मयात उत्कटत्वानें आढळते. लोकोद्धाराच्या या तळमळीने नाथवाङ्मय ओथबलेले आहे !

एकाजनार्दनी येतसे करूणा म्हणोनि वचना बोलणे हे

एकाजनार्दनी म्हणोनि येते कींव बुडताती सर्व महाडोहीं[33]

अशी किती तरी वचनें नाथाच्या वाङ्मयात आढळतील[34] अज्ञानानें भ्रमात सापडलेल्या मानवाना नाथ विचारतात: 'अरे जन्माला येऊन काय साधलेस ? तू कोण ? आलास कोठून ? याचा शोध कर तू अल्पायुषी आहेस. मिळालेल्या अवधींत जीवनाचें काही तरी सार्थक कर सताना आणि सद्गुरूस शरण जा म्हणजे तुझें जीवन सार्थकी लागेल "[35]

## 'प्रपंचुचि अवघा परमार्थरूप होय

जीवनाचें सार्थक करण्यासाठी परमार्थ साधावयाचा म्हणजे प्रपच सोडावयाचा असें मात्र नव्हे. प्रपच सुटत नाही· दशसहस्त्रात एखादा सर्वसग-परित्यागी निघतो मग राहिलेल्या नऊसहस्त्र नऊशे नव्याण्णवानीं करायचें काय ? परमार्थाचा मार्ग आपला नव्हे म्हणून स्वस्थ बसावयाचें कीं काय ? तसें असेल तर ज्ञानी व्यक्तीच्या दृष्टीने ससार मिथ्या ठरतो तसाच ससारिकाच्या दृष्टीनें परमार्थ देखील मिथ्या ठरेल बिकट परिस्थितींतून वाट काढण्यात पुढाऱ्याचे पुढारीपण कसास लागत असते. नाथानीं या दुश्चक्रातून वाट दाखविली इतकेच नव्हे तर

अगदी सोपी वाट काढली. प्रपंच आणि परमार्थ परस्परविरोधी आहेत ही समजूतच चुकीची आहे असें एकनाथ सांगतात. परमार्थासाठी प्रपंच सोडावा लागतो ही समजूत भ्रामक आहे युक्तीनें प्रपंच केला तर तो परमार्थरूप होतो आणि परमार्थाचें वर्म कळलें म्हणजे संसारापासून परमार्थ वेगळा रहात नाही[३६] संसार खुशाल करावा. मात्र श्रीहरीचें स्मरण असू द्यावें रामनामाच्या योगानें दु:खरूप संसार सुखरूप होतो[३७] कुटुंबातील व्यक्तींचे हाल करून परमार्थ साधणें हा दारुण अधर्म आहे[३८] प्रपंच–परमार्थाचे वर्म जाणलें म्हणजे प्रपंचच परमार्थरूप होतो आणि परमार्थ साधण्यासाठी प्रपंचाबाहेर जाण्याची गरज भासत नाहीं.[३९] प्रपंच आणि परमार्थ विरोधी नसून ते एकरूप आहेत हे नाथाच्या शिकवणीचें महत्त्वाचें वैशिष्टय आहे वाणीनें, वृत्तीनें आणि कृतीनें प्रपंचात परमार्थ पाहणारा एकच साधु महाराष्ट्रात होऊन गेला तो म्हणजे एकनाथ. ज्ञानेश्वर, नामदेव, रामदास आणि तुकाराम या चारहि संतांचा ओढा प्रपंचनिवृत्तीकडे अधिक आहे[४०] सामान्य माणसाच्या दृष्टीनें ही निवृत्ती आचरण–सुलभ नसते. भोळ्या–भाबड्यांना भवाब्धि तरून जाण्याचा मार्ग नाथांना सांगावयाचा होता म्हणून ते बालाच्या चालीनें चालले, त्याच्या बोलीनें ते बोलले आणि बालांना झेपेल असाच ध्येयवाद त्यांनीं समाजापुढें ठेवला. या ध्येयवादात यमनियमाचा बडीवार नाहीं, कीं जप-तपाचा शीण नाहीं, शास्त्र आणि विद्या यांचे महत्त्व मर्यादित आहे प्रपंच सोडण्याचा अवघड उपदेश नाहीं, आत्यंतिक मनोनिग्रहाचा आग्रह नाही, जन–जनार्दन यांत अंतर नाहीं, ज्ञानी–अज्ञानी असा पंक्तिप्रपंच नाहीं प्रपंच हा परमार्थमय आणि परमार्थ हा प्रपंचापासून वेगळा नाही जन जनार्दनस्वरूप आहे आणि जनार्दन जनाहून भिन्न नाहीं देहीं देव आहे आणि देव देहधाऱ्याच्या रूपानें नटलेला आहे

## 'तें वर्म संतांहातीं आहे'

या ध्येयवादात नाथांच्या घरची उलटी खूण मात्र आहे. उलटी आहे म्हणून अवघड मात्र नाही खूण आहे म्हणून गूढ मात्र नाहीं सद्गुरु आणि संत यांना शरण गेले म्हणजे दु:खरूप संसार सुखरूप होतो आणि

प्रपच परमार्थरूप होतो हे या मार्गाचें वर्म आहे सत धर्मरक्षणासाठीं अवतार घत असतात[४१] आणि सद्गुरु तर साक्षात् परब्रह्मरूपच असतात [४२] त्याना शरण गेल्यानें देहीं देव आणि जनी जनार्दन प्रत्ययास येतो मुक्ति मरणोत्तर मिळते यावर नाथानीं विशेष भर दिला नाही. देह असतानाच मुक्तावस्था अनुभविता येते हे त्यानीं वारवार सागितलें आहे ज्ञानानेंहि मोक्ष मिळतो हे खरें असलें तरी ज्ञानमार्ग हा सर्वांच्याच आटोक्यातला नसतो शिवाय, सद्गुरु आणि सत याच्या मार्गदर्शनाविना लाभलेल्या ज्ञानानें अहंकार जडण्याचा धोका विशेष असतो. वृत्ति निरहंकारी झाल्याविना मुक्तावस्था प्राप्त होणे अशक्य असतें म्हणून ज्ञानमार्गाची दुर्गमता टाळण्यासाठीं संत–सद्गुरूना शरण जाणेंच लाभप्रद ठरतें. खरा सत आणि खरा सद्गुरू याची पारख मात्र करता आली पाहिजे.

सर्वभूतमात्राविषयीं दया, समदृष्टि आणि अतरी शाति हीं सज्जनाचीं लक्षणें होत. [४३] सुखाचें माहेर असलेले सत साक्षात् देवच असतात [४४] इतर मार्गाना अनेक फाटे फुटतात सताचा मार्ग धोपट असतो [४५] त्याच्या दर्शनाने पाप-ताप व दैन्य-दारिद्र्य दूर होतात[४६] योगसाधनानेंहि जें लाभत नाहीं ते संतसगानें जोडता येते [४७] त्याच्या कृपेनें द्वैताचा निरास होतो. [४८] जगाला सन्मार्गाला लावणें हें त्याचे उद्दिष्ट. [४९] संत कोणत्याहि जातीचा असला तरी तो सारखाच वद्य असतो. अशा संताची अनन्यभावानें सेवा केली पाहिजे त्याच्या सेवेत देह झिजावा हीच आस बाळगली पाहिजे [५०] म्हणजे ससाराचेंच काय काळिकाळाचेंहि भय रहात नाहीं [५१] मातेचे प्रेम सताच्या हृदयात असतें बुडत्याना आधार देणें हा त्याचा स्वाभाव [५१] कामधेनु आणि कल्पवृक्ष यापेक्षाहि त्याचा महिमा मोठा आहे कारण, कल्पवृक्ष व कामधेनु जेवढे मागाल तेवढेंच देतील उलट सत शरणागताच्या मनीची आर्त ओळखून जीवन्मुक्ती देतात [५२] ज्ञान–ध्यान, जप–तप, योग–याग, तीर्थ–क्षेत्र सताच्या चरणीं विश्रातीस येतात [५३] ऋद्धि–सिद्धी व भक्ति–मुक्ति त्याच्या पायीच्या दासी असतात [५४]सर्वभूतीं ईश्वर आहे या निष्ठेनें वागणाऱ्या सताच्या दर्शनानें विश्वाचा उद्धार होतो [५५]

गीता, भागवत, ज्ञानेश्वरी व नाथवाङ्मय या ठिकाणीं आलेल्या संताच्या आणि परम भागवताच्या लक्षणात साम्य असलें तरी प्रत्येक ठिकाणीं थोडा फार तर-तम-भाव आढळतो संताचीं लक्षणें सांगताना गीतेनें निष्काम कर्मयोग आणि ज्ञान यावर भर दिला आहे, भागवतानें भक्तिप्राधान्य महत्त्वाचें गणले आहे, ज्ञानेश्वरींत गीतेतील ज्ञान व भागवतातील भक्ति याना महत्त्व मिळाले आहे आणि नाथवाङ्मयात सर्वात्मभाव व विश्वोद्धारकत्व या संताच्या गुणावर अधिक भर आढळतो नाथाचा संत, ज्ञानी व भक्त जनीं जनार्दन या भावानें भारलेला असून अज्ञ जनाना मुक्त करण्यासाठीं तो बद्धपरिकर झालेला दिसून येतो

## सद्‌गुरूचें महत्त्व

गीता-भागवतापेक्षाहि ज्ञानेश्वर-एकनाथ यानी संत-सद्‌गुरु यांचा महिमा विशेषिकरून वर्णिला आहे सद्‌गुरूचें मार्गदर्शन लाभावें हे गीतेनें सांगितले असलें तरी साधकाच्या आत्मप्रत्ययावर गीतेचा विशेष भर आहे भागवतात गीतेपेक्षा अधिक महत्त्व सद्‌गुरूच्या उपासनेस मिळाले आहे ज्ञानेश्वर-एकनाथाची गुरुभक्ति तर विख्यात आहेच एका-जनार्दन हे नाव धारण करून एकनाथानीं आपल्या गुरूस आणि गुरूभक्तीस अमर केलें आहे 'गुरु आणि परब्रह्म अभिन्न आहेत,'[५६] सद्‌गुरूचें वर्णन करताना वाणी कुंठित होते

> त्या सद्‌गुरूचे लक्षण सांगता शब्द थोटावे जाण
> तो सनातन ब्रह्म परिपूर्ण — ए भा १०-१२४

सद्‌गुरु ही परमेश्वरमूर्ती मानणे हीच भक्ति आहे[५७] असें एकनाथ मानतात देव, भक्ति, मोक्षसाधन या सर्वांचा समावेश त्यानी गुरूच्या ठिकाणी केला आहे 'वेदासी अगोचर ज्ञानासी कानडें' असलेले परब्रह्म सद्‌गुरूच्या चरणी सापडते[५८] सर्वभूती देव आणि देहीं देव दाखविणाऱ्या गुरूच्या ऋणातून मुक्त होणे अशक्य आहे म्हणून चरणीं माथा ठेवणें हेंच युक्त[५९]

## नाथांचा भक्तियोग

मोक्षमार्गाचे प्रदर्शक म्हणून सद्गुरु आणि संत यांचें महत्त्व विशेष असलें तरी प्रत्यक्ष मोक्षप्राप्तीसाठीं एकनिष्ठ भक्ति आवश्यक असतें भक्ति ही भागवतधर्मानें मानलेली स्वतंत्र निष्ठा आहे.[६०] ज्ञान आणि कर्म या मार्गांना आडवाटा फुटण्याची शक्यता असते भक्तीचें तसें नाहीं मोक्षाच्या गावास जाणारी ती सरळ वाट आहे असें ज्ञानेश्वरादिक संत सांगतात ती साधकावस्थेंत सुरु होते आणि अद्वैतानुभवातहि उरते अशी महाराष्ट्रातील संतांची भूमिका आहे गीता–भागवतातील भक्ति कर्मयोगाशीं निगडित झालेली आहे शंकराचार्यांना 'भजन भक्तिः' एवढेंच तिचें मर्यादित स्वरूप दिसलें. 'परमप्रेमरूप' भक्ति नारद–शांडिल्यादि सूत्रकारांनीं मानली आहे प्रेमरूप भक्तीचाच विस्तार महाराष्ट्राखेरीज इतर प्रांतात झाला आहे 'जें जें भेटे भूत त्या त्या मानी भगवंत' हा ज्ञानेश्वराचा भक्तियोग आहे निष्काम कर्मयोगाशी निगडित असलेल्या भक्तीचा पुरस्कार एकनाथानी केला आहे. नाथानीं वर्णिलेले सद्गुरु, संत आणि भक्त ज्ञानप्राप्तीनंतर देखील विश्वाच्या उद्धारार्थ कार्यरत असतात त्याचे कारण निष्काम कर्मयोगाचें अधिष्ठान या भक्तीस आहे हे देता येईल. 'सर्वात्मभाव मोक्ष' ही शंकराचार्यांची मोक्षाची कल्पना नाथाच्या भक्तिभावनेंत प्रतिबिंबित झाली आहे. 'भगवद्भाव सर्वभूतीं हेंचि ज्ञान हेंचि भक्ति' असें एकनाथ आवर्जून सांगतात [६१] गुळाला सोडून गोडी राहू शकत नाही त्याचप्रमाणें भक्तीच्या आश्रयाविना मुक्ति राहणें अशक्य. म्हणून भक्ति श्रेष्ठ व मुक्ति कनिष्ठ [६२] ज्ञानाच्या बाबतीतहि असेंच म्हणता येईल. भक्ति हे ज्ञानाचें मूळ आहे भक्तिवृक्षास आलेलें ज्ञान हे फळ आहे भक्ति नाहीं तेथें ज्ञानाचा संभव अशक्य कारण, 'मूळ नाही तेथें फळ केवि जोडे ?'[६३] भक्तिविरहित ज्ञानाचे ठिकाणी अधःपाताची शक्यता असते भक्तींतून परिणत झालेलें ज्ञान पतनविरहित असतें या ज्ञानानें प्रपंच–परमार्थ एकरूप होतात, भक्त सुख–दुःखातीत आणि विश्वाएवढा व्यापक होतो [६४]

एकाजनार्दनी प्रपंच परमार्थ सारिखाचि होत तयालागी [६५]

जनीं जनार्दन भरला आहे[६६] या भावनेनें भक्त वावरत असतो त्याला सवत्र परमेश्वर दिसतो आणि तो स्वतः परमेश्वररूप होतो

मीच देवो मीच भक्त पूजा-उपचार मीच समस्त
हीच उपासना भक्ति धर्म अर्थ सर्व पुरती
मीच माझी करी पूजा एकाजनार्दनी नाही दुजा [६७]

'आता काय पुजू देवा माझी मज घडे सेवा'[६८] असा प्रत्यय भक्तास येतो घरीं, दारी, जनी, विजनीं सर्वस्थानीं भक्तास देवाचें दर्शन घडते[६९] या भक्तीपुढें मुक्ति तुच्छ आहे

सहजस्वरूपस्थिति तया नाव भक्ति नवविधा भक्ति भामती
ऐसा भक्तिप्रती अंगे राबे मुक्ति दास्य करी अहोराती
दासासी अनुसरणें हें तव लाजीरवाणें मूर्ख ते मुक्ति मागती
एकाजनार्दनीं एकविधा भक्ति तैं चारी मुक्ति मुक्त होती [७०]

मुक्तीपेक्षाहि श्रेष्ठ असलेली सहजास्थिति ही भक्तीची उत्कर्षावस्था आहे. नामस्मरण, भजन आणि कीर्तन या भक्तीचा आरभ आहे भक्त हा भावाचा अंकित असतो तर देव भक्ताचा अंकित असतो पुडलिकानें आज्ञा केली आणि देव विटेवर उभा राहिला शकरासारख्या भक्ताला त्यानें डोक्यावर घेतलें[७१] वस्तुस्थिति अशी आहे की, देवच धाकटा असून भक्त वडिल आहे :

भजन भावातें उपजवी देव भक्ताते निपजवी
ऐसा भजनेंच देव केला भक्त वडिल देव धाकुला
भक्ताकारणें हा सकल्प भक्त देवाचाहि बाप
देव भक्ताचिया पोटीं जाला म्हणुनी आवड मोठी
एकाजनार्दनीं नवलावो भक्ताचि कैसा जाला देवो[७२]

भजन, कीर्तन आणि नामस्मरण यापैकीं कोणत्याहि साधनाचा अवलब केला तरी भक्त हा देव होतो[७३] भक्तीच्या क्षेत्रात जाति, कुल, वर्ण हे अकारण आहेत प्रपच आणि परमार्थ यामध्यें दिसणाऱ्या विरोधाचा भक्तीच्या सुलभ मार्गानें परिहार करता येतो भक्तिप्रधान भागवतधर्मातील भक्तियोगाचें स्वरूप थोडक्यात वरीलप्रमाणें आहे

## कर्मः ईशभक्तीचें वर्म

नाथांनी प्रतिपादिलेला भक्तियोग हें त्यांनीं पुरस्कारिलेल्या भागवत धर्माचें महत्त्वाचें अंग आहे रूढिग्रस्त परंपरेनें धर्माचें स्वरूप बरेंच जटिल आणि दुर्गम झालें असतांना नाथांनी भागवतधर्मास उजळा दिला. प्रचलित धर्म शुद्ध स्वरूपांत राहिला असता तर महाराष्ट्रीय संतांना भागवत-धर्माचा उपदेश करण्याचें कारणहि नव्हतें वस्तुस्थिति तशी नव्हती ज्ञानेश्वरांच्या काळांत परधर्मांचे आक्रमण झाले नसलें तरी कर्मठांच्या विपरीत कल्पनांनी धर्माला अवकळा आली होती धर्माचे स्वरूप 'प्राकृतांस' कळणें अशक्य झालें होतें ज्ञानेशांनी ही कोंडी फोडली आणि मराठीच्या नगरीं ब्रह्मविद्येचा सुकाळ केला ज्ञानेशांनीं अल्पवयांत आपल्या अवताराची समाप्ती केली. त्यानंतर लगेच 'तुर्कांची धाडी' महाराष्ट्रावर आली. महा-राष्ट्राचे शस्त्रबळ अपुरें ठरलें यवनसत्तेचें त्यामुळे फावलें. यवनांची सत्ता म्हणजे दुधारी तरवारः राजकीय सत्तेची काळ आणि जितांचा धर्म नेस्तना-बूद करण्यास बद्धपरिकर या दुधारी शस्त्रानें महाराष्ट्र जर्जर झाला, हताश मात्र झाला नाही शस्त्रबळ संघटित करून या सत्तेचा प्रतिकार करण्याचे प्रयत्न शेजारच्या प्रांतांत झाले शस्त्र जिताचें असो की जेत्याचें त्याच्या सामर्थ्याला मर्यादा ही आहेच तें अजिंक्य असतें असें थोडेंच आहे ? म्हणूनच समाजांतील अजिंक्य शक्ति जागृत करण्याचा प्रयत्न ज्ञानेश्वरोत्तर काळांत एकनाथांनी केला एकनाथांनी जागविलेला भागवतधर्म समाजा-च्या अजिंक्य शक्तीस केलेलें आवाहनच होय

जीर्ण झालेल्या धर्माचा उद्धार करण्यास आवश्यक असलेली व्यापक दृष्टि नाथांना होती धर्माविषयींचें अज्ञान आणि परधर्मीयांचें आक्रमण या कात्रींत गवसलेल्या समाजाची मुक्तता करण्यासाठी केवळ तत्त्वोपदेश अपुरा पडला असता धर्माचें सामर्थ्य धर्मानुयायांच्या धर्मविषयक निष्ठेंत असतें जाणत्यांचा वर्ग नेहमीच अल्पसंख्य असतो तो कितीहि समर्थ असला तरी राष्ट्राचे सामर्थ्य वाढविण्यास संपूर्ण समाजाची निष्ठाच अत्यावश्यक असते मूठभर लोकांच्या ध्येयवादानें संपूर्ण समाज जागृत होत नसतो. असा ध्येयवाद व्यक्तिजीवन कृतार्थ करू शकेल पण, समष्टि-

जीवनाची समृद्धी त्याने होणार नाही थोर तत्त्वज्ञान सांगणारे ज्ञानी तत्त्ववेत्ते भारतात पुष्कळ होऊन गेले असले तरी समाजाच्या उन्मार्गगामी प्रवृत्तींचें उन्नयन करण्याचें यश फार थोडयाना संपादन करता आलें

अशा थोडया लोकाच्या मालिकेंत एकनाथाचें स्थान फार मानाचें आहे समाज कसा आहे याचें सम्यक् ज्ञान त्याना होतें वेगवेगळया थरात अधर्म कशा रीतीनें नादत आहे याची जाणीव त्याना होती. तो कसा असावा याविषयींच्या त्याच्या कल्पना स्पष्ट होत्या हे नाथाच्या अभंग-भारुडावरून दृष्टोत्पत्तीस येते सुमारें पाऊणलाख ग्रंथरचना करूनहि त्याच्या भूमिकेंत विसंगति कोठेच आढळत नाही आरसा लहान असो किंवा मोठा त्यात समग्र प्रतिबिंब दिसावे त्याप्रमाणें एकनाथाच्या वाङ्मया-दर्शांत त्याचा ध्येयवाद प्रतिबिंबित झालेला दिसतो प्राकृताच्या उद्धाराची अजोड तळमळ ही नाथवाङ्मयाची प्रेरणा आहे बालकाच्या दर्शनानें सुदृढ प्रकृतीच्या मातेच्या अमृतकुंभास धारा फुटतात, त्यामुळे बालकाची धनी पुरते व माता कृतार्थ होते तसा प्रकार नाथाच्या वाणीच्या बाबतींत घडला आहे निरभिमानी दाता दान करून स्वतःस कृतार्थ मानतो व दान घेणाराहि अशा दानानें संतृप्त होतो तसें नाथाचें ज्ञानदान आहे लोकांविषयीं वाटणाऱ्या जिव्हाळ्यातून नाथवाङ्मय झालें लोकाचें मार्ग-दर्शन करूनहि आपण जनार्दनपूजा करीत आहोंत. या निष्ठेनें नाथानीं जनींजनार्दन आळविला. नाथाच्या या स्वभावधर्मानें धर्माला दृढ असें अधिष्ठान समाजात प्राप्त झाले

'धर्म म्हणजे ज्ञान साधन'[७४] अशी धर्माची व्याख्या भागवती टीकेंत नाथानीं केली आहे जनीं जनार्दन भरलेला आहे हे ज्ञान— केवळ शब्दज्ञान नव्हे तर त्याचा जिवंत अनुभव — हे धर्माचें साध्य. अधर्म आणि अज्ञान खऱ्या धर्माच्या आड येतात त्यामुळें असत्याचें फावतें व ढोंग प्रतिष्ठित होतें परमेश्वर जवळ असून सापडत नाहीं, सर्वत्र असून दिसत नाहीं या अज्ञानामुळें व्यक्तिव्यक्तींतील भेदभाव जन्मास येतात व लोक खरा देव सोडून फजीतखोर देवाच्या नादीं लागतात व्यक्ती-बरोबरच समाजाची होणारी अधोगति हा या अज्ञानाचाच परिणाम आहे म्हणून खऱ्या धर्माचें ज्ञान होणें आवश्यक आहे. धर्माची

महती एवढी मोठी आहे कीं, त्याचें रक्षण करण्यासाठी स्वत भगवान् अवतार घेत असतो भक्तानें स्वधर्माचे परिपालन केल्यानें एकीकडे भगवताच्या मनोगताचा आदर केल्याचें श्रेय मिळतें तर दुसरीकडे समाजाची धारणाहि घडते धर्मरक्षण करणारा भक्त आत्मोद्धार, विश्वोद्धार आणि ईशभक्ति असें त्रिविध कार्य करीत असतो :

जया करणें आत्महित स्वधर्म आचरावा सतत
कर्में नित्यनैमित्तिक ब्रह्मप्राप्तीलागी देख
तींचि नित्य आचरावीं चित्तशुद्धी तेणें व्हावी
एकाजनार्दनीं कर्म ईशभक्तींचें हें वर्म ॥ ७५

कर्म–ब्रह्म एकरूप असल्याचा विवेक वेदातानें सागितला आहे ७६ नित्य–नैमित्तिक कर्मे आचरून स्वधर्म हा पाळलाच पाहिजे.७७ कर्मत्यागरूपी सन्यास हा खरा धर्म नाही. सन्यासाश्रमाची व धर्माची ती विटबणा आहे. सर्वाठायी नारायण पाहणें आणि वासनावर विजय मिळवून वर्णाश्रमपरत्वें कर्म करणें हा खरा धर्म आहे ७८ हाच धवलभागवतधर्म समाजाची धारणा करतो. कर्म सोडल्यानें व्यक्तीचा व समाजाचा उद्धार होत नाहीं धर्माशी तें विसगत आहे. कर्मत्याग हा कर्मबधनातून मुक्त होण्याचा मार्ग नसून निष्कामकर्मयोग म्हणजेच भागवतधर्म हा कर्मातीत होण्याचा खरा मार्ग आहे

## एकनाथांनीं केलेलें धर्मरक्षण

ईश्वरार्पणपूर्वक केलेलें कर्म समाजास उपकारक ठरतें व्यक्तिगत आभि-लाषेपासून मुक्त असलेला हा कर्मयोग विश्वविकासास आवश्यक असलेल्या शाश्वत तत्त्वाचें सरक्षण करतो विश्वास तारण्याचें सामर्थ्य त्यात असतें म्हणून धर्मग्लानीच्या काळात प्राचीन काळापासून त्याचा उपदेश करण्यात आला आहे एकनाथाचा कालहि पराकाष्ठेच्या धर्मग्लानीचा होता धर्म केवळ अधर्मानें झाकळूनच गेला नव्हता तर त्यास जमीनदोस्त करण्या-साठी परधर्मानें कबर कसली होती या बिकट परिस्थितींतून महाराष्ट्राचा उद्धार करण्यासाठी नाथाचा भागवतधर्म अवतीर्ण झाला केशवमहिपति

यानीं नाथाना पांडुरंगाचा अवतार गणलें आहे ते केवळ भोळ्या भावनेनें असेलहि. परंतु 'धर्मरक्षणार्थ भगवान् अवतार घेतो' ही भागवतधर्माची निष्ठा या कथनाच्या मुळाशीं नसेल असे मात्र म्हणता येणार नाहीं

धर्म आणि कर्म यांचा समाजाच्या विकासाशी असलेला अनिवार्य संबंध भागवतधर्माच्या मूळ प्रेरणेचें वर्म समजल्याशिवाय ध्यानात येत नाही. प्रपंच व परमार्थ यांची एकरूपता, जन आणि जनार्दन यांचें ऐक्य, कर्म आणि ब्रह्म यांची अभिन्नता हे नाथोक्त भागवतधर्मांचे विशेष एकनाथानीं भागवतधर्माच्या प्रेरणेस आणि परंपरेस आत्मसात् केले होते हेच दर्शवितात ऋतापासून हे विश्व उदयास आलें, ऋतानेंच त्याची धारणा होतें आणि ऋताच्या मार्गानेंच त्याचा विकास घडतो म्हणून ऋतोपासना हीच सर्वश्रेष्ठ ईशपूजा आहे ही भागवतधर्माची मूलभूत भूमिका नाथाच्या तत्त्वज्ञानात आढळते ऋताचे उत्तरकालीन पर्यायशब्द सत्य आणि धर्म हे याच अर्थानें नाथानीं योजल्यामुळें नाथाच्या भागवतधर्मात निष्काम कर्मयोगाचा पुरस्कार केलेला आढळतो विश्वाच्या रूपानें ऋताचीच अभिव्यक्ति होत असल्यामुळें प्रपंचातून निवृत्त होण्याचा उपदेश त्यांनीं केला नाहीं उलट, विश्वाच्या धारणेस आवश्यक असलेल्या परमेश्वरार्पणपूर्वक निष्काम कर्मयोगाचा म्हणजेच ऋतोपासनेचा मार्ग त्यांनी समाजापुढें ठेवला म्हणूनच कर्म व ब्रह्म अभिन्न आहेत व प्रपंच आणि परमार्थ परस्परपूरक आहेत असें प्रतिपादन नाथवाङ्मयात आढळतें एकनाथाच्या अभंगवाणीच्याद्वारें त्यांनीं प्रतिपादिलेल्या भागवतधर्माचें स्वरूप या प्रकरणात विशद केलें आहे नाथानीं आपणास अभिप्रेत असलेल्या भागवतधर्माचा विस्तार एकादश स्कंधावरील मराठी टीकेंत केला आहे म्हणून नाथोक्त भागवतधर्माचा सविस्तर विचार एकनाथी भागवताच्या आधारानें पुढील प्रकरणात करावयाचा आहे



# १५. टीपा

१ "Systems of Philosophy can be understood only in relation to their time and place All thonght is dialogue with circumstance It ( intllect ) works in service and with material of entire Human Being"

– Radhakrihnan (Dr )S , *History of Philosophy Eastern and Western*, Vol II P 439

१ तुकारामतात्या, (स) **एकनाथगाथा,** क्र १५०

३ **कित्ता,** क्र १०२५, ४ **कित्ता,** क्र १०२६

५ पृ ३९ ते ४१      ६ **ए भा.** ४–२८३, ६–८०–८१

७ **गीता** ४–७ व ८,    **भागवत,** १–३–१३, २–७–१०

८ आवटे, **एकनाथगाथा,**   क्र १७९०–९१

९ **भागवत,** १–३–१३,   **विष्णुपुराण,** अश २ अध्याय १८

१० **विष्णुपुराण,** ३–१८–२३ ते ३० व ५०

११ आवटे **एकनाथगाथा,** क्र ३३४६,

१२ **कित्ता,** क्र ३९१४      १३ **कित्ता,** क्र ३९४१ व ३९७८

१४ पृ १९ व २०

१५–१६ क्र ५६५, ५७८, ५७४, ५७१, ५८४, ५५१, ६०४ या व इतर अभगातहि वेदोपनिषदोक्त परब्रह्म आणि विठ्ठल याची एकरूपता वर्णिली आहे

१७ आवटे, **एकनाथगाथा,** क्र ५६४,

१८. **कित्ता,** क्र ३३४, १९ **कित्ता,** क्र ३३०,
२०. **कित्ता,** क्र ३३०, २१ **कित्ता,** क्र ३२४,
२२ **कित्ता** क्र ३५८, २३ **कित्ता,** क्र ३५५,
२४. **कित्ता** क्र ४४७, २५ **कित्ता,** क्र ४४५,
२६. **कित्ता,** क्र २८८८–८९, २७ **कित्ता,** क्र २८९२–९४,
२८. **कित्ता,** क्र २९०६–१४, २९ **कित्ता,** क्र ३–२७१,
३० **ए भा** २–२४२ व २४७ ३१ **कित्ता,** १८–५१२–५३,
३२ **कित्ता,** २०–१६
३३ आवटे **एकनाथमहाराजाचा गाथा,** क्र २५८१
३४ आवटे सपादित एकनाथ महाराजाच्या गाथ्यात असे अनेक अभग आढळतील, विशेषत क्र ३०४२ ते ३०८२ या अभगांत ही तळमळ अधिक दिसून येते
३५ अनेक महाराष्ट्रकविकृत **पदसग्रह,** भाग १ला पृ ३४ व ५८ नाथांच्या जोहारात देखील असाच उपदेश आला आहे आवटे, **एकनाथमहाराजाचा गाथा,** क्र ३८६२ ते ३८९८
३६. आवटे **एकनाथमहराजाचा गाथा,** क्र ३२६१
३७ **कित्ता,** क्र ३२६२, ३८. **ए. भा** २३–३८९ ते ३९४
३९ **हस्तामलक,** ५७७ ते ५७९
४० Ranade, R D. *Mysticism in Maharastra*, **P. 256.**
४१ आवटे, **एकनाथमहाराजाचा गाथा,** क्र १७९०–९१
४२ **कित्ता,** क्र १८०४, ४३ **कित्ता,** क्र ३०६३
४४ **कित्ता,** क्र १६९५, १७१०, ४५ **कित्ता,** क्र १७४५
४६ **कित्ता,** क्र १७५९, ४७ **कित्ता,** क्र १७७५
४८ **कित्ता,** क्र १७८६, ४९ **कित्ता,** क्र १७९०–९१
५० **कित्ता,** क्र १७९४, ५१ **कित्ता,** क्र १७०४, १७३७
५२ **कित्ता,** क्र १६३९, ५३ **कित्ता,** क्र १५९०, १६४७–८,
५४ **कित्ता,** क्र १५८७–९२, ५५ **कित्ता,** क्र ८४३,
५६ **ए भा.** १०–११८ ५७ **कित्ता,** १२–४९७,
५८, आवटे, **एकनाथमहाराजाचा गाथा,** क्र.१७९७,

५९ **किता**, क्र १८२०, ६० पृ ६० व ६१
६१ आवटे, **एकनाथमहाराजाचा गाथा**, क्र २३२९,
६२ **किता**, क्र २१११, ६३ **किता**, क्र २२९१
६४ **किता**, क्र २२८९, ६५ **किता**, क्र २३१३,
६६ **किता**, क्र २३५२, ६७ **किता**, क्र ३३७४,
६८ **किता**, क्र २४०२, ६९ **किता**, क्र २४१३,
७० **किती**, क्र २५७२, ७१ **किता**, क्र ६०६,
७२ **किता**, क्र १४६६, ७३ **किता**, क्र ७१३
७४ **ए. भा** १५–२२५
७५ आवटे, **एकनाथमहाराजाचा गाथा** क्र २८३२
७६ **किता**, क्र २८४९ ७७ **किता**, क्र ३२७५–६
७८ **किता**, क्र २६४६,

———

# १६. एकनाथप्रणीत भागवतधर्म :२:

एका आणि एकादश–भक्तिप्रधान भागवतशास्त्र –ऋताधिष्ठित भागवत-धर्म–भक्ति सुलभ साधन –मुख्य भक्ति सर्वभूतीं भगवद्भाव–भक्ति सहजप्रकाश–नाथाच्या थोरवीचें वर्म–निष्कामकर्मयोग–भक्तिपूर्वक कर्म आणि कर्माधिष्ठित भक्ति–नाथाचे वैशिष्ट्य–

भागवत पुराणात एकादशस्कंध हा तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें महत्त्वाचा गणला जातो एकनाथानीं आपल्या मराठी टीकेंत कित्येक ठिकाणीं एकादश स्कंधाचें महत्त्व वर्णिलें आहे एकादशातील ज्ञान वेदशास्त्राचें 'मथित' आहे, उद्धवासारख्या भक्ताचें निमित्त करून भगवतानीं विश्वोद्धारासाठीं हें पावन ज्ञान प्रकट केलें, आपल्या पित्याला आणि मातेलासुद्धा जें रहस्य कृष्णानें सांगितलें नाहीं तें भक्ताची कणव घेऊन त्यानें प्रकट केलें, सर्व-भूतीं भगवद्भाव बाणल्यावाचून भागवतातील या सोलीव ज्ञानाचें रहस्य कळणार नाहीं, असा नाथानीं वर्णिलेल्या एकादश माहात्म्याचा साराश आहे :

एकादशाच्या तात्पर्यार्थीं साक्षेपें सविस्तारें मुक्ती
बोललासे आचतीं परमात्मस्थिती निजबोधु[१]

## एका आणि एकादश

या माहात्म्यापेक्षाहि एक महत्त्वाचें रहस्य नाथांनीं प्रारंभीं सांगितलें आहे त्यावरून एकनाथी भागवताच्या व नाथप्रणीत भागवतधर्माच्याहि उद्दिष्टाचा उलगडा होतो कोणता ग्रंथ रचावा अशी सज्जनाच्या मेळ्यात प्रार्थना केली असताना पुराणात श्रेष्ठ भागवत व त्याहीमाजीं श्रेष्ठ असले-

त्या एकादशाचें व्याख्यान करावें असा आदेश संतांनीं दिला या वाक्य-प्रसादानें एकनाथाना आनद झाला या आनदातच त्यानी आपल्या कुलदेवतेची प्रार्थना केली. नाथाची कुलदेवता एकवीरा :

एकरूप दाविलें मनी तव एकचि दिसे जनीं वनीं
ऐसे एकचि कानी वदनी एकपणें एकवीरा

या एकरूप दर्शनानतर सद्गुरूचें चिंतन केले तोहि

जनी विजनी समानू सदा सपूर्ण समत्वें
सागर सरिता जीवन एक परि मिळणी भजन दिसे अधिक
तैसें एकपणेंचि देख भजनसुख उल्हासे

ऐक्याच्या आणि सामरस्याच्या या अनुभवानतर एकनाथ जो ग्रथ करण्यास प्रवृत्त झाले तो हा एकादश त्याच्या स्वभावाशी आणि ऐक्यानुभवाशी हा ग्रंथ जुळण्यासारखा असल्यानें तो त्याना करावा लागला नाही, तर, 'ग्रथ होती स्वभावें–' तो स्वभावतःच झाला कारण,

घटित एका आणि एकादशे राशिनक्षत्र एकचि असे
त्या एकामाजी जे पूर्ण दिसे ते दशा दशाशें चढे अधिक[२]

वरील ओवीच्या पहिल्या चरणातील एका हा शब्द श्लेषार्थानें घेतला–एका–एकनाथ आणि ऐक्य किंवा अद्वैतानुभूती-म्हणजे नाथाच्या विवरणाचा अर्थ जास्त स्पष्ट होतो एकादशात असलेल्या पूर्णबोधाचें आणि एकनाथाच्या स्वानदानुभवाचें घटित–गोत्र 'एक'च असल्यानें एकादशा वरील टीका स्वभावत झाली असा वरील ओवीचा भावार्थ निघतो जनीं विजनीं, एकाती लोकातीं, पिंडी ब्रह्मांडीं, सर्वत्र एकच तत्त्व भरलेलें आहे ही नाथाची प्रकृति एकादश स्कधावरील टीकेंतहि प्रतिबिंबित झाली आहे. नाथाची भक्ति, भजन, ज्ञान, विज्ञान, धर्म, कर्म, प्रपच आणि परमार्थ या सर्वांचें स्वरूप या अद्वैतानेंच त्यानीं प्रकट केलें आहे जनीं जनार्दन हा त्याच्या भक्तीचा निष्कर्ष आहे त्याचें ज्ञानहि अद्वयानदात दग होऊन मौन धारण करतें, भक्तीचें किंवा आनिर्वचनीय आनदाचें वर्णन करताना या आनंदाची अनिर्वचनीयता त्यानीं स्पष्ट केली आहे अेकनाथी भागवता-प्रमाणेंच त्याच्या इतर स्फुट ग्रथातहि या आनंदाचें वर्णन नाथानीं जागो-जाग केलें आहे.[३]

परस्परें निजसंवादू करिता जाहला स्वरूप-बोधू
नेत्रीं जळ अंगीं स्वेदु प्राण स्फुंदू पागुळे
चित्तचैतन्या होता भेटी हर्ष बाष्प दाटे कंठी
पुलकित रोमांच उठी उन्मीलन दृष्टी पुजाळे
मीपणाचेनि अवरोधें गिळिलों होतों मोहमदें
तो सुटलों गुरुकृपाबोधें तेणे परमानंदे डुल्लत

— ए. भा. ३-५९०, ५९१, ५९४

एका आणि एकादश यांचें घटित गोत्र एकत्र असल्याचें एकनाथ सांगतात तें अद्वयानंदाच्या वरील वर्णनावरून चांगलेंच लक्षांत भरतें अद्वैतप्रतीती हे त्यांच्या उपदेशाचें, भक्तीचें आणि भागवतधर्माचे सार आहे एकादश-स्कंधात या प्रतीतीस अधिक वाव असल्यामुळें एकनाथ एकादशस्कंधावरील टीकेंत अधिक रमले म्हणूनच आचार्य विनोबा भावे म्हणतात, 'नाथाचे दुसरेहि प्रबंधग्रंथ पाहण्यात आले ते सगळेच सद्भावनेनें भरलेले आहेत. पण भागवताची जादू त्यांत नाहीं यांत नवल नाहीं माणसाचें हृदय दहा वस्तूंत उतरलें जाऊ शकत नाहीं नाथानी जी समरसता भागवतांत अनुभविली तीच त्यांच्या इतर प्रबंधग्रंथांत अनुभविली असेल असें म्हणणें धाडसाचें होईल '[४]

## भक्तिप्रधान भागवतशास्त्र

एकादशस्कंधावरील टीकेंत नाथानीं पुरस्कारिलेल्या भागवतधर्माचें स्वरूप समजून घेण्यापूर्वी त्याना अभिप्रेत असलेली भागवतधर्माची व्याख्या लक्षांत घेणें आवश्यक आहे प्रारंभीच्या एका प्रकरणांत भागवतधर्म या शब्दाची व्युत्पत्ति व स्पष्टीकरण या संबंधीचें विवरण आलें आहे[५] (१) भगवंताचा भक्त तो भागवत त्याचा धर्म तो भागवतधर्म आणि (२) भगवंताचा म्हणजे भगवंतानी उपदेशिलेला धर्म तो भागवतधर्म असे दोन अर्थ भागवतधर्म या पदाचे होतात हे दोन्ही अर्थ एकनाथास अभिप्रेत आहेत भगवंतानी उपदेशिलेला धर्म भक्ताच्या आचरणांत कोण-त्या प्रकारें दिसून येतो याचें विवेचन नाथानी केलें आहे भगवंताच्या उपदेशाचा विस्तार करून त्याबरोबरच भक्ताचें म्हणजे भागवताचें

वर्णनहि नाथानी केलें आहे त्यावरून भगवतानीं उपदेशिलेला आणि भक्ताच्या आचरणात साकारलेला धर्म म्हणजे समग्र भागवतधर्म अशी नाथाची या धर्मासबधीची कल्पना आहे हे स्पष्टच होतें.

ज्ञानमार्ग हा विद्वानाना इद्रियसयमनाच्या द्वारें साध्य होऊ शकतो. कर्ममार्ग हाहि त्याचें वर्म समजलें नाही तर निष्फल ठरतो यासाठीं सर्वांना सुलभ असलेला मार्ग म्हणजे भाक्तिप्रधान भागवतधर्म हाच होय :

येथे धरितां पुरे भावो तै बुडणेचि होय वावो
मग ठाकावा जो ठावो तो स्वयमेवो आपण होय
येथे पोहणेयावीण तरणें प्रयासेवीण प्राप्ती घेणे
सुखोपायें ब्रह्म पावणें यालागीं नारायणें प्रकाशली भक्ति
भागवतधर्माची स्थिति भोळीं भवाब्धि तरती
सुखोपायें ब्रह्मप्राप्ती ए भा २–३१६ ते १८

या धर्मावर ज्याचा विश्वास असतो त्याना विधिनिषेध, स्वधर्म–कर्म इत्यादिकाचें बधन बाधित नाही भागवत सर्व कर्मे परमेश्वरास अर्पण करीत असतो. म्हणून इद्रियाचें दमन न करता अथवा प्रपचाचा त्याग न करता तो नित्य मुक्तीचा अनुभव घेत असतो.[६]

## ऋताधिष्ठित भागवतधर्म

भागवतधर्म हा भक्तिप्रधान आहे [७] इतर बाबींना महत्त्व नाहीं असें नाही. परतु भक्तीचें मूलाधिष्ठान या धर्मास असल्यानें भक्तीचें स्वरूप समजून घेणें अगत्याचें ठरतें नाथाची भक्ति-कल्पना फारच व्यापक आहे भागवतधर्माच्या मूल प्रेरणेंतून ती परिणत झाली आहे ऋत किंवा धर्म या भक्तीचें किंवा भागवतधर्माचें अधिष्ठान आहे. विश्वाचा विकास विशिष्ट नियमानें होत असतो वेदात यालाच 'ऋत' ही सज्ञा दिली आहे ज्या-नियमाने विश्व बद्ध झालें आहे, विश्वाचें सवर्धन ज्यायोगें होतें, देव स्वत ज्याचें सरक्षण करतात त्यास ऋत म्हणतात त्यामुळें देवाच्या आणि सज्जनाच्या मार्गास 'ऋतस्य पन्था' असें सबोधण्यात येतें ऋताशी अविरोधीच नव्हे तर पोषक व सवर्धक असें सज्जनाचे वर्तन असतें, म्हणून

देव ज्या विश्वनियमाचें परिपालन करतात तोच मार्ग सज्जनहि अव लंबितात याचाच अर्थ असा होतो की, ऋतास म्हणजे विश्वाच्या प्रगतीस पोषक असेल तें सत्कर्म आणि विरोधी असेल ते असत्कर्म. 'सत्' या शब्दाचा अर्थ देखील 'सतत टिकणारे' किंवा शाश्वत असा होतो ज्याचें निर्मूलन होऊ शकत नाही तें सत् किंवा कर्म हा अर्थहि यामुळेंच ऋताला आला सत्य आणि कर्म हे अविनाशी असल्यामुळे तें ब्रह्मसंज्ञक बनलें परमेश्वरस्वरूप आणि परमेश्वरप्राप्तीचा उपाय असा यज्ञ ऋताच्या रूपानें याज्ञिकांनीं पाहिला म्हणूनच भिन्न काळात सत्य, ब्रह्म, यज्ञ, धर्म असे पर्यायवाचक शब्द ऋताचा निर्देश करण्यासाठी अस्तित्वात आले कारण, सत्याच्या आराधनेसाठी, ब्रह्माच्याप्राप्तीसाठी किंवा यज्ञाच्या परिपूर्ती-साठी होणारें कर्म आपण ऋतसवर्धनार्थच करीत आहोंत ही प्राचीनाची श्रद्धा होती हीच श्रद्धा पुढें धर्म या सज्ञेच्याद्वारें व्यक्त होऊ लागली 'नास्ति सत्यात् परो धर्मः' हे महाभारताचें वचन किंवा 'सत्यापरता नाही धर्म' हे सतवचन धर्म ऋतोद्भव असल्याची साक्ष देतात 'कर्म हे ब्रह्मो-द्भव आहे, ब्रह्म हे कर्मसभूत आहे, सर्वगत असलेलें ब्रह्म नित्य यज्ञात म्हणजे स्वधर्माचरणात प्रतिष्ठित झालें आहे ही कर्म–ब्रह्मासबधीची गीतेची मीमासा धर्माच्या ऋतमय परपरेंतून परिणत झाली आहे [८] (गीतेंतील उपरोक्त आशयाच्या श्लोकावर भाष्य करताना ज्ञानेश्वरानी यज्ञ या शब्दाचा स्वधर्म असा अर्थ केला आहे– ज्ञा. ३–१४०) ऋताचे अर्थ व धर्म आणि ऋत याचे अन्योन्य सबध यासबधींचें सविस्तर विवेचन पूर्वींच आलें आहे [९] त्याची पुनरुक्ति न करता पूर्वींच्या विवेचनाच्या सदर्भात नाथानीं ऋत-परपरा कशी चालविली हेंच याठिकाणीं पहावयाचें आहे

यापूर्वींच्याच प्रकरणात धर्म या शब्दात वेदोक्त ऋताचा अर्थ नाथानीं कसा समाविष्ट केला आहे हे दर्शविलेंच आहे ऋतरक्षणार्थ देव बद्ध-परिकर असतात ही ऋतोद्भव धर्मकल्पना गीतेच्या चौथ्या अध्यायात आली आहेच एकनाथी भागवताच्या प्रारभीं नाथानीं याच धर्माचें स्पष्टीकरण केलें आहे.[१०] ऋताचा मार्ग हा सज्जनाचा मार्ग असतो ही वेदोक्त विचारसरणी धर्माच्या रक्षणासाठीं साधूचा अवतार होत असतो या एकनाथाच्या सिद्धातात प्रतिबिंबित झाली आहे [११] कर्म आणि ब्रह्म

अभिन्न आहेत, देव आणि संत एकरूप असतात हे नाथवाङ्मयात आढळून येणारे सिद्धांतहि 'ऋतजात' आहेत हे ऋतासंबंधींच्या पूर्वीच्या विवरणाच्या संदर्भांत अभ्यासिलें असतांना लक्षांत येईलच. धर्मरक्षणार्थ भगवान् अवतार घेतो किंवा संत धर्मरक्षण करतात या नाथांच्या प्रतिपादनांत केवळ भोळा भाव किंवा अंधविश्वास मुळींच नाहीं. विश्वनियम आणि सत्य यांच्या रक्षणासाठी देव बद्धपरिकर असतात या वेदोक्त विचारसरणीतूनच नाथांचे हे सिद्धांत परिणत झाले आहेत

## भक्ति : सुलभ साधन

नाथांच्या भक्तीचाहि ऋततत्त्वाशीं असाच निकटचा संबंध आहे भक्तीचें मूळ असलेली श्रद्धा ही ऋतजात असल्याचें विवरण यापूर्वी करण्यांत आलेंच आहे [१२] नाथांची भक्ति देखील ऋतजातच आहे. कारण, ती केवळ भजनांत रमत नाही किंवा परमेश्वर-प्रेमावरच संतुष्ट होत नाही. निष्काम कर्मयोगाशीं तिचे अभेद्य नातें आहे आणि सहज प्रकाश हे तिचें स्वरूप आहे ज्ञान, कर्म आणि भक्ति या परमेश्वरप्राप्तीच्या त्रिविध साधनांपैकीं भक्ति हे अत्यंत सुलभ असें साधन असल्यामुळे भक्तीचा गौरव नाथांनीं अनेक ठिकाणी केला आहे [१३] ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग यांची तुलना करतांना मोट–पाटाचा दृष्टांत नाथांनी दिला आहे. मोटेचें पाणी काढून झाडांना देण्यांत कष्ट पडतात तसे पाटाच्या पाण्याचे नसतें म्हणून 'मोटेचे पाणी तैसें ज्ञान'[१४] आणि भक्तीचा प्रवाह हा सरितेच्या पाटासारखा असतो भक्तीपुढें सर्व साधनें बापुडीं आहेत [१५] ज्ञान आणि कर्म हीं साधनें भक्तीविना व्यर्थ होत कीर्तन–नामस्मरणादिकांच्या योगानें होणाऱ्या भक्तीचें सामर्थ्य एवढें मोठें आहे कीं, 'जवढी नामाची शक्ति : तेवढें पाप नाहीं त्रिजगतीं'[१६] अशी वस्तुस्थिति आहे या भक्तीच्या पेठीं जिवा–शिवाची भेटी होते [१७] भक्तीनें सारें विश्व भगवन्मय बनते मुंगी–मशकासारखे जीव हरिरूप वाटतात आणि भक्ताचा अहंकार विश्वाएवढा व्यापक होतो [१८] भक्त देही असून विदेही बनतो व प्रपंचात राहूनहि प्रपंचमुक्त होतो [१९]

# मुख्य भक्ति : सर्वभूतीं भगवदभाव

केवळ सुलभसाधन एवढेंच भक्तीचें महत्त्व नाहीं परमेश्वरप्राप्तीचा तो निश्चित असा मार्ग आहे तसें पाहिलें तर भगवान् सर्वत्र असतो परंतु सात्विकगुणाचा प्रकर्ष ज्याठिकाणी आढळतो त्याठिकाणी त्याचें अस्तित्व उत्कटत्वानें प्रतीत होतें पृथ्वी गधवती आहे हे खरें पण साऱ्याच मातीस सुवास नसतो तो कस्तूरीच्या ठिकाणी विशेषेंकरून आढळतो दिवा, चद्र अग्नि या ठिकाणींहि तेज असते. परतु सूर्याच्या रूपानें तेजाचा प्रकर्ष आढळतो सात्विक गुणाच्या प्रकर्ष असेल त्याठिकाणी भगवताचें स्वरूप विशेषेंकरून प्रकट होत असतें [२०] सात्विकवृत्ति वाढली म्हणजे धर्माकडे प्रवृत्ति होते धार्मिक प्रवृत्तीमुळें भजन घडतें भजनानें ज्ञान प्रकाशतें ज्ञानानें परमेश्वरप्राप्ती होते व

सर्वभूती भगवद्भावो या नाव मुख्य भक्ति पहाहो [२१]

अशी भक्ताची अवस्था होते या ज्ञानप्रकाशानें सकुचित मीपण लयास जातें आणि व्यापक आत्माभिमान जागृत होतो असा भक्त योग्याचा अग्रणी, ज्ञानियाचा शिरोमणि व सिद्धाचा मुकुटमणि असतो.[२२] तो द्वैतापासून निवृत्त झालेला असतो त्याचें कर्म ब्रह्मरूप होतें [२३] तो कोण-त्याहि वर्णात जन्माला आलेला असला तरी त्याला वर्णाभिमान नसतो [२४] असा भक्त म्हणजे परमेश्वराची सचेतन मूर्तीच त्याची पूजा केल्यानें परमेश्वराची उत्तमोत्तम पूजा होते परमेश्वरास 'पढियती' असलेली भक्ति हीच आहे[२५]

जो जातीनें नीचत्वा गेला परी भक्तिभावें उचावला
तो मद्रूपता पावला पूज्य झाला तिहीं लोकीं[२६]

आदर्श भक्ताला भक्तिसुखापुढें इतर सुखें तुच्छ वाटत असलीं तरी मनुष्यमात्राविषयीं तुच्छवृत्ति मात्र त्याच्या अतःकरणात मुळींच नसते. तर, सर्व भूताचे ठिकाणीं भगवद्भाव ही श्रेष्ठ वृत्ति त्याची असल्यामुळें तो चित्तत्वाशीं एकरूपता सपादन करतो.[२७]

## भक्ति : सहजप्रकाश

साधकावस्थेंतून सिद्धावस्थेपर्यंत भक्ताची प्रगति आणि विकास कसा घडतो याचे विवरण वर आले आहे ऋतमय भागवतधर्म हा व्याष्टिसमाष्टि-पूरक असा असतो. भक्ताचा विकास हे व्यष्टिप्रधान अग आहे याच भक्तिप्राधान्यानें समष्टीचा देखील विकास होतो जनीं जनार्दन या भावात मुरलेल्यास स्वतःसाठी काही करावयाचें शिल्लक रहात नाही मोक्षसुखापेक्षाहि श्रेष्ठ अशा परमानदात तो लोळत असतो या अवस्थेसच नाथ स्वर्ग म्हणतात मरणोत्तर लाभणारी उत्तमगति म्हणजे स्वर्ग नव्हे नाथाच्या दृष्टीने स्वर्ग भूलोकावरच आहे :

> स्वर्ग शब्दाची उत्पत्ति सत्वगुणाची व्युत्पत्ती
> जेणें निजसुखाची होय प्राप्ती परी इद्रलोकगति तो स्वर्ग नोहे
> अमरभुवना जे जे गेले ते परतोनि पतना आले
> शुद्धसत्त्वी मिसळले ते पावले निजसुख
> ऐसा जो का सत्वगुण तोचि येथे स्वर्ग जाण[२८]

स्वर्गसुखाचा आस्वाद घेत असताना भक्ताचा स्वभाव आणि परमेश्वराचा स्वभाव एकरूप होतो सृष्टीच्या मुळाशी असलेलें चित्तत्त्व आणि भक्त याची मिळणी होते भगवंताच्या या सहजस्थितीस नाथ भक्ति म्हणतात

> सहज माझी जे प्रकाशस्थिति ते भक्ति बोलिजे
> संविती बोलिजे वेदातीं शैवी शक्ति बोलिजे
> बोद्ध जिनेश नेमिनाथ जोगी म्हणती आदिनाथ
> भैरव खडेराव गाणपत्य अव्यक्त म्हणती एकपै
> ऐशी जे का प्रकाशस्थिति त्या नाव बोलिजे भक्ति
> तेणें प्रकाशे त्रिजगती उत्पत्ति स्थिति लय भासे

या प्रकाशाच्या योगाने भगवंताच्या नाना अवताराची उत्पत्ति होते–

> ऐशिया प्रकाशाची प्राप्ती ते जाण सनातन माझी भक्ति

एकनाथी भागवतात भक्तीच्या सहज प्रकाशाचें जे निरूपण आलें आहे त्यास मूळ भागवतात 'निश्चला भक्ति' या पदाचाच केवळ आधार आहे हे लक्षात घेतलें म्हणजे नाथानीं पुरस्कारिलेल्या भागवतधर्मात केवळ पौरा

णिक परपराच प्रतिबिंबित झाली नसून वेदोपनिषदानी वर्णिलेल्या ऋताच्या मूळ अधिष्ठानापर्यंत नाथ पोचले आहेत हे ध्यानात येईल ऋततत्त्वांसबधीं वेळोवेळीं केलेल्या विवरणाच्या सदर्भात नाथाच्या सहजप्रकाशरूप भक्तीचा अर्थ लावला म्हणजेहि नाथाच्या ऋतनिष्ठेचा प्रत्यय आल्यावाचून रहात नाहीं

भजनात्मक भक्ति हे व्यक्तीच्या विकासाचें प्रारभींचें साधन आहे. या साधनानें भक्त उत्तरोत्तर स्वत ची प्रगति करतो सर्वत्र परमेश्वर भरलेला आहे हा प्रत्यय विकासाच्या या मार्गावर त्याला येतो सर्वभूतीं भगवद्भाव जागृत झाला म्हणजे भक्ताला निजस्वरूपाची ओळख होते ही ओळख पटली म्हणजे भक्ताचा आणि भगवताचा स्वभाव समान होतो सत आणि सद्गुरु हे परमेश्वरच आहेत हा नाथाचा सिद्धात याच भूमिकेचा परिपाक आहे धर्मरक्षणार्थ देव अवतार घेतो त्याप्रमाणें सत धर्मोद्धाराचे कार्य करीत असतात भक्तीचा हा सहजप्रकाश भगवताच्या अवताराचें कारण आहे असें एकनाथ उपरोक्त ओव्यात सागतात कारण, अधर्मानें भगवताचा मूल प्रकाश झाकळून जातो असत्प्रवृत्तीचें पुट सत्प्रवृत्तीवर चढतें. तें दूर करण्यासाठीं धर्म जागाविणें आवश्यक असतें. धर्म जागवावयाचा म्हणजे विश्वाच्या धारणेस आवश्यक असलेला प्रकाश किंवा विश्वाची धारणा करणारे ऋततत्त्व आचरणानें व्यक्त दशेस आणणें अगत्याचें असतें भागवतधर्माचा अवतार यासाठींच झाला आहे भक्तिप्रधान भागवत-शास्त्राची भक्ति ऋताधिष्ठित आहे ती याप्रकारें. भागवतधर्मास असलेलें ऋताचें हे अधिष्ठान सत एकनाथाच्याच वाङ्मयात आढळतें म्हणूनच भागतधर्माच्या आचार्यात त्याचें स्थान अनन्यसाधारण असेंच आहे. आदर्श चारित्र्यवान्, सत, भाषाप्रभु, भगवद्भक्त, याद्दष्टीनें त्याची थोरवी वादातीत असली तरी त्याच्या थोरवीचें रहस्य त्यानीं जाणलेल्या व जाग-विलेल्या भागवतधर्माच्या मूल ऋताधिष्ठानातच आहे.

## नाथांच्या थोरवीचें वर्म

भागवतधर्माची ऋतप्रेरणा नाथानीं बुद्धीनें जाणली, भावनेनें आकळली, आचारानें साकारली, वाणीनें प्रकाशिली म्हणून ते भागवतधर्माचे

थोर प्रकाशक ठरतात कालाची निकड लक्षात घेऊन भागवतधर्माचें पुनरुज्जीवन करताना कोणत्याहि आचार्यांच्या मताचें अनुसरण न करता या धर्माची मूळ प्रेरणा लक्षात घेऊन नाथानी आपला भागवतधर्म उपदेशिला आहे ३० त्याच्या श्रेष्ठ विभूतिमत्त्वाचें हेच आदिकारण आहे.

नाथाच्या व्यक्तिमत्त्वाच्या या वैशिष्ट्याकडे विद्वानाचें लक्ष आतां पर्यंत गेलें नाहीं म्हणून या प्रबधाचा खटाटोप त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या या दर्शनावाचून नाथाचें सपूर्ण दर्शन घडेल असे वाटत नाहीं सत एकनाथ हे थोर तर खरेच परतु भागवतधर्माचे आचार्य या दृष्टीनें त्याची थोरवी अतुलनीय अशीच आहे गीता—भागवतानतर भागवतधर्माचा मूळस्वरूपात आविष्कार करणारा एवढा थोर आचार्य भारतात झाला नाहीं. भागवतपुराणानंतर होऊन गेलेल्या आचार्यांनीं समग्रभागवतधर्मापेक्षा त्याच्या एकेका अगावर विशेष भर देऊन तेवढ्याच स्वरूपाचें विशदीकरण केलें. भागवतधर्मातील अद्वैत जगन्मिथ्यावादाच्या पार्श्वभूमीवर शकराचार्यांनीं विशद केले. विशिष्टाद्वैताच्या भूमिकेवर भागवतधर्मातील प्रेममयी भक्तीचा पुरस्कार रामानुजानीं केला मध्व, निंबार्कादि आचार्यांनीं अद्वैत-वगळून केवळ परमप्रेमरूप भक्तीवर भर दिला ज्ञानेश्वरानी भागवतधर्माचा पाया महाराष्ट्रात घातला परतु त्यावर इमारत उभी राहण्यापूर्वीच महाराष्ट्र समाज आमूलाग्र ढवळून निघाला ज्ञानेशाच्या समाधीचा व त्याच्या ग्रथाचाहि जीर्णोद्धार करण्याची पाळी नाथावर आली. जीर्णोद्धाराच्या या कार्यात नाथाची दृष्टि भागवतधर्माच्या मूळ प्रेरणेपर्यंत पोचली साग व समग्र भागवतधर्माचें दर्शन त्यानीं घेतले व आपल्या वाङ्मयात तेच दर्शन ग्रथित केलें समकालीन साधुसतानी हेंच दर्शन आपल्या हृत्पटलावर कोरलें

ज्ञानेशाची अमृतवाणी आकाशवाणीसारखी तेजस्वी, ऊर्जस्वल आणि पार्थिवस्पर्शापासून अलिप्त असलेली पृथ्वीवर राहूनहि आकाशाला स्पर्श करणारी, पार्थिवाचा सबध न सोडताहि अपार्थिवाचें स्पदन अनुभवणारी, मनुष्यत्व न सोडताहि देवत्वाचा साक्षात्कार घडविणारी, पृथ्वी सोडून मिळणाऱ्या स्वर्गाला तुच्छ लेखून पृथ्वीवर स्वर्ग निर्माण करण्याची महत्त्वा-

काक्षा मूर्त स्वरूपात आणणारी अशी नाथवाणी असल्यामुळें तिनें मनुष्य देवकोटीपर्यंत कसा पोचतो आणि देव आपलें निराकाररूप सोडून मनुष्य-रूपाने कसा वावरतो याचें दर्शन घडविलें आहे

## निष्काम कर्मयोग

म्हणूनच नाथानीं वर्णिलेले साधुसत, गुरु–शिष्य, सिद्ध–साधक पृथ्वी सोडून विचरत नाहीत ससार–त्यागाचा उपदेश त्यानीं केला नाहीं किंवा दैनंदिन कर्तव्य देखील कमी लेखले नाही नाथाच्या भागवतधर्मात कर्मयोगास असलेले महत्त्व हे व्यवहार लक्षात घेऊन मिळालें नाहीं तर निराकार धर्मतत्त्व साकार करण्याच्या उद्देशानेंच कर्मयोग त्यानीं आवश्यक गणला आहे· प्रपचत्याग करून केवळ आत्मानंदात दग राहणारा आणि दीनोद्धरण न करणारा ज्ञानी त्याना भड मानला आहे तो यामुळेंच व्यक्ति कितीहि उन्नत झाली तरी धर्माचे भवितव्य समष्टीच्या सामर्थ्यावरच अवलंबून असतें समष्टीची पातळी उन्नत करण्याचें साधन एवढेंच व्यक्तिविकासाचें महत्त्व केवळ चार साधूसताची भर घालणें एवढेंच धर्माचें उद्दिष्ट नाहीं विश्वाला उजळणाऱ्या प्रकाशाचें अप्रतिहत दर्शन घडविण्यासाठीं धर्माचा अवतार आहे विश्वनियम किंवा ऋत जागविण्यासाठीं धर्म अवतीर्ण झाला आहे शबल पार्थिवाने वेढलेल्या शुद्ध तत्त्वाचा अवबोध करण्यासाठीं धर्मबद्धपरिकर झालेला असतो व्यष्टिधर्म हा या उद्दिष्टाचें एक साधन असून समष्टिधर्म हे त्याचें साध्य असतें म्हणूनच सर्वकर्मसन्यास करणारा ज्ञानी नाथानी गौण गणला आहे आणि स्वकर्मत्याग करणारा भक्त अधम लेखला आहे:

पावोनिया ब्रह्मज्ञान स्वयें उद्धरला आपण
न करी तोचि दीनोद्धरण हें भडपण ज्ञात्याचे
स्वयें तरोनि जना तारी हे ज्ञानाची अगाध थोरी
ते म्या दिधली तुझ्या करीं जन उद्धरी उद्धवा — ए भा २९–८२४

ज्ञान प्राप्त झाल्यानतर व्यक्तिविकास पूर्ण होत असला तरी समाजाचा उद्धार करण्याची जबाबदारी व्यक्तीस टाळता येत नाहीं. म्हणून ज्ञात्यानें लोकसग्रहार्थ म्हणजे समाज–रक्षणासाठीं कार्य करावयाचें असतें

तें लोकावर उपकार म्हणून नव्हे तर आपलें कर्तव्य म्हणून सर्वभूतीं भगवद्भाव हें भक्तीचें मुख्य लक्षण नाथानी दिले आहे इतकेंच नव्हे तर या लक्षणावर त्यानी विशेष भर दिला आहे हें लक्षण मान्य केले म्हणजे व्यक्तिविकासानें समग्र व्यक्तिमत्वाचा विकास साधत नाहीं हें आपोआपच उघड होते आपण एकटेंच ज्ञानमंदिराच्या शिखरावर पोंचून भागत नाहीं भूतमात्रानाहि त्याचे ठिकाणी असलेल्या परमात्मतत्त्वाची ओळख करून देणें म्हणजे लोकोद्धारार्थ कार्य करणे हें भक्तीच्या पूर्णतेचें एक आवश्यक अंग ठरतें. यासाठींच साधकावस्थेपासून सिद्धावस्थेपर्यंत आणि सिद्धावस्था प्राप्त झाल्यानतर देखील निष्काम कर्मयोगाचें आचरण आवश्यक ठरतें नाथानीं आपल्या वाङ्मयात याच दृष्टीने निष्कामकर्मयोगावर आणि स्वधर्माचरणावर भर दिला आहे.

निष्कामकर्मयोगावर भर देण्याचे दुसरेंहि एक कारण होतें बुद्धोत्तर काळापासून भारतीय मनावर सन्यासाश्रमाचा पगडा इतका बसला होता कीं, जो सन्यासी नाहीं तो साधूच नव्हे अशी समजून रूढ झाली होती शकराचार्यांच्या सर्वकर्मसन्यासपूर्वक आत्मनिष्ठेनें तर या आश्रमाची प्रतिष्ठा अधिकच वाढली महाराष्ट्रानें ही संन्यासनिष्ठा कधीच मानली नाहीं ज्ञानेश्वरापासून लोकमान्य टिळकापर्यंतच नव्हे तर विनोबा भाव्यापर्यंत गीतेंतील निष्काम कर्मयोगाचा व ज्ञानोत्तर कर्माचा पुरस्कार महाराष्ट्रानें केला आहे कारण, ज्ञानप्राप्तीनतर समाजातील सुबुद्धवर्ग गिरिकंदरात राहू लागला तर आचरणासाठीं सामान्य माणसानें आदर्श ठेवावयाचा कोणता ? विश्वाच्या शाश्वत नियमाची जाणीव जनतेस करून देऊन समाजोपकारक आणि विश्वाची धारणा करण्यास आवश्यक असलेले आचार जनतेपुढें ठेवणे हें सत्पुरुषाचें कार्य आहे तें कार्य करावयाचें म्हणजे साधु क्रियाशील असला पाहिजे प्रपंचात गुरफटलेला माणूस देखील क्रियाशील असतो. परतु साधूची क्रियाशीलता स्वार्थपर नसते. आणि एका दृष्टीनें स्वार्थपर असतेहि सामान्य माणसाचा स्वार्थ त्याच्या त्यानें मानलेल्या स्वहितापुरता मर्यादित असतो साधूचा 'स्व' समाजव्यापी असतो कारण, जगात भरून उरलेल्या सत्तत्वाचें ज्ञान त्याना झालेलें असतें त्याच्या जाणीवेस पोषक असें कार्य त्याच्याहातून घडत

असतें सुख-दु:खादि द्वद्वाच्या पलीकडे तो गेलेला असतो म्हणूनच विश्वोद्धाराचें कार्य तो करीत असतो नव्हे–त्याचें सहज कर्म विश्वोद्धारास पोषक हात असते कारण,

मुक्तपद आलें हाता भय न धरी कर्मे करिता
भोग भोगुनी अभोक्ता करूनी आलिप्तना यालागी
ब्रह्मपदाचा अधिकारी म्हणवूनी विश्वातें उद्धारी

– आनदलहरी, ११४–१५

शकराचार्यांच्या ज्ञाननिष्ठेस ज्ञानोत्तर कर्म विसगत आहे ब्रह्मप्राप्ती-साठीं कर्म सोडावें लागत नाही, ज्ञात्याचें कर्महि ब्रह्मरूप असतें असा नाथाचा सिद्धात असून तो त्यानीं आपल्या स्फूट प्रकरणात, अभगात आणि भागवतीटीकेतहि वारवार प्रतिपादिला आहे[३१] समाधि–अवस्था म्हणजे कर्म-लोप नव्हे· तटस्थता म्हणजे समाधि नव्हे समाधीच्या अवस्थेत देखील कर्म चालूच असतें शुकवामदेवानी सागितलेल्या समाधीच्या स्वरूपात ताटस्थ्य नाही·

स्वरूप देखोनि मूर्च्छित जाहला तो आपणिया आपण तरला
स्वये तरूनी जन उद्धरिला हा बोध बोधिला शुकवामदेवे

– ए भा २–४१९

भगवतानीं अर्जुनास केलेला बोध देखील ताटस्थ्याचा नाहीं तर कर्मात समाधिसुखाचा अनुभव घेण्याची युक्ति भगवतानीं सागितली आहे

अर्जुना देउनि निजसमाधी सर्वेचि घातला निर्वाणयुद्धी
परी तो कृष्णकृपानिधी ताटस्थ्य ते त्रिशुद्धी नेदीच स्पर्शा
सकळ कर्मी समाधी हेचि सद्गुरूची बुद्धी
तरी युद्धीहि त्रिशुद्धी निजसमाधी न मोडे
बुद्धीं आकळलें ब्रह्म तैं अहेतुक चालें कर्म
जें जें कर्म स्वाभाविक तेतें ब्रह्मार्पण अहेतुक
या नाव भजन निर्दोख भागवतधर्म या नांव[३२]

भागवतधर्मात चित्तशुद्धीसाठी कर्माचा आदर केला जातोच परतु ज्ञान-प्राप्तीनतर देखील लोकोद्धारार्थ कर्म चालूच राहतें या कर्मानें विश्व-

व्यापक असलेला 'अहम्' म्हणजे परमेश्वरच सतुष्ट होत असतो कर्म हे ईशभक्तीचें वर्म आहे असें एकनाथ याच हेतूनें सागतात

कर्मयोग हे भागवतधर्मांचें अविभक्त अग आहे अशी नाथाची निष्ठा आहे संन्यासमार्गीय उपदेशकानी कर्मयोग गौण मानल्यामुळें कर्मयोगाशीं सबधित असलेल्या सर्व शब्दाची स्वतत्र व्याख्याच नाथाना करावी लागली योग्याचे साध्य असलेल्या समाधीचा देखील कर्माशीं अनिवार्य सबध आहे असें त्यानीं सागितलें कर्म आणि स्वधर्म याच्या व्याख्यातहि नाथानीं हाच भाव व्यक्त केला आहे या व्याख्याना श्रीधरी टीकेचा आधार नाहीं ही गोष्ट विशेषेंकरून लक्षात ठेवण्यासारखी आहे पूर्वपरपरेचा आधार घेऊनहि नाथानीं स्वतत्रपणें आपली भूमिका माडली आहे हे या व्याख्याचा अभ्यास केला असतानाहि लक्षात येण्यासारखे आहे

'मुख्य मुळी जे का निपजे कर्म ऐसें त्यातें म्हणावें'[३३] अशीं नाथानीं कर्माची व्याख्या केली आहे कर्म ही मूळ प्रवृत्ति असल्यामुळें निःशेष कर्मत्याग अशक्य आहे हें ओघानें आलेच कर्मत्याग हा कर्माचें बधन तोडण्याचा मार्ग नव्हे हिऱ्याने हिरा चिरावा त्याप्रमाणें कर्मानेंच कर्मबंधनाचा छेद करता येतो[३४] नैष्कर्म्य म्हणजे कर्मत्याग नव्हे तर—

एव ईश्वरी जें जें अर्पे कर्म तें कर्म होय निधर्म
याचि नावें परम नैष्कर्म्य निजसिद्धी — ए भा ३–७९३

म्हणून कोणत्याहि परिस्थितींत कर्मत्याग विहित नसून निष्काम कर्मयोगच आचारला पाहिजे[३५] देह नश्वर असला, प्रपच अशाश्वत असला तरी देहाकडून होणारें निष्काम कर्म मात्र शाश्वत ब्रह्माची प्राप्ती करून देणारें आहे:

अनित्य देहाच्या साठीं नित्यवस्तूशीं पडे मिठी
होचि बुद्धिमतीं बुद्धि मोठी ज्ञानाची सतुष्टी या नाव म्हणो — २९–४१२

निष्काम कर्म म्हणजे फलाशाविरहित आणि परोपकारार्थ जें कर्म असतें तें[३६] परमेश्वरार्पण पूर्वक केलेल्या अशा कर्मासच स्वधर्म म्हणतात.[३७] असें कर्म परब्रह्माचें प्रकाशक असते याच कर्माने परमेश्वराची भक्ति होत असते[३९] स्वकर्म हे स्वभावतः पवित्र असतें.[४०] वेदोक्त कर्म सोडणें हा अधर्म आहे.[४१] कर्म करताना फक्त

अहंकार सोडावयाचा असतो अहंकार आणि फलाशा सोडून केलेलें कर्म ब्रह्मार्पण होत असतें ४२

# भक्तिपूर्वक कर्म आणि कर्माधिष्ठित भक्ति

निष्काम कर्मावाचून भक्ति संभवत नाही आणि भक्तिवाचून निष्काम कर्म घडत नाहीं भक्ति आणि निष्काम कर्म परस्परावलंबी असल्यामुळें भागवतधर्मीय भक्त क्रियाशील असतो आणि त्याची क्रिया भक्तिनिष्ठ असते:

> निर्विकल्पें निजधर्माचरण त्या नाव शुद्ध भजन
> तेणे भजने होउनि प्रसन्न मी विवेक ज्ञान भक्तासी दे
> यालागीं नैराश्यें जे स्वधर्म कर्म तेंचि माझे भजन परम
> तेणें भजनें भक्तोत्तम स्वये पुरुषोत्तम होउनि ठाकती
>
> – ए भा १८–३७४–६

भागवतधर्मातील भक्ति केवळ भजनात्मिका वा रागात्मिका नाहीं ती निष्कामकर्मयोगाधिष्ठित आहे. निष्काम कर्मयोग हेच भजन आहे. या भजनानें परमेश्वर संतुष्ट होतो आणि भक्तास अद्वैतसुखाचा अनुभव घेता येतो नाथाच्या भागवतधर्मांत या निष्ठेचा विस्तार प्रामुख्यानें झाला आहे भागवतानें निष्काम कर्मयोग मानला नाहीं असें नाहीं परंतु प्रेमरूप भक्तीचा विस्तार भागवतात अधिक झाल्यामुळें उत्तरकालात भागवतातील निष्काम कर्मयोग मागें पडला आणि प्रेमलक्षणात्मक भक्तीचाच प्रसार झाला व भागवताच्या इतर स्कंधापेक्षा दशमासच अधिक महत्त्व आलें. दश आणि एकादश याचा संगम महाराष्ट्रीय संताच्या भागवतधर्मांतच आढळतो आत्मोद्धार आणि विश्वोद्धार यासाठी कर्मयोग सारखाच आवश्यक असल्यानें ऋतनिष्ठेनें कर्म केल्याखेरीज समाजाची धारणा होणें शक्य नाहीं. ऋतरक्षणार्थ धर्म, धर्मार्थ कर्म, कर्मदोषपरिहारार्थ भक्ति, भक्तीच्या साफल्यासाठीं निष्काम कर्म आणि ब्रह्मप्राप्तीसाठीं कर्मब्रह्माची एकरूपता नाथवाङ्मयानें उपदेशिली आहे. भागवतधर्माची ऋतमय परंपरा नाथोक्त भागवतधर्मानें पुरस्कारिल्यामुळें साधक आणि सिद्ध या दोन्ही अवस्थेंत कर्म

आवश्यक असल्याचें त्यानीं सागितलें आहे. कारण, नाथाची भक्ति भजनात्मिका नाहीं ती ऋताधिष्ठित आहे

## नाथांचें वैशिष्ट्य

नाथाच्या या ऋतनिष्ठेमुळेंच त्यानीं कर्म ज्यायोगें घडतें तो नरदेह पवित्र मानला आहे[४३] व सत आणि सद्गुरु याच्या लक्षणात कर्मयोगावर भर दिला आहे [४४] कर्मसन्यास करणारा साधु त्यानीं आदर्श मानला नाहीं

> तैसा काया वाचा मनें प्राणें साधु वाढला उपकाराकारणें
> आपले पारखें म्हणो नेंणे उपकारु करणें सर्वांसी – ए भा ११–८७०

शुक–नारद यासारख्या परमभक्तापेक्षाहि कर्मयोगी विदेह त्यानीं श्रेष्ठ गणला आहे [४५] साधु उपकारापुरता उरतो, स्वधर्म कर्म करून त्यात ब्रह्मप्राप्ती अनुभवतो, भूतमात्राविषयीं दया दर्शवितो आणि भूताच्या दुःख-परिहारार्थ स्वतःचा जीव अथरण्यासहि तो मागेंपुढें पहात नाहीं. साधूच्या या वर्णनात ऋततत्त्वाचा आविष्कार झाला आहे सत्कर्म हे ऋताचें मूर्त स्वरूप. साधूच्या सत्कर्मानें विश्वाच्या उन्नयनास आवश्यक असलेल्या ऋताचा आविष्कार घडत असतो म्हणूनच सज्जनाचा मार्ग हा ऋताचा मार्ग असतो. यासाठीच नाथानी वर्णिलेला सत विश्व सोडून विजनवास स्वीकारीत नाहीं त्याचा स्वर्ग पृथ्वी सोडून रहात नाहीं किंवा मरणोत्तर तो प्राप्त होतो असेंहि नाही नाथानी वर्णिलेली मुक्ति ही मरणोत्तर उत्तम गति नसून ती जीवन्मुक्ती आहे भगवान् हा मंदिरात किंवा स्वर्गात रहात नाही तो सर्व भूतमात्राच्या रूपानें वावरतो व विश्वाच्या रूपानें साकारलेला असतो

नाथोक्त भागवतधर्माचा इतर ग्रथ आणि आचार्य याच्या तुलनेने अभ्यास केला असताना त्याच्या वैशिष्ट्याचा बोध विशेषेंकरून होतो. पुढील स्कधात तेंच विवरण करण्याचे योजिले आहे

## १६. टीपा

१. **ए भा.** १-१९५ पुढील ओव्यातहि नाथानी एकादशाचा महिमा वर्णिला आहे **ओ. भा.** २-१७, १८ ते ३१, १४-४५२ ते ४६०, १८-२० ते २८, ३१-३८८, ३१-४५५ ते ९३ इत्यादि

२ **ए भा.** १-५८ ते १०० ३ उदाहरणार्थ, **ए. भा.** ३-७८१-८२; १०-३५६-५८

४ भावे विनोबा, **एकनाथांचीं भजने**, प्रस्तावना, पृ ३

५ पृ ४ ते ६ ६ **ए. भा** २-७८२ ते ८८

७ भक्तिप्रधान भागवतशास्त्र- **ए भा.** १८-३९०-१ व १८-३०१

८ **गीता**, ३-१५, ९ पृ ३७ ते ३९

१० **ए भा** ४-२६५ ते २८३, ११ आवटे, **एकनाथमहाराजांचा गाथा**, क्र १७९० ते ९१

१२ पृ २४ ते २६

१३ **ए. भा** ११-१५२६-२८, १६-३०५-३२०, २०-४४४-४५, २९-३०,

१४ **ए भा** ११-१५३३, १५ **ए भा.** १४-२५६-८.

१६ **ए. भा.** २-५३९, १७ **ए. भा.** २-५४८

१८ **ए. भा** २-२८६-९० १९ **ए भा** ३-५६३

२० **ए भा** १९-५३२-३४

२१ **ए भा.** १३-१७८, २२ **ए. भा.** २-६३०,

२३ **ए भा** २-६५१-७५,

२४ जाति उच नीच असख्य परी तो न म्हणे हे माझीच एक
जेवीं गगातीरीं गाव अनेक गगा माझा एक गाव न म्हणे

— **ए. भा** २-७०२.

२५ **ए भा.** १९-२४३.

२६ **ए भा** १४-२९१,

२७ जागृतीं स्वप्न सुषुप्तीं । चिन्मात्रीं जडली वृत्ती
चित्त चित्तत्वाची विसरे स्फूर्ति या नाव मद्भक्ति उद्धवा

— **ए भा.** २-७१७,

किंवा

एव आपली आपण भक्ती करीतसे अनन्यप्रीतीं
हेंचि निरूपण वेदांतीं अद्वैत-भक्ति या नांव

– ए भा २-७१७

२८. ए. भा. १९-५३२-३४, २९ ए भा ११-७७२-७,

३०. पुढील प्रकरणात शकराचार्य व भागवताचे टीकाकार श्रीधर याच्या मतांत आणि एकनाथाच्या विचारसरणींत असलेलें अतर स्पष्ट करण्यात आलें आहे.

३१ **शुकाष्टक,** २९९-३००, **आनदलहरी,** ११४-१५.
**ए भा.** २-४१२ ते १४,

३२. **ए. भा.** २-४२१-४४१, समाधीसबधींचे वरील विवेचन एकनाथी भागवताच्या तेराव्या अध्यायांतहि आलें आहे या अध्यायात ३७ व्या श्लोकातील 'अधिरूढसमाधियोग' या पदावर व्याख्यान करताना ताटस्थ्य म्हणजे समाधि नव्हे, अर्जुनाला समाधि देऊन कृष्णानें लगेंच त्याला युद्धाला लावलें असा उल्लेख करून निष्काम कर्मयोग हीच खरी समाधि असल्याचें एकनाथ सागतात

तेवी कर्मास्तव उत्पत्ति कर्मेंचि झाली परब्रह्मप्राप्ती
त्या कर्मामाजीं वर्तती निष्कामस्थिति महायोगी – १३-६९९

चतु श्लोकी भागवत (६५८-६५), स्वात्मसुख (२६२-२७०), हस्तामलक (३५४-५६), या ठिकाणी देखील समाधीच्या निष्काम कर्मयोगप्रधान स्वरूपाचें वर्णन एकनाथानी केलें आहे अनेक ठिकाणीं झालेल्या या पुनरुक्तीवरून नाथाना ही भूमिका कटाक्षाने माडावयाची होती हें उघड आहे नाथाच्या भागवतधर्मात निष्काम कर्मयोगास किती महत्त्व आहे हें यावरून स्पष्टच होतें

३३. **ए. भा.** ३-७६८, ३४ **ए भा** ३-७७७-

३५ **ए. भा.** २९-४११, ३६ **ए. भा** १३-७९

३७. **ए. भा.** २५-१६२१, ३८ **ए भा.** २५-१७४.

३९ **ए. भा.** २५-१७५, ४० **ए भा** २५-१८४

४१ **ए. भा.** १७-९१, ४२ **ए भा** २७-९५-९७

४३ **ए. भा** २५-४२२-२३, ९-२५३, २५-४१७ ते २५.

४४. **ए. भा.** १-३५ ते ५६, ११-८९३-९८,

४५. **ए. भा.** ११-९१४,

# १७. एकनाथप्रणीत भागवतधर्म :३:

दर्शनकार एकनाथ – नाथांची स्वतंत्र भूमिका – शांकर वेदांत आणि एकनाथ – भूमिकेंत असलेला विरोध – गीता आणि योगवासिष्ठ – 'ज्ञानाचा एका' – उत्तरकालीन संतांचें स्फूर्तिस्थान – नाथांच्या भागवतधर्माचें संकलित स्वरूप

संस्कृत भाषेंत असलेलें तत्त्वज्ञान मराठी भाषेंत सुगम करून सांगण्याचीच कामगिरी एकनाथांनीं केली असती तर थोर भाष्यकार एवढेंच त्यांचें महत्त्व राहिलें असतें. एकनाथ केवळ विवरणकार नव्हते. ज्ञानेश्वर-एकनाथ यांनीं संस्कृतभाषेंत आपलें वाङ्मय लिहिलें असतें तर शंकराचार्यांदिकांपेक्षाहि त्यांना अधिक मान्यता मिळाली असती. केवळ विवरणकाराची भूमिका नाथांनीं घेतली नाही. धर्माच्या पुनरुज्जीवनार्थ त्यांचा अवतार झाला होता. धर्माचें पुनरुजीवन करण्यासाठीं सामाजिक दृष्टि असणें आवश्यक असतें. त्याच प्रमाणें पूर्वपरंपरेंतील कालबाह्य भाग कोणता आणि धर्मप्रेरणेस कोणत्या गोष्टी आवश्यक आहेत याची जाणीव असल्याशिवाय धर्माला उजळा देण्याचे कार्य करता येणें अशक्य आहे. समाजस्थितीचें अचूक निदान आणि धर्मतत्त्वाचें सम्यक् ज्ञान याची जोड असल्याविना धर्मोद्धाराचें कार्य अशक्य असतें. प्राचीन परंपरेंतील शाश्वत मूल्यांच्या आधारानें व युगधर्मास आवश्यक असलेल्या नवीन मूल्यांचा समावेश करून समाजाची रुद्धगति प्रवाही करण्याचें कार्य अवतारी युगपुरुष करीत असतात. जुन्याचा दुराग्रह आणि नव्यातत्त्वाविषयींचा अभिनिवेश हे दोन्ही दोष अशा माहात्म्यांच्या ठिकाणीं नसतात

त्यामुळेंच समाजाच्या प्रगतीचें कार्य ते साधू शकतात अशा महापुरुषात एकनाथाचें स्थान फारच मानाचें आहे.

## दर्शनकार एकनाथ

एकनाथानी भागवतपुराणाचा आधार घेतला असला तरी कालानुरूप नवीन मूल्याचा समावेशहि त्यानी आपल्या भागवतधर्माच्या विवरणात केला आहे समाजोत्थापनास आवश्यक असलेल्या तत्त्वप्रणालींचा पुरस्कार भागवत पुराणाच्या आधारानें त्यानी केला असे फार तर म्हणता येईल. कारण, एकनाथी भागवत म्हणजे मूळ भागवताच्या एकादशस्कधाचा मराठी अनुवाद नाहीं एकादशावरील भाष्य असलें तरी भागवत-धर्माचें ते एक स्वतत्र दर्शनच आहे. एकादशस्कधातील सस्कृत श्लोकाचा नाथानीं केलेला अर्थ लक्षात घेतला म्हणजे दर्शनकार एकनाथाची ओळख पटण्यास वेळ लागत नाहीं. काही स्थलाचा तुलनात्मक अभ्यास केला असताना नाथाच्या भूमिकेवर चागलाच प्रकाश पडतो

एकादशस्कंधाच्या अकराव्या अध्यायात २९ व्या श्लोकानतर साधूचीं लक्षणें सागण्यात आलीं आहेत तिसाव्या श्लोकात 'शुचि' असें एक लक्षण आलें आहे. ज्या श्रीधरी टीकेचा आधार आपण घेतला आहे असें एक-नाथ सागतात त्या श्रीधरी टीकेंत उपरोक्त लक्षणाचें 'सदाचार' एवढेंच स्पष्टीकरण करण्यात आलें आहे. नाथाची भूमिका केवळ टीकाकाराची असती तर त्याना देखील एका शब्दात वरील लक्षणाचा मराठी अनुवाद करता आला असता. परतु या एका शब्दाचा विस्तार नाथानी ९ ओव्यात केला आहे (११–८९१ वे ८९९) निष्काम बुद्धीनें स्वधर्माचें आणि स्वकर्माचें आचरण करणारा तो शुचिष्मंत असा मुळात नसलेला अभिप्राय नाथाच्या भाष्यात आढळतो. भगवद्भक्तीमुळें प्राप्त होणारी शुचिष्मतता तीर्थादिकानाहि पवित्र करते एवढें सामर्थ्य साधूच्या ठिकाणीं असूनहि साधु स्वधर्माचा किंवा स्वकर्माचा त्याग करीत नाहीं

हें पुढें सूनी ब्रह्म • आश्रमधर्मादि स्वकर्म
आचरोनि दावी पुरुषोत्तम • कर्मीं ब्रह्मप्रतीती.

कर्म करिती लोक म्हणती तो वर्तताहे ब्रह्मस्थिति
हे ज्याचे तो जाणे निश्चिती लोका प्रतीती कळेना
—ए भा ११–८९६–७

वरील ओव्यात स्वधर्म आणि स्वकर्म यावर दिलेला भर नाथाच्या दृष्टि-कोनाचा निदर्शक आहे याच श्लोकात 'अकिंचन' असें एक साधूचें लक्षण दिलें आहे 'अपरिग्रह' असा त्याचा अर्थ श्रीधरी टीकेंत आढळतो नाथभागवतात या लक्षणाचा विस्तार १६ ओव्यात झाला असून मुळातला अकिंचन बराच व्यापक झाला आहे.

चिन्मात्री जडले मन विश्व जाहले चैतन्यघन
परिग्रहाचें तुरले भान अकिंचन त्या नाव

केवळ त्याग आणि अपरिग्रह हे नाथाच्या दृष्टीनें अकिंचनत्वाचें समर्पक लक्षण होत नाहीं ससाराचा त्याग केला तरी वासना मागें रेंगाळतेच. त्यामुळें त्यागाचें फळ मिळत नाहीं म्हणून ससार-त्याग मूर्खपणाचा ठरतो नाथानीं वर्णिलेला अकिंचन ससारत्याग करीत नाहीं तो विश्वाच्या उद्धारासाठी विश्वातच वावरत असतो आणि प्रपच करूनहि प्रपचातीत होत असतोः

मूर्खासी त्याग तो झाला बाधु परिग्रही असोनी मुक्त साधु
सबाह्यत्यागें अतिशुध्दु शुक नारद तिही लोकीं
ते दोघेहि लागती जनकाच्या पायीं तो राज्य करिताहि विदेही
— ए. भा ११–९१३–१४.

शुक-नारदासारख्या निवृत्तिमार्गीयापेक्षाहि प्रपच करणारा पण प्रपचातीत असलेला जनक श्रेष्ठ आहे असें सागून नाथानी एका लक्षणाच्या निमित्तानें भागवतधर्माच्या निष्ठेचें प्रतिपादन केलें आहे स्थैर्य हेंहि एक सत लक्षण याच श्लोकात आलें आहे. मुळाच्या सदर्भात स्थिरबुद्धीचा, फार तर स्थितप्रज्ञ असा या लक्षणाचा अर्थ निघतो एकनाथानीं तो अर्थ तर दिलाच आहे. परतु त्याबरोबरच स्थैर्याचें लक्षण पुढील प्रमाणें वर्णिलें आहेः

चहू आश्रमाहुनि उत्तम आपला जो निजाश्रम
तेथें स्थिरावोनि मनोधर्म वर्णाश्रम चालवी
• स्वस्वरूपी सायुज्यता • पावोनि स्थिरावली स्थिरता

तेथ स्वस्वरूपें वर्णाश्रम . स्वस्वरूपें स्वधर्म
ऐसी स्वधर्मी अवस्था त्या नाव उत्तम स्थिरता – ए भा ११–९४९–५८.

स्थिरबुद्धीमुळें स्वधर्म–कर्म स्थिरावतात म्हणजे त्याचा लोप होतो असें नव्हे तर धर्म आणि कर्म हे परमेश्वरूप होतात असा नाथानीं दिलेला अर्थ आहे एकाच श्लोकातील भिन्न पदाचा अर्थ देताना निष्काम कर्मयोग हे साधूचे लक्षण आहे हे एकनाथानीं स्पष्ट केलें आहे हा योग म्हणजेच खरा भागवतधर्म आहे अशी नाथाची निष्ठा होती हे पदाच्या अर्थावरून देखील त्यानीं दिग्दर्शित केलें आहे नाथानी वरील पदाचें काढलेले निष्कर्ष मूळ भागवतात आढळत नाहींत हे लक्षात घेतलें म्हणजे एकनाथानी भागवताचा केवळ अनुवाद केला असें म्हणता येणार नाहीं भागवताचा आधार घेऊनहि तत्कालीन परिस्थितीस आवश्यक असलेली निष्ठा व आचारधर्म नाथानीं भागवत-धर्माची मूळ प्रेरणा लक्षात घेऊन स्पष्ट केला आहे हे केवळ एका श्लोका-च्या दोन पदाच्या अर्थाचा विचार केला असताहि ध्यानात येतें भागवत-धर्माचे थोर आचार्य या दृष्टीनें असलेली नाथाची थोरवी त्याच्या या वैशिष्ट्याच्या रूपानें देखील लक्षात येईल

## नाथांची स्वतंत्र भूमिका

एकादशाच्या अकराव्या अध्यायाचें आणखी एक उदाहरण घेऊ. ‘मयि सर्वाणि कर्माणि निरपेक्षः समाचर’ असा २२ व्या श्लोकाचा उत्तरार्ध आहे २१ व्या श्लोकात आत्मज्ञानाची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूनें शास्त्राभ्यासानें विश्वांतील अनेकत्वाचा निरास करावा, चित्त निर्मळ व शुद्ध ठेवावें व बाह्य विश्वापासून निवृत्त होऊन आत्मस्थितीमध्यें सदा असावें हा भाव असून ते साधत नसेल तर सर्व कर्मे परमेश्वरास अर्पण करावींत असा भाव पुढच्या म्हणजे २२ व्या श्लोकात आला आहे ‘ ज्ञानमार्ग साधत नसेल तर माझी अनन्य भक्ति कर त्यायोगें तू कृतार्थ होशील ’ असें श्रीधरा-चार्यांनीं केलेलें या श्लोकाचें स्पष्टीकरण आहे. नाथानीं केलेल्या विवरणात कर्मयोगावर भर देण्यात आला आहे :

माझ्या भजनीं प्रेम अधिकु न सोडावें नित्य-नैमित्तिकु
वैदिक लौकिक दैहिकु भक्तासी बाधकु नव्हे कर्म
आचरतां सकळ कर्म न कल्पावा फळसभ्रम
हेंचि भक्तीचें गुह्य वर्म उत्तमोत्तम अधिकारू
उबग न मानुनी अतरीं माझ्या प्रीती सर्व कर्मातें करी
जो फलाशेतें कही न धरी भक्तीचा अधिकारी तो जाण

— ए भा ११–६५२–६५४

भक्ताला कर्माचें बधन नसतें याचा अर्थ तो कर्म करण्यास बाधलेला नसतो असें नाही परमेश्वराविषयींचें प्रेम ही त्याच्या कर्माची स्फूर्ति असते या स्फूर्तीनें तो कर्म करीत असतो म्हणून त्यास कर्माची बाधा होत नसते. त्याचें कर्म ईशनिष्ठेचें एक अग म्हणून चालू असतें म्हणूनच जगाच्या बंधनाचा उच्छेद तो करू शकतो नाथाची भक्ति कर्मधिष्ठित आहे ती केवळ भजनरूप नाही हे त्यानी भागवती टीकेंत जागोजाग स्पष्ट केलें आहे

'धर्मान् सत्यज्य य सर्वान् मा भजेत् स सत्तम'

असें ११ व्या अध्यायातील ३२ व्या श्लोकाचें उत्तरार्ध आहे 'वेदानीं आदेशिलेल्या कर्माचाहि त्याग करून परमेश्वराची भक्ति करणारा श्रेष्ठ आहे' (वेदरूपेण आदिष्टानपि स्वधर्मान् सत्यज्य ) असें श्रीधराचार्यांचें या श्लोकावरील भाष्य आहे या श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीधराचार्य म्हणतात, 'वेदोक्त धर्म पाळले असताना चित्तशुद्धीप्रभृती योग्यता प्राप्त होते. तथापि, परमेश्वराचें ध्यान करण्याच्या मार्गात या धर्मानें विक्षेप निर्माण होतो भक्तीनें चित्तशुद्धीचें कार्य होतेंच म्हणून भक्त श्रुतिप्रणीत धर्माचा त्याग करीत असतो भक्तीच्या योगानें वर्णाश्रमाच्या आवरणातून तो मुक्त झालेला असतो कर्म केवळ चित्तशुद्धीसाठीं आवश्यक असतें. चित्तशुद्धी झाल्यानतर कर्माचा त्याग विहित आहे या शकराचार्यांच्या सिद्धाताचा प्रतिध्वनि श्रीधराचार्यांच्या वरील स्पष्टीकरणात उमटला आहे.[१]

एकनाथाची भूमिका त्याहून निराळी आहे. भागवताचा आणि श्रीधरी टीकेचा आधार घेऊनहि एकनाथानीं भागवतधर्माच्या मूळ प्रेरणेस

अनुसरून वरील श्लोकाचा अर्थ लावला आहे कर्मासबधींची भिन्न मतें प्रथम उद्धृत करून कोणत्याहि परिस्थितीत कर्माचरण सोडू नये असा स्पष्ट अभिप्राय दिला आहे शरीर क्लेषाच्या भीतीने उबग येऊन, किंवा ज्ञानाच्या अभिमानामुळें कर्म सोडू नये भक्त वेदाची आज्ञा शिरोधार्य मानतो व स्वधर्मकर्माचें आचरण करीत असतो [२] भक्तीनें सर्वात्मभाव जागृत होतो. त्या भावानेनें कर्म करणाऱ्या भक्तास स्वरूपत कर्मत्याग न करताहि त्यागाचें फळ लाभतें :

धर्माधर्मादि आघवें न त्यागिता स्वभावें त्याग फावे अनायासें
स्वकर्मत्यागाची खूण उद्धवा मुख्यत्वें हेंचि जाण याही वरी माझें
भजन मुख्य भागवतधर्म या नाव — ए भा ११–१०८९–९४

भागवताचा अर्थ लावतांना एकनाथानी भक्तीसाठी वेदोक्त कर्माचा त्याग करण्याचा आदेश न देता तें करण्याचा आग्रह धरला आहे अज्ञान नाहींसें झालें म्हणजे दृष्टि व्यापक होते दृष्टि व्यापक झाल्यावर स्वत साठी कर्म करावयाचे हे भान लोपतें पण, धर्म–कर्म यांचा स्वरूपतः लोप होत नसून ते विश्वासाठी चालू राहतें विश्वाच्या आधारासाठीं आवश्यक असलेली ऋतनिष्ठा कर्म आणि भक्ति याच्या विवरणातहि नाथानीं दृष्टीआड होऊ दिली नाही.

म्हणूनच भागवतावर टीका करणारे श्रीधराचार्य आणि आद्यशकराचार्य याच्या कर्मविषयक सिद्धातात आणि नाथाच्या कर्मयोगात बरेंच अतर दिसून येतें नाथानीं कर्मापासून निवृत्तीचा उपदेश केला नाही तर निवृत्त कर्माचा उपदेश केला आहे [३] निष्कामबुद्धीनें परोपकारासाठीं केलेलें कर्म हे श्रेष्ठ एकनाथाचें ज्ञानहि 'सकर्मक' आहे शकराचार्याप्रमाणें 'अकर्मक' नाही [४] शुद्ध परमार्थ म्हणजे कृष्णार्पणपूर्वक कर्म हीच भक्ति आणि ज्ञानाची परिसीमा देखील हीच उद्धवाचा निरोप घेण्यापूर्वी कृष्णानें 'तू ज्ञानी झालास तरी विरक्त बुद्धीने आणि लोकाना मार्गदर्शक होईल असें कर्म कर स्वतः ज्ञानी होणें एवढेंच ज्ञात्याचें कर्तव्य नसून जडमूढाचा उद्धार करणे हा त्याचा धर्म आहे' असा उपदेश केला आहे या उपदेशास मूळ भागवतात आधार नाहीं हे लक्षात ठेवलें पाहिजे मूळ भागवतात 'तूं बदरिकाश्रमात जा आणि विरक्तबुद्धीनें मद्धर्मानिरत रहा' एवढेंच

कृष्णानें सांगितलें आहे [५] एकनाथांनी मात्र या ठिकाणीं बराच विस्तार केला असून लोकसंग्रहासाठीं तू कर्मरत हो असें सांगितलें आहे याच सदर्भांत लोकसंग्रह या शब्दाचा अर्थहि त्यांनी दिला आहे [६] 'तुला मी ज्ञान सांगितलें आहे या ज्ञानानें तू लोकांचा उद्धार केला पाहिजेस कारण, स्वतःचा उद्धार करून घेऊन इतरांचा उद्धार करण्यातच ज्ञानाचें सार्थक आहे." [७] या कृष्णाच्या आदेशाचें उद्धवानें पालन केलें त्याच्या धर्मानें सर्वजन परमार्थी झाले व त्रिभुवन भवाब्धि तरण्यास समर्थ बनलें. [८]

ज्ञानी उद्धव गेल्यावर दारुकास कृष्णानें उपदेश केला आहे 'माझ्या धर्माचें आचरण कर म्हणजे तुझा उद्धार होईल' असें मुळांतील वचन आहे या ठिकाणींहि एकनाथांनी आपलें वैशिष्टय दाखविलें आहे दारुक हा ज्ञानी नव्हता तो होता साधा भोळा भक्त त्याला सांगितलेला धर्म म्हणजे सतत नामस्मरण आणि भजन–संकीर्तन असा मुळांत नसलेला खुलासा नाथांनीं केला आहे ब्रह्मात्मैक्यावस्था ज्ञानानें प्राप्त होते तशीच ती भजनानेंहि अनुभविता येते असा विश्वास नाथांनीं दारुकास केलेल्या उपदेशाचा भावार्थ स्पष्ट करतांना प्रगट केला आहे [९] ज्ञानी आणि साधक या दोघांनाहि केलेल्या उपदेशांत निष्काम कर्मयोग आणि सर्वभूतीं भगवद्भाव यावर एकनाथांनीं भर दिला आहे मूळ भागवतांत फारच थोडा आधार या विवरणास आहे कोणत्याहि आचार्यांची मध्यस्थी न स्वीकारतां नाथांनीं स्वतंत्र प्रज्ञेनें भागवताचा केवळ अर्थच लावला असें नसून भागवतधर्माचा स्वतंत्र आविष्कार नाथांनीं कशा पद्धतीनें केला हे मूळ भागवत आणि एकनाथी भागवत यांतील कांहीं स्थळांचा जो तुलनात्मक विचार वर आला आहे त्यावरून सिद्ध होण्यासारखें आहे.

## शांकर वेदांत आणि एकनाथ

वरील विधानावर कदाचित् असा आक्षेप येण्याचा संभव आहे कीं, 'आपण श्रीधरी टीकेचें अनुसरण केलें असे भागवती टीकेंत खुद्द नाथांनीं सांगितलें असतांना कोणत्याहि आचार्यांची मध्यस्थी त्यांनीं स्वीकारली नाहीं असें म्हणणें सत्यास धरून होईल काय? श्रीधराचार्य हे शंकरा-

चार्यांचे अनुयायी. म्हणजे पर्यायानें शांकरमतांचेंच अनुसरण नाथांनीं केलें नाहीं काय ?'

श्रीधराचार्यांच्या अर्थापेक्षा नाथांनी निराळे अर्थ अनेक ठिकाणी केले आहेत वरील विवरणात काहीं स्थळाचा उल्लेख आलाहि आहे प्रथम शांकरमताचें अनुसरण एकनाथांनीं केलें काय याचा विचार करू ज्ञानेश्वर आणि शंकराचार्य यांच्या तत्त्वप्रणालीत असलेला विरोध परिशिष्टातील एका प्रकरणात स्पष्ट केला आहे त्या विवरणाच्या संदर्भात–नाथांच्या विचारसरणीचाहि विचार करणें आवश्यक आहे एकनाथ आणि शंकराचार्य अद्वैती होते एवढेंच या दोघांच्या विचारसरणीत साम्य आहे. उपनिषदें, गीता, भागवत हे ग्रंथ देखील अद्वैताचेंच विवरण करतात [१०] या दृष्टीनें ज्ञानेश्वर किंवा एकनाथ अद्वैती होते म्हणजे ते शांकरमताचे अनुयायी होते असा निष्कर्ष काढणें योग्य होणार नाहीं प्रारंभींच्या वंदनात एकनाथांनी शंकराचार्यांस वंदन केलें आहे श्रीधराचार्यांच्या भागवती टीकेच्या आधारानें आपण टीका लिहीत आहोंत असे उल्लेखहि नाथांनीं अनेक केले आहेत.[११] पण, तेवढ्यावरूनच नाथांनी शांकरमताचें अनुसरण केलें असा निष्कर्ष काढणे चुकीचें ठरेल ज्ञानेश्वरांनी शांकरमताचें अनुसरण केलें नसलें तरी एकनाथांनी मात्र त्याचें अनुसरण केलें असा अभिप्राय एका विद्वानानें प्रकट केला आहे [१२]

एकनाथांनीं प्रारंभीं शंकराचार्यांना वंदन केले आहे तसेंच ज्ञानेश्वर, नामदेव, चांगावटेश्वर यांनाहि नमन केलें आहे श्रीधरी टीकेचा त्यांनीं आधार घेतला असला तरी शांकरमताचें अनुसरण, त्यांनीं केलें नाहीं हेहि तितकेंच खरें आहे नाथांनीं श्रीधरी टीकेचा आश्रय का केला याचा उलगडा होण्यासाठीं शंकराचार्यांच्या कालापासून श्रीधराचार्यांच्या कालापर्यंतचा शांकरपरंपरेचा म्हणजे इ सा च्या ८ व्या शतकापासून १५ व्या शतकापर्यंतचा इतिहास लक्षात घेतला पाहिजे या आठशें वर्षांच्या कालात शांकर परंपरेवर बरेच संस्कार झाले ही गोष्ट सहसा विसरली जाते. 'आचार्यांच्या नंतर (शांकर) वेदांतात दोन गट झालेले दिसतात : एक भामतीकारांचा व दुसरा पंचदशीकाराचा. यालाच भामतीप्रस्थान आणि विवरणप्रस्थान असें म्हणतात .. 'ज्ञानादेव तु कैवल्य' या श्रुतिवचनाच्या

आधारानें ज्ञानानेंच कैवल्याची प्राप्ती होत असल्याने ज्ञानानंतर भक्ति वगैरे काहीं रहात नाहीं असें म्हणणारा हा भामतीवाद्याचा पहिला गट आहे याच्या उलट ज्ञानाने कैवल्याची प्राप्ती झाली तरी देहपात होईपर्यंत उपाधि रहात असल्यामुळें उपाधीचा पूर्ण नाश करून विदेह-मुक्तितुल्य परमानंदता जीवन्मुक्तीत बाणण्याकरिता ज्ञान्यालाहि परमप्रेमरूपा भक्ति केली पाहिजे असें म्हणणारा विवरणकाराचा गट आहे मधुसूदनसरस्वती अप्पय्य दीक्षित, भागवतावरील प्रसिद्ध टीकाकार श्रीधराचार्य इत्यादिकांचा समावेश या गटात होतो या सर्व आचार्यांनी साधनरूपानें भक्तीचा स्वीकार केला आहे ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे'[३१]

उपरोक्त दुसऱ्या गटातील मधुसूदनसरस्वतीसंबधाने एका विद्वानानें पुढील अभिप्राय व्यक्त केला आहे 'याच्या बाबतींत एक विशिष्ट गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे मधुसूदनसरस्वती तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात कट्टर अद्वैताचे पुरस्कर्ते असले तरी ते भक्तिमार्गानुयायी होते हे भक्तीचे विवरण करणाऱ्या त्याच्या अनेक ग्रथांवरून स्पष्ट होतें.'[१४]

शांकर परंपरेचा हा इतिहास पाहिला म्हणजे ज्ञानेश्वरानीं न स्वीकारलेला शांकर संप्रदाय एकनाथानीं स्वीकारला असें म्हणता येणार नाहीं उलट, शांकर संप्रदायच महाराष्ट्राच्या भक्तिपरंपरेच्या अधिक जवळ आला असें म्हणावें लागतें उपरोक्त दोन्ही आचार्य ज्ञानेश्वरोत्तरकालीन असून श्रीधराचार्य इ स १४०० च्या व मधुसूदनसरस्वती हे इ स. १५०० च्या सुमारास होऊन गेले हे लक्षात घेतलें म्हणजे ज्ञानेश्वराना शांकर परंपरेत आपला समानधर्मा का दिसला नाही आणि एकनाथाना तो कसा आढळला याचा उलगडा होतो

## भूमिकेंत असलेला विरोध

तथापि, एकनाथानीं शांकर मताचे अनुसरण केलें नाहीं हे तितकेंच खरें आहे ज्ञान, कर्म आणि भक्ति या तिन्ही साधनाच्या आणि निष्ठाच्या बाबतींत आद्यशंकराचार्यांचा आणि ज्ञानेश्वराच्या भूमिकेचा पारीशिष्टात विशद केलेला भेद एकनाथाच्या बाबतींतहि कायम राहिला आहे

भागवती टीकेंत शांकर वेदांत आणि नाथप्रणीत तत्त्वज्ञान याचा

विरोध जेथे जेथें आला त्यात्या ठिकाणी श्रीधराचार्यांचा अर्थ सोडून एकनाथानीं स्वतंत्र अर्थ दिले आहेत कर्म, अकर्म आणि विकर्म या शब्दाचे उदाहरण या बाबतीत बरेच उद्बोधक ठरेल गीता (१४–१६ व १७) आणि भागवत एकादशस्कध (७–८) या दोन्ही ठिकाणी हीं पदें आली आहेत शकराचार्य आणि श्रीधराचार्य यानीं या पदाचे अर्थ पुढीलप्रमाणे केले आहेत

**कर्म** – शास्त्रविहित, **विकर्म** – प्रतिशिद्ध आणि **अकर्म** – कर्मलोप[१५]

या उलट, ज्ञानेश्वरानीं 'कर्म म्हणिजे स्वभावें. जेणे विश्वाकार सभवें' असा कर्म या पदाचा अर्थ देऊन विकर्म म्हणजे विहित कर्म व अकर्म म्हणजे निषिद्ध कर्म असे उपरोक्त पदाचे अर्थ दिले आहेत[१६] एकनाथानीं कर्म या शब्दाची व्याख्या ज्ञानेश्वराच्या व्याख्येप्रमाणें केली आहे आणि निष्काम कर्म असा अकर्म या शब्दाचा अर्थ शाकरपरपेरस सोडून दिला आहे[१७] स्वत स समत असलेले अर्थ देऊन श्रीधरानी दिलेले अर्थ नाथानीं दिले आहेत[१८] तिसऱ्या अध्यायात तर विहितकर्मलोप म्हणजे अकर्म नव्हे असें आग्रहानें सागितलें आहे त्यावरूनहि शाकरमतास असलेला नाथाचा विरोध स्पष्ट होतो

नाचेर जो वेदोक्त कर्म त्यक्तकर्मे मानी निष्कर्म
त्यासी थोर पडला भ्रम नाडला परम अभिमानें – ए भा ३–७८१

पद-पदार्थांच्या बाबतींत शाकर वेदात आणि एकनाथ यामधील भेद तसे पुष्कळच दर्शविता येतील मुख्य भेद आहे तो भूमिकेचाच गीतेप्रमाणेंच एकनाथानी निष्काम कर्मयोग आवश्यक गणला आहे. साधन आणि साध्य या दोन्ही स्वरूपात भक्तीस दिलेली मान्यता आणि निष्काम कर्मयोग या दोन्ही भूमिका शाकर वेदाताशी विसगत आहेत शकराचार्यांच्या परपरेत पुढें काहीं अनुयायानी भक्तीस महत्त्व दिलें असलें तरी ज्ञानोत्तर कर्मसन्यास आवश्यक असल्याची भूमिका शाकर परपरेने कोठेंच सोडली नाहीं उलट, अद्वैतातहि भजन उरतें व निष्काम कर्मयोग चालू राहतो हे नाथानीं आग्रहानें प्रतिपादिलें आहे त्यावरून ज्ञानेश्वरानीं सोडलेलें शाकरतत्त्वज्ञान एकनाथानी स्वीकारलें हे म्हणणें चुकीचें ठरते तसेंच ज्ञानेश्वरादि

सतहि शाकरमताचें अनुसरण करणारे होते ही काही विद्वानाची विचार-सरणी देखील अवास्तव ठरतें [१९]

## गीता आणि योगवासिष्ठ

वस्तुस्थिति अशी आहे की, नाथाच्या भूमिकेवर कोणत्याहि आचार्यापेक्षा वेदोक्त ऋतपरपरा, गीता व योगवासिष्ठ याचाच परिणाम अधिक झाला आहे एकनाथानी वर्णिलेला ज्ञानी भागवतातील भागवतापेक्षा गीतेंतील स्थितप्रज्ञ आणि योगवासिष्ठातील जीवन्मुक्त याना अधिक जवळचा आहे भागवतातील भक्ति, गीतेतील निष्काम कर्मयोग आणि योगवासिष्ठातील जीवन्मुक्त याचा त्रिवेणीसगम नाथाच्या भागवतधर्मरूपी गगेच्या प्रवाहात आढळतो स्वत. भागवतकारानीं गीतेचा आदर केला आहे.[२०] भागवतधर्म आणि गीतोक्तधर्म याची पूर्वपीठिका लक्षात घेऊन नाथानीं भागवतधर्माचें विवरण केलें असल्यानें गीतेचा ठसा त्याच्या भागवतधर्मावर खोलवर उमटलेला आहे भागवतोक्त सप्रेम भजन सागतानाहि गीतेंतील निष्काम कर्मयोगाचा नाथाना विसर पडला नाही याचे कारण हेंच देता येईल

गीतेवर रचना न करता भागवतावर आपण रचना का केली याचें स्पष्टीकरण अप्रत्यक्षरीत्या त्यानीं भागवत माहात्म्य वर्णिताना दिलें आहे सर्वजनसुलभता हा भागवतोक्त प्रतिपादनाचा विशेष आहे गीतेंत सूत्ररूपानें सागितलेल्या तत्त्वज्ञानाचा रसमय आविष्कार भागवतात झाला आहे. ज्ञान सागणें हेंच केवळ नाथाचें ध्येय नव्हतें सामान्य जनतेस ते ज्ञान पचविता यावें ही त्याची दृष्टि होती व्यक्तीच्या आचरणात ज्ञानाची प्रभा फाकावी हे त्याचें ध्येय होतें हे उद्दिष्ट गीतेपेक्षा भागवताच्या आधारानें साध्य करणें अधिक सुलभ असल्यानें नाथानी भागवत आधारासाठीं घेतलें गीतेनें सागितलेलें तत्त्वज्ञान कसें जगावें हे भागवताने शिकविलें ज्ञान आणि प्रत्यक्ष आचार या दोहोंनीं जीवन परिपूर्ण होतें. म्हणून गीतेनें सागितलेलें ज्ञान आणि भागवतातील भाव याचा समन्वय नाथानीं केला तत्त्वज्ञ हा सत असतोच असें नाहीं तत्त्वज्ञान जगतो तो खरा सत एकादशात जीवन आणि तत्त्वज्ञान याची सागड आढळते म्हणून एका आणि एकादश याचें

घटितगोत्र जुळलें तथापि, गीतेनें सांगितलेल्या तत्त्वज्ञानाचा विसर नाथांना पडला नाहीं

मूळ एकादश स्कंधात दोन ठिकाणीं गीतेचा उल्लेख आला आहे.[२१] या दोन्ही ठिकाणीं गीतेच्या तत्त्वज्ञानाचें विवरण नाथांनीं केलें आहे 'गीतेच्या बोधानें अर्जुनास पूर्णबोध झाला. तो कृष्णमय बनला युद्धाच्या घडघडटात त्याच्या समाधीचा भंग झाला नाहीं.' अशी गीतेची महती ३१ व्या अध्यायात एकनाथांनीं वर्णिली आहे. सोळाव्या अध्यायात गीतोक्त धर्माचें सार त्यांनीं दिले आहे 'युद्ध करणे हा क्षात्रधर्म आहे अभिमान सोडून जो आपले कर्तव्यकर्म करतो तो कोणत्याहि दोषाचा धनी होत नाहीं. परमेश्वरार्पणपूर्वक कर्म हा निरभिमान होण्याचा श्रेष्ठ मार्ग आहे या मार्गानें जाणारा जीव

देही वर्तता तो विदेह विदेह तेंचि त्याचे ध्येय
तें माझें परम गुह्य अर्जुनासी पाहीं सांगितलें

मतमतांराने वेदांतात निर्माण झालेलें दौर्बल्य गीतेने दूर केलें वेदांत निर्माण झालेलें उणें गीतेनें 'फेडलें' असा गीतेचा महिमा आहे.[२२] गीतेंत कर्मयोग सांगितला आहे म्हणून ती प्रिय असल्याचें नाथांनीं आपल्या स्फुट प्रकरणात अनेक ठिकाणीं स्पष्ट केले आहे हे पूर्वीं प्रसंगोपात उल्लेखिले आहेच[२३]

गीतेप्रमाणेच योगवासिष्ठाचा परिणामहि नाथांच्या भूमिकेवर बराच झालेला दिसतो एकनाथांनीं वर्णिलेला भक्त भागवतातील श्रेष्ठ भक्तापेक्षा योगवासिष्ठातील जीवन्मुक्ताच्या अधिक जवळचा दिसतो योगवासिष्ठावर नाथांचें प्रेमहि बरेंच आहे भावार्थरामायणात तर त्यांनीं योगवासिष्ठातील निवडक श्लोकांचा अनुवादहि दिला आहे[२४] परंतु, त्यापेक्षाहि महत्त्वाची गोष्ट म्हणजे नाथांच्या भागवतधर्माच्या विवेचनावर योगवासिष्ठातील तत्त्वज्ञानाची दाट छाया पडली आहे हे होय गीतेनंतर सुमारें हजार–बाराशें वर्षांनंतर म्हणजे इ स च्या पाचव्या शतकात योगवासिष्ठ ग्रंथ रचण्यात आला[२५] या कालावधींत बौद्धपंथाच्या परिणामामुळें संन्यासाश्रमास बरीच प्रतिष्ठा लाभली होती ज्ञानमार्ग म्हणजे संन्यासमार्ग हा समज रूढ झाला होता ज्ञानमार्ग श्रेष्ठ कीं कर्ममार्ग या भूमिकेचे स्पष्टीकरण करण्यासाठीं या ग्रंथाची रचना झाली केवळ ज्ञानानें किंवा केवळ कर्मानें

मोक्ष मिळत नाही. दोहोंच्या समन्वयानें मोक्ष मिळतो असें योगवासिष्ठाचें उत्तर आहे [२६] गीतेतील स्थितप्रज्ञ किंवा ज्ञानीभक्त आणि योगवासिष्ठाचा जीवन्मुक्त यात साम्य बरेंच असलें तरी दोन्ही ग्रथातील आदर्श पुरुषात वैशिष्टय आहेच योगवासिष्ठातील जीवन्मुक्त लोकजीवनात अधिक रमणारा दिसतो गीतेने ज्ञात्याच्या औदासिन्यावर भर दिला आहे तर योगवासिष्ठानें समाजनिष्ठेस अधिक महत्त्व दिलें आहे सुख–दु खादि द्वद्वाने विचलित न होणारा आणि लोकोपकारार्थ देह झिजविणारा जीवन्मुक्ताचा स्वभाव योगवासिष्ठात प्रामुख्यानें आढळतो [२७] निष्काम कर्मयोगावरील निष्ठे-बरोबरच मानवी कर्तृत्वावर योगवासिष्ठानें अधिक भर दिला आहे 'दैव या नावाची वस्तु जगात नाहीं. ती मूर्खांची निर्मिती आहे. पौरुष हेच जगात श्रेष्ठ आहे तेच सत्य आहे पौरुषाला अप्राप्य अशी कोणतीच वस्तु जगात नाहीं जीवन्मुक्त हा पौरुषाचा उपासक असतो. पौरुषानेंच तो उत्तमपदाची प्राप्ती करून घेतो ' अशी योगवासिष्ठाची साररूप विचार-सरणी आहे [२८] उपशमप्रकरणात १२ व्या सर्गात आलेलें जनकाच्या जीवन्मुक्त अवस्थेचें वर्णन, तेराव्या सर्गात केलेलें दैववादाचें निराकरण, ६१ व्या सर्गात आलेली सताची महती, ६२ व्या सर्गातील समाधीची व्याख्या आणि ७७ व्या सर्गात सकलित स्वरूपात दिलेली जीवन्मुक्ताचीं लक्षणें याचा नाथोक्त भागवतधर्माच्या स्वरूपावर बराच परिणाम झालेला दिसून येतो

भागवताची ऋतप्रेरणा जागवावयाची हे नाथाचें ध्येय असल्यामुळें या प्रेरणेस पोषक अश जेथें जेथें आढळला तेथून त्याचें वृक्षाच्या मुळा-प्रमाणें ग्रहण करून भागवतधर्माचा डौलदार वृक्ष नाथानीं वाढविला संस्कृत वाङ्मयातील जीवनोपयोगी सत्वाचें ग्रहण नाथानीं कशा रीतीनें केलें याचा बोध वरील विवरणावरून होईल. भागवत, गीता, योगवासिष्ठ आदि ग्रथाचा आधार घेऊनहि नाथानीं आपल्या वैशिष्टयानें भागवत-धर्मास प्रेरकरूप दिले त्यानीं उपदेशिलेला भागवतधर्म म्हणजे प्राचीन विद्येचें केवळ सकलन अथवा अनुवाद नाहीं नाथाच्या भागवतधर्मास विशिष्ट दिशा आहे त्याला निश्चित ध्येय आहे नराला नारायणरूप करण्याच्या ध्येयानें तो प्रेरलेला आहे समाजाच्या उत्थापनाच्या हेतूनें तो

व्यक्तदशेस आला आहे विश्वाचे उन्नयन करण्यास आवश्यक असलेल्या ऋतनिष्ठेतून तो परिणत झाला आहे

## 'ज्ञानाचा एका'

नाथाच्या भागवतधर्माच्या या रहस्याचे आकलन न झाल्यामुळे एकनाथी भागवत म्हणजे ज्ञानेश्वरीची सुधारून वाढविलेली आवृत्ती असा समज विद्वानात देखील रूढ आहे वारकरी सप्रदायात नाथाभागवत म्हणजे ज्ञानेश्वरीचें सुलभ विवरण असे समज रूढ असल्याचे दिसतात ज्ञानेश्वराच्या शैलीचा बराच परिणाम एकनाथाच्या शैलीवर झाला आहे हे वादातीत आहे. ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभवातील कितीतरी दृष्टात नाथवाङ्मयात आढळतील [२१] विचाराचें साम्यहि भरपूर आहेच तरीहि ज्ञानेश्वर ते ज्ञानेश्वर आणि एकनाथ ते एकनाथच असेच म्हणावें लागतें

एकनाथाचा पिडच ज्ञानेश्वराहून वेगळा आहे ज्ञानेश्वर हे जन्मजात ज्ञानी होते जगाला ज्ञान सागावयाचे व धर्माची विकलाग अवस्था दूर करून तो 'धडौता' करावयाचा ही त्याची भूमिका ज्ञानेश्वरी, चागदेवपासष्टी आणि अमृतानुभव या ज्ञानेश्वराच्या वाङ्मयीन आणि अध्यात्मिक जीवनाच्या तीन अवस्था ज्ञानेश्वरीत सामान्यजनसुलभ भागवतधर्म त्यानी उपदेशिला, चागदेवपासष्टीत अद्वैताची ओळख करून दिली व अमृतानुभवात अद्वैतप्रतीतीचें अमृत त्यानीं शब्दरूपानें ओतलें त्यानी सामान्यासाठीं म्हणून सागितलेला धर्म सामान्याच्या आटोक्याबाहेरचा होऊन बसेल याची कल्पना ज्ञानेश्वराना येणें शक्यच नव्हते कोटयाधिशाने केलेली दारिद्र्याची कल्पना आणि प्रत्यक्ष दारिद्र्य, ऐरावतानें केलेली क्षूद्र जीवाची कल्पना आणि प्रत्यक्ष क्षूद्र जीव यात जें अतर असतें तेंच ज्ञानेश्वरानी केलेली सामान्य जनाची कल्पना आणि प्रत्यक्ष सामान्य जीवन यात आहे म्हणून त्यानी सामान्यासाठी सागितलेलें ज्ञान देखील पर्वताच्या उच्च शिखरावरून उच्चारलेल्या आकाशवाणीसारखे वाटतें कारण, अज्ञानातून ज्ञानाकडे असा ज्ञानेश्वराचा विकासच झाला नाहीं पूर्ण विकसित ज्ञानी म्हणूनच ते जन्माला आले

एकनाथाची स्थिति याच्या उलट आहे त्यानीं आपल्या तपश्चर्येनें स्वतःचा विकास करून घेतला त्यामुळें सामान्य जीवनाची यथार्थ कल्पना त्याना सहज करता आली तुलनेच्या दृष्टीने विचार केला तर चतुःश्लोकी भागवत, एकनाथी भागवत आणि भावार्थ रामायण हे नाथाच्या जीवनाचे (अध्यात्मिक व वाङ्मयीन) महत्त्वाचे टप्पे ठरतात चतुःश्लोकी भागवतात ब्रह्मजिज्ञासा आढळेल नाथभागवतात प्रपच परमार्थ एकरूप असल्याची प्रतीती आहे तर तिसऱ्या अवस्थेत रामीं रगून रामरूप झाल्याचें दर्शन आहे या तिन्ही अवस्थात सामान्य जीवनाचें अधिष्ठान कोठेंच सुटलें नाहीं

ज्ञानेश्वरानी व्यक्तिगत प्रपच केला नसला तरी प्रपचाचें सूक्ष्म निरीक्षण त्याच्या वाङमयात आढळतें नाथानी प्रपचाचा प्रत्यक्ष अनुभव घेतला होता व प्रपच हा परमार्थरूप असतो हे अनुभविलें होतें त्याच्या वाङ्मयात हा अनुभव साकारला आहे. त्यामुळें सामान्याना नाथवाणी ही अधिक जवळची वाटते ज्ञानेश्वरानीं निष्काम कर्मयोगाचा पुरस्कार केला असला तरी विश्वातीत होऊन अद्वयानदात रमण्याकडे ज्ञानदेवाचा ओढा अधिक आहे तर आत्मोद्धारानतर विश्वोद्धाराच्या रूपानें अद्वयानद-वैभवात समरस होण्याकडे नाथाची प्रवृत्ति विशेषकरून दिसून येते. 'जें जें भेटे भूत त्या त्या मानी भागवत' हा ज्ञानेश्वराचा भक्तियेग असला तरी एकनाथानीं त्यापुढे एक पाऊल टाकलें आहे असें म्हणता येईल. 'जनीं जनार्दन' या निष्ठेनें समाजरूपी परमेश्वराची आराधना करणें ही नाथाची भक्तिनिष्ठा आहे आत्मोद्धारानतर करावयाचें एक कर्तव्य एवढेंच विश्वोद्धाराचें महत्त्व नाथास वाटत नसून विश्वोद्धाराचें कार्य केल्याशिवाय आत्मविकास पूर्ण होतच नाहीं ही नाथाची निष्ठा असल्यामुळें निष्काम कर्मयोग आणि सर्व भूतीं भगवद्भाव यास नाथाच्या भागवतधर्मात अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झालें आहे या निष्ठेंतच भागवतधर्माच्या मूळ ऋतप्रेरणेचें दर्शन घडतें म्हणूनच मूळ प्रेरणेचें दर्शन घडविणारे एकनाथ हे भागवतधर्माचें थोर आचार्य ठरतात

एकनाथकालीन परिस्थितीस अशा धर्माची नितात आवश्यकता होती समाजावर दुहेरी आक्रमण चालू होतें. राजाश्रयाच्या आधारानें परधर्म

स्वधर्माचा तेजोभग करीत होता स्वधर्माला जाणता त्राता न राहिल्यामुळें त्याची पिछेहाट चालू होती अशा परिस्थितींत स्वतःच्या उद्धारासाठीं अरण्यवास अवलबिणाऱ्या सन्यासीवर्गाकडून धर्माचें रक्षण होणें शक्य नव्हतें सामान्य जनाच्या फुटक्या नावेंत धर्म जन्म–मरणाचें आदोलन अनुभवीत होता विश्वाबाहेरच्या देवाची आराधना करून किंवा मरणोत्तर लाभणाऱ्या स्वर्गाकडे लक्ष ठेऊन धर्माचें रक्षण करणें अशक्य होतें धर्म जागता नाही म्हणून समाज रसातळाला चाललेला आणि समाज समर्थ नाही म्हणून धर्माला अवकळा आलेली असें दुष्टचक्र त्याकाळात धर्माचे वाटोळें करीत होतें एकनाथानीं या दुश्चक्रातून वाट काढली समाज समर्थ करण्यासाठी धर्म–निष्ठा जागृत करणें आवश्यक होतें ज्या विश्वाच्या आधारानें धर्म व्यक्तदशेस येतो त्यास लटके ठरवून समाजाची धर्मनिष्ठा जागृत होणें अशक्य होतें ज्या मानवी जीवनाच्या रूपानें धर्म सजीव व साकार बनतो त्यास भ्रममूल ठरवूनहि हे कार्य घडणें शक्य नव्हते. नर–नारायण व स्वर्ग-लोक-मृत्युलोक याच्यात ऐक्य प्रस्थापित करून हे कार्य एखाद्याच व्यक्ती-च्या विकासानें नव्हे तर समाजाच्या समग्र सर्वांगीण विकासाने शक्य असल्यामुळें नाथाच्या भागवतधर्मात विश्वात्म्याबरोबरच विश्वाला, परमार्थाबरोबरच प्रपचाला, पवित्र ज्ञानाबरोबरच पाचभौतिक नरदेहाला महत्त्व मिळालें.

निर्गुण आणि सगुण परब्रह्मात जें अतर तेंच ज्ञानेश्वर आणि एकनाथ यानीं वर्णिलेल्या भागवतधर्मात दिसून येईल सगुणरूप सामान्य माणसास दिसतें आणि पटतेहि साजरे सगुणरूप दृष्टीत भरतें, मनात ठसतें, चित्तात उरतें आणि कृतीत उतरतें. तसा एकनाथानीं पुरस्कारिलेला भागवतधर्म आहे. नश्वर देह पावन करण्याचें, विश्वास विश्वात्म्याने भारण्याचे, जनास जनार्दनरूपाने दर्शविण्याचें सामर्थ्य त्यात आहे म्हणूनच भागवतधर्माचें श्रेष्ठ आचार्य या दृष्टीनें त्याचें स्थान अनन्यसाधारण ठरतें उत्तरकालीन संताना त्याच्या वाङ्मयानें स्फूर्ति मिळाली त्याचें कारणहि त्याचें श्रेष्ठ व लोकोत्तर विभूतिमत्व हेच देता येईल.

## उत्तरकालीनांचें स्फूर्तिस्थान

नाथोत्तर कालातहि एवढ्या उचीचा संत झाला नाही तुकाराम आणि रामदास यानी नाथोत्तर कालात महाराष्ट्राचे नेतृत्व केलें नाथाच्या भक्तीचा विस्तार तुकोबानी केला त्याचा निष्काम कर्मयोग रामदासानी प्रयत्न आणि प्रत्यय याच्या रूपानें विकसित केला 'नामाचा तुका' असें म्हणतात तुकोबारायानीं आपल्या अभगातहि या समजूतीस दृढ केले आहे. नाथभागवत आणि तुकोबाचे अभग याचा तौलनिक अभ्यास केला असताना नाथाच्या वाणीचा तुकोबाच्या व्यक्तिमत्वावर केवढा सस्कार झाला होता हे लक्षात येतें पढरी–माहात्म्य, नाममहिमा, रामनामाचें महत्त्व आणि काही भारुडें या तुकारामाच्या कृतीवर नाथाची छाया बरीच दाट पडलेली आहे [३०] (टीपात काही समान स्थळाचा उल्लेख केला आहे).

समर्थ रामदासाच्या बाबतीत देखील हेच म्हणता येईल सतानीं उपदेशिलेला भागवतधर्म आणि समर्थाचा महाराष्ट्रधर्म यात स्वरूपतः भेद नाही. समर्थानीं दिलेलीं महतलक्षणें आणि नाथानी सागितलेलीं सताचीं लक्षणें यात बरेंच साम्य आहे नाथाचें भावार्थरामायण आणि युद्धकाड व सुदरकाड ही रामायणावरील रामदासाची प्रकरणें वरवर चाळलीं तरी रामदासावर झालेल्या नाथवाणीच्या परिणामाचें स्वरूप लक्षात येण्यास वेळ लागत नाहीं [३१] (अधिक उदाहरणे टीपेत दिली आहेत) प्रपंच परमार्थरूप असल्याचा प्रत्यय एकनाथी वाङ्मयात जेवढा आढळतो तेवढा रामदासी वाङ्मयात आढळत नाहीं नाथाची व्यापक दृष्टि, नवीन समाज-रचना करण्यास आवश्यक असलेलें सामाजिक तत्त्वज्ञान उत्तरकालीन सताचे ठिकाणीं आढळत नाही. नाथाची भक्ति तुकोबाना आवडली आणि त्याचा कर्मयोग व रामभक्ति रामदासानीं वाढविली एवढें मात्र म्हणता येईल

## नाथांच्या भागवधर्माचें संकलित स्वरूप

गेल्या तीन प्रकरणात विशद केलेल्या नाथांच्या भागवतधर्माचें सकलित स्वरूप थोडक्यात पुढील प्रमाणें देता येईल.

१ कलियुगात अधर्माचरणी राजे फार झाले या राजाना धर्म आणि नीति याची चाड राहिली नाहीं त्यानीं प्रजेची नागवण चालविली आहे हा अनर्थ भगवतास सहन होत नाही म्हणून पूर्वीच्या काळात भगवतानीं धर्मरक्षणार्थ अवतार घेतले त्याप्रमाणें याहि युगात भगवतानें विठ्ठलरूपाने अवतार घेतला भगवताच्या अवतारानतर धर्माचा उष काल होतो, वेदोक्त धर्मनिधाब प्रगट होतें,आणि सर्व जग धर्मानें राहू लागते (ए भा ४–२६६–८३)

२ भगवताच्या अवताराच्या योगाने प्रगट होणारा धर्म म्हणजे याज्ञिकांचा धर्म नव्हे कर्मठाचा धर्म सकाम असल्यानें त्यास खरा धर्म म्हणता येत नाहीं चरकात ऊस घातल्यानतर सारा रस पिळून निघाल्यावर नुसत्या चोपटाची करकर चालू राहते त्याप्रमाणे याज्ञिकांचा धर्म आहे (ए भा १०–४६९–५२१)

३ खरा धर्म म्हणजे भागवतधर्म भगवताच्या भक्तानीं आचरलेला आणि भगवतानीं उपदेशिलेला हा धर्म सुलभ आणि सोपा आहे या धर्मात बुडण्याचा धोका नाहीं मोठ्या कठोर तपस्येची त्यास आवश्यकता नाहीं नुसता भाव असला म्हणजे पुरें भक्तिभावानें स्वधर्माचरण केले म्हणजे भोळ्या–भावड्याना भवाब्धि तरून जाता येते इतकेंच नव्हे तर ब्रह्मप्राप्तीहि होते असा हा सुलभ भक्तिप्रधान भागवतधर्म आहे (ए भा २–३१६–३६,१८–३९०–९१,१९–३०१)

४ भागवतधर्मातील भक्ति स्वधर्मयुक्त आहे भक्तीचे आचरण करणारा भक्त हा सर्व कर्म अहेतुक करीत असतो. स्वधर्माचरण करणें हे परमेश्वराचें शुद्ध भजन आहे या भजनानें परमेश्वर प्रसन्न होतो आणि भक्त पुरुषोत्तम होत असतो (ए. भा १४–३७४, ते ३७६).

५ निष्काम कर्मयोगानें सर्वभूतीं भगवद्भाव जागृत होतो. भक्ताला मुगी–मशक सुद्धां परमेश्वररूप वाटतात श्रेष्ठ–कनिष्ठ हा जातिभेद त्याचे ठिकाणीं रहात नाहीं (ए भा. १४–२८१, ३–१७८)

६ या वृत्तींत भक्त मुरला म्हणजे त्यास जनीं जनार्दन हा प्रत्यय येतो. हा प्रत्यय सकळ उपनिषदाचें सार आहे. भक्ति हीच आहे. ज्ञान या प्रत्ययाहून वेगळें नाहीं या अवस्थेत नामरूपातीत सत्तत्त्वाशीं भक्त एकरूप होतो (ए भा २५–२१)

७. ज्ञानी भक्त केवळ स्वत च्या उद्धाराने संतुष्ट होत नाहीं. दीनोद्धरणाचें कार्य केल्याखेरीज त्याच्या आत्मोद्धारास पूर्णता येत नाहीं लौकिक कर्में करूनहि तो कर्मबधनानें

बद्ध होत नाहीं प्रपच करूनहि तो प्रपचातीत होतो त्याचा प्रपच हा परमार्थरूप होतो (अे भा २९-८ २० ते २४, २८-४६०-६३)

८ नरदेह हा परम पावन आहे त्याचा विनियोग विषयमुखार्थ न करता त्याचा उपयोग परमार्थसाधनेसाठी करावा स्वाधिकारे स्वधर्मनिष्ठा हा पुरुषाचा मोठा गुण आहे भागवतधर्मात स्वधर्म आणि स्वकर्म याचे ऐक्य साधलेले असते म्हणून भागवतधर्मीय सत आश्रमधर्मांचे पालन करतात ते कर्म करतात पण कर्मठ होत नाहीत तर कर्मातीत होतात स्वधर्म-कर्मातच ब्रह्मप्रतीतीचा अनुभव ते घेत असतात त्यामुळे ज्या धर्मांचे रक्षण करण्यासाठीं भगवान् अवतार घेत असतो त्याधर्मांचे निष्ठेनें परिपालन करून ते स्वधर्मरक्षण करीत असतात (अे भा २०-११० ते १८९, २०-३१६ ते ३४०, १८-३९० ते ९५, १३-५६७, ५८८, १०-२५४)

९ कारण, धर्म हें व्यक्तीचे परम श्रेय आहे त्याच प्रमाणे तो विश्वाचा मूलाधारहि आहे विश्वाचा विकास आणि मानवीजीवनाचे उन्नयन धर्मानें-वेदोक्त ऋतानें-होत असतें म्हणूनच भागवतधर्मात निष्काम कर्मयोगावर प्रारभापासून भर देण्यात आला आहे या धर्मांची ही ऋतप्रेरणा ज्या ज्या काळात दुर्लक्षिली गेली त्या त्या काळात अधर्म वाढला अधर्माचें निर्मूलन करण्यासाठीं वेळोवेळीं भागवतधर्मांचें पुनरुज्जीवन झालें अज्ञानानें अथवा धर्माविषयीच्या चुकीच्या कल्पनानीं मूळ ऋतप्रेरणेचा पडलेला विसर त्याल्या कालाच्या अनुरोधानें उपदेशिलेल्या भागवत-धर्माच्या स्वरूपात सजीव व साकार करण्यात आला गीता, नारायणीय धर्म, भागवत पुराण, या भागवतधर्मीय ग्रथानी भागवतधर्मांचे युगसापेक्ष पुनरुज्जीवन करून समग्र ऋततत्त्वाच्या दर्शनाच्या दृष्टीनें आवश्यक असलेल्या पण उपेक्षिलेल्या धर्मस्वरूपावर भर दिला

१०. भागवत पुराणानतर एकांतिक भक्तीचा प्रसार भारतात मोठ्या प्रमाणात झाला भजनात्मक भक्तीचा पुरस्कार करणारे अनेक वैष्णव पथोपथ या नतरच्या काळात उदयास आले या पथांची भक्ति एकातिक असल्यामुळें समग्र ऋतदर्शन त्यायोगे घडणें अशक्य होतें मानवी जीवनाचा सपूर्ण विकास करण्यासाठी अवतरलेला हा धर्म आपल्या मूळ स्वरूपात प्रगट करण्याचे महान् कार्य एकनाथांनी केलें. नाथ-कालीन विपरीत राजकीय आणि सामाजिक परिस्थितीतून मार्ग काढण्यास व महाराष्ट्राच्या उद्धारास हाच मार्ग आवश्यक असल्यामुळे या धर्मांचा प्रकाश दाख-

विणारे एकनाथ हे भागवतधर्माचे थोर आचार्य ठरतात

११ एकनाथानीं पुरस्कारिलेल्या भागवतधर्मात भक्ति आहे पण ती केवळ भजनात्मिका नाही ती नैष्कर्म्य-प्रधान आहे, सर्वभूती भगवद्भाव प्रतिपादणारी सहज प्रकाशरूप आहे ती विश्वाच्या विकासाकडे लक्ष देणारी असल्यामुळे आत्मविकासात कृतार्थता मानीत नाही तर विश्वोद्धारातच आत्मोद्धाराची परिपूती मानते

नाथाच्या भक्तीचें हे स्वरूप म्हणजेच वैदिक ऋततत्त्वाचा सोळाव्या-सतराव्या शतकातील शुद्धाविष्कार होय महाराष्ट्रात परधर्माचें प्राबल्य वाढलें असताना व अधर्मानें धर्म अभिभूत झाला असताना भागवत-धर्माची मूळ प्रेरणा लक्षात घेऊन त्याचें पुनरुज्जीवन नाथानी केलें परमेश्व-राची भक्ति ही स्वधर्म-कर्माच्या रूपानें साधावयाची असते, मानवाच्या सेवेच्या रूपानें परमेश्वराची पूजा करावयाची असते, नारायण हा स्वर्गात राहणारा देव नसून समाजात मानवाच्या रूपानें वावरणारें तें चित्तत्त्व आहे, म्हणूनच या नारायणाचें भजन म्हणजेच नराचे कल्याण, या नाराय-णाचा धर्म म्हणजेच स्वकर्माच्या योगाने साधलेला विश्वोद्धार. हाच खरा भागवतधर्म एकनाथानी उपदेशिला नाथप्रणीत भागवतधर्माचा हा आत्मा आहे. भागवतधर्माचें हे वर्म पूर्वकालीन आणि उत्तरकालीन संताच्या वाङ्मयात एवढ्या उत्कट स्वरूपात मूळ प्रेरणा लक्षात घेऊन प्रतिपादिलेलें आढळून येत नाही. मानवतेविषयी एवढा जिव्हाळा, एवढा आदरभाव, एवढी उदात्त निष्ठा अर्वाचीन कालखंडातील समग्र भारतीय वाङ्मयात अद्वितीय अशीच आहे. म्हणून नाथप्रणीत भागवतधर्म जसा श्रेष्ठ तसेच या धर्माचे अर्वाचीन युगातील दर्शनकार एकनाथ हे असामान्य ठरतात



# १७. टीपा

१ **भागवत,** एकादशस्कंध, दामोदर सावळारामप्रत, पृ ३६९.

२ **ए भा** ११–१०७८–७९

३ कर्म म्हणजे जें निवृत्त आशापाशफळरहित
का क्रिया जे उपकारार्थ – **ए भा** १३–७९,

४ **ए भा.** २८–४११–१३, ५ **भागवत,** ११–२९–४१ ते ४४

६ अभेद भक्ति वैराग्य ज्ञान स्वयेंचि आचरोनि आपण
देखीं लावावे इतर जन लोकसग्रह जाण या नाव – **ए भा** २९–८०९

७ **ए भा** २९–८२०–२४

८ **ए भा.** २९–९ ४३–४, २९–९९१ व १००३

९ **ए भा** ३०–४७८–८१

१० भागवतावर द्वैती सप्रदायिकानीं टीका–भाष्यें लिहून त्यात द्वैतमताचेंच मडन केलें आहे असें प्रतिपादिलें असलें तरी खुद्द भागवतकाराना अद्वैतच अभिप्रेत होतें यात शका नाहीं पहिल्या स्कधातील तिसरा अध्याय आणि द्वितीय स्कधातील चतु श्लोकी भागवत या ठिकाणी आलेल्या विवरणाचा अभ्यास केला असताना भागवतकारास अद्वैतच अभिप्रेत होतें याविषयीं शका रहात नाहीं शकेला जागा राहू नये म्हणूनच कीं काय या पुराणाचा उपसहार करताना पुढील श्लोक भागवतकारानी दिला असावा

सर्ववेदातसार यद् ब्रह्मात्मैकत्वलक्षणम्
वस्त्वद्वितीय तन्निष्ठ कैवैल्यप्रयोजनम् – **भागवत** १२-१३–१२

११ उदाहरणार्थ, **ए भा** ३१–४४८, १६–२० ते २६ याठकाणी श्रीधरी टीकेचा उल्लेख आला आहे

१२ बा र सुठणकर, **महाराष्ट्रीय सतमडळाचे ऐतिहासिक कार्य,** पृ ५१

१३. डॉ, वा. ना, पडित, 'मराठी वाङ्मयावर भागवत सप्रदायाचा परिणाम,'

**युगवाणी**, ऑगस्ट १९५५

१४ Dasgupta, *A History of Indian Philosophy* Vol II P 226

१५. **गीता, शांकरभाष्य,** गोरखपुरप्रत, पृ १३४–३५ **भागवत** एकादशस्कंध, दामोदर सावळाराम प्रत, पृ २२२

१६ **ज्ञानेश्वरी** ४–८९–९२, १७– **ए. भा** ७–६४–६६

१८ श्रीधरी व्याख्यानाची युक्ती तेहि उपपत्ति परियेसी –**ए. भा.** ७–७१

१९ पहा परिशिष्ट, 'शांकरवेदांत आणि ज्ञानेश्वर 'Eknath believes in Shankar's theory with all its deduction'– Ranade, R D. *Mysticism in Maharastra*, P 232

२० भागवतपुराणावरील प्रकरणात गीता–भागवत यातील साम्याचें विवरण आलें आहेच–शिवाय परिशिष्टातहि काहीं समान स्थळाचें दिग्दर्शन करण्यात आलें आहे

२१ **भागवत**, एकादशस्कंध, १६–६ ते ८ व ३१–२१

२२ **ए भा** १६–१४७, ३१–२७८ ते २८१ अभंगातहि गीतेचा महिमा आला आहे उदाहरणार्थ, आवटे,**एकनाथ महाराजाचा गाथा**४८-३५४६-५०

२३ पृ

२४ वसिष्ठग्रंथ शतसहस्री त्यातील श्लोक सत्याहत्तरी
एकाजनार्दनें त्यावरी ज्ञानार्थकारी टीका केली
**भावार्थरामायण,** बालकांड, ११–३०९

२५ Dasgupta, *History of Indian Philosophy* vol II, P 231

२६ मोक्षस्य कारण कर्म ज्ञान वा मोक्ष साधनम्
उभय वा विनिश्चित्य एक कथय कारणम् ॥
. उभाभ्यामेव पक्षाभ्या यथा खे पक्षिणा गति
तथैव ज्ञानकर्मभ्या जायते परम पदम्
केवलात्कर्मणो ज्ञानान्नहि मोक्षोभिजायते
किन्तूभाभ्या भवेन्मोक्ष साधन तूभय विदु
**योगवासिष्ठ,** वैराग्य, १–१–६ ते ८.

२७ The saint in Yogawasistha not only performs his own actions in an unattached manner but to all appearances mixes with the sorrows and joys of others ' – Dasgupta, *History of Indian Philosophy* vol II P 247

२८ मूढै प्रकल्पित दैव तत्परास्ते क्षय गता
प्राज्ञस्तु पुरुषार्थेन पदमुत्तमता गता - **योगवासिष्ठ,** २–८–१६

२९ एकनाथाना ज्ञानेश्वराविषयीं वाटणारा आदर सुविख्यात आहे ज्ञानेश्वरीची पाठशुद्ध आवृत्ति व त्याच्या समाधीचा जीर्णोद्धार करून त्यानीं तो प्रकट केला आहे तसाच त्याच्या शैलीच्या अनुकरणानेंहि तो व्यक्त झाला आहे भक्तलक्षण, ज्ञात्याचे लक्षण, परम भागवताची लक्षणें या विषयात एकनाथानीं मूळ भागवतापेक्षा ज्ञानेश्वराचेंच अनुसरण अधिक केलें आहे नाथभागवताचा अगदीं पहिला अध्याय घेतला तरी ज्ञानेश्वरानीं केलेल्या प्रारभींच्या वर्णनाची आठवण होतें पहिल्या अध्यायांतील १७ ते १९ ओव्यावर अमृतानुभवाच्या १–२, ३ व ४२ ओव्याची छाप दिसून येते. दुसऱ्या अध्यायातील ९१–१०२ ओव्यात आलेलें माया नदीचें रूपक ज्ञानेश्वरींतील ७–६८ ते ८१ या ओव्याशी तुलना करून पाहण्यासारखें आहे शिवाय, **ए भा** ३–३६४ आणि **ज्ञानेश्वरी** १३–२५०, **ए भा** ७–६५–७७ व **ज्ञानेश्वरी** ४–८९–९२, **ए भा** ३१–२७५–८३ व **ज्ञा** १८–१४५७–६० अशीं किती तरी समान स्थळें दाखविता येण्यासारखीं आहेत एकनाथी–भागवतात आलेले कृष्णोद्धवाच्या प्रेमाचें वर्णन ज्ञानेश्वरींतील कृष्णार्जुनाच्या प्रेमाच्या वर्णनास बरेच जवळचें आहे (**ए. भा.** १९–३०८–१० व **ज्ञा** १८–१४२१ ते २३)

३० एकनाथी भागवतातील किती तरी ओव्या तुकारामानीं अभगरूपानें अधिक लोकप्रिय केल्या आहेत उदाहरणार्थ सत आले घरा तोचि दिवाळी दसरा ॥ हा तुकारामाचा अभग 'जैं माझे भक्त येती घरा तैं सर्व पर्वकाळ येती दारा'। वैष्णवा तो दिवाळी दसरा तीर्थें घरा पैं येती ॥ या नाथाच्या ओवीवरून सुचला आहे हें उघड दिसतें (**ए. भा.** ११–१२६७, १९–२३१ आवटे, **एकनाथ गाथा,** क्र. १७६६).

'कन्या सासुऱ्यासी जाये' या अभगाचे शेवटीं 'जीवनावेगळी मासोळी तैसा तुका तळमळी ॥ असे तुकाराम सागतात नाथभागवतात हाच आशय जवळपास याच शब्दात आला आहे (**ए भा** ७–२३१, ६–३३५) जैसी जीवनावेगळी मासोळी तैसा बोधालागी तळमळी किंवा जळावेगळी मासोळी तैसा जीवु तळमळी (**ए भा** ७-२३१, ६-३३५) 'धन्य आजि दीन • झाले सताचे दर्शन' हा तुकोबाचा अभग नाथाच्या गाथ्यात आलेल्या क्र १७५९ व १७६६ या अभगाचा प्रतिध्वनि वाटतो तुकारामाच्या अभगाना स्फूर्ति देणारे एकनाथाचे अभग विपुल आहेत एकनाथाच्या गाथ्यातील क्र ४६२, १७९१, २२७६ यासारखे काहीं अभग वाचले तरी तुकोबाच्या अभगवाणीत त्याचे उमटलेले पडसाद ध्यानात येतील

३१ प्रपच परमार्थाच्या समन्वयाची दृष्टि रामदास आणि एकनाथ याना समान आहे परतु 'प्रपचच परमार्थरूप होतो हा विश्वास समर्थवाङ्मयात आढळत नाही. **ए भा** ३–२७५–९७ व **दासबोध** ५–२ या ठिकाणीं ढोंगी गुरूचीं लक्षणें सारखींच आहेत **ए भा.** १०–४२६–४४१ या ओव्यात आलेलें गर्भावस्थेचें वर्णन समर्थांनी आपल्या **दासबोधात** अनेक ठिकाणीं काहीं शब्द जसेच्या तसे ठेवून केलें आहे **दासबोध** ११–३–३ ते ४ या ओव्यात आलेले नरदेहाचें महत्त्व नाथाच्या गाथ्यातील क्र २९०६ च्या अभगावरून सुचल्यासारखें वाटावें इतकें सारखें आहे 'डोलत डोलत चाले श्रवणीं कुडल हाले' हें समर्थांचें एक सुदर पद आहे. 'वारियानें कुडल हाले डोळे मोडित राधा चाले' या नाथाच्या पदाचाच तो प्रतिध्वनि नाहीं काय ?

# १८. 'आतां विश्वात्मकें देवें-'

आता विश्वात्मके देवे : येणें वाग्यज्ञें तोषावे
तोषोनि मज द्यावे पसाय-दान हे
जे खळाची व्यकटी साडो तया सत्कर्मी रति वाढो
भूता परस्परे घडो मैत्र जीवाचे
दुरिताचे तिमिर जावो विश्व स्वधर्म सूर्ये पाहो
जो जें वाछील तो ते लाहो प्राणीजात – ज्ञा १८–१७९३ ते ९५.

संतश्रेष्ठ श्रीएकनाथ यानीं उपदेशिलेल्या भागवतधर्मांचें याथार्थ दर्शन घडविण्यासाठीं हा वाग्यज्ञ आरंभिला त्याच्याच कृपेनें तो सिद्धी गेला लेखकाला लाभली तीं 'पायिकीची' धन्यता ! भारतीय संस्कृतीच्या ऐतिहासिक विकासक्रमाच्या प्रकाशात सतवाङ्मयाचा अभ्यास केल्या-खेरीज सताच्या वाङ्मयीन व सामाजिक कार्यांचें यथार्थ मूल्यमापन करता येणें अशक्य आहे विशेषत. सत एकनाथ याच्या कार्याचें यथायोग्य दर्शन अशा अभ्यासावाचून शक्यच होणार नाही. वेदोक्त धर्म-प्रेरणा त्याच्या भागवतधर्मात अविकृत स्वरूपात प्रातिबिंबित झाली आहे असें उत्कटत्वानें प्रत्ययास आल्यावरून यथाशक्ति संशोधन केलें व यथा-मति विवरणाहि केलें वेदोक्त धर्मप्रेरणा हेच नाथाच्या भागवतधर्मांचें उगमस्थान असल्यामुळे या धर्मप्रेरणेचा शोध घेतला, वेळोवेळीं घडलेल्या सामाजिक व वैचारिक स्थित्यतराचा आढावा घेऊन भिन्नकाळातील भाग-वतधर्माच्या स्वरूपाचें विवेचन केलें. वेदशास्त्राच्या मथनातून निघालेलें नाथोक्त भागवतधर्मांचें मथित सद्धर्माचें बलस्थान असलेल्या जनस्वरूपी जनार्दनाच्या चरणीं समर्पित करता आलें तें एकाजनार्दनाच्या कृपेमुळेंच !

परलौकिक कल्याण याच दृष्टीनें धर्मतत्त्वाकडे बघणे हे धर्मतत्त्वांविषयींच्या अज्ञानाचें निदर्शक आहे असेंच म्हणता येईल. मोक्षाची कल्पना परलोकात मिळणाऱ्या उत्तम गतीची सूचक म्हणून रूढ झाली आहे परतु परलोक याचा अर्थ मरणोत्तर लाभणारा लोक, इहलोक नाहीं तो लोक असा घेणें चुकीचें ठरेल, परलोक म्हणजे श्रेष्ठ लोक किंवा उन्नत मानवता असाच परलोकाचा अर्थ घेणें श्रेयस्कर ठरेल उन्नत मानव हेच धर्मतत्त्वाचें उद्दिष्ट असतें. भागवतधर्माचें तरी तेंच ध्येय आहे म्हणून या धर्मात मरणोत्तर कोणती सुखे मिळणार आहेत याचें विवेचन फारसें आढळत नाहीं तर 'याच देहीं याच डोळा मुक्तीचा सोहळा' कसा पाहता येईल आणि नर नारायणस्वरूप कसा होऊ शकेल यावरच अधिक भर दिलेला दिसून येईल.

वेदोक्त धर्मप्रेरणाहि याच स्वरूपाची आहे विश्वाच्या निश्चित प्रगतीचा मार्ग, मनुष्याच्या विकासाचा अमोघ मार्ग, ऋताच्या रूपानें वर्णिला आहे या मार्गाची थोरवी एवढी आहे कीं देव स्वतः त्याचे सरक्षण करतात. त्यामुळें मनुष्यानें त्याची उपासना आणि अनुष्ठान केलें असता त्याचा विकास होईल हे निराळें सागण्याची आवश्यकताच नाहीं. अज्ञानानें हे तत्त्व ज्या ज्या वेळी लोकदृष्टीपुढून ढळत असतें त्यावेळीं समाजाचाहि अधःपात होतो आणि मानव आपल्या मूळच्या उत्तम तत्त्वास अतरतो. आपली ओळख तो विसरतो. अज्ञानजन्य हीन भाव हेच आपलें स्वरूप आहे असें तो मानतो. तो स्वतः अशारीतीनें दु.खी झाल्यामुळें समाजाचें दुःख निवारण करण्याचें सामर्थ्य त्याचे ठिकाणीं रहात नाही म्हणूनच त्याला आपल्या मूळ स्वरूपाची ओळख करून देणारे, खरा मार्ग दर्शविणारे महात्मे वेळोवेळीं उदयास येत असतात परमेश्वर धर्मरक्षणासाठीं अवतार घेतो हें गीतेंतील तत्त्व अशा धार्मिक पुनरुत्थापनास अनुलक्षूनच सागण्यात आलें आहे भागवतधर्माच्या इतिहासात असे महापुरुष अनेक काळात अवतरले आहेत अशाच युगपुरुषापैकी एकनाथ हे एक आहेत.

'जैं धर्माची वाट मोडे अधर्मासी सींग चढे तै आम्हा येणें घडे संसारस्थिति' असें साधुसताच्या अवताराचें एकनाथानीं वर्णन केलें आहे हे वर्णन त्याच्या अवतारासहि पूर्णपणें लागू पडतें एकनाथानी आपल्या

आदर्श आचरणानें आणि वाणीनें भागवतधर्मात चैतन्य ओतले आणि दिङ्मूढ झालेल्या महाराष्ट्रास आत्मोन्नति व समाजोन्नती याचा मार्ग दाखविला हा मार्ग म्हणजे भागवतधर्म गीतेपासून एकनाथी भागवतापर्यंत अनेक ग्रथानीं भागवतधर्माचा उपदेश केला आहे. परतु नाथोक्त भागवत-धर्मात आगळें असे वैशिष्ट्य आहे एकनाथाचा पिंडच जनताभिमुख होता. जनतेला समजेल अशीच सोपी भाषा त्यानी योजिली, जनतेस आकलन होईल अशाच सोप्या रूपात त्यानी धर्मतत्त्व प्रतिपादिलें त्याच्या दृष्टीनें जनता म्हणजे केवळ अज्ञानी लोकाचा मेळावा नव्हता जनता म्हणजे हीन, दलित, पतित अशा पाप्याचा समुदाय नव्हता. वरवर दिसणारें अज्ञान, अथवा हीनतेचे आवरण हा या जनतेचा अगभूत स्वभाव नाहीं. तें परिस्थितीनें त्याच्यावर घातलेलें आच्छादन आहे नाथाना जनता ही परमेश्वररूप वाटत होती परमेश्वराच्या विठ्ठलमूर्तीची त्यानी उपासना केली त्याच प्रमाणे भागवतधर्माचें निरूपण करून 'जनीं जनार्दनाचीं' आराधनाहि त्यानीं केली. त्याचें अद्वैत 'अहम्' आणि 'तत्' म्हणजे परमेश्वर यात जशी एकरूपता मानीत होतें त्याचप्रमाणें जन आणि जनार्दन याच्यात असलेल्या अद्वैताचा विसर त्याना कधींच पडला नाही म्हणून नाथाचा भागवतधर्म हा अज्ञ जनतेला धर्माचरणाचा योग्य मार्ग दाखविणारा होता तसाच तो ज्ञानी माणसालाहि मनुष्यतत्त्वाची आराधना करण्यास सागणारा होता मानवतेविषयी एवढी उदात्त भावना अलीकडच्या काळात भागवतधर्माच्या कोणत्याहि आचार्यांनीं व्यक्त केली नाही हे नाथाचे वैशिष्ट्य आहे नाथाचें अलौकिकत्व यातच आहे. ते लोकात राहिले, लोकात मिसळले, लोकात रमले, लोकाच्या सेवेंतच परमेश्वराच्या सेवेचा आनद त्यानीं भोगला आणि लोकदर्शनातच पाडुरगाचें दर्शन त्यानी घेतले या निष्ठेमुळे सामान्य जनतेस सहज झेपेल असें ज्ञान आणि त्याना सहज समजेल अशी भाषा त्याच्या लेखणीतून उतरली जनतेस ऋताच्या पथाला लावण्याचें कार्य याच निष्ठेनें त्यानीं केलें व त्यानीं भागवतधर्म जागविला तोहि याच लोकनिष्ठेनें

एकनाथानी उपदेशिलेल्या या भागवतधर्माने महाराष्ट्रात एक नवें चैतन्य पसरले. लोकाना आत्मसामर्थ्याची जाणीव झाली. धर्मतत्त्व हे

परधर्माच्या आक्रमक राजवटीनें आणि समाजात धर्माच्या नावाखाली पसरलेल्या अधर्मानें झाकळून गेले होतें त्याचे शुद्ध स्वरूपात दर्शन एकनाथानी घडविलें त्यामुळें समाजात धर्माविषयीचा अभिमान जागृत झाला. त्याचप्रमाणे शुद्धधर्माची ओळख झाली. खऱ्या धर्माचे ज्ञान झाल्यानें जनतेंत स्वत च्या कर्तृत्वाविषयींचा विश्वास तर वाढलाच परतु लोकाच्या कल्याणासाठी झिजणें, कष्टणें हाहि आपल्या धर्माचाच एक भाग आहे याची जाणीव वाढली या जाणीनेंच महाराष्ट्रास समर्थ बनविले आणि नाथाच्या अवतार समाप्तीनतर अवघ्या ५०–६० वर्षांच्या आत स्वराज्याची प्राणप्रतिष्ठा महाराष्ट्रात झाली. शिवछत्रपतीनी आपल्या स्वराज्याचें ध्येय धर्मरक्षण हे ठेवलें होते. एकनाथानी ज्याप्रमाणें सकुचित धर्म पुरस्कारिला नाही त्याचप्रमाणे शिवछत्रपतींनी देखील स्वराज्यातील धर्मरक्षण म्हणजे केवळ हिंदु-धर्माचेच सरक्षण अथवा या धर्मातील जुन्या रूढीचे वा आचाराचें पुनरुज्जीवन हे सकुचित ध्येय आपल्यापुढें ठेवलें नाही तर महाराष्ट्राच्या विकासास पायबद घालणाऱ्या परधर्मीय राजवटीचा प्रतिकार करून समाजाच्या उत्थापनास अनुकूल असें स्वराज्य स्थापिले मुसलमानी राजाप्रमाणें त्यानीं परधर्मीयावर सूड उगविला नाही. धर्माविषयींच्या या व्यापक निष्ठेंतच स्वराज्याचें बळ होते ही निष्ठा जागृत होती तोपर्यंत प्रातिकूल परिस्थितीत देखील स्वराज्य सावरण्यास जनता पुढें सरसावली मराठ्याच्या राज्यावरचीं सकटे दूर झाल्यानतर वैभवाच्या काळात ही प्रेरक आणि व्यापक निष्ठा ढळली. कर्त्या राज्यकारभारधुरधराच्या मनात विकल्प नादू लागले ख्याली–खुशाली वाढली, धर्मसकीर्तनाची जागा कथाप्रिय हरदासी कीर्तनानीं आणि शृगार प्रधान शाहिरी कवनानी घेतली सुखासीनता वाढली निष्ठा डळमळीत झाली आत्मोद्धारास सकुचित अर्थ आला जो तो स्वतःपुरतें आणि स्वत.च्या वैभवापुरतें किंवा किमानपक्षी आपल्या हातात निर्णायक राज्यसूत्रे कशीं राहतील या पुरताच विचार करू लागला ज्या जनतेच्या कल्याणासाठीं आणि जो धर्म जागविण्यासाठीं स्वराज्य उदयास आले ती उद्दिष्टें मागें पडलीं सकटाच्या काळापेक्षा वैभवाच्या काळातच अधःपाताचा धोका अधिक असतो हे लक्षात राहिले नाहीं- तसा उपदेश करणारा प्रभावी महात्मा मराठेशाही-

च्या उत्तरकाळात राहिला नाही एकनाथाच्या भागवतधर्माचे उत्तरकालीन वारसदार तुकाराम आणि रामदास याच्याकडून एकनाथाच्या समग्र भागवतधर्माचा पुरस्कार घडला नाही तुकारामानी व्यक्तिनिष्ठ विकासाच्या बाबीवर अधिक भर दिला तर रामदासानी सघ-सघटना याच्या रूपानें महताच्या द्वारें मठस्थापना करून सघटना केली परतु रामदास तुकारामानतर या परपरेत एकहि प्रभावी सत, अथवा समाजाला समग्र भागवतधर्माचे दर्शन घडविणारा भागवतधर्माचा प्रवक्ता झाला नाहीं तुकोबा वारकरी सप्रदायाचे कळस ठरले रामदासाच्या नतरचे रामदासी महत त्यानीं स्थापलेल्या मठाचेच वारसदार राहिले याहि कारणामुळें, आणि वाढत्या वैभवामुळें एकनाथानी उपदेशिलेला भागवतधर्म विसराळीपडल्याबरोबर मराठी मनात प्रथम अधःपात सुरू झाला आणि त्याचा परिणाम स्वराज्याच्या विनाशात झाला

इतिहासापासून बोध घ्यावयाचा असेल तर आजच्याहि काळात अशीच आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली आहे हे लक्षात घ्यावें लागेल स्वराज्यांपूर्वी असलेली लोकानिष्ठा डळमळू लागली आहे स्वराज्यानें व्यक्तिवैभवास प्राप्त करून दिलेल्या अनुकूल वातावरणाने समाजनिष्ठेचा सकोच होऊ लागला आहे अशा परिस्थितीत नाथोक्त भागवतधर्मानें उपदोशिलेल्या व्यापक लोकानिष्ठेचा आदर्श भारताच्या पुढें राहिला तरच स्वराज्याला बळकटी येऊ शकेल•

पारतत्र्याच्या कालात धर्मोत्थापनार्थ एकनाथानीं भागवतधर्म सागितला तथापि, आजच्या आपल्या स्वातत्र्याच्या कालात देखील तो ऋतपथ दर्शविण्यास समर्थ आहे यात शका नाही कारण, भारतानें राजकीय स्वातत्र्य सपादन केले असलें तरी पारतत्र्याच्या काळात वाढलेल्या दुर्गुणातून त्याची मुक्तता झाली आहे असें मात्र म्हणता येत नाही सध्याच्या राजकीय आणि सामाजिक विकलतेवरून हेच सिद्ध होते

लोकशाहीच्या उदयानतर अनेक लोकपक्ष भारतात अस्तित्वात आले आहेत परतु त्याची लोकनिष्ठा ही धनवताने दरिद्री माणसाविषयीं दाखविलेल्या औदार्याच्या स्वरूपाची आहे "आम्हीच तुमचे कल्याण करू शकतों" हा अहभाव त्यात आहे जनीं जनार्दनाचें दर्शन घ्यावयाचें असेल

तर अभिमान प्रथम सोडला पाहिजे. अहंकारांतून स्वतःची मुक्तता आगोदर करून घ्यावयास पाहिजे निरभिमान लोकसेवकाची निष्ठा असल्याशिवाय लोककल्याण साधता येणार नाहीं जनतेचा सर्वांगीण विकास ही आजच्या युगातील महत्त्वाची समस्या आहे. एकनाथाच्या भागवतधर्मानें ती कशी सोडवावी याचा मार्ग दाखवून दिला आहे स्वातंत्र्यप्राप्तीमुळे भौतिक दृष्ट्या लोकविकासास अनुकूल असें वातावरण निर्माण झाले आहे हे खरें परंतु, परवशतेच्या काळात आपल्या अंतरंगावर चढलेली घनदाट पुटें अद्याप दूर व्हावयाचीं आहेत ज्योतीच्या प्रकाशासाठीं आवश्यक असलेलें 'स्नेह' स्वातंत्र्यानें पुरविलें आहे परंतु, ज्योतीवर साचलेली युगानुयुगाची काजळी दूर झाली नाही म्हणून स्वातंत्र्याचें स्नेह असूनहि ज्योतीचा पूर्ण प्रकाश मात्र पडत नाही. ज्योतीवरची ही काजळी दूर झाली तरच अखंड प्रकाश सर्वत्र नांदेल ही काजळी म्हणजे हीन भावानी केलेला आत्मतत्त्वाचा संकोच स्वातंत्र्य-युद्धाच्या काळात काही मर्यादेंत दडपलेला द्वैतभाव ध्येय-प्राप्तीनंतर अत्यंत विकृत स्वरूपात उफाळून येत आहे. प्रतिकूल परिस्थितीत सत्त्वपरीक्षा होत असतें हे खरें असलें तरी वैभवाच्या काळात प्रत्यही व्यक्तीच्या शीलाचें दर्शन होत असतें सत्त्वशीलतेच्या दृष्टीनें वैभव-काल अत्यंत महत्त्वाचा असतो शीलास जपावयाचें असतें तें अधिकतर याच काळात आपली खरी सत्त्वपरीक्षा स्वातंत्र्याच्या या कालातच आहे पारतंत्र्याच्या कालापेक्षाहि आजच्या कालात लोकनिष्ठा दृढ करणें आव श्यक आहे

अद्वैत ही केवळ अध्यात्माची किंवा पारलौकिक जीवनाची परिभाषा नाहीं ती या जगाची भाषा आहे. आपपरभाव आणि स्वार्थवृत्तीचा संकोच द्वैतमूलक आहे. मानव हा एक तोच परमेश्वराचा अवतार मानवमात्राचें कल्याण हेंच आत्मकल्याण ही व्यापक लोकनिष्ठा आज आवश्यक आहे या दृष्टीने विचार केला असताना नाथानी उपदेशिलेला भागवतधर्म आजच्या काळासहि प्रेरक होऊं शकेल हे पटण्यास वेळ लागणार नाहीं. जनीं जनार्दनाची नाथाची निष्ठा लोकशाहीचे स्वरूप शुद्ध राखण्यास साहाय्यभूत होऊं शकेल यात शंकाच नाही. लोकाच्या सेवेंत ईश्वराची सेवा, लोकांच्या आराधनेंत परमेश्वराची पूजा, लोकदर्शनात ईशदर्शन घडविणारा नाथाचा

भागवतधर्म या काळातहि मार्ग दाखविण्यास समर्थ आहे कारण, लोकोद्धार झाल्याविना आत्मोद्धार होऊच शकत नाहीं अशी या धर्माची निष्ठा आहे लोकाविषयी एवढी थोर निष्ठा असल्याशिवाय लोकशाहीचें अधिष्ठान उन्नत कसें बरे राहील ?

दृश्य जगताच्या पलीकडे असलेल्या अंतिम सत्याचें सशोधन प्राचीन काळापासून ऋषि-मुनि करीत आले आहेत या सत्यसशोधनास 'अहम्' पासून प्रारभ होतो व्यक्तीचें नामरूपात्मक अस्तित्व म्हणजे 'अहम्' अशी सामान्य माणसाची समजूत असते तर चराचराच्या रूपानें आविष्कृत झालेलें व्यापक व्यक्तिमत्त्व हे खऱ्या अर्थानें 'अहम्' आहे अशी थोर विभूतीची श्रद्धा असते आपलें व्यक्तिमत्व व्यापक सत्याचा अशमात्र असून त्या सत्याशीं ऐक्य साधण्यासाठी म्हणजेच आत्मसाक्षात्कारासाठीं तत्त्वचिंतक तळमळत असतो मानवी शरीरात सुप्तरूपानें अस्तित्वात असलेलें आत्म-तत्त्व जागृत करून त्याचा विश्वाच्या रूपानें आविष्कृत झालेल्या आत्म-तत्त्वाशी लय साधणे म्हणजेच सत्याचा साक्षात्कार, अध्यात्मज्ञान तें हेच ऋताचा आविष्कार याहून वेगळा नसतो याच ऋताची साधना करण्यासाठीं जनी जनार्दनाची निष्ठा नाथानीं उपदेशिली नाथाच्या दृष्टीनें जनीं जनार्दनाचा प्रत्यय हे वेदोक्त ज्ञानाचें सार असून ज्ञान आणि भक्ति याची परिसीमा देखील हीच आहे

अध्यात्मवादी जगाविषयी उदासीन असतात किंवा जगापासून अलिप्त राहतात ही समजूत चुकीची आहे. व्यावहारिक जगानें मानलेलें सत्य त्याच्या दृष्टीनें अपूर्ण असते किंवा अवास्तव तरी असते. म्हणून त्याच्या दृष्टीनें अवास्तव असलेल्या विषयाविषयीं ते उदासीन असतात व अतिम सत्यावरच आपले सर्व लक्ष केंद्रित करीत असतात. ज्ञान आणि प्रेम या दोन वस्तूविषयीं मानवी मनाला वाटणारे स्वाभाविक आकर्षण त्याच्या वृत्तींतहि असतें. फरक एवढाच कीं, समग्र विश्वास व्यापणाऱ्या सत्तत्त्वाच्या ज्ञानानेंच त्याची जिज्ञासा तृप्त होतें व मानवमात्रावर प्रेम करून अतिम सत्याशीं एकरूपता साधणाऱ्या प्रेमानेंच कृतार्थता होते अशी त्याची भूमिका असते भक्ति ही परमप्रेमरूपा आहे तशीच ती सहजप्रकाशरूप आहे असें एकनाथ सागतात त्याच्या मुळाशी विमल ज्ञान व निर्मळ प्रेम

याचें ऐक्य आहे हे वरील सदर्भात नाथांच्या भागवतधर्माचा विचार लेला असताना प्रत्ययास येईल. 'सत्यं ज्ञान अनत ब्रह्म' किंवा सच्चिदानद-स्वरूप परब्रह्माची उपनिषदाची कल्पना देखील उपरोक्त प्रत्ययाहून वेगळी नाहीं

आजेंच युग विज्ञानाचें आहे. विज्ञानाच्या नेत्रदीपक यशामुळें सर्व काही विज्ञानानें प्राप्त होऊ शकते असा गैरसमज आज वाढीस लागला आहे. भौतिक विश्व आणि वासनापूर्ती या स्वयपूर्ण असल्याचे समज त्यामुळेंच प्रसृत झाले आहेत. त्यामुळें जीवन आणि मन व मन आणि आत्मा याच्यामध्यें आकाश–पाताळाचें अतर निर्माण झालें आहे आजच्या-विश्वव्यापी विकलतेचें हे आदिकारण आहे हे अतर दूर करणें हाच मानवमात्रास सुखी करण्याचा एकमेव मार्ग आहे हें अतर दूर करावयाचें म्हणजे मानवमात्राचा विकास आणि विश्वाची निश्चित प्रगति यात अवि-रोध निर्माण होणें आवश्यक आहे

वेदोक्त ऋतानें आणि नाथोक्त भागवतधर्मानें आविरोधाचा व निश्चित प्रगतीचा मार्ग दाखविला आहे या मार्गानें धर्माविषयींचें केवळ ज्ञान प्रमाण मानलें नाहीं तर त्या ज्ञानाचा जिवत अनुभव प्रमाण मानला आहे हा प्रत्यय आला म्हणजे जन आणि जनार्दन, विश्व आणि मानव, बुद्धी आणि मन, स्वार्थ आणि परार्थ, प्रपंच आणि परमार्थ यात असलेल्या अद्वैताचें दर्शन घडतें या धर्मानें नराचा नारायण होतो. आणि पुरुषाचा पुरुषो-त्तम होतो ऋताचा हा पंथ, सत्याचा हा मार्ग, परमात्मतत्त्वाचा हा सहज-प्रकाश, विश्वात्म्याची ही सहजस्थिति नाथोक्त भागवतधर्माच्या रूपानें व प्रकाशली आहे आजच्या युगात देखील हीच व्यापक आत्मनिष्ठा सहजप्रकाशाची भक्ति समाजविकास घडवून आणील असा विश्वास वाटतो कारण, समदर्शन हेच सत्य आहे, सत्य हेच परब्रह्म आहे असें नाथ मानतात. वेदोक्त ऋताचा अर्थ तरी याहून वेगळ असा थोडाच आहे?

ज्या नाव बोलिजे निजसत्य तें मी सागेन निश्चित
समब्रह्म देखणें सतत तें परम सत्य उद्धवा
वस्तु न देखता सर्वसम जें देखणें गा विषम
तेचि असत्य अतिदुर्गम, सत्य तें ब्रह्मसमसाम्यें – ए. भा १८–४६१–६२.

# परिशिष्ट-खंड

* भक्तीचा उगम. काहीं आक्षेप
* सूफी पंथ आणि भागवतधर्म
* गीता आणि एकादशस्कंध
* चौंडरसकृत पंढरीवर्णन
* शांकर वेदांत आणि ज्ञानेश्वर

# आधार ग्रंथ

# १. भक्तीचा उगम : कांहीं आक्षेप

भक्तिप्रधान भागवतधर्मात रूढ असलेल्या भक्तीचें अस्तित्व किमान वैदिक कालाइतके प्राचीन असूनहि खिस्तीधर्माचा परिणाम झाल्यामुळे भक्तिमार्ग भारतात उदयास आला अशा स्वरूपाचे अपसिद्धात गेल्या शतकाच्या प्रारंभी काही प्राश्चिमात्य पडितानीं माडले होते एका जर्मन पडितानें इ. स. १८७३ सालीं 'इडियन ॲटिक्वेरी' या नियतकालिकात एक लेख लिहून हे मत माडलें हे मत माडताना बायबल आणि गीता यामधील काही समान स्थळाची माहितीहि या विद्वानाने दिली. नारदाला श्वेतद्वीपात भागवतधर्माचा उपदेश झाल्याची पौराणिक कथा आधारास घेऊन हे श्वेतद्वीप म्हणजे युरोप खडच होय असेहि या पडितानें प्रतिपादन केलें. जॉन मूर, डॉ ग्रिअर्सन व डॉ विंटर्निट्झ् या पंडितानीं या मताचें खडन केलें आहे [१] डॉ भाडारकर यानीं तर ऐतिहासिक पुरावे देऊन खिस्तापूर्वी तिसऱ्या किवा चौथ्या शतकात भक्तिमार्ग भारतात अस्तित्वात असल्यामुळें खिस्ती किंवा इतर कोणत्याहि धर्मातून याबाबतींत उसनवारी करण्याचा प्रश्नच निर्माण होत नाहीं असा निर्वाळा दिला आहे [२]

दुसऱ्या एका विद्वान् खिस्ती धर्मगुरूनें अशाच स्वरूपाचा अपसिद्धात भक्तिमार्गासबधाने दिला आहे त्याच्या म्हणण्याचा थोडक्यात आशय असा : 'भक्तिमार्गासह सर्वच तत्त्वज्ञान आर्यानीं अनार्यापासून उचललें आहे आत्मा हा शब्दच वैदिक आर्याना अपरिचित होता तामीळ 'आन्' या धातूपासून 'आत्मा' हा शब्द बनलेला असून तो ऋग्वेदात आढळून येत नाही. द्रावीड सस्कृति ही बरीच समृद्ध असल्यामुळें आर्यानीं अनार्यांच्या पुष्कळ बाबी आत्मसात् केल्या त्यात भक्ति आणि तत्त्वज्ञान याचा प्रामुख्यानें उल्लेख करता येईल [३] '

[१] रे. हेरस यानीं आग्रहानें माडलेल्या या मतास इतिहासाचा मुळींच आधार नाहीं आत्मा हा शब्द ऋग्वेदात निदान २० वेळा तरी आल्याचें

उपरोक्त विद्वानाच्या देशबाधवानीच लिहून ठेवलें आहे [४] त्यामुळें वरील मताचें खडन करण्याची विशेष आवश्यकता आहे असें वाटत नाही. याच प्रबधाच्या पहिल्या तीन प्रकरणात भक्तीचा आणि श्रद्धेचा वेदोक्त ऋताशी आणि वरुणाच्या उपासनेशीं कसा सबध पोहोंचतो हे सप्रमाण सिद्ध केले आहेच त्यावरून वरील मत किती निराधार आहे हे लक्षात येण्यास वेळ लागणार नाहीं

तथापि, सिंधु-खोऱ्यातील उत्खननात सापडलेल्या अवशेषाच्या आधारे काही पाश्चिमात्य पडितानीं असा निष्कर्ष काढला आहे की, वेदपूर्वकालात भारतात मूर्तिपूजा आणि भक्ति अस्तित्वात होती वैदिक सस्कृतीचा भारतात प्रसार झाल्यानतर प्राचीन द्रावीड सस्कृतीचे हे वैशिष्टय आर्याच्या संस्कृतीत उतरलें भागवत पुराणाचा आधार देऊन डॉ पेडसे यानींहि शिव आणि विष्णु याची भक्ति द्रावीड असल्याचें सागितलें आहे.[५]

सिंधुखोऱ्यात झालेल्या उत्खाननात सापडलेले अवशेष आर्यपूर्वकालीन आहेत हा पश्चिमात्य पाडिताचा सिद्धातच आता निराधार ठरला असल्यानें त्या सिद्धातावर आधारलेली भक्तीची उसनवारी लटकी ठरते हे निराळें सागण्याची आवश्यकताच नाहीं 'या उत्खननात सापडलेली मूर्ति पशुपतीची आहे त्यावरून द्राविडानी शिवोपासना स्वीकारली होती व तीच पुढें आर्यांनीं चालविली' असा सिद्धात ज्या मूर्तीच्या आधारें माडण्यात येतो ती मूर्ती 'सामान्य माणसाची फार तर पुरोहिताची असेल ती देवाची प्रतिमा आहे असें समजण्यास काहीहि लक्षण त्या मूर्तींत नाहीं'. असें म म काणे - याचें मत आहे [६] ज्योति.शास्त्रीय आधार देऊनहि ही संस्कृति प्राचीन नसल्याचें म. म काणे यानीं सिद्ध केलें आहे ते म्हणतात, ..सिंधुखोऱ्यातील किल्लेकोट बदोबस्त केलेल्या नगरातील लोक बहुधा धार्मिक विधींच्या आणि उपासनेच्या बाबतींत ऋग्वेदादिकाहून वेगळी पद्धति अनुसरणारे आर्यच असावेत किंबहुना आर्याहून वेगळ्या वंशाचे व काळ्यावर्णाचे परतु आर्यांचेच समकालीन असावेत तसेच सिंधुनगरातील सस्कृति ऋग्वैदिक संस्कृतीहून प्राचीन नव्हती असेंहि म्हणता येईल उलट .. ज्योतिःशास्त्रीय पुराव्यावरून तर असें दिसतें कीं, ऋग्वैदिक लोक सिंधुलोकापेक्षाहि प्राचीन होते'

वैदिक वाङ्मयात आढळून येणारें भक्तीचें शुद्ध स्वरूप, देवांचा राजा वरुण याच्या आराधनेपासून ते भगवान् विष्णूच्या भक्तीपर्यंत असलेली भक्तिमार्गाची अखड परपरा व प्राचीन इतिहासावरून निघणारे निष्कर्ष या सर्वांचा साकल्यानें विचार केला असता भागवतधर्मातील भक्तीचें उगमस्थान वैदिक संस्कृतीच्या बाहेर शोधणें निरर्थक ठरतें भागवत- धर्मातील भक्ति ही शुद्ध वैदिक परपरेंतून परिणत झालेली आहे वैदिक वाङ्मयात असलेलें तिचें अधिष्ठान इतरत्र सप्रमाण सिद्ध केलेलेंच असल्या मुळें याबाबतींत अधिक विस्तार करण्याची आवश्यकता नाहीं ● ●

## १. टीपा


१ *Encyclopaedia of Religion and Ethics*, Vol II
Winternitz, *History of Indian Literature*, Vol I. P. 431

२ Origin of Bhakti School, *Indian Antiquary*, Jan. 1912

३. *Mystic Teachings of Haridasas of Karnatak*, Introdution

४. Griswold, *Religion of Rigveda*, P 241

५ डॉ पेंडसे, **ज्ञानेश्वराचे तत्त्वज्ञान**, पृ २५४

६ म म काणे, 'हरप्पा सस्कृतीचा कालनिर्णय' **पुरुषार्थ**, एप्रिल १९५४.

# २. सूफी पंथ आणि भागवतधर्म

भक्तीच्या उगमासबधीं रूढ असलेल्या विपर्यस्त मताचा उल्लेख आगो-दरच्या परिशिष्टात आलाच आहे या क्षेत्रातील आणखी एका प्रचलित विपर्यासाचा परामर्श घ्यावयाचा आहे. 'भागवतधर्मातील भक्तीच्या स्वरूपावर इस्लामी धर्मातून परिणत झालेल्या सूफींच्या सप्रदायाचा परिणाम झाला आहे' अशा आशयाचें मत कित्येक विद्वानानी माडलें आहे सूफींचा प्रेमसप्रदाय आणि भागवतधर्मातील रागात्मिका भक्ति यामध्यें कांहीं बाब-तींत साधर्म्य आढळतें हे सत्य आहे 'सर्व साक्षात्कारी सताची भाषा सारखीच असते. कारण, ते एकाच भूमिकेंतून उगम पावलेले असतात'[१] या सिद्धाताच्या आधाराने भारतीय रागात्मिका भक्ति आणि इस्लामी सूफींचें परमेश्वराविषयक प्रेम याचें साधर्म्य दर्शविण्यात आलें असतें तर या बाबतींत वाद चालण्याचें कारणहि नव्हतें परतु, प्रत्यक्ष प्रकार घडतो तो निराळाच' सूफींच्या प्रेमरूपा भक्तीचा विस्तार भारतात रागात्मिका भक्तीच्या स्वरूपात झाला आहे अशा आशयाचें विधान विद्वानाकडून करण्यात येतें त्यामुळें या मताचा परामर्श घेणें आवश्यक ठरतें. उदाहरणार्थ एकनाथाच्या रुक्मिणीस्वयवराचें परीक्षण करताना प्रा. न र फाटक म्हणतात, 'जिवा-शिवाच्या लग्नाचें रूपक रुक्मिणीस्वयवरावर चढविण्याची कल्पना एक-नाथानीं कोठून घेतली असावी, हा एक चर्चा करण्याचा विषय आहे' सुमारें दीड पान या चर्चेसाठीं लेखकानें दिलें आहे त्यात त्यानी असा निष्कर्ष काढला आहे कीं, अशा प्रकारचें रूपक पौराणिक आख्यानात नाहीं त्याच्या पूर्वीच्या मराठी कवींनीं अशा प्रकारचें रूपक केलें नाही मग ही कल्पना आली कोठून ? प्रा फाटकाचें म्हणणें आहे .. "असा विचार करू लागलें की पुन्हा सूफी सप्रदायाच्या साहित्याचें स्मरण झाल्या-शिवाय रहात नाहीं जीवात्मा लौकिक स्त्रीरूपानें कोणा पुरुषाच्या (परमात्म्याच्या) प्राप्तीसाठीं तळमळतो, त्याची भक्ति सर्व घरबध तोडून

टाकण्याची भाषा बोलते, शेवटीं ती भक्ति दुष्कीर्तीची क्षिति न बाळगता त्या जीवात्म्याला परमात्म्याकडे घेऊन जाते. अशा भावार्थाच्या कविता सूफी साहित्यामध्यें दृष्टीस पडतात एकनाथ काशीस राहू लागल्यानतर त्याच्या चिंतनशीलतेला या सूफी काव्यप्रकाराचा स्पर्श होऊन त्यानीं रुक्मिणीस्वयवराचें प्राचीन पौराणिक आख्यान या वळणानें सहज रचून टाकण्याचा हेतु मनात आणला असल्यास ते सभाव्यतेच्या मर्यादेपली-कडचें वाटायला नको"[२]

वरील 'चर्चेत' प्रा फाटकानीं पुढील मुद्दे गोविले आहेत –

(१) जिवाशिवाच्या लग्नाची कल्पना पौराणिक वाङ्मयात नाहीं.

(२) स्त्रीरूपाने पुरुषाच्या ( परमात्म्याच्या ) प्राप्तीसाठीं तळमळ-णाऱ्या जिवाची भक्ति सूफी वाङ्मयात आढळते.

(३) नाथपूर्वकालीन कवीनीं ती माडली नाहीं

(४) काशीच्या वास्तव्यात नाथाना सुफीवाङ्मयाचा परिचय झाला असेल

(५) त्याचायोगे सूफीवाङ्मयात आढळून येणारी जिवा-शिवाच्या लग्नाची कल्पना नाथानीं रुक्मिणीस्वयवराच्याद्वारे माडली असेल

यापैकीं पहिला मुद्दा भारतीय भक्ति–शास्त्राच्या अज्ञानावर आधार-लेला आहे जिवाशिवाच्या लग्नाची कल्पना पौराणिक वाङ्मयात नाहीं, किंवा भारतीय वाङ्ममयात इस्लामपूर्वकालात तिचें अस्तित्व नव्हतें या विधानास इतिहासाचा आधार नाही नारदभक्तिसूत्रात ८२ व्या सूत्रात भक्तीचे अकरा प्रकार सागण्यात आले आहेत त्यापैकीं सातवा प्रकार 'कातासक्ति' हा असून 'परमविरहासक्ति' हा दहावा प्रकार आहे स्त्रीचें पुरुषावर प्रेम असते त्याप्रमाणे जिवानें परमेश्वरप्रेम करणें हा 'कातासक्तीचा' भावार्थ असून 'पतीच्या विरहानें पत्नि तळमळते त्याप्रमाणें परमेश्वरप्राप्ती-साठी तळमळणे' असें विरहासक्तीचें स्पष्टीकरण आहे. यासबधात शकेस जागा राहू नये म्हणून अगोदरहि दोन सूत्रें आलीं आहेत १९ व्या सूत्रात परमेश्वरास सर्वस्व अर्पण करणें आणि परमेश्वररहित अवस्थेंत परमव्याकुलता असणें हीं भक्तीचीं लक्षणें सागण्यात आलीं आहेत त्याच्या स्पष्टी-

करणार्थ गाकुळातील गोपागनाचें उदाहरण देऊन पुढे २३ व्या सूत्रात 'तद्विहीन जाराणामिव' असें लक्षण दिलें आहे परमेश्वराविरहित अशी स्थिति भक्ताच्या दृष्टीने जाराच्या सहवासात असलेल्या पतिव्रतेसारखी असते असें नारद सागतात ६६ व्या सूत्रात 'नित्यदास्य नित्यकान्ताभजनात्मक प्रेम कार्य प्रेमैव कार्यम् ॥' असें भक्तीचें लक्षण देण्यात आलें आहे या सर्व लक्षणावरून नारदास 'जिवानें स्त्रीच्या रूपानें परमेश्वरावर प्रेम करणें' हे भक्तिलक्षण समत होतें असें निश्चित रीतीनें म्हणता येतें नारदभक्तिसूत्राचा काल १२ व्या शतकाच्या अलीकडे आणता येत नाहीं या कालात सूफी वाङ्मयाचा परिणाम सस्कृत वाङ्मयावर झाला होता असें अद्याप कोणीहि प्रतिपादिलें नाही. यापूर्वीचा आधार भागवतात सापडतो भागवतात कृष्णचरित्र विस्ताराने आलें आहे निरनिराळ्या कथाच्या आधारानें कृष्णाचें माहात्म्य भागवतकारानीं वर्णिले आहे कृष्णगोपीचें प्रेम यातलाच एक भाग आहे गोपीच्या प्रेमाच्या रूपानें 'कान्तभक्ती' चें वर्णन भागवतात आलें आहे दशमस्कधात ३१ व्या अध्यायात आलेले गोपीगीत या दृष्टीनें अभ्यासण्यासारखें आहे या गीतात श्रीकृष्ण भक्तवत्सल परमेश्वर असल्याची जाणीव गोपीना असल्याचें दिसून येते तरीहि त्या कृष्णावर प्रेम करतात. पुढील श्लोक कृष्णभक्तीचा भाव विशेषरूपानें व्यक्त करतातः

दिनपरिक्षये नीलकुन्तलैर्वनरूहानन बिभ्रदावृतम्
घनरजस्वल दर्शयन् मुहुर्मनसि न स्मर वीर यच्छसि ॥
प्रणतकामद पद्मजार्चित धरणिमडन ध्येयमापदि
चरणपडकज शान्तम च ते रमण न स्तनेष्वर्पयाधिहन् ॥
सुरतवर्धन शोकनाशन स्वरितवेणुना सुष्ठु चुबितम्
इतररागविस्मारण नृणा वितर वीर नस्तेऽधरामृतम्
रहसि सविद हृच्छयोदय प्रहसितानन प्रेमवीक्षणम्
बृहदुर श्रियो वीक्ष्य धाम ते मूहुरतिस्पृहा मुह्यते मन

— भागवत, दशमस्कध, ३१–१२, १३, १४ व १७

१९ श्लोकाचें हे सपूर्ण गीतच कान्तभक्तीचें भावरम्य असें उदाहरण म्हणून देता येईल भागवताचा काल पाश्चात्यानी १० व्या शतकाच्या

आसपास मानला असला तरी तो ग्रथ इ स च्या तिसऱ्या चौथ्या शतकात रचण्यात आला आहे हें मानण्यास भरपूर पुरावा आहे आणि दहावें शतक हा भागवताचा काल मानला तरी त्या काळात सूफी भारतात असल्याचा पुरावा इतिहासात सापडत नाही त्यावरून जिवाशिवाच्या मीलनाची कल्पना धुडण्यासाठी भारतीय सप्रदायास सूफी पंथाकडे पाहण्याची आवश्यकता नव्हती हें स्पष्ट होईल भागवताचा विद्वानानी निश्चित केलेला काल इ स. च्या चौथ्या शतकाच्या आलीकडे येऊच शकत नाही [३] या काळात इस्लामचा जन्महि झाला नव्हता. सूफीपथ इस्लामच्या उदयानतर सुमारें तीन शतकानीं अस्तित्वात आला व हिजरीच्या ६ व्या शतकात म्हणजे इ स च्या तेराव्या शतकात हा पथ इस्लामीधर्मात प्रविष्ट झाला हें [४] लक्षात घेतलें असताना या पथाच्या पूर्वी सुमोर एक हजार वर्षे रचलेल्या भागवतपुराणातील भाक्ति सूफीपथातून उदयास आली असें तर्कदुष्ट विधान करण्याचा प्रसंग येतो !

प्रा फाटकानी केलेल्या विवेचनातून निष्पन्न होणाऱ्या दुसऱ्या मुद्द्याचा म्हणजे सुफीच्या प्रेमरूप भक्तीचा विचार करण्यापूर्वी तिसऱ्या मुद्द्याचा परामर्श घेतला पाहिजे. 'नाथपूर्वकालीन कवींनी जिवाशिवाच्या लग्नाची कल्पना माडली नाहीं' असा त्याच्या म्हणण्याचा आशय आहे. नाथपूर्वकालीन मराठीवाङ्मयाच्या इतिहासाची साक्ष याच्या अगदीं उलट आहे. महानुभाव कवि नरेंद्र याच्या रुक्मिणी–स्वयवरात रुक्मिणीच्या पत्रिकेंत पुढील उद्गार रुक्मिणीच्या मुखानें वदविले आहेत ·

तू परब्रह्म अमळु सदा मी जीवु समळु
परि तु शरणागता देसी मेळु इया आशा विनीवतोंये ।।–

यात जिवाशिवाच्या लग्नाची कल्पना नाहीं असें म्हणता येत नाहीं. परमेश्वर आणि जीव याचें प्रियकर-प्रेयसीचें नातें फक्त सूफी सतानींच कल्पिलें आहे असें नाही ज्ञानेश्वराच्या अभगात 'चदनाची चोळीः माझें अंग की ओ जाळी'[५] अशा स्वरूपाच्या भावना आढळून येतील पण, प्रा फाटकाच्या मताप्रमाणें, ज्ञानेश्वरासह सारेच सत मुसलमानी राजवट दृढमूल झाल्यानंतरचे आहेत असें गृहीत धरलें तरी या भावनाना भारतीय सस्कृतींत प्राचीन इतिहास नाहीं असें म्हणता येत नाहीं

नारद–भक्तिसूत्रें कितीहि अर्वाचीन मानली तरी भारतात यावनी सस्कृति दृढमूल होण्यापूर्वी तीं सूत्रे रचली गेलीं आहेत नारदाच्या भक्ति-प्रकारात कान्तभक्तीचा निर्देश करण्यात आल्याचें पूर्वी उल्लेखिलें आहेच. त्याचप्रमाणें तेवीसाव्या सूत्रात 'भक्ताला परमेश्वराव्यतिरिक्त जगणें हे कुलस्त्रीस जाराच्या सहवासात राहिल्याप्रमाणें वाटते' (तद्विहीन जाराणा-मिव) असें सागितलें आहे त्यामुळे 'भारतीय भक्तिपथानें कोणत्या तरी स्वरूपात सूफीपथाची उसनवारी केली आहे' असें विधान करणें धाड-साचेंच वाटते

खरी परिस्थिति अशी आहे की,सूफी साधूनींच समृद्ध भारतीय तत्त्वज्ञा-नाची अधिक उसनवारी केली आहे. इस्लामधर्मास विसगत असलेली तत्त्वे आपल्या सप्रदायात रूढ करणाऱ्या या इराणी साधूना तशा प्रकारची अनुकूलताहि होती इस्लाम भारतात येण्यापूर्वीच भारतीय तत्त्वज्ञ अरब-स्तान व इराण या प्रातात आपल्या विद्येचा परिचय करून देण्यासाठी गेल्याचें इतिहास सागतो. मन्सूर, हरूनअल्रशीद, मामून या खलिफाच्या काळात भारतीय पडित मोठ्या प्रमाणात अरबस्तानात जात असत पुष्कळ सस्कृत तत्त्वज्ञानप्रधान ग्रथाचीं भाषातरें या काळात अरबी भाषेत झाली अकराव्या शतकात अल्बेरूनी आणि अल्मुवाफिक हे भारतीय विद्याचा अभ्यास करण्यासाठी भारतात आले होते हे प्रसिद्ध आहेच कपिलाचें साख्यदर्शन, पतजलीचीं योगसूत्रें आणि भगवद्गीता या ग्रथाचे अनुवाद इ स १०३० च्या सुमारास अल्बेरूनीनें केले आहेत

इतिहासाच्या या प्रकाशात भारतीय सताचा ईश्वर आणि सूफींचा अल्ला याच्यातील सारखेपणाचें रहस्य सहज उलगडते 'भारतीय तत्त्वज्ञा-नाचा सूफीपथावर परिणाम झाला आहे हे कोणासहि नाकारता येणार नाहीं' असा निष्कर्ष या विषयावर भारदस्त ग्रंथ लिहिणाऱ्या सुबहान नावाच्या पाश्चात्य लेखकानेंहि काढला आहे[६] म्हणूनच एकनाथ किंवा अन्य कोणताहि भारतीय सत आपला भक्तिसप्रदाय समृद्ध करण्यासाठीं सूफीपथाच्या भाडारास शरण गेला असें म्हणणें ऐतिहासिक सत्याचा विपर्यास करणारें आहे.

वस्तुतः जीव-शिव याचें अद्वैत इस्लामधर्मात उपदेशिलें नाही त्याच-

प्रमाणें परमेश्वर भक्ताच्या हृदयात अवतीर्ण होण्याइतकें लहान स्वरूप धारण करतो हा सिद्धान्तहि इस्लामला मान्य नाहीं ख्रिस्ती धर्माप्रमाणेंच इस्लाम धर्मातहि स्वर्गाच्या उच्चासनावर परमेश्वर विश्वाचें संचालन करतो अशी समजूत असल्यामुळें उभय पंथात मूर्तिपूजा वर्ज्य मानली आहे. साधूची पूजासुद्धा ते परमेश्वरस्वरूप आहेत म्हणून करण्यात येत नसून ते परमेश्वराचें प्रेषित किंवा परमेश्वराचा संदेश मनवाना सांगणारे आहेत म्हणूनच करण्यात येते इस्लामधर्माच्या या चौकटीच्या बाहेर जाऊन सूफीपंथीयांनी मात्र परमेश्वर हृदयात वास करतो हे तत्त्व प्रतिपादिलें आहे तसेंच स्वतःच्या व्यक्तित्वाचा परमेश्वराच्या विभूतिमत्वात लय साधणें ही अंतिम अवस्था सूफी पंथीयांनी मानली आहे [७]

'एकनिष्ठ भक्ताच्या हृदयात परमेश्वर वास करतो' असें जिली हा सूफी साधु लिहितो. रूमीनेंहि याच स्वरूपाचे विचार प्रगट केले आहेत 'ईश्वराला भक्ताच्या हृदयात शोधा, कारण सर्व आत्म्याचा आत्मा तो आहे' असा रूमीचा संदेश आहे अबूयाझीद म्हणतो, 'माझ्या देहाच्या आवरणाखाली ईश्वर आहे, मीच ईश्वर आहे'

'मीच ईश्वर आहे!' 'अहं ब्रह्मास्मि' या अद्वैत सिद्धान्ताचाच प्रतिध्वनि या संताच्या वाङ्मयातून दुमदुमत असल्याचें दिसून येईल हा सिद्धान्त इस्लाम धर्मास मान्य नाही म्हणून त्याचा पुरस्कार करणारा पहिला साधु हुसेन मन्सूर याचा धर्मपंडितांनी अनंत प्रकारें छळ केला. सात वर्षांच्या तुरुंगवासानंतरहि त्याने आपलें मत बदललें नाहीं. शेवटीं अनेक थोर संत-महात्म्याप्रमाणेंच आपल्या मताचा प्रसार करणाऱ्या या संतालाहि फासावर चढावें लागलें!

गुरु हा ब्रह्मस्वरूप असून संत हीं भगवताचीं 'चालतीं बोलतीं रूपे आहेत' हा ज्ञानेश्वर-एकनाथाचा सिद्धान्त सूफी साधूंना मान्य आहे. भारतीय भक्तिसंप्रदायात सामान्यतः नवविधा भक्ति मानली आहे. "श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आणि आत्मनिवेदन" असे प्रल्हादानें भागवतात भक्तीचे नऊ प्रकार वर्णिले आहेत. नारदानें अकरा प्रकार सांगितले आहेत : गुण, माहात्म्य, पूजा, स्मरण, दास्य, सख्य, वात्सल्य, कान्त (पत्नीचें पतिविषयी असलेलें प्रेम)

आत्मनिवेदन, तन्मय, परमविरह, आणि एकरूपता" हे नऊ किंवा अकरा प्रकार हे भक्तीचे पर्याय नाहीत, साधकाच्या विविध अवस्थेतील तो विकासक्रम आहे हे सहज लक्षात येण्यासारखे आहे

सूफी सतानीं सुद्धा ७ प्रकारची भक्ति मानली आहे महानुभाव तत्त्वज्ञानात 'जन्मला साता जीव क्षण एक शुद्ध असे : मग मैळे।' जन्मल्यानतर जीव क्षणभर शुद्ध राहतो. नतर त्याच्यावर मळाचीं पुटें चढूं लागतात असे अनंत मळ जिवाला लागतात त्या मळातून परमेश्वरभक्तीच्या द्वारें जिवाला शुद्ध करणें हे भक्ताचे ध्येय असते आणि असा जीव परमेश्वराच्या "सन्निधानास" पात्र ठरतो असें सागण्यात आले आहे त्याचप्रमाणें सूफी साधूचाहि असा सिद्वान्त आहे की, जीव आणि परमेश्वर अधार आणि प्रकाश याच्या ७० हजार आवरणानीं विभक्त झालेले असतात आपल्या मूळ स्वरूपात विलीन होण्यासाठी जिवाला १० हजार आवरणाच्या सात अवस्थातून प्रवास करावा लागतो या अवस्था खालीलप्रमाणें आहेत .-

(१) उबिदिय्यात (सेवावृत्ति), (२) इष्क (परमेश्वराविषयीं प्रेम), (३) झद् (निवृत्ति), (४) मारिफत (ज्ञान), (५) वज्द (आनद), (६) हकीकत (परमेश्वराच्या सत्यस्वरूपाच्या प्रकाशानें हृदय प्रकाशित होणें), आणि (७) वसूल (तद्रूपता)

या सातहि अवस्थाचें भारतीय भक्ताच्या अवस्थाशीं किती साम्य आहे हे अधिक विवेचन न करताहि ध्यानात येण्यासारखें आहे जगताच्या उत्पत्तीविषयींच्या सूफींच्या कल्पना तर वेद आणि उपनिषदें यातून अक्षरशः उचलून घेतल्यासारख्या वाटतात सद्भाव धारण करणारे मूलतत्त्व क्रमाक्रमानें गुणयुक्त बनतें, पहिली आणि सर्वश्रेष्ठ अवस्थाहि निर्गुणाचीच (अल्वजुदुल्मुतलक्) या अवस्थेत सर्व वस्तुजात भगवतात बीजरूपानें असते त्याची अभिव्यक्ति होण्यापूर्वी सर्वत्र "अल् अमा" गाढ अधःकार असतो नतर त्या सत्तत्त्वास व्यक्त होण्याची इच्छा निर्माण होते व अशा रीतीनें वस्तुजात नामरूपास येते 'सृष्टि निर्माण होण्यापूर्वी परमेश्वर कोठें होता' असा महम्मदास प्रश्न केला असताना 'त्यानें उत्तर दिलें, 'परमेश्वर अल् अमा (काळा ढग किंवा दाट धुकें) यात होता या ढगावर किंवा

खाली हवा नव्हती' हे वर्णन वाचीत असताना ऋग्वेदांतील नासदीय सूक्ताची आठवण झाल्याशिवाय रहात नाही. या सुप्रसिद्ध सूक्तातील ऋषि हेच सागतो. तो म्हणतो, 'सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वीं सद्हि नव्हतें असद्हि नव्हतें अध कारानेच व्यापलेला असा अधःकार होता त्याखेरीज काहीच नव्हतें'

सुफीच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला असताना जो निष्कर्ष निघतो तो प्रारभीं उल्लेखिलेल्या विद्वानाच्या मताच्या अगदी उलट आहे इस्लामी धर्माशीं विसगत असलेलें अद्वैत सुफींनीं भारतीय तत्त्वज्ञानातून उचललें हे सप्रमाण सिद्ध होत असल्यामुळें भागवतधर्मानें सुफीची उसनवारी केली या मताला आधारच रहात नाही शिवाय, भारतीय भक्तिमार्ग आणि सूफी याच्यात मूलभूत भूमिकेचेंच अतर आहे ही महत्त्वाची गोष्टहि ध्यानात ठेवली पाहिजे भक्तिसप्रदायातील भक्त किंवा जीव स्वतःकडे स्त्रीची भूमिका घेतो आणि परमेश्वरास पुरुष कल्पितो. सूफीचें तत्त्वज्ञान त्याविरुद्ध आहे. सूफी सत किंवा जीव स्वतःकडे पुरुषाची भूमिका घेऊन परमेश्वरास 'स्त्री' समजून तिची आराधना करतो. भक्तिसंप्रदायात विरहिणीची प्रेमभावना असते तर सूफीसप्रदायातील जीव प्रेयसीच्या म्हणजे परमात्म्याच्या प्रेमासाठीं तळमळत असतो म्हणून 'पुरुषाच्या प्राप्तीसाठीं तळमळणारी स्त्री' असें सूफींच्या भावनेचें जें स्वरूप प्रा फाटकानीं सागितले आहे तेंच चुकीचें आहे 'मृगावत' आणि 'पद्मावत' या हिंदी सूफी काव्याचा प्रा फाटकानीं जो उल्लेख केला आहे त्यातहि अशीच भूमिका आढळते.

सारांश, चद्रच परप्रकाशित असल्याने तो सूर्यास प्रकाश देतो या म्हणण्यात जेवढा हेत्वाभास आहे तेवढाच सूफी वाङ्मय भारतीय भक्तिपथास परिणामित करतें असें म्हणण्यात आहे. भारतीय तत्त्वज्ञानाच्या परिणामानें सूफीसप्रदायाचा उदय झाला. मुसलमानी राज्यकर्त्याबरोबर सूफी सत भारतात आले फाटक म्हणतात त्याप्रमाणें त्यानीं धर्मभेद मिटविण्याचें कार्य मुळीच केलें नसून आपल्यात आणि हिंदूत फारसा भेद नाहीं असा प्रच्छन्न प्रचार करून हिंदूना मुसलमानी धर्मांत ओढण्याचें राजकारण

मुसलमानी बादशहाच्या पाठिंब्यानें सूफी खेळले आहेत अशी फारसी व उर्दू भाषेंत या सतासबधानें लिहून ठेवलेल्या इतिहासाची साक्ष आहे.



## २. टीपा


१ Under Hill, Mysticism, P 82

२ प्रा न र फाटक, **एकनाथ वाङ्मय व कार्य**, पृ १०६

३. Dixitar V. R , *Purana Index* Vol I. Introduction, P 29

४ Radhakrishnan (Ed), History of Philosophy Eastern and Western Vol II P 183 'Sufism'

५ रानडे रा द **सतवचनामृत**, क्र ३९ व ४०

६ Subhan, Sufism Saints and Shrines, P 17, 119, 132 etc

Dr Grierson, Encyclopaedia of Religion and Ethics, Vol II 'Bhakti Marga'

७ "The whole of Sufism rests on the belief that when the Individual Self is lost the Universal Self is found or in religious language that ecstacy affords the only means by which the Soul can directly communicate and become united with God–" Nicholson, *Mystics of Islam*, P. 59




# ३. गीता आणि एकादशस्कंध

श्रीमद्‌भगवद्‌गीता आणि श्रीमद्‌भागवताचा एकादशस्कध यात तत्त्व ज्ञानाच्या दृष्टीनें विलक्षण साम्य दिसून येतें. तत्त्वज्ञान आणि तत्त्वनिश्चय या दृष्टीने विचार केला असता एकादशस्कध ही गीतेची सुधारून वाढविलेली आवृत्ति आहे असेंच वाटते

ज्ञान, ध्यान, कर्म आणि भक्ति या योगाचें विवरण एकादशस्कधात गीतेच्याच आधारानें करण्यात आलें आहे निष्काम-कर्मयोगाच्या भूमिके-वरून गीतेनें उपरोक्त योगाचा विस्तार केला आहे तर भागवताने भक्ति-योगाच्या भूमिकेवरून या योगाचें विवरण केलें आहे एवढाच काय तो फरक आहे. परमेश्वरार्पणपूर्वक कर्म केल्यास कर्मबधनाच्या अतीत होता येतें हे महान्‌ सूत्र दोन्ही ग्रथात समान आहे त्यामुळे ज्ञानी, भक्त, साधु, कर्मयोगी याचीं लक्षणें दोन्ही ठिकाणी सारखीच आली आहेत काही श्लोक व श्लोकार्ध गीतेतून जसेच्या तसेच एकादशात उद्‌धृत करण्यात आले आहेत भागवतपुराणोक्त भागवतधर्मात विचाराच्या दृष्टीनें असलेल्या साम्याचें विवरण करण्यात आलें आहेच या ठिकाणी आणखी काहीं समान स्थळाचा निर्देश करण्यात येत आहे :

| भगवद्‌गीता | | एकादशस्कंध |
|---|---|---|
| अध्याय–श्लोक | | अध्याय–श्लोक |
| ४– यत्करोषि० | कायेन वाचा. | २–३६ |
| | | ३–२८ |
| ४–१६–१७ किंकर्म० | – | ३–४२ |
| ४–८ – | – | ५–५० |
| ६–५ व ६ | | ७–१९ व २० |
| ६–२९ | | ६–२९ |

| भगवद्गीता | एकादशस्कंध |
| --- | --- |
| अध्याय–श्लोक | अध्याय–श्लोक |
| ४–१६–१७ | ७–८, ८–५ |
| १६– दैवीसंपत्ति | ११–२९ ते ३१ |
| १८–१५ | ११–३३ |
| १८– गुणत्रय विभाग | १३–१ ते ५ |
| ६–१२, १३ | १४–३२ |
| १० विभूति योग | १६– विभूतियोग |
| २–६२, ६३ | २१–१९ ते २१ |
| २– यामिमा० | २१–२६ ते ४३ |
| ९–२६ | २७–१७ |
| १८–४२ | १७–१६ |
| १८–४२ ते ४४ | १७ वर्ण-धर्म |
| १४–१८ | २५–२१, २२ |

---

# ४. चौंडरसकृत पंढरीवर्णन

कानडी कवि चौडरस यानें केलेल्या पढरीच्या वर्णनाचा उल्लेख ९ व्या प्रकरणात आला आहे या वर्णनाचा काहीं भाग पुढें देण्यात येत आहे.

पाडुरगाचा आपल्या काव्यात प्रथम उल्लेख करणारा प्राचीन कानडी कवि रुद्रभट. त्यानें ‘जगन्नाथ-विजय’ नामक ग्रथात जगन्नाथ हाच पाडु-रग आहे असे वार्णिलें आहे त्यानतरचा कवि चौडरस इ. स चें तेरावें शतक हा त्याचा काळ मानला जातो दण्डीच्या ‘दशकुमारचरिता’चे ‘अभिनवदशकुमारचरिते’ या नावानें त्यानें कानडींत रूपातर केलें आहे या ग्रंथाच्या १४ व्या अध्यायात विश्रुतनामक राजकुमार पढरपुर पाहिल्याचे वर्णन करतो. पढरीचें क्षेत्र आणि भीमेवरून विठ्ठलमदिरास जाताना मार्गा-वर आढळणाऱ्या सर्व देवता याचें वर्णन या सदर्भात चौडरसानें दिलें आहे

## पंढरीक्षेत्र

अनुपमेय असें पाडुरगक्षेत्र असून याठिकाणी सर्व मगलाचें मगल अवतीर्ण झालें आहे असें सागून चौंडरस म्हणतो :

> हरिपदसगम विविधमोक्षवधूनवनृत्यरगम्
> परमदयाग सुखसुधाब्धितरगमनुग्रपापसि
> धुरमदभग भुवनमगलगेहमृदग
> स्थिरगिरिश्रृग भरीदैनंदिरे ॥

‘हरिपदाचा सगम याठिकाणीं झाला आहे मोक्षरूपी सुदरीचें ते नृत्यस्थान आहे दयेचा संगम, सुखामृतोदधीचा तरग, मदोन्मत्ताचा मदभग कर-करणारें स्थान, मगलाचे आश्रयस्थान आणि शाश्वताच्या गिरीचें शृग असें पंढरपुर आहे.’

अवर्णनीय सौंदर्य असलेल्या या क्षेत्राची मनोहारिता कोठवर वर्णावी ?

समस्तदेवतासदन अनततीर्थनिलय सकलोत्तम–
भूमि विष्णुमेच्चिदमने लोकलोचनमनोहरम्
आगमशास्त्रकोटिपुट्टिदनेले पाडुरग मदनगेडे

'सर्व देवतांचें सदन, अनत तीर्थांचें निलय, सर्वोत्तम भूमि, विष्णु-प्रिय स्थान, आगमाचें जन्मस्थान, शास्त्राची जन्मभूमि, मदनाचें क्रीडाक्षेत्र असलेलें हे क्षेत्र लोकलोचन-मनोहर आहे'

भक्ताना अभिमत फल देणारा कृष्ण राजा गोपालासह क्रीडा करताना ती तशीच सोडून देऊन विठ्ठलरूपानें या क्षेत्रावर अवतीर्ण झाला.

तापी पयोष्णि, नर्मदा, सुरगगा, सुगौतमी, तुगभद्रा, कावेरी या सर्व नद्यापेक्षा भीमानदी श्रेष्ठ आहे 'हरिसनिधान उर्वीवलय' अशी या नदीची ख्याती आहे. आपल्या सौंदर्यानें तळपणारी ही सुरगगा 'सत्पाडुरगके सुदर्पणम्' – पाडुरगाचा प्रत्यक्ष आरसाच आहे.

## पंढरीच्या वाटे –

युगानुयुगे तपश्चर्या करणाऱ्या ऋषींना जो परमात्मा भेटला नाहीं तो मी पढरीच्या क्षेत्रावर डोळ्यानीं पाहिला भागीरथींत स्नान करून उल्ह-सित अतःकरणानें मी निघालो देवळाच्या प्राकारात एक प्रचड लिंबाचा वृक्ष आहे त्याच्या उन्नत शाखा अतराळात तेजानें तळपत असतात. या वृक्षाखालून जाणारा मार्ग म्हणजे पुण्यरूपी वधूचाच मार्ग पापरूपी मृगा-च्या मरणाची वाट ती हीच या वृक्षाच्या पुढें गेल्यानतर 'विठ्ठलाचे पादपयोजयुग्म' अचल दृष्टीनें पाहणाऱ्या गरुडाचें दर्शन झालें. गरुडा-नतर दर्शन झालें तें विनायकाचें:

नीररत्नालकृत परमहस्त शूर्पकर्णद्वय रदैनक
नवरक्तचदनविलिप्ताग गजास्य वरप्रद विनायक

वदिल्यानतर भैरवास वदन केलें :

ज्वलनाक्ष क्रूरदष्ट्राप्रहसितवदन कुडल रुडमाला–
गलमुभ्राहींद्रहार डमरुगविलसच्छूलकापालखड्गा–
विलस्त क्षुद्रघटांचितजघनतढ रजिसल क्षेत्रपालम्–

अग्निवर्षाव करणारे डोळे, क्रूर द्रष्ट्रा, स्मितवदन, रुडमाला, सर्परत्नांचा हार, डमरु, शूल याना धारण करणारा क्षेत्रपाल' वदिल्यानतर 'विठ्ठल राय गृहात' प्रवेश केला.

## विठ्ठलराय गृह

अभिनवरत्न तोरणामनेकलसत् कलश गरूत्मव–
छभन पताक वैष्णवजयध्वनि निर्मलाभित्तिका सुधा–
प्रभे नव धूपधूमलते मगलवारक गेय नर्तकी–
रमसनारत मेरेवा विठ्ठलरायगृह विराजिकुम्–॥

अनेक रत्नाच्या योगानें विलसणारें, गरुडपताकानीं शोभणारें, निर्मल सुधे-प्रमाणें असलेल्या भिंतीनी सुशोभित दिसणारे, वैष्णवाच्या जयध्वनीनें दुमदुमणारें, धूपानें घमघमींत झालेलें, आणि मगलवाद्य व नर्तन यानी सतत निनादणारें असे तें विठ्ठलरायाचें घर दृष्टीस पडलें'

## साजरें हें रूप

प्राकार–प्रदक्षिणा केल्यानंतर 'भुवनके सततं जीवनमपप्रतिष्ठिसुवा'– विश्वाचें जीवन सुप्रतिष्ठित करणारी विठ्ठलरायाची राणी रुक्मिणी हिचे चरण वंदून पाडुरगाच्या दर्शनास गेलों. देवकन्यकासारख्या दिसणाऱ्या चद्रमुखी तारकासमान पुष्पानीं पाडुरंगाचें अर्चन करीत होत्या पाडुरगा-च्या दर्शनानें अष्ट सात्विक भाव जागृत झाले व अनिमिष नेत्रानीं त्याचें सौंदर्य डोळयात साठविण्याचा प्रयत्न मी करूं लागलो

वरमुकुट मुगल्नगे तुळुकुव मुद्दुमोग जनमनो–
हर कुडल .
स्थिरमेनलिङ्गहस्तयुगल पोसगोवल गीलनिलीनस–
च्चरणसरोरुह मेरेवा चनिग विठ्ठलरायनोप्पिदम्–
नवमेघच्छविमैघे मदहसित वक्त्रके शखनवी–
नवेनलकामकरके सत्कटिगे सत्पाणीद्वय पादप–
ल्लवयुग्मके नेगलके इदिगे लसन् सौंदर्यभाग्य सम–
स्त विशेष स्सुदायशोभे यशेयलक दोप्पिद विठ्ठलम्

सुंदर मुकुट, मदस्मित, आपादमाला धारण करणारी प्रेममयी मूर्ति नवमेघासारखी सुदर दिसत होती विटेवर असलेले हे परब्रह्म दोन्ही कर कटेवर ठेवून स्थिर उभें होते'

चौंडरस हा पाडुरगाचा एकनिष्ठ भक्त होता 'अभगाविठ्ठलभृत्य' असा स्वत च्या नावाचा उल्लेख तो या काव्यात करतो प्रत्येक आश्वासा-च्या समीप्तिलेखातहि आपण विठ्ठलभक्त असल्याचा निर्देश त्यानें केला आहे :

निखिलबुधजन मनोवनजवनदिवाकरकिरण –
प्रतिमप्रसन्न श्रीमद्‌भगविठ्ठलपदाभोजमत्त –
मधुकरमधुसूदननदनसरसकविचौंडराज –
विरचितमप्पअभिनवदशकुमारचीरिते –

—०—

# ५. शांकर वेदान्त आणि ज्ञानेश्वर

एक सवत्सर–चक्र उलटले तरी या विषयावर अद्यापहि चर्चा चालूच आहे आजहि ही चर्चा निर्णायक अवस्थेत आहे असें म्हणता येत नाही या विषयासबधानें आज दोन प्रमुख विचारप्रवाह आहेत. ज्ञानेश्वर हे शाकरमतानुयायी होते असे प्रतिपादणारा आणि या विचारसरणीशी सहमत नसणारा दुसऱ्या विचारसरणीची मतें स्फुट लेखाच्या रूपानें नियतकालिकातून वेळोवेळी प्रसिद्ध झाली आहेत पहिला विचार-प्रवाह स्फुट लिखाणाच्या रूपानें आणि डॉ पेंडसे याच्या प्रदीर्घ प्रबधाच्या स्वरूपात प्रकट झाला आहे 'ज्ञानेश्वराचे तत्त्वज्ञान' या अभ्यासपूर्ण प्रबंधानतर डॉ पेंडसे यानीं कौशिक व्याख्यानमालेंत दिलेल्या व्याख्यानात देखील ज्ञानेश्वर हे शाकरमताचे अनुयायी होते हे आपले मत आग्रहानें माडलें आहे

कित्येक वर्षे चालू असलेल्या या खडन–मंडनात्मक चर्चेचा अभ्यास केला असता शाकर वेदान्त आणि ज्ञानेश्वराचे सिद्धात याचा तौलनिक अभ्यास निर्लेप अत.करणाने न होता विशिष्ट मताचा पुरस्कार करण्यासाठीच तो होत असावा असें वाटू लागतें शाकर वेदान्त आणि ज्ञानेश्वरी यातील साम्य आणि विरोध स्पष्ट करून दाखविण्यासाठी गीतेच्या किती श्लोकाचा अर्थ दोघानी सारखा दिला आहे अथवा कोणत्या श्लोकाच्या अर्थात विरोध आहे यावर बराच भर देण्यात येतो. तत्त्वज्ञानात असलेले साम्य वा विरोध दाखविताना केवळ अर्थाच्या साम्यावर भर देणें अयुक्त आहे असें आम्हास वाटते उदाहरणार्थ, डॉ पेडसें यानीं 'ज्ञानेश्वरानीं शंकराचार्यांचें अनुसरण केलें' हे सिद्ध करण्यासाठी शाकरभाष्य आणि ज्ञानेश्वरी यातील २१८ स्थळाची तुलना केली आहे तुलनेचा निष्कर्ष त्यानीं पुढील प्रमाणें दिला आहे

‘ १४६ ठिकाणीं शंकर व ज्ञानेश यानीं तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें सदृश अशी टीका लिहिली आहे ६८ ठिकाणी शंकराचा आणि रामानुजाचाहि अर्थ न घेता ज्ञानेशानीं स्वतंत्र अर्थ केले आहेत ३८ ठिकाणी तर निर्गुणमायावादपर अर्थ शंकरापेक्षाहि पुढे जाऊन किंवा त्याच्यापेक्षा स्पष्ट केले आहेत. एका ठिकाणीं शंकराचा अर्थ सोडून रामानुजाचा अर्थ स्वीकारला आहे ’ यावरून त्याचा निर्णय असा की, **‘ तत्त्वज्ञानच्या दृष्टीने शंकराना विरोधी असे एकहि स्थळ– (ज्ञानेश्वरींत) नाहीं ’**[1]

प्रश्न असा निर्माण होतो की शंकराचार्यांचें गीताभाष्य आणि ज्ञानेश्वरी या ग्रंथातील काही ठिकाणच्या साम्यावरून ज्ञानेश्वरानीं शंकराचार्यांचें अनुसरण केलें असा निर्वाळा देणे युक्त ठरतें काय ? केवळ अर्थसाम्य ही तत्त्वज्ञानाच्या एकात्मकतेची निर्णायक कसोटी ठरविता येईल काय ? दोन्हीं भाष्ये गीतेवरच लिहिली असल्यानें दोन्ही ग्रंथात बऱ्याच ठिकाणी अर्थसाम्य आढळून येणें अपरिहार्य आहे तत्त्वज्ञानाचें साम्य तत्त्वज्ञानाच्याच भूमिकेवरून तपासणें अगत्याचे ठरतें गीतेंतील प्रतिपाद्य विषय . कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग : याच्यासंबधीं आचार्य आणि ज्ञानेश्वर याची भूमिका सारखीच आहे काय ? तसें असेल तर एक उपोद्बलक प्रमाण म्हणून फार तर अर्थसाम्याचा उल्लेख करता येईल केवळ काहि ठिकाणचे अर्थसाम्य ज्ञानेश्वरानी शंकराचार्यांचें अनुसरण केलें हे सिद्ध करण्यास पुरेसे प्रमाण ठरणार नाही.

गीतेंतील प्रतिपाद्य विषयासंबधानें शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर यानीं व्यक्त केलेल्या विचारसरणीचा अभ्यास केला असताना “तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें –(ज्ञानेश्वरींत)- शंकराच्या विरोधी असे एकहि स्थळ नाहीं ” असा निर्वाळा देणें बरेच धाडसाचें ठरेल असें वाटतें दोघेहि अद्वैत तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते होते हें सर्वमान्य आहे परंतु, अद्वैताचा पुरस्कार प्रथम शंकराचार्यांनीच केला असे नाही शंकराचार्यांच्याहि पूर्वी कित्येक शतके ही विचारसरणी उपनिषदानीं मांडली आहे विशिष्टाद्वैत, द्वैत, द्वैताद्वैत इत्यादि अद्वैताशीं द्वैत राखणारे रामानुजप्रभृति आचार्य पुढें आल्यानंतर शंकराचार्यांचें नाव अद्वैताशीं अपरिहार्यपणें निगडित झालें.

आचार्यांनी ही विचारसरणी हिरिरीनें माडल्याकारणानें अद्वैत म्हणजे शकराचार्य आणि शकराचार्य म्हणजे अद्वैत असा समज रूढ झाला. तथापि, दोघे केवळ अद्वैताचे पुरस्कर्ते होते म्हणून दोघाच्या विचार-सरणींत साम्य आहे असा सिद्धात माडता येत नाहीं म्हणूनच गीतेतील कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग यासबधी दोघानीं स्वीकारलेली भूमिका सारखीच होती काय याचा शोध घेणे अगत्याचें ठरतें

## कर्मयोग आणि शंकराचार्य

गीतेनें कर्मयोगाचा पुरस्कार केला आहे किंवा नाहीं, हा स्वतंत्र चर्चेचा गहन असा विषय असून प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें तो अप्रस्तुतहि ठरेल शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर यानी यासबधी माडलेली मते एकाच स्वरूपाचीं आहेत किवा नाहींत याचाच विचार या ठिकाणी करावयाचा आहे आपल्या भाष्याच्या प्रस्तावनेंत आचार्यांनी पुढील उद्‌गार काढले आहेत 'सक्षेपानें या गीताशास्त्राचें प्रयोजन परमकल्याण अर्थात् कारणसहित ससाराची अत्यत उपरति हे आहे. हे परम कल्याण सर्वकर्मसन्यासपूर्वक आत्मज्ञान निष्ठारूप धर्मानें प्राप्त होतें.[२]'

आचार्यांच्या कर्मयोग सिद्धान्ताचे हे सार आहे असें म्हणावें लागेल. दुसऱ्या अध्यायातील २१ व्या श्लोकाचें स्पष्टीकरण आचार्यांनीं पुढीलप्रमाणें केले आहे

'ज्ञात्यास सर्व कर्मे असभवनीय आहेत. शास्त्रविहित कर्में केवळ अज्ञान्यासाठी आहेत. म्हणून ज्ञानी व मुमुक्षूसाठीं कर्मसन्यासाचाच अधि-कार आहे, कर्माचा नाही असे गीतशास्त्रात सागितलें आहे...[३] तिसरा अध्याय वस्तुत कर्मयोगाचा. परतु, या अध्यायातदेखील आचार्यांनीं जागोजाग कर्मसन्यासाचें प्रतिपादन केलें आहे 'भगवतानीं अर्जुनास कर्म कर असें सागितलें. परतु त्यायोगे तुला मोक्ष मिळेल असें मात्र सागितलें नाही[४]' असा युक्तिवाद या अध्यायात त्यानीं केला आहे 'मोक्ष हा अकार्य म्हणजे स्वतःसिद्ध असल्याने त्यासाठीं कोणत्याहि कर्माची आवश्य-कता नाहीं म्हणून मुमुक्षूसाठी सर्व कर्म निरर्थक आहेत याच कारणासाठीं सन्यासात कर्म विहित नाही अत एव ज्ञान-कर्म-समुच्चयसुद्धा अयुक्तच

ठरतो .. म्हणूनच ज्ञानानेंच मोक्ष मिळतो हा अर्थ गीता व उपनिषदें यानीं सुनीश्चित केला आहे.' असें तिसऱ्या अध्यायात सांगितल्यानंतर अठराव्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकावरील भाष्यात आणि गीताशास्त्राचा उपसंहार करताना हीच विचारसरणी आचार्यांनीं मांडली आहे[५]

१८ व्या अध्यायात दुसऱ्या व तिसऱ्या श्लोकावरील भाष्यात आचार्यांनीं पुढीलप्रमाणें पूर्वपक्ष केला आहे 'नहि देहभृता शक्य त्यक्तुं कर्माण्यशेषतः' या श्लोकावरून स्वरूपतः कर्मसंन्यास अशक्य आहे असेंच दिसून येतें म्हणून कर्मफलत्याग हाच खरा संन्यास नव्हे काय?' आचार्यांचा यावर उत्तरपक्ष असा : 'हे म्हणणें बरोबर नाहीं फलत्यागाच्या स्तुतीसाठीं वरील वचन आलें आहे ज्याप्रमाणें 'त्यागाच्छांतिरनंतरम्' हे वचन अनेक साधनाचें अनुष्ठान करण्यास असमर्थ असलेल्या अज्ञास म्हणजे अर्जुनास त्यागाची स्तुती करण्यासाठीं सांगण्यात आलें आहे . संन्यास आणि त्याग याचा विकल्प केवळ कर्माच्या अधिकाऱ्यासाठीं म्हणजे अज्ञासाठीं आहे. जे यथार्थ ज्ञानी आहेत त्याना सर्वकर्मसंन्यासरूप ज्ञाननिष्ठेचाच अधिकार आहे'[६]

याच अध्यायात गीतेच्या ६६ व्या श्लोकावर भाष्य करताना आचार्य म्हणतात, '...ज्ञान हे अज्ञानाचा नाश करणारें असल्यामुळे त्याचा कर्माशीं विरोध आहे अंधारच अंधाराचा निवर्तक ठरत नाहीं... म्हणून ज्ञान हेंच मोक्षाचें साधन आहे . कर्म शास्त्रविहित असलें तरी तें अविद्यावतासाठीं आहे. ज्ञात्यासाठीं नाहीं – 'अविद्वद्विषय कर्म, विद्वद्विषयाच। सर्वकर्मसंन्यासपूर्विका ज्ञाननिष्ठा'[७]

वर उल्लेखिलेल्या आचार्यांच्या कर्मयोगविषयक सिद्धाताच्या आधारानें त्याचे या विषयासंबंधींचे सिद्धात सूत्ररूपानें पुढीलप्रमाणें मांडता येतील.

१. शास्त्रविहित कर्मासह सर्वच कर्म अज्ञानी अवस्थेंत संभवतें चित्तशुद्धीसाठीं कर्माची आवश्यकता असते. परंतु मुमुक्षु आणि ज्ञानी अवस्थेंत मात्र सर्वकर्मसंन्यासच विहित आहे.

२ कर्म अज्ञनजन्य असल्यानें त्यानें मोक्ष मिळत नाहीं मोक्ष ज्ञानानेंच मिळतो.

३. अंधार आणि प्रकाश एकत्र नांदू शकत नाहींत, त्याप्रमाणेंच ज्ञान

आणि कर्म एकत्र राहू शकत नाहीत

४. म्हणून सर्वकर्मसन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठा हीच ज्ञात्यास विहित आहे.

## ज्ञानेश्वर आणि कर्मयोग

आचार्यांच्या कर्मयोगविषयक वरील सिद्धाताच्या पार्श्वभूमीवर ज्ञानेश्वराचे कर्मयोगविषयक सिद्धात अभ्यासिले असताना उभयताच्या मतातील साम्यापेक्षा विरोधच अधिक प्रत्ययास येतो.[८] ज्ञानेश्वरीच्या दुसऱ्या अध्यायात विहित कर्म सोडू नये असा स्पष्ट उपदेश ज्ञानेश्वरांनीं केला आहे :

आम्हीं समस्तही विचारले तव ऐसेची मना आलें
जें न साडिजे तुवां आपुलें विहित कर्म
परी कर्मफळीं आस न धरावी ' आणि कुकर्मीं सगती न व्हावी
हे सत्क्रियाचि आचरावी हेतुवीण
देखे जेतुलें कर्म निपजें तेतुलें आदि–पुरुषीं समर्पिजे
तरी पूर्णपण सहजें जाहलें जाणें ज्ञा २–२६५, २६६, व २६९

'नैष्कर्म्य म्हणजे फलाशाविरहित कर्म' असा अर्थ ज्ञानेश्वरानीं अनेक ठिकाणीं दिला आहे शकराचार्यांचा याच पदाचा अर्थ भिन्न आहे 'निष्कर्मभाव म्हणजे कर्मशून्यता' असा नैष्कर्म्य या पदाचा अर्थ आचार्यांनीं गीता, ३–४ वरील भाष्यात दिला आहे सर्व कर्माचा स्वरूपतः त्याग करून नैष्कर्म्य साधावें अशी आचार्यांची भूमिका आहे तर फलाशेचा त्याग करून किंवा परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करून नैष्कर्म्य साधता येतें असा ज्ञानेश्वराचा सिद्धात आहे हा भेद लक्षात घेतला म्हणजे ज्ञानेश्वरानीं शकराचार्यांचे अनुसरण केले या मताचा स्वीकार करता येत नाहीं

मोक्ष कर्मांच्या योगानें प्राप्त होत नाही उलट त्यासाठी सर्वकर्मसन्यासच केला पाहिजे हे मत ज्ञानेश्वराना मान्य नाही अधार हा अधाराचा निवर्तक होऊ शकत नाहीं त्याचप्रमाणें कर्म मोक्षाचे साधन ठरू शकत नाही हें शकराचार्यांचें मत ज्ञानेश्वरानीं स्वीकारलें नाहीं ज्ञान हें मोक्ष-प्राप्तीचें श्रेष्ठतम साधन आहे हें ज्ञानेश्वरांनीं मान्य केलें असलें तरी ज्ञान हेंच एकमेव साधन आहे असें प्रतिपादन ज्ञानेश्वरीत आढळत नाही उलट, कर्मानेंदेखील मोक्ष मिळतो असा त्याचा सिद्धात आहे. ज्ञानमार्ग व कर्ममार्ग हे

अंधार-प्रकाशाइतके परस्परविरोधी नसून शेवटी ते एकाच स्थळास नेणारे आहेत असें तिसऱ्या अध्यायात ज्ञानेश्वर सागतात .

हे मार्गु तरी दोनी परी एकवटती निदानीं
जैसी सिद्ध-साध्य भोजनी तृप्ति एक
तैसे पा विहगमतें अधिष्ठून ज्ञानातें
साख्य सद्य मोक्षातें . आकळिती
येर योगिये कर्माधारे सविहितेनि निजाचारें
पूर्णता अवसरें पावते होती ज्ञा ३–३८ व ४३–४४

ज्या श्लोकातील नैष्कर्म्य या पदाचा अर्थ कर्मशून्यता असा शंकराचार्यांनीं केला आहे त्याच तिसऱ्या अध्यायातील चौथ्या श्लोकावर टीका लिहिताना ज्ञानेश्वर म्हणतात : 'नैष्कर्म्य म्हणजे कर्मशून्यता नव्हे या पदाचा असा अर्थ करणें मूर्खपणाचें आहे.'

कीं प्राप्त कर्म साडिजे एतुलेनि नैष्कर्म्य होइजे
हें अर्जुना वाया बोलिजे मूर्खपणें
जया नैष्कर्म्यपदीं आस्था
तया उचित कर्म सर्वथा त्याज्य नोहे
. म्हणोनी सग जव प्रकृतीचा तव त्याग न घडे कर्मांचा
ऐसिया करू म्हणती तयाचा आग्रहोचि उरे
म्हणोनि जें जें उचित अवसरेंकरोनि प्राप्त
तें कर्म हेतुरहित आचरें तू
पार्था आणिकही एक तू नेणसी कवतिक
जें ऐसें कर्म मोचक आपैसें असे – ज्ञा ३–४७, ५०, ७८, ७९

कर्म मोचक आहे इतकेंच नव्हे तर कर्मशून्यता असभवनीय आहे असा ज्ञानेश्वराचा सिद्धान्त वरील ओव्यात प्रतिबिंबित झाला आहे शंकराचार्यांच्या सिद्धान्ताशी तो जुळता नाही हे उघडच आहे कर्मयोग हा अज्ञानी माणसाकरिता आहे, ज्ञात्याकरिता नाहीं असा उल्लेख गीता ३-३ वरील शांकरभाष्यात आला आहे याउलट, ज्ञानेश्वराचें म्हणणें आहे ज्ञानी झाला तरी विश्व मोहरे लावण्यासाठीं कर्मयोगाचा आश्रय करणें हे ज्ञात्याचें कर्तव्य ठरतें असें ज्ञानेश्वर सागतात ( ज्ञा. ३ १५५, १५८, १४९, १७१ ).

१२ व्या अध्यायात १२ व्या श्लोकावरील टीकेंत कर्मफलत्याग हा धुरेचा योग आहे असें ज्ञानेश्वराचें प्रतिपादन आहे, तर याच श्लोकावरील भाष्यात 'कर्मफलत्यागस्तुतिरिय रोचनार्था' अशी कर्मयोगाची पोकळ अर्थवादात शकराचार्यांनीं गणना केली आहे हेच मत आचार्यांनीं १८ व्या अध्यायात ३ ऱ्या श्लोकावरील भाष्यात माडलें आहे. आणि आश्चर्य हे की, नेमक्या याच श्लोकावरील टीकेंत ज्ञानेश्वरानी कर्मसन्यासवाद्याचा खरपूस समाचार घेतला आहे निष्काम कर्मयोगाची महती सागून ज्ञानेश्वर म्हणतात :

एका फलाभिलाष न ठके ते कर्माते म्हणती बधकें
जैसे आपण नग्न भाडके जगातें म्हणे
तैसें फलकाम दुर्बल म्हणती कर्मची किडाळ
मग निर्णय देती केवळ त्यजावें ऐसा
म्हणौनी फळीं लागू साडौनी देहसगू
कर्मे आचारावीं हा चागू निरोप माझा – ज्ञा १८–१३५, १३७, १७६

शकराचार्यांच्या मताचें निराकरण वरील ओव्यात स्पष्ट रूपात करण्यात आलें आहे, हे आचार्यांचीं अगोदर उल्लेखिलेलीं मतें लक्षात घेतलीं असता सहज ध्यानात येईल आचार्यांच्या मताचें भरदार खडन करणारें आणखी एक स्थळ अठराव्या अध्यायात आढळतें. 'कर्माच्या योगानें परमेश्वराची पूजा साधून मोक्षप्राप्ति साधावी, विहित कर्माचा त्याग करू नये, कारण, विहित कर्म हाच आपला अनन्य ओलावा आहे, सर्वात्मक ईश्वराची पूजाहि विहित कर्माच्या अनुष्ठानानें होतें (ज्ञा १८–९०६–७, १२४७, १२६१.)' – असें सागितल्यानतर अठराव्या अधयायातलि १२४७ पासून पुढच्या ओव्यात कर्माच्या योगानें क्रमाक्रमाने ज्ञान व भक्ति याचा उदय होऊन भक्त सायुज्याच्या पाटा कसा बसतो याचें वर्णन ज्ञानेश्वरानी केलें आहे. आणि शेवटीं विहित कर्माचा सन्यास करू नका असें निक्षून सागितलें आहे अठराव्या अध्यायातील ५५ व ५६ या श्लोकावरील टीकेंत ज्ञानेश्वरानीं हे विचार माडले आहेत. नेमक्या याच श्लोकावरील भाष्यात आचार्य म्हणतात : 'निरतर आत्मविषयक प्रतीतीच्या आग्रहास ज्ञाननिष्ठा म्हणावें. या ज्ञान निष्ठेचा कर्मनिष्ठेशीं विरोध आहे पूर्वसमुद्राकडे जाण्याची इच्छा करीत असताना पश्चिम समुद्राकडे जाण्यासारखाच हा प्रकार आहे. राई आणि

पर्वत याच्याप्रमाणें कर्म आणि ज्ञान याच्यात विरोध आहे. म्हणून सर्वकर्म-सन्यासानेंच ज्ञाननिष्ठा साधावी.'

उभयताच्या मतातील हा विरोध एवढा स्पष्ट आहे कीं, त्यावर अधिक भाष्य करण्याची आवश्यकताच नाहीं इतकेंच नव्हे तर कर्मसन्यासवादाचें निराकरण ज्या ज्या ठिकाणीं ज्ञानेश्वरानीं केलें आहे त्या त्या ठिकाणीं ते आचार्यांच्या मताचेंच निराकरण करीत आहेत असा एखाद्या अभ्यासकाचा ग्रह झाला तर तो निराधार आहे असें म्हणता येणार नाहीं कारण, कर्म-सन्यासाचें मडन ज्या ठिकाणीं आचार्यांनीं केलें आहे त्या ठिकाणीं निष्काम कर्मयोगाचें भरदार समर्थन ज्ञानेश्वरानीं केलें आहे असें आढळून येतें. तिसरा आणि अठारावा अध्याय या दृष्टीनें अभ्यसण्यासारखा आहे.

शकराचार्य आणि ज्ञानेश्वर याच्या संन्यासाच्या कल्पनेंत मूलभूत असा फरक आहे कर्मांचा स्वरूपत त्याग करावा यावर आचार्यांनीं भर दिला आहे. तर फलाशेचा मनानें त्याग म्हणजेच सन्यास होय अशी ज्ञानेश्वराची भूमिका आहे मनानें फलाशेचा त्याग असभवनीय आहे असें शकराचार्यांस वाटतें. 'मनानें सन्यास करून न कर्ता न कारयिता अशी अवस्था दाखविता येणेंच अशक्य आहे म्हणून सर्वकर्मसन्यास हाच ज्ञात्यास विहित आहे' (१८-३ वरील शाकरभाष्य) असें आचार्य सागतात. तर ज्ञानेश्वर म्हणतात :

जो मनें ऐसा जाहला सगीं तोची साडिला
म्हणौनी सुखें सुख पावला अखडित
आता गृहादिक आघवें न लगे त्यजावें
जें घेतें झालें स्वभावें नि सग म्हणवुनी
म्हणोनी कल्पना जै सांडे तैची सन्यासु घडे
इयेकारणें दोनी सांगाडे : सन्यासु योगु ' -ज्ञा ५-२१, २२, २५

## भक्तियोगांतहि विरोध

कर्मयोगासबधीं शकराचार्य आणि ज्ञानेश्वर याची भूमिका किती भिन्न आहे हे वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. उभयताचा विरोध केवळ कर्मयोगाच्याच क्षेत्रात आहे असे नाहीं भक्तियोगासबधी देखील तेंच

म्हणता येईल अद्वैतप्रतीतींत देखील भक्ति उरते अशी ज्ञानेश्वराची निष्ठा आहे तर भक्ति अद्वैत-प्रतीतीस बाधक असल्याची आचार्यांची भूमिका आहे त्याच्या दृष्टीने चित्तशुद्धीचें साधन या पलीकडे भक्तीस महत्त्व नाही 'सगुणोपासनेनें फार तर ब्रह्मलोक प्राप्त होइल मोक्ष मिळणार नाही ज्ञान हेच मोक्षाचें एकमेव कारण आहे' अशी शकराचार्यांची भक्तिविषयक विचारसरणी आहे.[९]

गीतेंत आलेल्या भक्तिविषयक वर्णनाचा शकराचार्यांनी "भजनं भक्ति" एवढाच अर्थ देऊन सक्षेप केला आहे तर ज्ञानेश्वराच्या वाणीस भक्ति-वर्णनाचे प्रसंगी भरती आल्याचें दिसून येतें[१०] भक्ति ही चौपुरुषार्थांच्या शिरीं आहे. मोक्षाच्या गावास जाणारी ती सरळ वाट आहे [राजवाडे ज्ञा ८-१९३), भक्तीनें न मरता मोक्ष मिळतो.भक्त परमेश्वरास फार अवडतो, भक्ताच्या ऋणातून मुक्त होण्यासाठी परमेश्वर त्याचें दास्य करीत असतो. भक्त परमेश्वररूप होत असला तरी त्याचें भक्तपण मोडत नाहीं आणि अद्वैतात देखील भक्ति उरते

तैसी क्रिया कीर न साहे तरी अद्वैतीं भक्ती आहे
हे अनुभवाची जोगे – नव्हे बोला ऐसें ज्ञा १८– ११५१,

ज्ञानेश्वराचा हा दृष्टिकोन लक्षात घेतला म्हणजे शंकराचार्यांचा भक्ति-विषयक दृष्टिकोन भिन्न आहे हे सिद्ध होतें. गीतेच्या सातव्या अध्यायातील १७ व्या श्लोकातील 'एकभक्तिः' या पदावर भाष्य करताना 'अन्यस्य भजनीयस्यादर्शनात्' एवढाच अर्थ शकराचार्यांनी दिला आहे याच श्लोकावर ज्ञानेश्वरानी विस्तृत भाष्य करून 'भक्त आणि परमेश्वराचें ऐक्य भक्तीनें घडतें तथापि, भक्ताचे भक्तपण मात्र मोडत नाही.' असा आशय प्रकट केला आहे (ज्ञा ७–११४–१६)

ज्ञानयोगासबधीचेहि दोन्ही आचार्यांचे मतभेद स्पष्ट करता येण्यासारखे आहेत मायावादासबधी देखील हाच निष्कर्ष निघतो. आचार्यांचा मायावाद आणि ज्ञानेश्वराचा चिद्विलासवाद एकच असल्याचें मत डॉ. पेंडसे यानीं व्यक्त-कलें आहे तें बरोबर आहे असें वाटत नाही. शकराचार्यांच्या भूमिकेप्रमाणें जग हे मिथ्या आहे माया ही ब्रह्माची उपाधि आहे तिच्यामुळें मिथ्या जगाचा अवभास होतो. ज्ञानेश्वरानी विश्व ही वस्तुप्रभा मानली आहे.[११] विश्व

परते सारून परमेश्वराचा शोध घेणे हा व्यभिचार आहे जग आणि ब्रह्म एकरूप आहे :

म्हणौनि जगा परौतें सारोनी पाहिजे मातें
तसा नव्हे उखिनें आघवा मीची – ज्ञा ६–१२७
. या कारणे भेदातें साडोनि अभेदचित्ते
आपणाया सकट मातें जाणावें गा – ज्ञा ६–३८२

ज्ञानेश्वराच्या प्रतिपादनात विश्व मिथ्या असल्याचा निर्देश नाहीं माया ही परमेश्वराची प्रभा असल्याचें वर्णन अमृतानुभवात आलें आहे (अमृ १–८, १-१८, १९, १–२५, १–४१ ७–२२६) म्हणूनच माया आणि परब्रह्म याच्या सबधाचें वर्णन करताना आचार्यांनी रज्जु-सर्प, शुक्ति-रजत यासारखे दृष्टात दिले आहेत तर ज्ञानेश्वरानीं सूर्य प्रभा, सोने-अलकार, जळ–तरग, गूळ गोडी, कापूर-सुगध, डोळे-दृष्टि, दीप–दीप्ति या सारखे दृष्टात दिले आहेत शकराचार्यांच्या दृष्टातात मायेचें अवभासात्मकत्व ध्वनित होतें तर ज्ञानेश्वराच्या दृष्टाताच्या योगानें परब्रह्म-मायेची एकरूपता व सत्यत्व ध्वनित होतें म्हणजे, शाकर अद्वैत आणि ज्ञानेश्वरोक्त अद्वैत हे जसें भिन्न तशीच आचार्योक्त माया व ज्ञानेश्वरोक्त वस्तुप्रभारूप माया ही देखाल विरोधी आहेत

उभयताच्या भूमिकेंत असलेला हा विरोध लक्षात घेतला म्हणजे ‘ शाकर मतास विरोधी असें एकहि स्थळ ज्ञानेश्वरींत नाहीं ’ हा डॉ पेंडसे याचा सिद्धात निराधारच ठरतो ज्ञानेश्वरानीं विश्वेश्वराइतकेंच विश्वाचें, ज्ञानाइतकेंच कर्माचें आणि भक्तीचें महत्त्व प्रतिपादिलें आहे म्हणूनच डॉ. पेंडसे याना ज्ञानेश्वराच्या वैशिष्ट्यासबधींचा निष्कर्ष काढताना स्वतःच्याच मताशी विरोध करावा लागला आहे [13]

> “ कर्मसहितत्व हा या (ज्ञानेशाच्या) भक्तियोगाचा विशेष आहे विहित कर्माचाहि सन्यास करून भक्तिमार्गाला लागलेले असे सन्यासयुक्त भक्तीचे जे इतर सप्रदाय आहेत त्याच्यापेक्षा ज्ञानेश्वराचा भक्तिसप्रदाय निराळा असण्याची जीं अनेक कारणें आहेत त्यापैकीं भक्तीला कर्माची जोड हे एक प्रमुख कारण आहे.”

वर केलेल्या विवेचनाच्या सदर्भात डॉ पेंडसे याच्या या निष्कर्षावर

अधिक भाष्य करण्याची आवश्यकताच रहात नाहीं संन्यासवादी संप्रदाय-हून ज्ञानेश्वराचा सप्रदाय निराळा आहे म्हणूनच शंकाराचार्यांचें अनुसरण ज्ञानेश्वरानीं केलें नाही ज्ञानेश्वर भागवतधर्मानुयायी होते भागवतधर्म कर्मसन्यासाचा पुरस्कार करीत नाहीं विश्वासह विश्वात्म्याची आणि भूतासह भगवताची आराधना करणें हेच भागवतधर्माचें ध्येय आहे.

● ●

## ५. टीपा

१ (जाड ठसा लेखकाचा) डॉ पेंडसे, **ज्ञानेश्वराचे तत्त्वज्ञान**, पृ १६६–६७

२ गीता, **शाकरभाष्य**, (गोरखपूर प्रत) प्रस्तावना

३ कित्ता, पृ ४४, ४५, ४८ ४ कित्ता पृ ७६

५ कित्ता, पृ ४०३, ४०७, ४५९, ४६१, ४६२, ४६६, ४६८

६ गीता, **शाकरभाष्य**, गोरखपुरप्रत, पृ ४९७–८

७ कित्ता, पृ ४५९, ४६१ ४६२ व ४६६–७ व ४६८

८ कर्म, विकर्म आणि अकर्म या गीर्तेतील पदाचा अर्थ आचार्य आणि ज्ञानेश्वर यानीं भिन्न दिला आहे हें विद्वानानीं मान्य केलें आहेच म्हणून त्याचें विवरण या ठिकाणीं केलें नाहीं तथापि, हा विरोधहि लक्षात ठेवण्यासारखा आहेच

९ ब्रह्मसूत्र १–२–४, ४–३–१, ४–१–४, ४–३–१५, वरील शाकरभाष्यात आचार्यांचा भक्तिविषय दृष्टिकोन स्पष्ट झाला आहे

१० **ज्ञानेश्वरी**, १८–८६७, ८–१९३, १२–१७६ इत्यादि ठिकाणीं ज्ञानेश्वराचा भक्तिविषयक दृष्टिकोन स्पष्ट झाला आहे **अमृतानुभवात** ९–२९, ३०, ३५, ४२ या ठिकाणींहि या विषयाचें विवरण आढळेल

११ **अमृतानुभव**, ७–२४५, ७–२८९,

१२ "विश्व हें ईश्वराइतकेंच सत्य असून तें परमेश्वररूपच आहे व तें भ्रामक नाहीं असा चिद्विलासवादाचा सिद्धात ज्ञानेश्वरानीं माडला हें जर निर्णित झालें तर शकराचार्यानतर अद्वैत वेदांताचा अधिक विकास झाला आहे असें एक ऐतिहासिक सत्य निदर्शनास येईल–" तर्कतीर्थ जोशी, दिल्ली साहित्यसंमेलनाचें अध्यक्षीय भाषण, पृ ३८

१३. **ज्ञानेश्वराचे तत्त्वज्ञान**, पृ. २२६.

—०—

# प्रमुख आधार-ग्रंथ

प्रस्तुत प्रबधात आधारादाखल घेतलेल्या प्रमुख ग्रथाचीच यादी याठिकाणी देण्यात येत आहे निरनिराळ्या नियतकालिकाचा त्या त्या स्थळींच तेवढा उल्लेख केला आहे या यादीत त्याचा समावेश केला नाहीं लेखक किंवा मपादक याच्या वर्णानुक्रमानें नावें देण्यात आलीं आहेत


१ Altekar A S *Rastrakutas and their times*, (1984).

२ Bhandarkar R. G *Shaivism, Vaishnavism and other Minor Religious* etc (1913).

३ Bhandarkar R G *Early History of the Dekan*, Calcutta : Chakravarti and Chatterji (1928)

४ Bhandarkar R G *Collected works of Dr Bhandarkar*, Vol III, Poona : Bhandarkar Oriental-Research Institute (1927).

५ Bloomfield, *Rigveda Repititions*, Harvard Oriental series Vol XX and XXIV

६ Cecil B Williams and Allon H Stevenson, *A Research Manual*, Newyork Harper and Brothers (Revised Edition 1951)

७ Dasgupta, *History of Indian Philosophy*, Vol I, II (1932) and III (1940) Cambridge : Cambridge University Press

८ Dasgupta, *Yoga as Philosophy and Religion*, New-york . Turner & co (1924)

९ Dauson, *The Philosophy of the Upanishadas*, Edinburogh Paul and Clerk (1919).

१० Dixitar V R *Studies in Tamil Literature and History*

११ Dixitar, I V R Ramchandra, *The Purana Index*, Vol I, Madras Madras University Press (1951)

१२ Farquhar J N *An outline of the Religious Literature of India* oxford University Press (1920)

१३ Griffith, *The Hymns of the Atharveda*, Vol I (1895) Vol II (1896), Benares : Laxarus and Co

१४ Griswold, *The Religion of the Rigveda*, Oxford University Press (1923)

१५ Habibullah, *The foundation of Muslim Rule in India*, (1945)

१६ Hooper, *Hymns of the Alvars*, Heritage of India series (1929)

१७ Hukkerikar (Ed), *Karnataka Darshan*, (1953)

१८ Iyangar S Krishnaswami, *The Early History of Vaishnavism in south India*, (1920)

१९ Iyangar, S Krishnaswami *South India and Her Mohmmadan invaders*, Oxford Oxford University Press

२० Jacob G A (Colonel), *Eleven Atharwana Upnishadas*, Bombay Sanskrit and Prakrit series Bombay Govt Central Press (second Edition 1916)

२१ Jha, Ganganath, *Yoga Darshana*, (1934)

२२ Kaegi, *The Rigveda : The Oldest Literature of the Indians*, (1896)

२३. Kane P V (Maha Mahopadhyaya), *History of Dharma Shastra* Vol I, (1930)

२४ Karmarkar and Kalamdami, *Mystic Teachings of Haridasas of Karnatak*

२५ Keay, *Hindi Literature*, Heritage of India series

२६. Macdonell, *Hymns of Rigveda*, Oxford University Press,

२७ Macdnell and Keith *Vedic Index of Names and Subjects*, Vol I and II, London Murray (1912)
२८ Macdonell (Ed ) *Brihad Devata Khanda of Sonaka*, Harward Oriental series
२९ Mackenzie, *Indian Myth and Legend*
३० Macnicol, *The Psalms of the Maratha saints*, Heritage of India series (1929)
३१ Macnicol, *Indian Theism*, Oxford University Press (1915)
३२ Max Muller, *Vedic Hymns*, Vol I, Secred Books of the East series, Vol XXXII
३३ Maxmuller, *History of Ancient Sanskrit Literature*, Allahahad Sharma (1925)
३४ Muir John, *Original Sanskrit Texts*, London : Truber & Co, Vol I (1868), Vol II (1871), Vol. III (1867), Vol IV (1863) Vol V (1870)
३५ Mujumdar R C *Ancient India*,
३६ Mujumdar R C and Raichoudhari Hemchandra, *An Advanced History of India* (1946)
३७ Mujumdar R C (Ed ) *The History and Culture of the Indian People* Vol. I and II (1952), Vol III (1954) Vol IV (1955) Bombay Bharteeya Vidyabhavan.
३८ Nicholson, *The Mystics of Islam*
३९ Oldenburg, *Vedic Hymns*, Vol II, Secred Books of the East series Vol XLVI
४० Pal Bipinchandra, *Bengal Vaishnavism*
४१ Pannikar K M (Sardar), *The Survey of Indian History* (1947)
४२ Pergiter F E *The Purana Text of the Dynasties of Kali Age*, Oxford· Oxford University Press (1913)
४३ Radhakrishnan Dr S *History of Philisophy Eastern and western*, Vol II, London : Geerge Allen and Unwin Ltd (1953)
४४ Radhakrishnan Dr S *Eastern Religions and Wes-*

